स्वल्प किंमतीची सुलभ-पुराण-ग्रंथमाला.

पुस्तक चौथें

# स्कंदपुराण

भाग २ रा.

लेखक,

**नरहर रावजी शास्त्री जोगळेकर.**

प्रकाशक

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी,**

जनरल प्रिंटर्स, पब्लिशर्स, कामिशन एजंटस् इ. इ. गिरगांवरोड, मुंबई, नं. २.

सन १९१६ इ.

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

## पुराणं पञ्चलक्षणम् ।

पुराणें म्हणजे प्राचीन लोकांनीं लिहून ठेविलेले सन्मार्गद्योतक ग्रंथ होत. '**पुराणे** प्रतनप्रत्नपुरातनचिरन्तनाः' ह्या संस्कृत कोषप्रमाणावरून पुराण म्हणजे पुरातन (जुन्या) कथांचा साठा ज्यांत आहे, असा ग्रंथ. सर्ग (तात्त्विक सृष्टीची उत्पत्ति) प्रतिसर्ग (सामान्यप्राण्यांची उत्पत्ति) वंश (सूर्यवंश, चंद्रवंश वगैरे) मन्वन्तरें (स्वायंभुवप्रमुख चौदा मनूंची माहिती) वंशानुचरित (जागोजागीं मोठमोठ्या अवतारी पुरुषांचीं चरित्रें) हे पांच प्रकार ज्यांत वर्णिले जातात, त्यास पुराण म्हणतात. एकंदर पुराणें चौपन आहेत; पैकीं महापुराणें अठरा, उपपुराणें अठरा; व उपोपपुराणें अठरा होत. ब्रह्मपुराण, पद्मपुराण इत्यादि अठरा महापुराणांपैकीं **स्कंदपुराण** हें चौदावें महापुराण होय. हें स्कंदमहापुराण एक्यांयशी हजार श्लोकात्मक आहे. ह्या पुराणाचीं अनुक्रमें माहेश्वर, वैष्णव, ब्राह्म, काशी, अवंती, नागर व प्रभास अशीं सात खंडें आहेत. हें पुराण फारच मोठें असल्यामुळें ह्याचे चार भाग कल्पिले आहेत. त्यांपैकीं माहेश्वर व वैष्णव हीं दोनच खंडें पहिल्या भागांत मराठींत भाषांतररूपानें पूर्ण केलीं आहेत. ह्या दुसऱ्या भागांत ब्रह्मखंड, काशीखंड व अवंतीखंडाच्या अंतर्गत असणारें अवंतीक्षेत्रमाहात्म्य इतकें भाषांतर ह्या दुसऱ्या भागांत घेतलें आहे. पुढें क्रमाक्रमानें अवंतीखंडाच्या अन्तर्गत असणारीं दुसरीं दोन खंडें म्हणजे चतुरशीतिलिंगमाहात्म्य व रेवाखंड आणि नागरखंड हीं खंडें तिसऱ्या भागांत घेणार आहों; व चवथ्या भागांत प्रभासखंडाचें भाषांतर प्रसिद्ध करून चार भागांत स्कंदपुराण पुरें करण्याचा आमचा विचार आहे. ह्या दुसऱ्या भागांत दोनशें पंच्याऐंशी अध्याय आले आहेत. ह्या भागांत शिवलीलामृतांतील कथा, काशीक्षेत्राचें माहात्म्य, उज्जैनीचें महत्त्व, सेतुबंधरामेश्वरासंबंधी माहात्म्यनिदर्शनपूर्वक कथा; वगैरे माहात्म्यें आलेलीं आहेत. त्यांचें सारभूत तात्पर्य येथें थोडक्यांत देतों.

स्कंदमहापुराणांत जीं एकंदर सात खंडें आहेत; त्यांपैकीं दोन खंडें पहिल्या भागांत गेलीं असल्यामुळें तिसऱ्या ब्रह्मखंडापासून ह्या दुसऱ्या भागाला प्रारंभ झाला आहे. ह्या तिसऱ्या ब्रह्मखंडाच्या अन्तर्गत तीन खंडें आहेत. तीं अनुक्रमें सेतुमाहात्म्य, धर्मारण्यखंड व ब्रह्मोत्तरखंड अशीं होत. ह्या तीनहि खंडांत म्हणजे संपूर्ण ब्रह्मखंडांत एकंदर अध्याय एकशें चौदा आहेत. अंतर्गत वर निर्दिष्ट केलेल्या तीन खंडांपैकीं पहिलें जें सेतुमाहात्म्य खंड त्याचें एकंदर अध्याय बावन आहेत. त्या बावन अध्यायांपैकीं पहिल्या दोन अध्यायांत सेतुबंध-

रामेश्वराच्या उत्पत्तीचीं कारणें दर्शवून रामचरित्र वर्णित केलें आहे. नंतर तीन ते छत्तीस अध्यायापर्यंत सेतुरामेश्वराच्या आसपास असणारीं चक्रतीर्थ, अमृतवापिकातीर्थ, ब्रह्मकुंड, हनुमत्कुण्ड, अगस्त्यतीर्थ, रामतीर्थ, लक्ष्मणतीर्थ अग्नितीर्थ, शिवतीर्थ, शंखतीर्थ यामुनतीर्थ, गंगातीर्थ, गयातीर्थ, कोटितीर्थ, मानसतीर्थ, साध्यामृततीर्थ; व धनुष्कोटितीर्थ वगैरे जीं चोवीस तीर्थें आहेत, त्यांचीं माहात्म्यें सांगण्याच्या उद्देशानें गालवचरित्र, विधूमाख्यान, दुर्गामाहात्म्य वगैरे भक्तिरसपरिप्लुत अशा अनेक कथा कुशलतेनें वर्णिल्या आहेत. त्या सर्व कथांचा साधारणतः ओघ असा आहे कीं, एकाद्या मनुष्यानें म्हणा; किंवा देवानें अथवा गंधर्वानें म्हणा एकाद्या ब्राह्मणाचा अपमान केल्यामुळें; व एकाद्याचा वध केल्यामुळें ब्राह्मणानें दिलेल्या अथवा देवतेनें दिलेल्या शापामुळें किंवा दुष्कृत्यामुळें प्राप्त झालेलीं पातकें धुवून टाकिण्याकरितां पश्चात्तापानें एकाद्या गुरूला शरण जावून त्यांनीं सांगितल्यावरून शिवाराधना करणें; व शिवरूपेनें स्वतः निर्दोष होऊन तेथें एकादें तीर्थ निर्माण करणें; व त्याचें माहात्म्य शिवानें स्वमुखानें स्वभक्ताजवळ कथित केल्यामुळें त्या स्थानाला महत्त्व प्राप्त होणें, इत्यादि गोष्टींचा गोषवारा बहुधा प्रत्येक तीर्थमाहात्म्यांत व क्षेत्रमाहात्म्यांत येत असतो. उदाहरणार्थ इंद्रानें वृत्रासुराला मारल्यामुळें त्याला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व तो तें धुवून काढण्याकरितां बृहस्पतीच्या सांगण्यावरून ब्रह्मकुंडांत स्नान करून पापमुक्त झाला. किंवा दुर्दमगंधर्वानें गालवाचा अपमान केल्यामुळें त्याला गालवानें शाप दिला; व नंतर तो दुर्दम धर्मतीर्थाला येतांच शापमुक्त झाला. अशातऱ्हेनें अनेक कथा वर्णिल्या आहेत, ह्या वरील कथानकावरून असें अनुमान होतें कीं, ऋषींनीं किंवा देवतांनीं दिलेले जे शाप ते शाप नसून एकप्रकारचे ऐश्वर्यवृद्धि करणारे अनुग्रहच होत. "**सुखपर्यवसायी दुःखमपि सुखमेव, तथैवानुग्रहपर्यवसायी शापोऽप्यनुग्रह एवेति निश्चेतव्यम्।**" ह्या संस्कृतोक्तीप्रमाणें ज्याचा शेवट चांगला आहे, असा शापसुद्धा सुखरूपच होय. असो. अशातऱ्हेनें छत्तीस अध्यायांत कथासंदर्भ व तीर्थक्षेत्रमाहात्म्यें सांगितलीं असून अश्रुतपूर्व म्हणजे वाल्मीकिरामायणांत किंवा अध्यात्मरामायणांतहि मिळणार नाहींत, अशा अनेक रामकथा ह्यांत सांगितल्या आहेत. आतां सदतीसाव्या अध्यायापासून तों चाळीसाव्या अध्यायांपर्यंत क्षीरकुंडाचें माहात्म्य, कपितीर्थमाहात्म्य व गायत्रीसरस्वतीतीर्थमाहात्म्यें वर्णिलीं आहेत. तसेंच मुद्गलानें केलेली यज्ञादि कृत्यें, तसेंच सवतीमत्सर वाढल्यामुळें कद्रू व विनता ह्यांची झालेलीं दुर्दशा, क्षात्रतेज श्रेष्ठ कीं ब्राह्मतेज श्रेष्ठ ह्याचा निर्णय व ब्रह्मदेवानें स्वकन्येशीं गमन केल्यामुळें त्याची झालेली फजिती इत्यादि कथाहि सुंदरत्वानें वर्णिल्या आहेत. ह्या वरील कथांवरून असें निष्पन्न होतें कीं, लहान असो किंवा मोठा असो, त्याला दुष्कृत्याचें दुःखद व सत्कृत्याचें सुखद असेंच

फल मिळणार. जरी ब्रह्मदेव कर्तुं–अकर्तुं–अन्यथाकर्तुं समर्थ आहे, तरी सुद्धां त्याला दुष्कृत्याचें फल सुखद न मिळतां दुःखदच मिळून लोकांत कमीपणा प्राप्त झाला. ह्या सर्व कथा औपदेशिक होत. अशाचतऱ्हेनें एकेचाळीस ते बावन अध्यायापर्यंत पापनाशक तीर्थमाहात्म्यें सांगून हें सेतुमाहात्म्य समाप्त केलें आहे.

आतां दुसरें धर्मारण्य खंड होय. ह्या धर्मारण्यखंडांत एकंदर अध्याय चाळीस आहेत. पैकीं पहिल्या चार अध्यायांत धर्मारण्याची व्याख्या करून हें अरण्य यमधर्मानें स्थापिल्यामुळें ह्यास धर्मारण्य म्हणतात, इत्यादि सांगितलें आहे. पांचव्या अध्यायांत सदाचाराचें वर्णन केलें आहे. सदाचार कशाला म्हणतात ! सदाचरण कसें करावें ? त्याचें फल काय ? वगैरे सप्रमाण सांगून तद्विरुद्ध वर्तन करणाराची परिस्थिती कशी दुःखदायक होते, वगैरे सांगितलें आहे. सहाव्या अध्यायांत ग्रहस्थाश्रमी पुरुषानें कसें वागावें, हें सांगितलें आहे. गृहस्थाश्रम्यानें कोणत्या धर्माचें कसें आचरण करावें, हेंहि सोदाहरण कथिलें आहे. सातव्या अध्यायांत पतिव्रताधर्म सांगितला आहे. पति व पत्नी ह्यांचें नातें कोणत्या योग्यतेचें आहे, परस्परांनीं आपआपलें वर्तन कसें ठेवावें, वगैरे पुष्कळ पतिपत्नी धर्म उपदेश घेण्याजोगे सांगितले आहेत. तसेंच विधवाधर्महि ह्याच अध्यायांत उपदेशिले आहेत; व कोणकोणतें दान ब्राह्मणाला दिलें असतां त्याचें फल काय मिळतें, हेंहि सांगितलें आहे. नंतर आठपासून तों बारा अध्यायापर्यंत धर्मारण्याची रचना व त्याच्या प्रतिष्ठापनेकरितां अनेक बंदोबस्ताच्या योजना कसकशा केल्या, त्याठिकाणीं कोणकोणत्या देवतेंची स्थापना केली, हेंहि शिव व कार्तिकस्वामी ह्यांच्या संवादरूपानें वर्णिलें आहे, तेराव्या अध्यायांत बकुलार्कमाहात्म्य वर्णन करण्याच्या निमित्तानें अश्विनौदेवतांची उत्पत्ति कथन केली आहे. चौदाव्यांत व पंधराव्यांत विष्णूच्या हयग्रीवनामक अवतारांचें वर्णन दिलें आहे. नंतर पंधरा ते वीस अध्यायापर्यंत श्रीमाताप्रमुख अनेक देवींची ( शक्तींची ) स्थापना कसकशी झाली, तें सर्व साद्यंत उदाहरणपूर्वक वर्णन केलें आहे. तसेंच इंद्रानें व इंत्रपुत्र जयंतानें इंद्रेश्वर व जयंतेश्वर नांवाचीं जीं लिंगें स्थापिलीं, त्याचेंहि वर्णन ह्यांत केलें आहे. नंतर एकवीसाव्या अध्यायांत धर्मारण्यांत राहणाऱ्या लोकांचीं गोत्रें व प्रवरें वर्णन केलीं आहेत. धर्मारण्यांतील लोकांचीं आडनावेंहि कथन केलीं आहेत. पुढें बावीसाव्यांत देवतांचीं स्वरूपें व तेथील देवतांचीं नांवें सांगून त्यांचीं माहात्म्येंहि वर्णित केलीं आहेत. नंतर चोवीस ते एकोणतीस अध्यायापर्यंत धर्मारण्यमाहात्म्य, द्वारिकामाहात्म्य, सरस्वतीतीर्थमाहात्म्य, गोवत्सलिंगमाहात्म्य, लोहयष्टीतीर्थमाहात्म्य वगैरे माहात्म्यें स्वोत्पत्तिपूर्वक वर्णन केलीं आहेत. तसेंच तीस अध्यायापासून तों पस्तीस अध्यायापर्यंत रामचरित्र वर्णून त्यांनीं केलेल्या तीर्थयात्रांचें वर्णन ह्यांत आलें आहे. राम, लक्ष्मण, सीता वगैरे हनुमत्प्रमुख

मंडळींनीं धर्मारण्यांत येऊन स्थापिलेल्या अनेक लिंगांचीं माहात्म्यें फारच मनोहर सांगितलीं आहेत. मध्यंतरीं धर्मारण्य हें दुष्ट दैत्यानीं उद्ध्वस्त केलें असतां रामानें त्याचें जीर्णोद्धरण करून त्याच्या रक्षणार्थ मारुतीची योजना केली, वगैरे फारच कौतुकास्पद कथा ह्यांत आल्या आहेत. छत्तिसाव्या अध्यायांत कलिमाहात्म्य वर्णन केलें आहे. कलीला भिवून मारुती धर्मारण्यांतून पळून रामेश्वरीं जाऊन राहिल्यामुळें तेथील राजानें व इतर दुष्ट राक्षसांनीं धर्मारण्यांत राहणाऱ्या सच्छील ब्राह्मणांचा व इतर मंडळींचा छळ करून त्यांस घालवून दिलें; व धर्मारण्याचा पुनः उच्छेद केला, वगैरे कथानक आहे. नंतर सदतीस ते चाळीस अध्यायापर्यंत धर्मारण्यांतील ब्राह्मणानें मारुतीकडे जाऊन त्यास आपलें गाऱ्हाणें सांगितलें, त्यामुळें मारुतीला राग येऊन त्यानें राजाच्या सभेंत व धर्मारण्यांत हापटण्याकरितां मंत्रयुक्त अशा दोन पुड्या धर्मारण्यांतील ब्राह्मणांना दिल्या. नंतर त्या ब्राह्मणांनीं त्या पुड्या राजसभेंत हापटतांच एकाएकीं अग्नी उत्पन्न होऊन राजाकडे येऊं ऊागला, तें पाहून राजा ब्राह्मणांना शरण आला; व त्या योगें राजानें ब्राह्मणांचें रक्षण करून धर्मारण्याची पुनः प्रतिष्ठा केली; व जातिभेदाचीहि व्यवस्था लाविली; वगैरे मजकूर ह्या धर्मारण्यखंडांत आला आहे.

तिसरें ब्रह्मोत्तरखंड. ह्याचें अध्याय बावीस आहेत. श्रीधरानें जो ओवीबद्ध शिवलीलामृत ग्रंथ रचिला, तो ह्या खंडाचेंच भाषान्तर होय. हें त्याच शिवलीलामृताच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या " शिवलीलामृत ग्रंथ प्रचंड । स्कंदपुराण ब्रह्मोत्तरखंड । तेथील परिसोत अखंड । प्रथमोऽध्याय गोड हा ॥ १ ॥ " ह्या श्रीधराच्या ओवीवरूनच सिद्ध होतें; व प्रत्यक्ष हें ब्रह्मोत्तरखंडाचें भाषान्तर वाचिल्यास शिवलीलामृत वाचणाऱ्या किंवा त्यांचें श्रवण करणाऱ्या वाचकांचीहि खात्री होईलच. आतां शिवलीलामृताचा कथाक्रम व ह्या ब्रह्मोत्तरखंडाचा कथाक्रम मुळींच मिळता नाहीं. मित्रसहराजाची कथा ब्रह्मोत्तरखंडाच्या दुसऱ्या अध्यायांत दिली आहे,तर तीच कथा शिवलीलामृतांत निराळ्याच अध्यायांत ग्रथित केली आहे. तसेंच रुद्राक्षमाहात्म्य ब्रह्मोत्तरखंडांत वीस व एकवीस ह्या अध्यायांत वर्णिलें आहे तर शिवलीलामृतांत तेंच अकराव्या अध्यायांत कथिलें आहे. शिवलीलामृताच्याहून ब्रह्मोत्तरखंडांत आठ अध्याय अधीक असल्यामुळें अशा तऱ्हेनें कथाध्यायांत विपर्यास होणें शक्य आहे. ह्यामध्यें दाशार्हराजा, मित्रसहराजा. वगैरे राजांचीं चरित्रें; व गोकर्णक्षेत्रमाहात्म्य, विमर्दनराजाची कथा, चंद्रसेनचरित्र वगैरे कथा वर्णिल्या आहेत. सीमंतिनीच्या आख्यानांतून सर्वांना घेण्याजोगा उपदेश म्हणजे सद्धर्म, सच्छील; व सदाचार आणि एकनिष्ठता इत्यादि गुणांचें अवलंबन करणारा कधींहि दुःखी होणार नाहीं, आणि जरी कदाचित् झाला तरी त्या दुःखाचें पर्यवसान सुखांत असल्यामुळें तें दुःखहि सुखरूपच होय. सीमंतिनीनेंहि दुःखप्रसंगीं आपला धर्म, आपला स्वभाव, आपला

पातिव्रत्याचार व आपली ईश्वरावरची निष्ठा ढळूं न दिल्यामुळें जरी ती दुःखसागरांत गटंकळ्या खात होती, तरी ती गुरुप्रसादानें त्या दुःखांतून मुक्त होऊन सुखसागरांत विहार करूं लागली. अशातऱ्हेनें महानंदाख्यानहि आश्चर्य उत्पन्न करणारें आहे. महानंदा ही जरी वेश्या होती, तरी पतिव्रता होती, असें लोकांना विपरीत वाटणारें भाषण येथें करावें लागतें. वेश्याधर्म व पतिव्रताधर्म हे अगदी परस्परविरुद्ध धर्म आहेत. सुख दुःख; व शीत, उष्ण ह्या परस्पर धर्मांत जितका फरक इतकाच किंबहुना ह्याहूनहि अधीक असा फरक पतिव्रता व वेश्या ह्यांत आहे. तथापि हे दोनहि गुण महानंदजवळ होते. अर्थात् तिची योग्यता विशेष मानली आहे. अशातऱ्हेनें शिवलीलायुक्त कथांनीं हें खंड समाप्त केलें आहे.

स्कंदपुराणाच्या खंडांनुक्रमानें सेतुमाहात्म्य, धर्मारण्यमाहात्म्य व ब्रह्मोत्तरखंड ह्या तीन अंतर्गतखंडांनीं युक्त असें तिसरें ब्रह्मखंड संपल्यानंतर चवथ्या काशीखंडाला प्रारंभ झाला आहे. ह्या काशीखंडाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन विभाग पाडिले आहेत. ह्या खंडांत एकंदर अध्याय शंभर आहेत. पैकीं पूर्वार्धांत पन्नास व उत्तरार्धांत पन्नास असे आहेत.सर्वसामान्यतः ह्या काशीखंडांत काशीक्षेत्रांतील तीर्थें, कुंडें, शिवलिंगें वगैरे पुण्यस्थानांचीं वर्णनें कथिलीं असून काशीयात्रेचा विधिक्रमहि वर्णिला आहे. काशीखंडाच्या पूर्वार्धांतील पहिल्या पांच अध्यायांत विंध्यपर्वताच्या गर्वयुक्त वर्तनानें लोकांना पीडा झाल्यामुळें अगस्त्यऋषी लोपामुद्रेसह लोकांना सुख देण्याकरितां विंध्यपर्वताचा गर्व हरण करून स्वतः दक्षिणदिशेला रामेश्वरासन्निध जाऊन राहिले, इत्यादि कथा वर्णिली आहे. साहा व सात ह्या दोन अध्यायांत काशीक्षेत्राचें माहात्म्य; व अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, द्वारका ह्या सप्तपुरींचें माहात्म्य वर्णिलें आहे. पुढें आठपासून तों चोवीस अध्यायापर्यंत शिवशर्म्याला मोक्षप्राप्ती झाली, हें कथानक सांगण्याच्या निमित्तानें तो विमानांत बसून सत्यलोकीं चालला असतां शिवशर्मा विष्णुदूतांना अनेक लोकांची माहिती विचारीत आहे; असा प्रसंग आणून इंद्रचंद्रादि अनेक लोकांचे व नवग्रहांच्या स्थानांचेंहि सत्यलोकापर्यंतच्या सर्व लोकांच्या वर्णनासह माहात्म्य सांगितलें आहे. नंतर चोवीस ते पन्नास अध्यायापर्यंत सदाचारवर्णन, काशीविश्वेश्वरमाहात्म्य, द्वादशादित्य, अष्ट वसु, एकादश रुद्र वगैरे अनेक लिंगांचें व तीर्थांचें माहात्म्य सांगितलें आहे. ब्राह्मणादि चार वर्ण, स्त्री व शूद्र इत्यादिकांनीं काशीक्षेत्रांत राहून कसें वागावें, वगैरे सांगून हा पूर्वार्ध संपविला आहे.

काशीखंडाच्या उत्तरार्धांतील पहिल्या आठ अध्यायांत म्हणजे एकावनपासून अठ्ठावनपर्यंत दिवोदासाची शंकरानें परीक्षा घेऊन त्यास मुक्त केलें; हा भाग मोठा विचारणीय आहे. नंतर ऐकोणसाठापासून चौसष्ट अध्यायापर्यंत वेदशिरा-

ख्यान व गंगादि पांच नद्यांचीं माहात्म्यें तसेंच बिंदुमाधव व वैष्णवतीर्थ ह्यांचें माहात्म्य सांगून काशीक्षेत्राचें रहस्यहि सांगितलें आहे. पुढें पासष्टाव्या अध्यायापासून तों अठ्याहत्तर अध्यायापर्यंत पराशरेश्वरादि अनेक लिंगांचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. एकूणऐंशीव्या व ऐंशीव्या अध्यायांत इंद्राणीचें चरित्र सांगितलें आहे; व धर्मेश्वराख्यानहि कथिलें आहे. नंतर एक्यांयशीव्या अध्यायापासून तों षाहाण्णव अध्यायापर्यंत वीरेश्वरादितीर्थांचीं माहात्म्यें सांगितलीं असून काशीनाममाहात्म्य व दक्षाच्या यज्ञांत सतीनें केलेला प्राणत्याग, वगैरे चरित्र वर्णिलें आहे. सती जी पार्वती तिच्या चरित्रावरून पतिप्रेम पितृप्रेमाहून किती पटीनें अधीक आहे, ह्याचें स्वारस्य दृष्टीगोचर होतें. पित्याजवळ जर कन्याप्रेम जागृत असेल तरच कन्येचेठिकाणीं पितृप्रेम जागृत असतें; तसें पतीचे ठिकाणीं नाहीं. पतिप्रेम पत्नीवर असो वा नसो; तथापि पतिव्रता स्त्री केव्हांहि पतीवरचें प्रेम तिळमात्रहि कमी करणार नाहीं, असा पतिप्रेमांत व पितृप्रेमांत भेद आहे, वाचकांनीं हें कथानक वाचीत असतां अवश्य लक्ष्यांत ठेवावें. नंतर सत्याण्णव ते शंभर अध्यायापर्यंत एकंदर काशीक्षेत्रांत तीर्थें व लिंगें किती आहेत, ह्यांचें परिगणन केलें आहे. तसेंच मुक्तिमंडप वगैरे स्थानाचें माहात्म्य सांगितल्यानंतर काशीखंडाच्या शंभर अध्यायांची कथानुक्रमणिका संगतवार दिली आहे. अशा-तऱ्हेनें ह्या खंडाचा उपसंहार करून हें काशीखंड समाप्त केलें आहे.

आतां स्कंदपुराणाच्या क्रमानें येणारें जें पांचवें अवन्तीखंड त्याला प्रारंभ केला आहे. ह्या खंडांत अंतर्गत खंडें तीन आहेत. तीं अनुक्रमें अवन्तीक्षेत्र-माहात्म्य, चतुरशीतिलिंगमाहात्म्य व रेवाखंड अशा नांवानें प्रसिद्ध आहेत. ह्या तीन खंडांपैकीं पहिलें जें अवन्तीक्षेत्रमाहात्म्य तेंच ह्या दुसऱ्या भागांत घेतलें असल्यामुळें, त्यांतील कथांचा सारांश सांगून ही प्रस्तावना पुरी करितों. ह्या अवन्तीक्षेत्रमाहात्म्यांत एकंदर अध्याय एकाहत्तर आहेत. पैकीं पहिल्या दहा अध्यायांत महाकालवर्णन, अग्नीची उत्पत्ति, भक्तिमहत्त्व, अप्सराकुंड, रुद्र-सरकुंड वगैरे कुंडांचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. तसेंच अकरापासून एकेचाळीस अध्यायापर्यंत मधून मधून गोड अशा कथा सांगून अवन्तीक्षेत्रांतील अनेक शिवलिंगांचीं व तीर्थांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत. जागोजागीं शंकराचे पराक्रम, त्याचें औदार्य व त्याच्या लीलाहि वर्णिल्या आहेत. शंकरासारखे भाविक व भोळें दुसरें दैवतच नाहीं, अशा अनेक गोष्टी ठिकठिकाणीं सप्रमाण सिद्ध केल्या आहेत. नंतर बेचाळीसाव्या अध्यायापासून तों एकाहत्तराव्या अध्याया-पर्यंत प्रथमतः महाकालवनाला अवंती, उज्जेनी, पद्मावती, कुमुद्वती, अमरावती व विशाला हीं नांवें कां प्राप्त झालीं, हें सकारण दर्शविलें आहे; व ह्या वरून हें क्षेत्र अनादि आहे, असें सिद्ध होतें. नंतर कल्पवर्णन व कालप्रमाणकोष्टक आणि नीलगंगा वगैरे नद्यांचींहि माहात्म्यें सांगून हें खंड समाप्त केलें आहे.

अशातऱ्हेनें मराठींत भाषान्तर करून हा स्कंदपुराणाचा दुसरा भाग तयार केला आहे. हें स्कंदपुराण भारतेतिहासाशिवाय पुराणग्रंथांतच विचार केला असतां फारच मोठें आहे. भारत हा ग्रंथ इतिहासांत व रामायण हा ग्रंथ काव्य-ग्रंथांत मोडत असल्यामुळें स्कंदपुराणाएवढें मोठें दुसरें महापुराणच नाहीं, असें म्हणावें लागेल. ह्या हेतूस्तवच ह्याचे लहान लहान चार भाग करणें भाग पडलें आहे. स्कंदपुराण हें एक उपपुराणामध्येंहि आहे. त्याची ग्रंथसंख्या सव्वालक्ष इतकी आहे. त्या स्कंदपुराणांत चौसष्ट खंडें आहेत. तथापि नारदपुराणांत जेथें अष्टादश पुराणांची यादी दिली आहे, त्याठिकाणीं स्कंदपुराणाचा जो कथानुक्रम दिला आहे, त्या क्रमानें विचार केला असतां ऐक्यांयशी हजार एकशें श्लोकांनीं युक्त जें महापुराण तेंच हें अशी खात्री होईल. आतां चौसष्ट खंडांनीं युक्त जें उपपुराण तें उपलब्ध नसून त्या बद्दलचा क्रमही कोठें मिळत नाहीं; तेव्हां महापुराणाच्या क्रमांत असणारें जें स्कंदपुराण तें हेंच किं दुसरें आहे, असा वाचकांस भ्रम होऊं नये; म्हणून आम्ही ह्याचें स्पष्टीकरण केलें आहे. भाषान्तरकारांचें व मुद्रणकारांचें जे परिश्रम ह्यांचें वाचक प्रोत्साहनद्वारा सार्थक करितील, अशी आशा धरून ही प्रस्तावना आम्ही संपवितों.

आपला कृपाकांक्षी

**पुराणभूषणः— नरहर रावजी शास्त्री जोगळेकर.**

---

# विषयानुक्रमणिका.

## ब्रह्मखंड ३ (सेतुमाहात्म्य १).



सेतुमाहात्म्य समाप्त. १

## ब्रह्मखंड ३ ( धर्मारण्यखंड २ ).



धर्मारण्यखंड समाप्त ॥ २ ॥

## ब्रह्मखंड ३ ( ब्रह्मोत्तरखंड ३).

## काशिखंड ४ (पूर्वार्ध).

काशीखंड ( पूर्वार्ध ) समाप्त ४.

## काशीखंड ४ (उत्तरार्ध).

काशीखंड ( उत्तरार्ध ) समाप्त ४.

काशीखंड समाप्त.

## अवंतीखंड ५ ( अवंतीक्षेत्रमाहात्म्य १ )

अवन्तीक्षेत्रमाहात्म्य समाप्त ५-१

# स्कंदपुराण.

## ब्रह्मखंड ३. ( सेतुमाहात्म्य १ ).

### अध्याय १ ला.

### सेतुस्नानाचें व दर्शनाचें फल.

शुक्लाम्बरधरं विष्णुं शशिवर्णं चतुर्भुजम् ।
प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशान्तये ॥ १ ॥

ग्रंथाची निर्विघ्नपणें समाप्ती व्हांवी, एवढ्यांकरितां ब्रह्माची आद्य देवता जी विष्णु, त्याची आरंभीं स्तुति करून व्यासमुनी ग्रंथाला प्रारंभ करितात. हे विष्णो। आपण शुभ्रवर्णाचें वस्त्र धारण करून शरीरवर्णहि चंद्राप्रमाणें आनंददायकच धारण केला आहे. आपणाला चार हात असून आपली मुद्रा शांत आहे; अशा सर्वगुणसंपन्न आपलें, सर्व विघ्नें नाहींशी होण्याकरितां मी ध्यान धरून ग्रंथारंभ करितों.

एकदां नैमिषारण्यामध्यें शौनकादि ऋषी तप करून मुक्ति मिळविण्याच्या इच्छेनें बसले असतां इतक्यांत व्यासांचे शिष्य सूत त्याठिकाणीं प्राप्त झाले. शौनकादि ऋषींनीं सूताची अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजा करून प्रश्न केला कीं, हे सूत ! अशीं जगांत कोणतीं तीर्थें आहेत कीं, ज्यांच्या सेवनानें मोक्ष प्राप्त होईल, तें सांगा. नंतर सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो, ज्याठिकाणीं रामचंद्रानें सेतु बांधून रामेश्वराचें लिंग स्थापित केलें, तें स्थान फारच पुण्यकारक व सर्वश्रेष्ठ असून तत्काल मुक्ति देणारें आहे. पृथ्वीचे रजःकण मोजवतील; परंतु सेतुबंधरामेश्वराच्या दर्शनानें किती पुण्य प्राप्त होतें, त्याची गणना करितां यावयाची नाहीं. सेतुबंधरामेश्वराच्या दर्शनानें कधींहि कोणत्याहि पापी मनुष्यास नरकगति प्राप्त होणार नाहीं, हें खास समजावें. ज्यानें परस्त्रीगमन केलें असेल, त्यानें सेतुबंधरामेश्वराचेठिकाणीं मुंडन करून आपले केस सेतूमध्यें अर्पण करावे; म्हणजे त्याचें सर्व पाप नाहींसें होतें. जे कोणी ब्राह्मणांना दान देण्याच्या बुद्धीनें आमंत्रण करून, आलेल्या ब्राह्मणास मागाहून देत नाहीं, म्हणून सांगतात, त्यांस ब्रह्महत्येचें पातक लागतें.

एकाद्या जलप्रवाहाचेठिकाणीं गांई पाणी पीत असतां त्यास जो पाणी पिऊं न देतां हांकलून लावतो, त्यासहि ब्रह्महत्त्येचें पाप लागतें. अशातऱ्हेनें ब्रह्महत्त्या करणारांचीं सर्व पातकें सेतूमध्यें स्नान केल्याच्या योगानें नाश पावतात. जी जी कामना मनांत ठेवून आपण सेतुस्नान करूं, त्या त्या सर्व कामना अल्प कालांतच खात्रीनें सिद्धीस जातील, ह्यांत शंका नाहीं. सेतुस्नान करण्याकरितां जाणाऱ्या मनुष्यास जो द्रव्य, वस्त्र इत्यादिकांचें साहाय्य करितो, त्यास अश्वमेधयज्ञांचें फल प्राप्त होतें; एवढेंच नव्हे, तर चार वेदांच्या अध्ययनांचें फल; व तुलापुरुषदान केल्याचें फलहि त्यास प्राप्त होतें; व त्याचेंहि ब्रह्महत्त्यादि पाप नाश पाऊन तो अंतीं वैकुंठाला जाऊन पोंचतो. जे कोणी सेतुदर्शनाला जाण्याच्या निमित्तानें एकाद्यापासून द्रव्य घेतात; व सेतुबंधरामेश्वरीं न जाता त्या द्रव्याचा दुसरीकडे उपयोग करितात, त्यांस चोरी केल्याचें व ब्रह्महत्त्यादि महापातकें केल्याचें पाप लागतें. आपणास जर सेतुदर्शनास जाववलें नाहीं, तर तें द्रव्य सेतुदर्शनास जाण्याची इच्छा करणाऱ्या एकाद्या ब्राह्मणास द्यावें; ह्मणजे सेतुदर्शनाचें पुण्य लागतें. कृतयुगांत ज्ञानानें मोक्ष मिळतो, त्रेतायुगांत यज्ञानें मिळतो, द्वापारयुगांत व कलियुगांत दानाच्या योगें मोक्ष मिळतो; व चारहियुगांत सेतुबंधाच्या दर्शनानें व स्नानानें मोक्ष मिळतो; असा ह्या सेतुबंधरामेश्वराच्या दर्शनाचा, दानादिकांचा; व स्नानाचा महिमा अगाध आहे.

---

## अध्याय २ रा.

### सेतूची उत्पत्ति.

शौनकादि ऋषी सूताला प्रश्न करितात; हे सूत ! एवढ्या मोठ्या अवाढव्य समुद्रामध्यें रामानें सेतु कसा बांधिला ? तें सांगा. नंतर सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषीहो ! सीता व लक्ष्मण ह्यांसह रामचंद्र बापाच्या आज्ञेवरून दंडकारण्यांत पंचवटीमध्यें राहते झाले. तेथें राहत असतां एकेदिवशीं राम व लक्ष्मण यांचा डोळा चुकवून कपटानें रावणानें सीता हरण केली; व लंकेत नेऊन अशोकवनांत ठेविली. रामचंद्र लक्ष्मणासह सीतेचा शोध करीत करीत अरण्यांत फिरूं लागले. ते शोकाकुल होऊन पंपासरोवरावर बसले असतां, तेथें एका वानराची व रामचंद्राची भेट झाली. वानराच्या विच्यारण्यावरून रामचंद्रानें झालेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला. रामानें वानरास विचारल्यावरून तो वानर रामचंद्रास

म्हणातो कीं, मी सुग्रीवाचा प्रधान असून माझें नांव हनुमान् आहे. सुग्रीवानें मला आपल्याकडे पाठविलें आहे. सुग्रीवाच्या मनांतून आपणाशीं सख्य करावें, असें आहे; करितां आपण मजबरोबर सुग्रीवाकडे चलावें. नंतर बरें आहे, असें म्हणून राम; व लक्ष्मण हे मारुतीबरोबर सुग्रीवाकडे गेले; व अग्नीला साक्षीभूत ठेऊन मारुतीनें सुग्रीवाचें व रामाचें सख्य करविलें. वालीला मारण्याबद्दल रामचंद्रानें सुग्रीवाजवळ प्रतिज्ञा केली; व सुग्रीवानेंहि सीतेचा शोध लावून देण्याबद्दल रामाजवळ प्रतिज्ञा केली. अशा उभयतांच्या प्रतिज्ञा झाल्यावर मी वालीचा नाश करूं शकेन, असे सुग्रीवास खरें वाटावें; म्हणून रामचंद्रानें ऋष्यमूकपर्वतावर दुंदुभिराक्षसाचें शरीर पाडलें होतें; तें आपल्या पायाच्या अंगठ्यानें कित्येक योजनें उडवून दिलें; तसेंच सात ताड एका बाणानें वेधून जमिनीवर पाडिले, त्यावेळीं सुग्रीवाला मोठा आनंद झाला. सुग्रीवाचें व वालीचें युद्ध सुरू झालें असतां रामचंद्रानें एका बाणानें वालीला जमिनीवर पाडलें. वालीचा नाश करून सुग्रीवाला किष्किंधानगरीचें राज्य अर्पण केलें. सुग्रीवानें आपली वानरमंडळी सीताशुद्धीकरितां रामाच्या आज्ञेवरून चारहि दिशांकडे पाठविली असतां मारुतीनें सीतेचा शोध लावून, मी सीता पाहिली, हें रामास खरें वाटावें; म्हणून रामाच्या ओळखीचें; व सतत सीतेच्या मस्तकांत असणारें रत्न मारुतीनें रामाचें हातांत दिलें. तें पाहून रामाला फारच आनंद झाला; व सुग्रीव, मारुती, जांबवान् वगैरे वानरसेनेसह राम व लक्ष्मण अभिजित्–मुहूर्तावर रावणाला मारून सीतेला आणण्याचे उद्देशानें ऋष्यमूकपर्वतावरून निघाले; ते अनेक प्रदेश ओलांडून दक्षिणसमुद्राजवळ आले. तेथें बिभीषणाची व रामाची गांठ पडली; व रामानें 'तुला लंकेचें राज्य देईन' असें बिभीषणास वचन दिलें. नंतर समुद्राचें उल्लंघन कसें करावे ! हा विचार प्रत्येकाच्या दृष्टीसमोर उभा राहिला. रामचंद्राला समुद्राचा राग आला;व जर समुद्रानें आम्हाला वाट दिली नाहीं,तर मी आपल्या अस्त्रसामर्थ्यानें समुद्र सुखवून टाकीन; व समुद्राचा नाश करीन, असा विचार करून रामचंद्रानें शुचिर्भूत होऊन व हातांत धनुष्यबाण घेऊन;व त्यावर अस्त्राचें अभिमंत्रण करून बाण सोडला. त्यावेळीं तो बाण समुद्रांत शिरून समुद्र शुष्क करूं लागला. समुद्राला भीति उत्पन्न झाली;व तो रामाला शरण गेला. त्यावेळीं राम समुद्राला म्हणतात कीं, तूं आम्हाला लंकेत जाण्याला रस्ता दे. तेव्हां समुद्र ह्मणतो; रामा ! मी आपणास एक युक्ति सांगतो, ती ही कीं, नल-नांवाचा एक तुमच्या सैन्यांत वानर आहे, तो समुद्रांत जें कांहीं टाकील तें वरतीच्या वरती तरून राहील; मग दगड असोत, लांकडे असोत, किंवा दुसरे कोणतेहि पदार्थ असोत. तेव्हां आपण नलाकडून समुद्रावर सेतु तयार करा;

व सेतूवरून तुह्मी सैन्यासह लंकेत जा. आपण सर्व कांहीं करण्यास समर्थ आहां. याप्रमाणें सांगून समुद्र गुप्त झाला असतां राम नलाला समुद्रानें सांगितलेली सर्व हकीगत निवेदन करिते झाले. त्यावेळीं नल रामाला म्हणतो; मी आपल्या कृपेनें सेतु तयार करितों, असें ह्मणून सर्व वानराच्या साहाय्यानें नलानें चारशें कोश सेतु ( पूल ) तयार केला. त्याठिकाणीं मुख्य चोवीस तीर्थें आहेत, तीं येणेंप्रमाणेंः—चक्रतीर्थ, वेतालवरदतीर्थ, पापविनाशतीर्थ, सीतासरस्तीर्थ मंगलतीर्थ, अमृतवापिकातीर्थ, ब्रह्मकुण्ड, हनुमत्कुंड, आगस्त्यतीर्थ, रामतीर्थ, लक्ष्मणतीर्थ, जटातीर्थ, लक्ष्मीतीर्थ, अग्नितीर्थ, चक्रतीर्थ, शिवतीर्थ, शंखतीर्थ यामुनतीर्थ, गंगातीर्थ, गयातीर्थ, कोटितीर्थ, मानसतीर्थ, धनुष्कोटितीर्थ साध्यामृततीर्थ, हीं मोक्ष देणारीं सेतुबंधाजवळ असणारीं तीर्थें होत. ह्याप्रमाणें हे ऋषिहो ! रामानें सेतु कसा बांधिला ? हें तुम्हाला कथानक सांगितलें. जे कोणी ही कथा श्रवण करितील; किंवा पठण करितील, त्यांना सर्वत्र जय प्राप्त होऊन; व ते जननमरणाच्या संसृतीपासून मुक्त होऊन वैकुंठाला जातील.

## अध्याय ३ रा.

### गालवाख्यान.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! सेतुबंधानजीक असणारीं जीं चोवीस तीर्थें, त्यांपैकीं चक्रतीर्थ या नांवाचें एक तीर्थ आहे. त्या तीर्थाचेठिकाणीं गालवनावाचा एक ऋषी तप करीत होता. तेथेंच गालवमुनीनें पांच हजार वर्षेपर्यंत वायुभक्षण करून अष्टाक्षर मंत्राचा जप केला. त्यानंतर त्यानें पांच हजार वर्षें पुनः पंचाग्नि साधन व धूम्रपानासारखे खडतर उपाय योजून घोरतर तपश्चर्या केली. त्याची ती तपश्चर्या पाहून प्रत्यक्ष चतुर्भुज भगवान् विष्णु, ह्यांनीं गालवाला दर्शन दिलें. त्या भगवंताची सर्वलक्षणसंपन्न व सर्वालंकारभूषित अशी मूर्ति पाहून गालवऋषीला मोठा आनंद झाला; व तो भगवंताची स्तुति करूं लागला. गालवमुनीनें केलेली स्तुति ऐकून भगवान् विष्णु प्रसन्न झाले; व त्यांनीं गालवाला दृढ असें प्रेमालिंगन दिलें; व वर माग, असें गालवास म्हटलें. नंतर गालवमुनि विष्णूला म्हणतात. हे भगवन् लक्ष्मीपते ! आपल्या दर्शनानेंच मी कृतार्थ आहे. तूं धर्माचें रक्षण करणारा असल्यामुळें तुझें दर्शन अधार्मिक लोकांना होत नाहीं, करितां ज्यापेक्षां मला आपलें दर्शन घडलें त्यापेक्षां मी कांहीं पूर्वीं सुकृत केलें असावें, हें खास. ज्या आपल्या नामस्मरणानें महापातकी लोक सुद्धां

मुक्त होतात; मग तर ज्यांना आपलें प्रत्यक्ष दर्शनच घडलें आहे, ते मुक्त होतील ह्यांत तें नवल काय? आतां मला दुसरी कोणतीहि इच्छा नाहीं, फक्त आपल्या चरणकमलाचेठिकाणीं माझी दृढ भक्ति असावी; एवढीच काय ती माझी इच्छा आहे. ह्याप्रमाणें गालवमुनीचें भाषण ऐकून विष्णु गालवास म्हणतात; हे मुने! माझेंठिकाणीं तुझी भक्ति दृढ होईल, ह्यांत संशय नाहीं; परंतु मीच होऊन तुला असा वर देतों कीं, ज्यापेक्षां तूं प्रत्येक कर्म मला अर्पण करण्याच्या बुद्धीनें करीत आहेस, त्यापेक्षां तूं अंतःकालीं माझ्याच स्वरूपाला प्राप्त होशील. आतां तूं ह्याच आश्रमांत सतत वास्तव्य कर. ह्या पुष्करिणीला धर्मपुष्करिणी हें नांव पडलें आहे. ह्या धर्मपुष्करिणीतीर्थाचे ठिकाणीं तप करणारांना सिद्धि प्राप्त होते. पूर्वीं धर्म ह्याचठिकाणीं शंकराची तपश्चर्या करून तीर्थ निर्माण करिता झाला; व म्हणूनच ह्याला धर्मपुष्करिणी हें नांव प्राप्त झालें. ज्यावेळीं धर्माच्या तपश्चर्येनें शंकर प्रसन्न झाले; त्यावेळीं धर्मानें वर मागितला कीं, माला तूं आपलें वाहन कर. नंतर शंकरानें धर्माला नंदीचें रूप घ्यावयास सांगितलें; व धर्मानें तें रूप धारण करून तो शंकराचें वाहन झाला. शंकर त्या वाहनावर बसून कैलासाला गेले. अशा तऱ्हेनें विष्णू गालवमुनीला धर्मपुष्करिणीच्या उत्पत्तीचें कथानक सांगून तेथून गुप्त झाले. विष्णु अंतर्धान पावल्यानंतर गालवमुनि नित्य धर्मपुष्करिणीवर त्रिकाल स्नान करून शालिग्रामपूजा करूं लागला. एकेदिवशीं गालव माघ शुक्ल एकादशीला उपोषण करून; व विष्णूची पूजा करून दुसरेदिवशीं म्हणजे द्वादशीला धर्मपुष्करिणीतीर्थावर स्नान करून, नित्य कर्म उरकल्यानंतर विष्णुपूजा करून विष्णुस्तोत्राचें पठण करिता झाला. विष्णूचें स्तोत्र पठन करीत आहे, इतक्यांत कोणीं एक राक्षस क्षुधित होऊन गालवमुनीला खाण्याकरितां त्याजवळ प्राप्त झाला; व राक्षसानें गालवाला धरिलें. नंतर गालव भयभीत होऊन विष्णूचा धावा करूं लागला. गालवाची स्तुति विष्णूच्या कानीं पडतांच विष्णूला गालवाची दया येऊन त्यानें गालवरक्षणार्थ आपलें सुदर्शन चक्र सोडिलें. त्या सुदर्शनाला भिऊन राक्षस पळूं लागला; तथापि सुदर्शनचक्रानें राक्षसाचें मस्तक तुटून पडलें. गालावानें ह्या सुदर्शनाचा प्रभाव पाहून त्याची स्तुति करण्यास सुरवात केली. सुदर्शनचक्र प्रसन्न होऊन गालवमुनीला ह्मणूं लागलें कीं, मी ह्याच तीर्थाचेठिकाणीं राहणार आहे; व आजपासून ह्या तीर्थाला चक्रतीर्थ असें म्हणतील. आजपासून येथें राहणारांना राक्षसादि क्रूर प्राण्यांची भीति वाटणार नाही. जे कोणी ह्या चक्रतीर्थामध्यें पितरांना उद्देशून पिंडदानादि कर्में करितील, त्यांच्या पितरांचा उद्धार होईल. जे कोणी हें आख्यान पठण करितील, ते मुक्त होऊन वैकुंठाला जातील.

---

# अध्याय ४ था.

## दुर्दमगंधर्वाची शापमुक्तता.

सूत म्हणतात,—हे शौनकादि ऋषिहो! मागील अध्यायांत गालवाला पीडा देणारा जो राक्षस तो कोण होता? हें सांगतो; ऐका. पूर्वी कैलासपर्वतावर असणाऱ्या शिवमंदिरांत वशिष्ठ, अत्रि वगैरे मोठमोठे चोवीस हजार ऋषी शंकराची उपासना करीत असतां, एकाएकी विश्वावसुगंधर्वाचा दुर्दमनांवाचा पुत्र मदोन्मत्त होऊन, शेंकडों स्त्रियांसह त्याठिकाणीं येऊन जवळच असणाऱ्या हालास्यतीर्थामध्यें नग्न असा स्नान करूं लागला. हा प्रकार वशिष्ठादि ऋषींनीं पाहून, क्रोधानें त्या दुर्दमगंधर्वास शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं निर्लज्ज होत्साता स्त्रियांसह ह्या तीर्थांत आमच्या समक्ष स्नान करीत आहेस, त्यापेक्षां तूं राक्षसजन्माला प्राप्त हो. नंतर स्त्रियांनीं पतीला उच्छाप मिळण्याविषयीं वशिष्ठाची प्रार्थना केली असतां वशिष्ठ म्हणतात; तुमचा पति जो दुर्दम तो सोळा वर्षांनंतर शापमुक्त होऊन, तुमच्या जवळ प्राप्त होईल. ह्याप्रमाणें वशिष्ठाचें भाषण ऐकून, दुर्दमाच्या चोवीस हजार स्त्रिया स्वस्थानाला निघून गेल्या; व दुर्दमाला राक्षसाचा जन्म प्राप्त झाला. तो राक्षस अनेक देश हिंडत व प्राणिमात्रांचा नाश करीत धर्मतीर्थाला आला. तेथें गालवमुनीला भक्षण करण्याकरितां त्याचें अंगांवर धावला असतां, विष्णूच्या सुदर्शनचक्रानें तो राक्षस शापमुक्त होऊन; व दिव्य देह धारण करून, विमानांत बसून, व सुदर्शनाची अनेकप्रकारें स्तुति करून, त्याच्या आज्ञेनें गंधर्वलोकाला प्राप्त झाला.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो, आणखी एक तुम्हास चक्रतीर्थासंबंधीं कथानक सांगतो; ऐका. पूर्वी सर्व पर्वतांना पंख होते; व ते पक्ष्यांप्रमाणें आकाशांत उडत असत. ह्या नगरांतून उडी मारावी, ती एकाद्या अरण्यांत जाऊन बसावें; पुनः तेथून निघावें; तें एकाद्या राष्ट्रांत जाऊन राहावें; अशा तऱ्हेनें पर्वत स्वेच्छेप्रमाणें आकाशमार्गानें विहार करीत असत. ह्या पर्वतांच्या हालचालीमुळें पुष्कळ प्राण्यांचा विनाकारण वध होत असे. हा प्रकार पाहून हा प्राणिनाश इंद्राला न आवडून त्यानें सर्व पर्वतांचे पंख आपल्या वज्रप्रहारानें तोडून टाकिले. त्यामुळें पर्वतांना फारच वाईट वाटलें; व ते समुद्रांत जाऊन लपून बसले. कांहीं पर्वत इंद्राच्या भीतीनें चक्रतीर्थामध्यें येऊन राहिले. त्यामुळें चक्रतीर्थाचा कांहीं भाग पर्वतानें वेढून गेला; व त्या चक्रतीर्थाचें दोन विभाग झाले: देवशयनतीर्थ; व चक्रतीर्थ पर्वतानें व्यापिलेलें असें दिसतें.

# अध्याय ५ वा.

## विधूमशापमोचन.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! एके दिवशीं ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें मुख्य आसनांवर सरस्वती व सावित्री यांच्यासह ब्रह्मदेव बसले असतां; व सनकादि मुनि, नारद, इंद्रादिदेव, तसेंच सिद्ध, विद्याधरादि मंडळीहि तेथें स्वस्थानीं विराजमान असतां, त्या सभेंत अवलंबुसा नामक देवस्त्रीचें नृत्य सुरू होऊन सर्व सभासदांचीं मनें नृत्यश्रवणानें तल्लीन झालीं होतीं. अलंबुसा नृत्याच्या भरांत असतां एकाएकीं मोठा वारा सुटून तिचें वस्त्र वरती उडून सर्व अंतर्भाग सभासदांना स्पष्ट दिसत होता. अशातऱ्हेची जी अलंबुसा, तिला पाहून देवांनीं आपले नेत्र झाकिले. मात्र त्या सभेमध्यें बसलेल्या अष्टवसुपैकीं विधुमनांवाचा एक वसु होता. तो कामबाणानें पीडित होऊन; व जवळ नग्न झालेल्या अशा अलंबुसेला पाहून आनंदोद्रेकानें स्वतःला कृतकृत्य मानता झाला. ब्रह्मदेवानें हा प्रकार पाहून रागानें विधूमाला शाप दिला कीं, तूं मृत्युलोकांमध्यें मनुष्ययोनींत जन्म घेशील; व ही अलंबुसा तुझी बायको होईल. नंतर तो शाप ऐकून विधूमाला फारच वाईच वाटलें; व तो ब्रह्मदेवाची उच्छाप मिळण्याविषयीं प्रार्थना करिता झाला. विधूमाची प्रार्थना श्रवण करून ब्रह्मदेव विधूमाला म्हणतो कीं, तूं पृथ्वीवर राजकुलांत उत्पन्न होशील. तेथें सर्व प्रजेचें उत्तमतऱ्हेनें पालन करून; व वृद्धावस्थेमध्यें पुत्राला आपल्या राज्यावर बसवून तूं चक्रतीर्थावर ह्या अलंबुसेसह जाशील; व चक्रतीर्थामध्यें तुम्हीं उभयतां स्नान करून; व शापमुक्त होऊन स्वस्थानाला प्राप्त व्हाल. अशातऱ्हेचें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून विधूम हा स्वगृहाला निघून गेला; व एकांतांत बसून विचार करितो कीं, आपण भूमीवर कोणत्या कुळांत जन्म घ्यावा. असा विचार करीत असतां त्यानें कौशांबीनगरीमध्यें असलेला शतानीक राजा; व त्याची पत्नी विष्णुमती ह्याच्या कुळांत जन्म घेणें आपणास श्रेयस्कर होईल, असा निश्चय केला. विधूमानें माल्यवान्, पुष्पदंत; व बलोत्कट ह्या तिघां सेवकांना बोलावून झालेलें सर्व वर्तमान त्यांस सांगितलें. नंतर तिघे सेवक विधूमाला म्हणतात कीं, आपण जर शतानीकाचे पुत्र होणार असाल तर आम्ही तिघे शतानीकाचा प्रधान जो युगंधर, त्याचे पुत्र होऊं; म्हणजे आपला आम्हाला वियोग होणार नाहीं. विधूम म्हणतो कीं, मनुष्यजन्म कांहीं उत्तम नव्हे. शापामुळें आम्हाला तो स्वीकारणें भाग आहे, करितां आपण काहींकाळपर्यंत माझा

वियोग सहन करा; लवकरच मी तुमच्याजवळ परत येईन. तथापि त्या तिघां सेवकांनीं फारच आग्रह धरल्यामुळें विधूमानें त्यांना मनुष्य देह घेण्याची परवानगी दिली. ब्रह्मशापाप्रमाणें विधुम हा शतानीकाची पत्नी जी वसुमती तिचेपोटीं जन्म घेता झाला;व धन्याच्या हुकुमाप्रमाणें त्याचा वियोग होऊं नये; म्हणून विधूमाचे तिघे सेवकहि शतानीकाचा प्रधान जो युगंधर त्याचे पोटीं जन्म घेते झाले. विधूम हा सहस्रानीक या नांवानें शतानीकाचेठिकाणीं पुत्र-रूपानें उत्पन्न झाला. व तिघे सेवक हे यौगंधरायण, रुमण्वान् व वसंतक अशा नांवानें शतानीकाच्या प्रधानाचेठिकाणीं पुत्ररूपानें उत्पन्न होते झाले. एकदा अहिर्दंष्ट्रनांवाचा दैत्य इंद्रादिदेवांना पीडा देत असतां इंद्रानें आपल्याला साहाय्य करण्याकरितां शतानीकाला बोलावणें पाठविलें; व त्याकडून दैत्याचा नाश करविला. शतानीक आपला मुलगा मोठा झाला, असें पाहून त्याला राज्यावर बसवून स्वतः विष्णुमतीनामक पत्नीसह अरण्यांत तपश्चर्या करण्याकरितां गेला असतां शतानीकाच्या प्रधानानेंहि आपल्या पुत्रांना आपला अधिकार देऊन ते स्वतः तीर्थयात्रा करण्याकरितां म्हणून निघून गेले. सहस्रानीक हा बापाप्रमाणें प्रजेचें पालन उत्तम-तऱ्हेनें करूं लागला. देवांगना अलंबुसासुद्धा कृतवर्मराजाच्या कुलांत मृगावतीनांवानें उत्पन्न झाली; व तिचा सहस्रानीकाबरोबर विवाह झाला. पुढें मृगावती गरोदर झाली; व सहस्रानीक आपल्या पत्नीचे सर्व डोहाळे पुरवितां झाला. एकेदिवशीं मृगावतीला रक्ताप्रमाणें लाल असणाऱ्या विहिरीमध्यें स्नान करण्याची इच्छा झाली. तेव्हां सहस्रानीकानें तिची इच्छा पूर्ण करण्या-करितां एक कुसुंबी रंगाची कत्रिम विहीर निर्माण केली. नंतर मृगावती त्या लाल विहिरींत स्नान करताच तिचा सर्व देह रक्तमय झाला. तितक्यांत एका मोठ्या पक्षानें मृगावतीला पाहिलें; व हें पिकलेंलें लाल फळ असावें, अशाबुद्धीनें त्यानें तिला उचलून आकाशमार्गानें नेलें. पुढें बरेंच लांब नेल्यावर उदयाचलपर्वताच्या गुहेंत तिला टाकिलें. उंच प्रदेशावरून पडल्यामुळें मृगावतीला मूर्च्छा आली; तथापि ती क्षणांत सावध होऊन पतिविरहानें शोक करूं लागली. तितक्यांत जमदग्निमुनीनें तिचें ओरडणें ऐकिलें; व तिला आपल्या आश्रमांत आणिलें. पुढें कांहीं काळानें प्रसूत होऊन मृगावतीला मुलगा झाला; व तिचें बाळंतपण तेथील ऋषिपत्न्यांनीं उत्तमतऱ्हेनें केलें. त्या मुलाचें नांव उदयन असें ठेविलें. पुढें त्या मुलाचे सर्व जातकर्मादि चौलांत संस्कार ऋषींनीं यथाविधि केलें. तो उदयन मृगया करण्याकरितां एके दिवशीं गेला असतां त्यानें एका पारध्यानें पकडलेला सर्प पाहिला. उदयन व्याधाला म्हणतो कीं, निरापराधी सर्पाला कां धरलें आहेस !

सोडून दे. व्याध उदयनास म्हणतो; मी जर ह्या सापाला नगरामध्यें घेऊन गेलो, तर मला पुष्कळ द्रव्य मिळेल, करितां मी ह्याला सोडणार नाहीं. नंतर व्याधानें सापाला पेटींत बांधून ठेविलें. उदयनानें व्याधाचा निश्चय पाहून आपल्या आईनें दिलेलें सोन्याचें कंकण व्याधाला दिलें; व सापाला सोडून देण्याबद्दल व्याधाची प्रार्थना केली. द्रव्यप्राप्ती होताच व्याधानें सापाला सोडून दिलें. नंतर तो साप मनुष्यदेह धारण करून; व उदयनाबरोबर सख्य करून त्यास पाताळीं घेऊन गेला. पुढें पाताळांत उदयनाचा उत्तमप्रकारें पाहुणचार करून धृतराष्ट्र नांवाच्या सर्पाला एक ललिता नांवाची मुलगी होती, तिच्याशी उदयनाचा विवाह केला. पुढें ललितेला उदयनापासून एक मुलगा झाला. नंतर उदयन आईला भेटण्याकरितां, धृतराष्ट्रादिकांची आज्ञा घेऊन लीलावती व पुत्र ह्यासह परत घरीं आला. उदयनाला, लीलावतीला व नातवाला पाहून मृगावतीला फारच आनंद झाला. थोड्याच दिवसांत ज्या व्याधानें सापाला पकडलें होतें; व उदयनानें ज्या व्याधाला कंकण दिलें होतें; तोच व्याध तें कंकण घेऊन, विकण्याकरितां कौशांबीनगरामध्यें एका वैश्याकडे प्राप्त झाला. त्या कंकणावर राजाचा छाप आहे, असें पाहून वैश्य व्याधाला घेऊन राजद्वारीं आला. सहस्रानीकानें तें कंकण पाहून; व हें आपली पत्नी जी मृगावती तिच्या हातांतील आहे; असें ओळखून स्त्रीविरहानें सहस्रानीक फारच शोक करूं लागला. तेव्हां हें कंकण तुला कसें मिळालें, असें सहस्रानीकानें व्याधाला विचारलें असतां, व्याधानें घडलेलें सर्व वर्तमान राजास निवेदन केलें. नंतर पत्नीचा शोध करण्याकरितां कित्येक मंडळी बरोबर घेऊन, राजा उदयाचलपर्वतावर प्राप्त झाला. तेथें जमदग्नीच्या आश्रमांत सहस्रानीकराजा सैन्यासह आला असतां, त्याचें आदरातिथ्य जमदग्नीनें उत्तमप्रकारें केलें. नंतर राजाला जमदग्नीनें मृगावतीची; व पुत्र जो उदयन त्याची आणि उदयनाची पत्नी जी लीलावती तिची व तिच्या मुलाची अशी गाठ घालून दिली. सर्व कुटुंबासह राजा स्वनगराला प्राप्त झाला; उदयनाला राज्यावर बसवून स्वतः सहस्रानीक पत्नीसह, दक्षिणसमुद्राचे काठीं असणाऱ्या चक्रतीर्थावर येऊन स्नान करिता झाला. स्नान करतांच तो राजा व मृगावती; आणि इतर प्रधानमंडळी मनुष्यदेह सोडून; व शापापासून मुक्त होऊन स्वस्थानीं; म्हणजे विमानांत बसून गंधर्वलोकीं निघून गेली. हें चक्रतीर्थ शापमुक्त करणारें आहे; ह्याच्या श्रवणानें प्राण्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

# अध्याय ६ वा.

## महिषासुर व देवी यांचें युद्ध.

सूत म्हणतातः हे शौनकादि ऋषिहो ! पूर्वीं देव व दैत्य यांचें युद्ध सुरू असतां त्यांत देवांनीं दैत्यांचा पराजय केला; त्यामुळें दितीला फार वाईट वाटलें; व तिनें म्हशीचें स्वरूप धारण केलें; व ती अरण्यांत जाऊन पंचाग्नि-साधनादि घोर कृत्याच्या योगें तपश्चर्या करती झाली. त्या तपश्चर्येच्या प्रभावानें इंद्रादि देव भयभीत झाले. नंतर सुपार्श्वनांवाचा ऋषि दितीजवळ येऊन म्हणतो कीं, तूं ज्याकरितां तप करीत आहेस, तें तुझें कार्य सफल होईल. तूं महिषीचें म्हणजे म्हशीचें रूप घेतल्यामुळें तुला महिषाप्रमाणें म्हणजे रेड्याप्रमाणें तोंड असलेला व बाकीचें सर्व शरीर मनुष्याप्रमाणें असलेला असा महिष या नांवाचा अति पराक्रमी पुत्र होईल; व तो सर्व देवांना जिंकील. ह्याप्रमाणें सुपार्श्वमुनीचें भाषण ऐकून;व दितीनें तपश्चर्या समाप्त करून ती परत आपल्या स्वस्थानाला प्राप्त झाली. पुढें कांहीं काळानें तिला वरा-प्रमाणें महिषाच्या मुखाचा असा पुत्र झाला. त्याचें नांव तिनें महिषासुर असें ठेविलें. तो महिषासुर दिवसेंदिवस मोठा होऊं लागला. तो मोठा झाल्यावर विप्रचित्ति, विद्युन्माली वगैरे असुर महिषासुराजवळ येऊन सांगते झाले कीं, स्वर्गांतील राज्य पूर्वीं आपणाकडे होतें; परंतु इंद्रादि-देवांनीं विष्णूचा आश्रय धरून तें आमच्यापासून हिरावून घेतलें आहे; करितां आतां आपण तें पुनः परत मिळविणें, हें आपलें कर्तव्य आहे. महिषासुराच्या संमतीनें इतर असुरांनीं देवांबरोबर युद्ध कर-ण्याचा निश्चय केला. नंतर महिषासुर असुरसैन्यांसह अमरावतीला येऊन; व शंभर वर्षें देवांबरोबर युद्ध करून; व स्वर्गलोक आपल्या ताब्यांत घेऊन देवांना देशोधडीला पळवून लाविता झाला. इंद्रादि देव ब्रह्मदेवाला शरण गेले; परंतु ब्रह्मदेवाचे हातून महिषासुराचा नाश व्हावयाचा नसल्या-मुळें तो देवांना घेऊन विष्णु व शंकर यांजकडे जाऊन झालेलें सर्व वर्तमान निवेदन करिता झाला. विष्णु व शंकर ह्यांनीं ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून; व महिषासुराचा नाश करावा, ह्या उद्देशानें क्रोधाविष्ट होऊन त्यांनीं आपआपल्या मुखांतून विशिष्ट तेज उत्पन्न केलें. शिव व विष्णु यांचें तेज एकत्र होऊन ह्या दोन तेजांच्या संयोगानें एक स्त्री निर्माण झाली. शंकराचें तेज हें त्या स्त्रीचें मुख; व विष्णुतेज हें तिचे दोन हात झाले. नंतर ब्रह्मादि देवांनींहि आप आपल्या अधिकाराप्रमाणें तेजें उत्पन्न करून त्या स्त्रीचें बाकीचे सर्व

अवयव निर्माण केले. त्या स्त्रीला पाहून देवांना पुष्कळ धीर आला. तसेंच रुद्रादि देवांनीं आपआपल्या आयुधांमधून एक एक आयुध काढून त्या स्त्रीला अर्पण केलें. तशीं सर्वांनीं तिला भूषणेंहि दिलीं. ज्यावेळीं ती मोठा शब्द करूं लागली, त्यावेळीं सर्व जगत् कांपूं लागले. तीं स्त्रीरूप धारण केलेली व आयुधें हातात घेतलेली देवी सिंहावर बसून महिषासुराबरोबर युद्ध करण्यास तयार झाली. देवीनें आपल्या अनेक शस्त्रास्त्राच्या साहाय्यानें महिषासुराचें सर्व सैन्य नाहींसें केले. सैन्याचा नाश झालेला पाहून महिषासुर स्वतः देवीबरोबर युद्ध करूं लागला; परंतु त्यांत महिषासुराला यश आलें नाहीं.

---

# अध्याय ७ वा.

## महिषासुराचा वध.

सूत म्हणतात; शौनकादिक ऋषीहो ! ज्यावेळीं देवीच्या पुढें आपला टिकाव लागत नाहीं, असें महिषासुरास वाटलें, त्यावेळीं त्यानें चंडकोप-नांवाच्या असुरास देवीबरोबर युद्ध करण्याची आज्ञा दिली. बरें आहे, असें म्हणून चंडकोपानें देवीवर शेंकडो बाणांचा वर्षाव केला. देवीनें चंडकोपानें सोडलेले सर्व बाण आपल्या सामर्थ्यानें निरुपयोगी केले; व चंडकोपाचे रथाला जोडलेले घोडे, व सारथी ठार केले; व ध्वजहि तोडून मोडून टाकिला. नंतर देवीनें चंडकोपाचें धनुष्य तोडून त्यास विरथ व निःशस्त्र केलें. चंडकोप रागानें हातांत खड्ग घेऊन देवीचें वाहन जो सिंह त्यास मारण्याकरितां निघाला असतां, देवीनें त्याचा उजवा हात तोडून टाकिला. देवीनें त्यावेळीं आपल्या शूलानें चंडकोपाचा प्राण घेतला. क्रमानें चित्रभानु, कराल, बाष्कल, वगैरे असुरांचाहि नाश देवीनें तत्काळ केला. महिषासुर हातांत खड्ग घेऊन व मोठी गर्जना करून सिंहावर धांवला असतां सिंहानें आपल्या तीक्ष्ण नखानें त्याला फाडून टाकिलें. इतक्यांत महिषासुरानें आपलें स्वरूप पालटिलें; व सिंहस्वरूप धारण केलें. क्षणांत पुरुषस्वरूप, क्षणांत गजस्वरूप, अशीं अनेक स्वरूपें घेऊन देवीबरोबर युद्ध सुरू केलें. देवीनें महिषासुराच्या छातींत मुष्टिप्रहार करून त्याचा प्राण घेतला. महिषासुराचा नाश झालेला पाहून इंद्रादि देवांना मोठा आनंद झाला; व देवांनीं अनेकप्रकारें देवीची स्तुति केली. ज्या दक्षिणसमुद्राचे काठीं महिषासुराचा वध केला, त्याठिकाणीं देवीनें आपल्या नांवाचें एक पुर निर्माण केलें. त्यास देवीपुरतीर्थ असें म्हणतात. देवीपुरतीर्थाजवळ असणारी धर्मपुष्करिणी अमृ-

तानें भरलेली असल्यामुळें त्याठिकाणच्या तीर्थास अमृततीर्थ असेंहि म्हणतात. देवीनें देवीपुरतीर्थास वर दिला आहे कीं, जे कोणी ह्या तीर्थाचेठिकाणीं येऊन स्नानादि पुण्यकृत्यें करितील, ते सर्व पापापासून मुक्त होऊन सर्व ऐच्छिक मनोरथानें पूर्ण होतील. रामचंद्रानें ह्या देवीपुरापासून सेतु ( पूल ) बांधण्यास सुरवात केली आहे. ज्यावेळीं सेतूला प्रारंभ करावयाचा, तेव्हां प्रथम तेथें शंकराची आराधना करून प्रथम शंकराच्या आज्ञेनें नऊ पाषाणांची स्वतः तेथें स्थापना केली; व नलनामक वानराकडून सेतु बांधण्यास प्रारंभ केला. जेथें नऊ पाषाणांची स्थापना रामानें केली, त्यास पाषाणनवकतीर्थ असें म्हणतात. रामेश्वराची यात्रा करणारांनीं चक्रतीर्थावर स्नान करून सेतूचेठिकाणी स्थापित केलेल्या विष्णूची पूजा करावी. नंतर पाषाणनवकतीर्थांत स्नान; व देवांचें पूजन केल्यावर देवीपुरापासून तों सेतुबंधरामेश्वरापर्यंतच्या सर्व तीर्थांवर स्नानें करावींत. प्रथम पाषाणनवकतीर्थ, क्षेत्रपिंडतीर्थ; चक्रतीर्थ, सेतुनाथतीर्थ, दर्भशय्यातीर्थ वगैरे तीर्थांवर स्नान केल्यानंतर जे सेतूला, रामेश्वराला; व इतर देवतांना नमस्कार करून सेतूची प्रार्थना करितात, त्यांच्या सर्व इच्छित मनकामना पूर्ण होऊन; ते शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ८ वा.

### सुदर्शनगंधर्वाला शाप.

सूत म्हणतात;—हे शौनकादि ऋषिहो ! आतां तुम्हाला चक्रतीर्थाच्या दक्षिणेस असणारें जें वेतालवरदतीर्थ त्याचें माहात्म्य सांगतो; ऐका. हें कथानक पूर्वीं शंकरानें पार्वतीला सांगितलें होतें. पूर्वीं गालवनांवाचा एक ऋषि होता. तो नित्य आपल्या आश्रमांत बसून तप करी; व त्याची मुलगी कांतिमतीहि फुलें वगैरे आणून बापाला देवपूजेकरिता देत असे. ती कांतिमती नित्याप्रमाणें फुलें आणण्याकरितां रानांत बरीच दूर जाऊन; व सुंगधीं फुलें वेंचून पेटींत घालून बापाकडे आणीत असतां वाटेंत सुदर्शन व सुकर्ण यां नांवाचें दोन गंधर्व तिला भेटले. त्यांनीं सुंदर; व प्रत्यक्ष कामपत्नी रतीप्रमाणें शोभणारी अशी कांतिमतीनांवाची गालवाची कन्या अवलोकन करून कामपीडित होत्साते ते कांतिमतीला म्हणते झाले कीं, हे कन्ये ! तूं कोणाची मुलगी आहेस ? तुला पाहून माझें मन कामपीडित झालें आहे. आमच्यापैकीं जो कोणी हवा असेल तो तूं पति कर, त्याबद्दल आमची कांहीं हरकत नाहीं. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून कांतिमती म्हणतें; मी गालवमुनीची मुलगी आहें,

मी अविवाहित आहें; व मी फुलें आणण्याकरितां येथें येत असते. मला घरीं जाण्यास विलंब झाल्यास माझा बाप मला रागवेल. मी स्वतंत्र नसल्यामुळें आपल्या प्रश्नांचें उत्तर मजला देणें अशक्य आहे; इतकें सांगून ती कांतिमती आश्रमाकडे येऊं लागली; तोंच सुदर्शननामक गंधर्वानें धांवत जाऊन; व कांतिमतीची वेणी धरून तिच्यावर बलात्कार केला. ती कांतिमती बापाला मोठमोठ्या हांका मारून, ओरडूं लागली. ती आरडाओरड ऐकून गालवप्रमुखऋषि त्याठिकाणीं प्राप्त झाले; व आपल्या मुलीला गंधर्वाच्या एका मुलानें धरलें आहे, असेंहि गालवमुनींनें अवलोकन केलें. गालवाला सुदर्शनगंधर्वाचा राग आला; व त्यानें सुदर्शनास शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं हें निंद्य कृत्य केलेंस त्यापेक्षां तुला प्रथम मनुष्यजन्म व नंतर वेताळाचा जन्म प्राप्त होईल. ऋषिशाप श्रवण करून सुदर्शनाला फारच वाईट वाटलें; व तो गालवमुनींस शरण गेला. गालवानें उच्छाप दिला कीं, ज्या वेळीं विज्ञप्तिकौतुक नांवाच्या गंधर्वपतीचें तुला दर्शन होईल, त्या वेळीं तूं शापापासून मुक्त होशील. सुकर्णगंधर्वालाहि असाच शाप व उच्छाप दिला. नंतर गालवमुनि कन्येला घेऊन स्वाश्रमांत निघून गेले; कांहीं काळानें त्या दोन गंधर्वांस मनुष्यदेह प्राप्त झाले. त्यांचीं नांवें विजय व अशोकदत्त अशीं होत; एके दिवशीं यमुनानदीचे काठीं बारा वर्षें दुष्काळ पडला असतां, त्यांत विजयाचा अंत झाला; व तोहि शेवटीं नाशाप्रत प्राप्त झाला. मुनिशापाप्रमाणें त्याला वेताळाचा जन्म प्राप्त झाला; व तो सर्वत्र भटकूं लागला. अशातऱ्हेनें गंधर्वाच्या मुलाला म्हणजे सुदर्शनाला गालवाचा शाप होऊन, प्रथम मनुष्यजन्म घेऊन; व त्या जन्मांत अनेक दुःखें भोगून दुसरा वेताळजन्म प्राप्त झाला.

---

## अध्याय ९ वा.

### वेतालवरदतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! ‘ गालवऋषीच्या शापानें सुदर्शनगंधर्वाला मनुष्यजन्म प्राप्त होऊन नंतर तो दुसरे जन्मीं वेताळांचा राजा झाला; व विकर्णगंधर्व अशोकदत्तनांवानें मनुष्यजन्म धारण करून वेदवेदांतादि, अनेक शास्त्रांत पारंगत झाला. एक प्रतापमुकुट नांवाचा राजा होता. त्याच्याकडे एक काशींतील प्रसिद्ध मल्ल त्या राजाजवळ मल्लयुद्ध करण्याकरितां आला. अशोकदत्त बलवान् असून जसा शास्त्रविद्येंत निष्णात होता, तसाच तो शस्त्रविद्येंतहि होता; व ही गोष्ट प्रतापमुकुटाला माहिती असल्यामुळें

त्यानें मल्लाचा पराजय करण्याकरितां अशोकदत्ताला बोलावणें पाठिवलें. अशोकदत्तानें राजाजवळ येऊन राजाच्या आज्ञेनें त्या मल्लाला ठार मारिलें. हें कृत्य पाहून प्रतापमुकुटाला फार आनंद झाला; व त्यानें अशोकदत्ताला पुष्कळ पैसा; व गांव वगैरे इनाम देऊन त्यास आपल्या जवळ ठेऊन घेतलें. एके दिवशीं तो राजा अशोकदत्ताला बरोबर घेऊन रानांत मृगया करण्याकरितां गेला असतां तेथें एक दीन असा ध्वनी उत्पन्न झाला कीं, माला फार तहान लागली आहे; करितां माला प्यावयास पाणी देऊन माझें रक्षण करा. असा शब्द कानीं पडतांच राजानें अशोकदत्ताला हा ध्वनि कोठून निघाला; व कोणाचा आहे, वगैरे विचारिलें. नंतर राजाच्या भाषणाप्रमाणें अशोकदत्तानें विचार करून हा भूतें व वेताळ यांचा ध्वनि आहे; व त्यांना पाणी देणें हें आपलें कर्तव्य आहे; असें म्हणून अशोकदत्त उदक; व मृगया करून आणिलेलें मांस भूतें व वेताळ यांस देता झाला. वाटेंत त्याला एक नूपुर(पायांतील पैंजण) सांपडलें. तें घेऊन तो राजाजवळ आला; व एका नूपुराचा कांहीं उपयोग होणार नाहीं, तर असलें दुसरें नुपुर कसें मिळेल, अशाविषयीं तो विचार करूं लगला. पूर्वीं जेथें तें नूपुर सांपडलें तेथें अशोकदत्त पुनः गेला असतां एका राक्षसीची तेथें गांठ पडली. आपल्या जवळ असलेल्या नूपुराच्या जोडीचें नूपुर हिच्याजवळ आहे, असें पाहून अशोकदत्तानें राक्षसीला ह्मटलें कीं, एक नूपर मजला मिळालें आहे; व दुसरें जें तुजजवळ आहे, तें माला दे. नंतर तिनें अशोकदत्ताला तें नूपुर दिलें; व आपली विद्युत्प्रभानांवाची मुलगी व एक सोन्याचें कमळ त्यास दिलें. तो एकेदिवशीं आपली पत्नी जी विद्युत्प्रभा तिला विचारता झाला कीं, हे प्रिये! हें सुवर्णकमल तुझ्या आईला कोठें मिळालें. ती अशोकदत्ताला म्हणाली कीं, हे स्वामिन् ! कपालविस्फोटनांवाचा एक वेताळांचा राजा आहे. त्याचें एक सरोवर आहे. त्या सरोवरांत असलीं कमळें सांपडतील. अशोकदत्ताच्या वचनाप्रमाणें विद्युत्प्रभेनें त्याला त्या सरोवराजवळ नेलें.त्याठिकाणीं गेल्यावर अशोकदत्त त्या सरोवरांतील कमळें तोडूं लागला, त्या वेळीं तेथील वेताळांचा राजा जो कपालविस्फोट त्याच्या सैन्याचें व अशोकदत्ताचें युद्ध झालें. शेवटीं सर्व वेताळसैन्याचा पराजय करून, अशोकदत्त कपालविस्फोटाला मारण्यास सिद्ध झाला. त्या वेळीं गंधर्वांचा राजा विमानांत बसून तेथें आला; व अशोकदत्ताला म्हणतो कीं, तूं कपालविस्फोटाला मारण्याचें साहस करूं नको. त्याच काळीं अशोकदत्त शापमुक्त होऊन; व मनुष्यदेह टाकून तो दिव्यदेह धारण करिता झाला, आणि विद्याधरपतीच्या विमानांत जाऊन बसला. विद्याधरपति [गंधर्वांचा राजा] विकर्णाला म्हणतो कीं, हा जो कपालविस्फोटनांवाचा वेताळांचा राजा आहे,तो तुझा भाऊ असून गालवाच्या शापानें

वेताळाच्या जन्माला आला आहे. असें गंधर्वराजाचें भाषण ऐकून विकर्ण म्हणतो कीं, ह्याला सोडून मी एकटा स्वर्गाला येणार नाहीं, करितां ज्यायोगें हा शापमुक्त होईल, असा एकादा उपाय सांगा. गंधर्वराजा विकर्णास म्हणतो कीं, जर हा वेताळराजा कपालविस्फोट दक्षिणसमुद्राचें काठीं असणाऱ्या चक्रतीर्थाजवळ जाऊन स्नान करील, तरच गालवशापापासून मुक्त होईल. नंतर विकर्ण व वेताळराजा चक्रतीर्थाजवळ जाऊन स्नानादि करितांच विद्याधरपतीच्या वचनाप्रमाणें व गालवानें दिलेल्या उच्छापाप्रमाणें शापमुक्त होऊन; व सुंदर स्वरूप धारण करून गंधर्वलोकाला निघून गेले. त्या दिवसापासून त्या तीर्थाला वेतालवरदतीर्थ असें नांव प्राप्त झालें. हें तीर्थ चक्रतीर्थाच्या दक्षिणदिशेस आहे. जे कोणी वेतालवरदतीर्थावर स्नान करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन ते जीवन्मुक्त होतात. इतकें मोठें तीर्थ आजपर्यंत झालें नाहीं; व पुढें दुसरें होणार नाहीं. जे कोणी ह्या वेतालवरदतीर्थाचेठिकाणीं श्राद्धादि विधी करितील, ते सर्व पितरांसह पापमुक्त होऊन स्वर्गाला जातील. ह्या कथनकाचें पठण करणारासहि मुक्ति मिळेल.

---

## अध्याय १० वा.

### पापविनाशतीर्थाचें माहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! वेतालवरदतीर्थाचेठिकाणीं स्नान करून नंतर गंधमादनपर्वतावर जावें. ज्या पर्वतावर अनेक आश्रम, नद्या; व पुण्यकारक क्षेत्रें आहेत. ज्या पर्वतावर वसिष्ठादि ऋषि मोठमोठीं अनुष्ठानें करीत आहेत. ज्या पर्वतावर लक्ष्मीनारायण, ब्रह्मदेव, गणपति, कार्तिकस्वामी, नवग्रह, अष्टवसु, पितर, लोकपाल वगैरे पुण्यपुरुष नित्य राहतात. ज्या पर्वतावर पार्वतीसह शंकर क्रीडा करितात. असा हा गंधमादनपर्वत समुद्रामध्यें सेतूप्रमाणें राहिलेला आहे. गंधमादनाची स्तुति करून; व वर चढतांना होणाऱ्या पादाघाताची मला क्षमा कर, असें म्हणून आपण त्या गंधमादनपर्वतावर हळूहळू जावें. नंतर समुद्रस्नान करून पितृश्राद्ध करावें. त्या गंधमादनपर्वतावर शमीच्या पानाइतकें बारीक जरी पिंड दिले, तरी तेवढ्यानें सर्व पितर अक्षय्य तृप्त होतात; व शेवटीं मुक्तीला जातात.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो, आतां तुम्हाला पापविनाशतीर्थाचे माहात्म्य सांगतो. पूर्वी हिमवान्पर्वताच्या जवळ कुलपतिनामक ब्राह्मणाचा एक आश्रम होता. त्याठिकाणीं दृढमतिनांवाचा एक शूद्र धर्म श्रवण करण्याची

इच्छा करून कुलपतीजवळ प्रश्न करिता झाला.त्यावेळीं कुलपती दृढमतिनांवाच्या शूद्राला म्हणतो कीं,तूं शूद्र असल्यामुळें तुला उपदेश करणें अयोग्य आहे.शूद्राला व्याकरणादि ग्रंथ, त्याप्रमाणें दुसरेहि शास्त्रीय ग्रंथ शिकवूं नये; असा नियम आहे; तेव्हां मी तुला उपदेश करूं शकत नाहीं. नंतर तो शूद्र तेथून निघून घोर तपश्चर्या करिता झाला. कांहीं दिवस लोटल्यावर तेथें एक सुमति-नांवाचा ब्राह्मण रोज येऊन शूद्राकडून अतिथिसत्कार घेऊन परत स्वाश्र-माला येत असे; मात्र दृढमतिनांवाच्या त्या शूद्राची तपश्चर्या पाहून सुमति मनामध्यें त्याचा द्वेष करीत असे. ह्याप्रमाणें सुमतिब्राह्मणाचा पुष्कळ काळ शूद्राच्या संसर्गामध्यें ( अतिथिसत्कार ग्रहण करण्यामध्यें ) गेल्यामुळें शूद्रानें विचारिलेल्या प्रश्नाचा निषेध करण्याचें सामर्थ्य त्या ब्राह्मणामध्यें राहिलें नाहीं. एके दिवशीं तोच ब्राह्मण नित्यनियमाप्रमाणें शूद्राजवळ आल्याबरोबर त्या दृढमतिनामक शूद्रानें धार्मिक विषयांच्या बाबतींत त्या ब्राह्मणास एक प्रश्न विचारिला असतां सुमतिब्राह्मणानें शूद्राला हव्यकव्यादि सर्व धार्मिक विष-याचा उपदेश केला; व तेथें त्या शूद्राकडून श्राद्धादि कर्मेंहि करविलीं. सुमतीचें हें वर्तन इतर ब्राह्मणास न आवडून त्यानें सुमतीला वाळींत टाकिलें ( अपांक्त केले ) शेवटीं सुमतीचा जेव्हां अंत झाला, तेव्हां यमदूतांनीं त्याला नरकांत लोटून दिलें. त्याला दुसरा जन्म गाढवाचा प्राप्त झाला. नंतर कुत्रा, कावळा; व चांडाळ इतके जन्म सुमतीला घ्यावे लागून, त्यापुढें त्याला शूद्रज-न्मांत जावें लागलें. नंतर वैश्यजन्म, क्षत्रियजन्म व पुढें ब्राह्मणजन्महि क्रमा-क्रमानें सुमतीला प्राप्त झाले. पुढें ब्राह्मणजन्मांत उपनयनसंस्कार झाल्यानंतर कांहीं कारणानें तो अरण्यांत गेला असता त्याला एका ब्रह्मराक्षसानें पकडिलें. हें पाहून त्या ब्राह्मणपुत्राच्या बापाला फारच वाईट वाटलें; व पुत्राची ब्रह्म-राक्षसाचे हातून मुक्तता व्हावी, एवढ्याचकरितां तो फिरत फिरत अगस्ति-ऋषीच्या आश्रमाला प्राप्त झाला; व पुत्राची ब्रह्मराक्षसाचे हातून सुटका होण्याविषयीं उपाय विचारूं लागला. अगस्तीनें ज्ञानदृष्टीनें त्या पुत्राचें पूर्व-कर्म जाणून घेऊन सांगितलें कीं, हा तुझा मुलगा पूर्वी सुमतिनांवाचा ब्राह्मण होता; व त्यावेळीं त्यानें एका शूद्राला धर्मोपदेश केला. त्या पापकर्मानें त्याला पुष्कळ वाईट जन्म घ्यावे लागले. आतां पूर्वजन्मीं जें कांहीं थोडें पुण्य संपादन केलें होतें, त्या पुण्यानें ह्याला हा ब्राह्मणजन्म प्राप्त झाला आहे. यमानें हा ब्रह्मराक्षस ह्याला त्रास देण्याकरितां पूर्वी केलेल्या दुष्कृत्यामुळें पाठविला आहे. आतां तूं मुलाला घेऊन दक्षिणसमुद्रामध्यें असणाऱ्या गंध-मादनपर्वतावर एक पापविनाशतीर्थ आहे, तेथें जा; व मुलाला त्या तीर्थोदकानें स्नान घाल; म्हणजे त्याचे सर्व दोष नष्ट होतील. असें अगस्तिऋषीनें सांगतांच

तो ब्राह्मण आपल्या मुलाला घेऊन पापविनाशतीर्थाचें ठिकाणीं प्राप्त झाला; व त्यानें पुत्रासह स्वतः तेथें स्नान केलें, त्यायोगें त्याचें सर्व पाप नष्ट होऊन त्याची ब्रह्मराक्षसापासून मुक्तता झाली; व तो ब्रह्मपुत्र निरोगी बनला. अशा ह्या तिर्थप्रभावानें तो ब्राह्मणपुत्र ह्या लोकीं पुष्कळ सौख्य भोगून अंतकाळीं पापविनाशतीर्थात स्नान केल्यामुळें सर्वपापापासून मुक्त होऊन वैकुंठलोकीं जाता झाला. त्या ब्राह्मणपुत्राचा बापहि अंतकाळीं मुक्त झाला. सुमतीनें ज्या शूद्राला धर्मोपदेश केला, तोहि अनेकजन्मांतीं गंधमादनपर्वतावर गिधाड्याचा जन्म घेऊन; व पापविनाशतीर्थात स्नान करून मुक्त झाला. ह्याप्रमाणें पापविनाशतीर्थाचें केवळ माहात्म्य श्रवण करणारास व पठन करणारास स्वर्गलोक प्राप्त होतो. सर्व पातकांचा येथें नाश होत असल्यामुळें ह्या तीर्थास पापविनाशतीर्थ हें नांव प्राप्त झालें आहे.

---

# अध्याय ११ वा.

## सीतासराचें माहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! पापविनाशतीर्थाचे ठिकाणीं स्नान केल्यानंतर सीतासराचे ठीकाणीं स्नान करावें. जगतामध्यें जितकीं तीर्थें आहेत तीं सर्व स्वतःची पापापासून मुक्तता व्हावी एवढ्याकरितां सीतासराचे ठिकाणीं स्नान करण्याकरितां येत असतात, असा हा सीतासराचा महिमा आहे. ब्रह्महत्त्येपासून आपली मुक्तता व्हावी; म्हणून इंद्रानेंहि ह्या सीतासराचे ठिकाणीं स्नान केलें होतें. पूर्वीं एक कपालाभरणनांवाचा राक्षस होता. त्याला ब्रह्मदेवाच्या वरानें अवध्यत्व प्राप्त झालें होतें. त्याचा शवभक्षण ह्यानांवाचा एक प्रधान होता. एकेदिवशीं राक्षसानें आपल्या प्रधानास बोलावून सांगितलें कीं, आपण स्वर्गलोकांतील राज्य करून सर्व मंडळीसह नंदनवनांत क्रीडा करावी, असा माझा विचार ठरला आहे. नंतर प्रधानाचें अनुमोदन मिळतांच राक्षसानें आपल्या आसनावर दुर्मेधसनांवाच्या पुत्राला बसवून स्वतः प्रधानासह शंभर अक्षौहिणी सैन्य घेऊन इंद्रलोकावर स्वारी केली. त्या युद्धामध्यें देवसेनेच्या साहाय्यानें इंद्रानें कपालाभरणनामक राक्षसाचें सर्व सैन्य नष्ट करून शेवटीं वज्रप्रहारानें त्या राक्षसाचाहि नाश केला. राक्षसाला मारल्यामुळें इंद्राला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें.

हा राक्षस ब्राह्मण नसतां ह्याच्या नाशानें इंद्राला ब्रह्महत्त्या कशी लागली, असा प्रश्न शौनकादिऋषींनीं केला असल्यामुळें सूत सांगतात; हे ऋषिहो, पूर्वीं

विंध्यपर्वतावर त्रिवक्रनांवाचा एक राक्षस होता. त्या राक्षसाची सुशीला या नांवाची सद्गुणी अशी बायको होती. ती विंध्यपर्वतावर हिंडत असतां तिला एका शुचिनांवाच्या तपस्व्याची गांठ पडली. त्या सुंदर स्त्रीला पाहून शुचि-नामकमुनीचें मन कामपीडित होऊन तो तिला आपल्या पर्णकुटिकेंत राहण्याकरितां जागा देऊं लागला. ती स्त्री त्या ऋषीला म्हणते; हे मुने ! मी त्रिवक्रराक्षसाची बायको आहे. मला संतान नसल्यामुळें त्याच्या प्राप्तीकरितां मला माझ्या पतीनें शुचिनामक ऋषीची शेवा करण्याकरितां पाठविलें आहे. नंतर शुचिनामक ब्राह्मणाशीं ती स्त्री तीन दिवस रममाण होऊन गर्भवती असती झाली. पुढें जो पुत्र झाला, तोच हा कपालाभरण राक्षस होय. त्याची उत्पत्ति ब्रह्मबीजापासून असल्यामुळें इंद्राला त्याच्या वधानें ब्रह्महत्त्या लागली. ब्रह्महत्त्येनें पीडित झालेला इंद्र जिकडे तिकडे धावूं लागला; व शेवटीं ब्रह्मदेवाकडे गेला. ब्रह्मदेवानें इंद्राला सांगितलें कीं, तूं सीतासराचेठिकाणीं जाऊन स्नान कर; म्हणजे तूं ब्रह्महत्त्येच्या दोषापासून मुक्त होशील. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें इंद्र गंधमादनपर्वतावर जाऊन, तेथें असणाऱ्या सीतासरावर स्नान करून; व शंकराची पूजा करून ब्रह्महत्त्येच्या दोषापासून मुक्त होता झाला. सीतासर हें सर्व महापातकादि दोषांचें नाशन करणारें असून मुक्ति देणारें आहे. त्याच सरोवराचेठिकाणीं सीतेनें ‘ मी पवित्र आहे ’ असा रामाचा विश्वास आपल्यावर बसावा; म्हणून अग्नींत प्रवेश केला होता, त्यावेळीं अग्नी शीतळ होऊन सीता शुद्ध आहे, असे रामास दर्शविता झाला. जे कोणी ह्या सीतासराचे ठिकाणीं स्नान करून व अनेक दानें देऊन यज्ञादि कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें करितील, ते ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं जातील.

---

## अध्याय १२ वा.

### मंगलतीर्थाचें माहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! सीतासराचेठिकाणीं स्नान केल्यावर मंगलतीर्थावर स्नान करावें. ज्या तीर्थाचेठिकाणीं लक्ष्मी सतत वास करिते, ज्याठिकाणीं देव ऐश्वर्यप्राप्तीकरितां स्नानादि पुण्यकृत्यें करिते झाले; असें हें सर्वश्रेष्ठ तीर्थ आहे. आतां ह्याबद्धल एक कथानक सांगतों. पूर्वी मनोजवनांवाचा एक सोमवंशांत उत्पन्न झालेला राजा होता. तो मोठा पराक्रमी; व सर्वगुणसंपन्न होता. त्यानें षड्रिपूंचा पराजय; व इंद्रियनिग्रह केला होता. कालान्तरानें त्या राजाला ब्राह्मणादिकांपासून द्रव्य हरण करण्याची कुबुद्धि

झाली; जरी हा राजा मूळचा दुर्वर्तनी नव्हता, तरीसुद्धा पूर्वदुष्कृतानें झालेल्या अंतर्गत गृहकलहामुळें त्यास कामादि षड्रिपुहि त्रास देऊं लागले. त्या राजाच्या नवीन उत्पन्न झालेल्या दुर्वर्तनामुळें शत्रूंनीं त्याच्या राज्यावर हल्ला करून त्यास राज्यांतून हाकलून दिलें. मनोजव राजा आपल्या पत्नीसह अरण्यांत हिंडत असतां त्याच्यावर अनेक संकटें प्राप्त झालीं; व तो राजा स्वस्त्रीसह अत्यंत शोक करूं लागला असतां तेथें एक भस्मास्थि अंगावर धारण केलेला; व जटावल्कलें; व त्रिपुंड्र धारण केलेला असा पराशर ऋषि प्राप्त झाला. त्याला पाहून मनोजवाची बायको सुमित्रा चंद्रकान्तनामक पुत्रासह पराशर ऋषीस नमस्कार करून त्याची प्रार्थना करिती झाली. नंतर पराशर तिचें सांत्वन करून तिला म्हणाला कीं, हे सुमित्रे ! तूं भिऊं नको,तुला लवकरच सुख प्राप्त होईल. हे मनोजव राजा, तुला मी शत्रुनाशनाचा उपाय सांगतों. तूं गंधमादनपर्वतावर रामसेतूचेठिकाणीं मंगलनांवाचें एक तीर्थ आहे; त्याठिकाणीं तूं पुत्रकलत्रासह जाऊन स्नान कर; व तीर्थश्राद्धादि विधी कर; म्हणजे त्या पुण्यानें तुझ्या सर्व शत्रूंचा नाश होईल; व तूं सर्व राज्योपभोगानें युक्त होऊन सुखानें काळ घालविशील. नंतर पराशरानें त्या राजाला पुत्रादिकांसह तेथें घेऊन जाऊन, त्यांकडून तीन महिने मंगलतीर्थामध्यें स्नान करवून तीर्थविधीहि यथाशास्त्र करविले; व रामाचा एकाक्षरमंत्राचा त्याजकडून जप करविला. ह्याप्रमाणें तीन महिने झाल्यावर त्या ठिकाणीं एक धनुष्य व बाणासह भाते उत्पन्न झाले; ते असे होते कीं, ज्यांचा स्वीकार करून युद्धांत गेले असतां पराजय हा कधींहि होणार नाहीं. नंतर त्या राजास एक विजयी शंख व एक घोड्यांसह रथ तेथें उपस्थित झाला. अशातऱ्हेनें सर्व अक्षय्य युद्धसामग्री गुरूच्या प्रसादानें प्राप्त होतांच, गुरूनें प्रसन्न होऊन त्या राजास ब्रह्मास्त्रहि दिलें. तो मनोजवराजा पुत्रकलत्रासह रथांत बसून व सर्व आयुधें बरोबर घेऊन; व शत्रूंबरोबर युद्ध करण्यास तयार होऊन स्वनगराकडे आला. मनोजवानें आपला शंख वाजवून शत्रूला घाबरवून सोडिलें. शत्रूबरोबर युद्ध करून मनोजवराजानें आपलें राज्य फिरून मिळविलें; व त्याचें पालन तो उत्तमतऱ्हेनें करूं लागला. त्या दिवसापासून त्या राजास आगंतुक आलेल्या षड्रिपूपासून बिलकुल त्रास न होऊन मनोजवाची कुबुद्धि पश्चात्तापानें नष्ट झाली. पुढें त्यानें सत्कर्म करून पुष्कळ वर्षें राज्यसुखाचा अनुभव घेतल्यावर आपल्या पुत्राला म्हणजे चंद्रकांताला राज्यावर बसविलें;व स्वतः पत्नीसह गंधमादनपर्वतावर असणाऱ्या मंगलतीर्थाचे काठीं जाऊन तप केलें. अंतकालीं तो भार्येसह शिवलोकीं जाऊन सुखांत राहिला. तात्पर्य; अशा तऱ्हेनें शत्रूंचा नाश करून; व ह्या लोकीं सुख भोगून अंतीं त्यानें शिवलोकीं प्रयाण केलें.

---

# अध्याय १३ वा.

## अमृतवापीमाहात्म्य.

सूत म्हणतात; मंगलतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यावर एकांतरामनाथ क्षेत्रामध्यें जावें; व तेथें असणाऱ्या अमृतवापीचेठिकाणीं स्नान केल्यास त्यास जरामरणादि भीति उरत नाहीं. ह्या वापीचे काठीं शंकर स्वतः हातांत अमृतपात्र घेऊन उभे असतात; व तेथें स्नान करणारास अमृत पाजून ते अमर करितात. पूर्वी हिमालयपर्वताच्या संनिध एका निबिड अरण्यामध्यें अगस्ति ऋषीचा भाऊ तपश्चर्या करीत होता. तो त्रिकाल शंकराची फलपुष्पादिकांनीं पूजा करीत असे. अशातऱ्हेनें स्नानसंध्यादि नित्यकर्माचरणानें व शिवपूजनानें सहस्रावधि वर्षे त्याची लोटल्यावर त्यानें पंचाग्निसाधनाला आरंभ केला:—शेवटीं शंकर प्रसन्न होऊन त्यानें वर मागण्याविषयीं अगस्तीच्या भावाला सूचना केली. अगस्तीच्या भावानें शंकराची स्तुति केल्यावर तो मोक्षप्राप्तीचा उपाय शंकरास विचारिता झाला. शंकर त्यास म्हणतात; हे अगस्त्यबंधो, तू सेतूमध्यें गंधमादनपर्वतावर जाऊन मंगलतीर्थानजिक असणाऱ्या एकांतरामनाथनामक तीर्थाचे काठीं स्नानादि शुभ कर्मे कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होऊन तूं मुक्त होशील. असें सांगून शंकर गुप्त झाले. शंकराच्या सांगण्याप्रमाणें अगस्तिऋषीचा बंधु एकांतरामनाथतीर्थाचे काठीं जाऊन तीन वर्षे स्नानादि कर्मे करिता झाला. चवथ्या वर्षी तो अगस्तिबंधु योगसमाधीच्या योगें;व ईश्वरप्रसादानें समाधिस्थ होऊन मुक्तीप्रत जाता झाला. ह्या एकांतरामनाथतीर्थाचेठिकाणीं अगस्तिऋषीच्या भावाला अमृतत्व मिळालें; म्हणून ह्या तीर्थाला अमृतवापीतीर्थ असें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या अमृतवापीमध्यें स्नान करितील त्यांना अमृतत्व ( मोक्ष ) प्राप्त होईल. ह्या तीर्थाला एकांतरामनाथ हें नांव पडण्याचें कारण, ह्या ठिकाणीं राम आपल्या प्रधानादि मुख्य मंडळीसह एकांतांत बसून रावणाला कसा मारावा ? सीतेची प्राप्ती कशी होईल ? इत्यादि विचार करीत बसले होते; म्हणून ह्याचें नांव एकांतरामनाथ असें पडलें. जे कोणी अमृतवापीचे काठीं येऊन;व स्नान करून रामादिकांची पूजा करितात; ते सर्वपापापासून मुक्त होऊन शिवलोकीं जातात.

# अध्याय १४ वा.

## ब्रह्मकुण्डमाहात्म्य.

सूत म्हणतात; अमृतवापीचेठिकाणीं स्नान केल्यानंतर ब्रह्मकुंडतीर्थाचे-ठिकाणी स्नान करण्याकरितां जावें. अमृतवापीजवळच ब्रह्मकुंड आहे; त्या ठिकाणीं स्नान केलें असतां कधींहि दारिद्र्य प्राप्त होत नाहीं. केवळ ब्रह्मकुंडाचें दर्शन घेतलें तरी सुद्धां ब्रह्महत्यादि महादोष नष्ट होतात. ब्रह्मकुंडामध्यें एकदां स्नान केलें, तरी मोक्षप्राप्ती होते.जो कोणी ब्रह्मकुंडाचे काठीं यज्ञ करून त्यापासून उत्पन्न झालेलें भस्म ब्राह्मणास अर्पण करितो, त्याला संपूर्ण पृथ्वीदानाचें पुण्य लागतें. पूर्वीं ब्रह्मदेवाला कांहीं कारणामुळें शंकरानें शाप दिला होता; व त्या शापापासून आपली मुक्तता व्हावी;म्हणून ब्रह्मदेवानें गंधमादनपर्वतावर येऊन ब्रह्मकुंडतीर्थाचे काठीं यज्ञ केला; त्यायोगें ब्रह्मदेवाची शिवशापापासून मुक्तता झाली. अशा तऱ्हेनें ब्रह्मकुंडामध्यें स्नान करणारे शिवलोकाला जातात.

सूत म्हणतात; हे ऋषिहो, ब्रह्मदेवाला शंकरानें शाप कां दिला ? तें सांगतो; ऐका: पूर्वीं एकदां ब्रह्मदेव; व विष्णु यांच्यामध्यें एक भांडण उपस्थित झालें. ब्रह्मदेव विष्णूला म्हणूं लागले कीं, मी सर्व जगाच्या उत्पत्तिस्थितीला कारणीभूत असून मी सर्वांहून श्रेष्ठ आहें. विष्णु म्हणालें कीं, तुझें सर्व म्हणणें खोटें आहे. मी तुझ्यापेक्षां मोठा असून सर्व त्रैलोक्य माझ्यापासून उत्पन्न झालें आहे. असा वाद पुष्कळ वर्षें चालूं असतां तेथें शंकर प्रगट होऊन दोघांची समजूत घालूं लागले. शेवटीं ज्यावेळीं ब्रह्मदेव; व विष्णु ह्यांची समजूत पडेना, तेव्हां शंकरानें एक युक्ति योजिली. प्रथम आपलें एक शिवलिंग तेथें उत्पन्न करून ब्रह्मदेव; व विष्णु ह्यांस सांगितलें कीं, जो तुमच्यापैकीं ह्या लिंगाचा अंत लावील तो मोठा; व त्यानें सर्व जगत् निर्माण केलें, असें मी कबूल करीन. नंतर ब्रह्मदेव; व विष्णु हे शिवलिंगाचा अंत लावण्याकरितां निरनिराळ्या मार्गानें निघाले. विष्णूला अंत न लागल्यामुळें ते शंकराजवळ येऊन सांगते झाले कीं, आपल्या लिंगाचा अंत माझ्या हातून लागणें शक्य नाहीं. नंतर ब्रह्मदेवहि शंकराजवळ प्राप्त झाले; व सांगते झाले कीं, हे शंकरा ! मी तुझ्या लिंगाचा अंत लाविला, असा मोठेपणा मिळविण्याच्या आशेनें तो खोटें बोलला. खोटें भाषण ऐकून क्रोधानें ब्रह्मदेवास शाप दिला कीं, तूं जगतामध्यें अपूज्य होशील; व विष्णूला वर देऊन सांगितलें कीं, तूं ब्रह्मदेवाहून श्रेष्ठ आहेस; व तूं सर्वत्र वंद्य व पूज्य होशील. नंतर ब्रह्मदेवाला शिवशापामुळें फारच वाईट वाटलें; व तो शंकराची प्रार्थना करून उच्छापाची वाट पाहूं लागला. शंकर

ब्रह्मदेवाला सांगतात कीं, तूं गंधमादनपर्वतावर जाऊन यज्ञकर्मानें माझी पूजा कर; म्हणजे शापमुक्त होशील. जरी तूं शापमुक्त झालास, तरी तुझी पूजा फक्त श्रौत स्मार्त कर्मांमध्येंच केली जाईल, प्रत्यक्ष तुझ्या मूर्तीचें पुजन कधींहि कोणी करणार नाहीं, हें खास समज. नंतर ब्रह्मदेवांनें शिवाज्ञेप्रमाणें यज्ञ करून तो शापमुक्त झाला. ज्याठिकाणीं ब्रह्मदेवानें यज्ञ केला, त्या स्थानाला ब्रह्मकुंड हें नांव प्राप्त झालें. ब्रह्मकुंडापासून उत्पन्न झालेलें भस्म अंगाला लावणारास जन्ममरणादिकांची भीति राहणार नाहीं; व तो पंचमाहापातकापासून मुक्त होऊन; व इह लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होईल. ब्रह्मकुंडाचें अगाध माहात्म्य अवलोकन करून देव सुद्धां तेथें यज्ञादि कर्मे करूं लागले; व त्यायोगें तें आपणास कृतार्थ मानिते झाले.

---

# अध्याय १९ वा.

## हनुमत्कुंडमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! ब्रह्मकुंडामध्यें स्नान केल्यावर हनुमत्कुंडामध्यें स्नान करण्याकरितां जावें. पूर्वीं हनुमंतानें राक्षसांचा नाश केल्यानंतर परत ज्यावेळीं अयोध्येंत रामचंद्रादि सर्व येण्याकरितां निघाले, त्यावेळीं आपलें नांवाचें स्मारक ह्या बुद्धीनें एक तीर्थ निर्माण केलें; तेंच हनुमत्कुंडतीर्थ होय. हनुमंताच्या पराक्रमानें संतुष्ट झालेले शंकर स्वतः ह्या कुंडासन्निध येऊन राहते झाले; त्यामुळें हनुमत्कुंडा इतकें श्रेष्ठ तीर्थ दुसरें भूतलावरच नाहीं, असा ह्या तीर्थाचा अप्रतिम महिमा वाढला. ह्या तीर्थाचेठिकाणीं स्नान करणारांना शिवलोक प्राप्त होतो; ह्या तीर्थाचें माहात्म्य किती आहे? हें प्रत्यक्ष शंकराला सुद्धा पुरतें समजलेलें नाहीं. पूर्वीं ह्या तीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यामुळें केकयवंशांत उत्पन्न झालेल्या धर्मसख राजाला शंभर पुत्र झाले. पूर्वीं धर्मसखनांवाचा राजा पुत्राप्रमाणें प्रजापालन करणारा; व महापराक्रमी असा होता. त्याला पतिव्रता अशा शंभर स्त्रिया होत्या; तथापि राजाला संतान नव्हतें. त्या राजानें पुत्रप्राप्तीकरितां पुष्कळ यत्न केले. दानधर्म, व्रतवैकल्यें करूनहि त्याला पुत्र उत्पन्न होईना. शेवटीं राजा वृद्ध होऊन पुत्रप्राप्तीविषयीं निराश झाला. पुढें वृद्धावस्थेमध्यें सुचंद्रनावाच्या ज्येष्ठ पत्नीचेठिकाणीं एक पुत्र झाला. सर्वांनीं मिळून त्या पुत्राचें सांगोपन केलें. पुढें कांहीं काळानें पुत्राला विंचू डसला; व त्यामुळें सर्व राजस्त्रिया आक्रोश करूं लागल्या. राजानें

मांत्रिक बोलावून पुत्राची पीडा दूर केली. नंतर राजा सभेंत बसून सर्व प्रधानमंडळींना; व विद्वान् ब्राह्मणांना उद्देशून बोलला कीं, सभासद हो! एक पुत्र असणें हें मोठें दुःख होय; कारण आतांच्या अनुभवावरून त्याचे जर कमी ज्यास्ती झालें असतें तर माझ्या शंभर स्त्रियांनीं पुत्रशोकानें आपला देह टाकून परलोकाचा मार्ग स्वीकारिला असता. तोंच जर पुष्कळ पुत्र असले; व मग जरी त्यापैकीं एकाद्या पुत्राचे बरे वाईट झाले,तरी त्याबद्दल इतके वाईट वाटणार नाहीं; करितां मला पुष्कळ पुत्र होतील;कमीत कमी एकेक पत्नीला एकेक तरी पुत्र होईल; असा एकदा उपाय आपण सांगावा. असें राजाचें भाषण ऐकून सभेंत बसलेले विद्वान् ब्राह्मण राजास म्हणतात; हे राजा! दक्षिणसमुद्रामध्यें एक गंधमादननांवाचा पर्वत आहे. तो त्या समुद्रांत सेतूप्रमाणें शोभणारा असा आहे. पर्वतावर एक हनुमत्कुंडनांवाचें तीर्थ आहे; त्याठिकाणीं जाऊन; व स्नानादि तीर्थविधी करून तूं त्या तीर्थाचे काठीं पुत्रकामेष्टि यज्ञ कर; म्हणजे तुझ्या इच्छेप्रमाणें तुला संतति होईल. नंतर राजानें ब्राह्मणांच्या सांगण्याप्रमाणें त्या हनुमत्कुंडतीर्थाचे काठीं पुत्रकामेष्टि यज्ञ केला; व त्यायोगें त्याला शंभर पुत्र झाले. ह्याप्रमाणें हे शौनकादि ऋषिहो! तुम्हाला हनुमत्कुंडतीर्थाचें अप्रतिम वैभव वर्णित केलें आहे. हें माहात्म्य श्रवण करणारास मोक्ष मिळतो.

---

## अध्याय १६ वा.

---

### अगस्तितीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! हनुमत्कुण्डाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर अगस्तितीर्थाचेठिकाणीं स्नान करण्याकरितां जावें. हें तीर्थ अगस्तिऋषीनें निर्माण केलेलें आहे. पूर्वी एकदां मेरुपर्वत व विंध्यपर्वत ह्यांचा वाद सुरू असतां, मेरूपर्वताहून आपण मोठें व्हावें, ह्या इराद्यानें विंध्यपर्वत वाढूं लागला. सर्व त्रैलोक्य ह्या पर्वतानें व्यापून टाकिलें. त्यावेळीं ज्योतिश्चक्राची गति कुंठित होऊन, प्राणिमात्रांचे श्वासोच्छ्वासहि बंद होण्याचा समय प्राप्त झाला. हा प्रकार पाहून इंद्रादिदेव शंकराकडे जाऊन, विंध्यपर्वताचें सर्व वर्तमान त्यास निवेदन करिते झाले. नंतर शंकर देवांसह अगस्तिऋषीकडे जाऊन, विंध्यपर्वताला पूर्ववत् करण्याबद्दल त्याची प्रार्थना करिते झाले. अगस्तिऋषि विंध्याचलाकडे जात असतां विंध्य हा अगस्तीचा शिष्य असल्यामुळें, गुरूला पाहून त्यास साष्टांग नमस्कार घालण्याच्या मिषानें जमिनीवर आडवा पडला. अगस्ति विंध्यास म्हणतात,–हे शिष्या! मी दक्षिणदिशेकडे जात

आहे; तिकडून परत इकडे येईपर्यंत तूं असाच पडलेला राहा. गुरूच्या आज्ञेला मान देऊन विंध्य तसाच राहिला; व जगाचे सर्व व्यवहार सुरळीत चालू झाले; व अगस्ति दक्षिणदिशेकडे निघून गेला; तो थेट गंधमादन-पर्वतावर जाता झाला. त्या पर्वतावर अगस्तीनें आपल्या नांवानें एक तीर्थ निर्माण केलें; त्यासच आपण अगस्तितीर्थ म्हणतो. त्या अगस्तितीर्थाचे-ठिकाणीं स्नान करणारा जन्ममरणापासून मुक्त होतो. आतां त्या तीर्थाचे-ठिकाणीं पुण्यकर्म केल्यानें कोणतें फल प्राप्त होतें, ह्याबद्दल एक कथा सांगतो.

एक दीर्घतमा नांवाचा मुनी होता. त्याला कक्षीवान् नावाचा एक पुत्र होता. त्याला उदंकऋषीचे घरीं विद्याध्ययनाकरितां पाठविलें. कक्षीवानानें गुरुगृहीं संपूर्ण विद्या व कला यांचें अध्ययन केलें. त्या कक्षीवानानें अध्ययन समाप्त होतांच स्वगृहीं जाऊन गृहस्थाश्रम स्वीकारण्याबद्दल गुरूजवळ आज्ञा मागितली. उदंक आपला प्रियशिष्य जो कक्षीवान् त्यास म्हणतो; हे शिष्या! तुला मी घरीं जाण्याची आज्ञा देतों, तुला लग्न करावयाचें आहे, करितां मी सांगतो तो उपाय योजित कर; म्हणजे तुला सुख देणारी अशी बायको मिळेल. तो उपाय हाच कीं, गंधमादनपर्वतावर अगस्तितीर्थ आहे. त्या-ठिकाणीं नित्य स्नानादि पुण्य कर्में करीत तीन वर्षें राहा. तीन वर्षें पुरीं होऊन चौथे वर्ष लागणार तोंच एक चार दांत बाहेर असलेला हत्ती त्या तीर्थांतून बाहेर निघेल. तूं तीर्थस्नान करून त्या हत्तीवर बस; व राजाच्या नगरींत प्राप्त हो. तो राजा इंद्राप्रमाणें चार दांतांच्या हत्तीवर बसलेल्या तुला पाहून आपली कन्या मनोरमा तुला अर्पण करील. त्यादिवसापासून त्यामुळें तुझें ऐश्वर्य व सुख वाढून तुझा गृहस्थाश्रम आनंदांत जाईल. ह्याप्रमाणें गुरूचें भाषण ऐकून कक्षीवानाला मोठा आनंद झाला; व तो गुरूच्या सांगण्याप्रमाणें अगस्तितीर्थाचे काठीं राहता झाला. नित्य स्नानादि नियमानें त्यानें त्याठिकाणीं एक दिवस कमी असा तीन वर्षेपर्यंतचा काळ घालविला. उद्या तीन वर्षें पुरीं होणार तों रात्रीं नित्यनियमाप्रमाणें स्नानसंध्यादि उरकून तो त्या तीर्थाचे काठीं वाळ-वंटावर निजला असतां; व एक प्रहर रात्र शिल्लक राहिली असतां एकाएकीं एक मोठा नाद तीर्थोदकांतून निघाला. तो ऐकतांच कक्षीवान् एकदम दचकून जागा झाला. सकाळीं उठून स्नान करून बाहेर येतो, तों एक चार दांतांचा हत्ति त्या तीर्थांतून बाहेर पडला. त्याला पाहून कक्षीवान् गुरूच्या आज्ञेप्रमाणें त्या हत्तीवर बसता झाला. नंतर कक्षीवान् स्वनयराजाच्या नगरीकडे जाण्या-करितां हत्तीवर बसून निघाला. नगरामध्यें येतांच स्वनयानें कक्षीवानाला हत्तीवर बसलेला पाहून मोठ्या आनंदानें आपली कन्या मनोरमा त्याला यथाविधीनें अर्पण केली. पुढें हें वर्तमान कक्षीवानाचा पिता जो दीर्घतमा-

मुनि, त्याला पुत्रानें मिळविलेली विद्या, त्यानें केलेली तीर्थाराधना श्रवण करून मोठा आनंद झाला; व दीर्घतमा स्वतः अगस्तितीर्थाचे ठिकाणीं जाऊन; व स्नानादि शुभ कृत्यें करून कृतकृत्य होता झाला. असा अगस्तितीर्थाचा महिमा अगाध आहे. त्याचें वर्णन ब्रह्मदेवहि करूं शकणार नाहीं.

---

## अध्याय १७ वा.

### कक्षीवानाचा विवाहसमारंभ.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! स्वनयराजानें आपली प्रधानमंडळी बरोबर देऊन कांहीं लोक दीर्घतमामुनीला बोलाविण्याकरितां पाठविले. नंतर दीर्घतमामुनि परिवारासह स्वनयाकडे येता झाला. पुढें पुत्राची म्हणजे कक्षीवानाची व दीर्घतमाची भेट झाली. पुत्रमुखानें घडलेलें आश्चर्यजनक सर्व वर्तमान समजावें; म्हणून दीर्घतमानें आपला पुत्र जो कक्षीवान् त्याला हा काय प्रकार आहे? हें विचारिलें. तेव्हां कक्षिवान् बापाला म्हणतो; हे तात! माझा गुरु उदंकऋषी, त्याच्या आज्ञेप्रमाणें मी अगस्तितीर्थाचेठिकाणीं जाऊन तीन वर्षें व्रतनियमानें युक्त असा राहिलों. तीन वर्षें पुरीं होण्याच्या सुमारास त्या तीर्थांतून एक चार दांताचा हत्ति बाहेर निघाला. मी त्या हत्तीवर बसून स्वनयनराजाच्या नगराकडे येण्याकरीतां निघालो. नगरांत आल्यावर त्या राजानें; व त्याच्या मुलीनें मजला पाहिलें; व मला मुलगी देण्याचा राजानें निश्चय केला; व हा विवाहविधि यथासांग व्हावा; एवढ्याकरीतां आपणाला आमंत्रण केलें आहे. इतकें सांगून कक्षीवान् स्तब्ध होता झाला. स्वनयानें परिवारासह प्राप्त झालेल्या दीर्घतमाचे उत्तमतऱ्हेनें आदरातिथ्य केलें. परस्परांचे कुशलप्रश्न होतात; तों उदंकऋषीहि त्याचाठिकाणी प्राप्त झाला. कक्षीवानानें आपला गुरु आला आहे, असें पाहून त्याला नमस्कारादिविधीनें सत्कृत केलें. दीर्घतमा व स्वनयराजा यांनीं विवाहमुहूर्ताचा निश्चय करून जिकडे तिकडे आमंत्रणचिठ्ठ्या पाठविल्या. दीर्घतमामुनीनें आपल्या पुत्राचे विवाहाचे पूर्वी होणारे गोदानादि संस्कार उरकून घेतले. नंतर स्वनयराजानें मोठा सभामंडप तयार करून पुण्याहवाचनादि विधीनें; व मोठ्या समारंभानें आपली कन्या मनोरमा कक्षीवानाला अर्पण केली. मनोरमेनेंहि पतीच्या कंठांत चाफ्याचे फुलाची माळा घालून स्वमनोरथ पूर्ण झाल्याबद्दल ईश्वराचे आभार मानिले. उदंकगुरूच्या आज्ञेनें लाजाहोमादि विधी करून

दीर्घतमा व स्वनयराजा ह्यांनीं विवाहसमारंभ पार पाडला. उदंकमुनि ह्यांची परवानगी घेऊन स्वाश्रमीं निघून गेल्यावर दीर्घतमा मुनीहि स्वनयाच्या अनुमोदनानें कक्षीवान्नामक मुलाला व मनोरमानामक स्नुनेला बरोबर घेऊन स्वाश्रमाला जाता झाला. वाटेंत अगस्तितीर्थाचे काठीं स्नान करण्याकरितां उतरले. तीर्थांतून उत्पन्न झालेला चार दांतांचा हत्ति पुनः त्या तीर्थांत गुप्त झाला. नंतर सर्वमंडळी स्वाश्रमाला प्राप्त झाली. स्वनयानें आपली कन्या जी मनोरमा तिच्या विवाहसमारंभाच्या सांगतेप्रीत्यर्थ कक्षीवानाला लक्षावधि द्रव्य, सुवर्ण, दासी वगैरे आंदण दिलें; तसेंच हजार गाई, पांचशें गांव व अनेक वस्त्रालंकारहि दिलें. दीर्घतमामुनि आपल्या पुत्रासह व स्नुषेसह आश्रमांत आनंदानें राहता झाला. स्वनयराजाहि आपल्या इष्टमित्राबांधवांसह अगस्तितीर्थाचेठिकाणीं स्नान करून कृतार्थ होता झाला. हा इतिहास श्रवण करणाऱ्यांना अखंड सिद्धि, सौभाग्य व दीर्घायुष्य प्राप्त होईल. हें अगस्तितीर्थ-माहात्म्य श्रवण करणाराचें सर्व पाप नष्ट होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय १८ वा.

### रामकुण्डतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात;–हे शौनकादि ऋषिहो; अगस्तितीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर रामकुंडतीर्थावर स्नान करण्याकरितां जावें. त्याठिकाणीं स्नान करणारा सर्व पापापासून मुक्त होतो. आतां रामकुंडतीर्थाला उद्देशून एक कथानक तुम्हाला सांगतो; श्रवण करा. अगस्तिऋषीचा एक सुतीक्ष्ण नांवाचा शिष्य होता. त्यानें रामकुंडतीर्थाचेठिकाणीं मोठी तपश्चर्या केली. तो नित्य रामचंद्राची स्तुति करून त्याची अनन्यभावनेनें भक्ती करीत असें. त्याच्या त्या पुण्यकर्माच्या प्रभावानें त्याला सर्वज्ञत्व प्राप्त झालें; व त्रैलोक्यांत गमन करण्याचें सामर्थ्यहि त्यास प्राप्त झालें. असें ह्या रामकुण्डतीर्थाचें असामान्य माहात्म्य आहे. पूर्वी धर्मराजानें खोटें बोलण्याचा दोष दूर होण्याकरितां ह्याच कुंडांत स्नान केलें होतें; व त्यामुळें तो दोषमुक्त झाला. शौनक सूताला प्रश्न करतात कीं, धर्मराज खोटें कां बोललें ? तें आम्हाला कथानक सांगा. ह्याप्रमाणें शौनकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! दुर्योधनाबरोबर युद्ध करीत असतां धर्मराजाला जो खोटे बोलण्याचा प्रसंग प्राप्त झाला, तें आख्यान तुम्हाला सांगतो; ऐका. पूर्वी धर्मादि पांच पांडव; व दुर्योधनादि कौरव यांचें अपसाअपसांत मोठें वैर उपस्थित झालें. तें इतकें वाढलें कीं, युद्धाशिवाय वैरसमाप्तीला दुसरा मार्गच उरला नाहीं.

शेवटीं पांडव; व कौरव यांचें मोठें युद्ध सुरू झालें. प्रथम कौरवांचें सेनापत्य भीष्माकडे होते. भीष्माशीं पांडवांचें दहा दिवस युद्ध झालें. नंतर दहावेदिवशीं शिखंडीला पुढें करून पांडवानें भीष्माला निरुपयोगी करून सोडिलें. नंतर अकरावे दिवशीं द्रोणाला सेनापतित्व देऊन कौरव पांडवांबरोबर लढूं लागले; त्यावेळीं पांडवांचा सेनापति धृष्टद्युम्न होता. धृष्टद्युम्न व द्रोण यांचें पांच दिवस युद्ध झालें. द्रोणानें शस्त्रास्त्रादिकांनीं पांडवसेनेला जर्जर करून दाहीं-दिशांकडे पळावयास लाविलें. आपलें सैन्य पराजित झालेलें पाहून अर्जुनाला त्वेष येऊन त्यानें द्रोणाबरोबर देवांना भय उत्पन्न करणारें, असें घनघोर युद्ध केलें. द्रोणाचा पराजय होणें अशक्य आहे, असा विचार करून; व कपटाशिवाय द्रोणाचा नाश होणार नाहीं, असें जाणून धर्मराजाला खोटें बोलण्याविषयीं कृष्णानें अनुमोदन दिलें. कृष्णाचे वचनाप्रमाणें धर्मराज द्रोणाचार्याला म्हण-तात; हे गुरो! आपण ब्राह्मण आहां. "अहिंसा परमो धर्मः" ह्या वाक्या-वरून ब्राह्मणानें हिंसा करणें हा अधर्म शास्त्रकारांनीं गणला असतां; ह्या वाक्याला धाब्यावर बसवून ज्या पुत्राकरितां आपण अधर्म करण्याकरितां उद्युक्त झाला, तो अश्वत्थामानामक तुमचा मुलगा इहलोक सोडून स्वर्गाला गेला आहे; आतां तरी आपण हा हिंसारूपी अधर्म करण्याचें सोडून द्यावें. वास्तविक त्या वेळेला द्रोणपुत्र आश्वत्थामा मेला नसून त्यांचे सैन्यांत असणारा एक अश्वत्थामानांवाचा हत्ति होता; व त्या हत्तीचा मात्र नाश झाला होता; परंतु द्रोणाला फसविण्याकरितां धर्मराजानें अशी भाषा वापरली होती. नंतर धर्म खोटें बोलणार नाहीं, असा द्रोणाचा विश्वास असल्यामुळें अश्वत्थाम्याचा खरोखरच नाश झाला असावा, अशी खात्री वाटून द्रोण निःशस्त्र होत्साते पुत्रशोकानें प्रायोपवेशनाच्या उद्देशानें स्तब्ध बसते झाले. तेव्हां धृष्टद्युम्नानें स्तब्ध बसलेल्या द्रोणाचार्यांची शेंडी आपले डाव्या हातांत धरून उजव्या हातांतील तरवारीनें त्याचें मस्तक छेदिलें. तत्काल द्रोणाचे शरीरांतून एक तेज निघून तें आकाशांत गेलें. नंतर बापाच्या नाशामुळें अश्वत्था-म्यानें प्रतिज्ञा केली कीं, सूर्यास्ताचे पूर्वीं मी धृष्टद्युम्नाचा शिरच्छेद करीन; परंतु त्या प्रतिज्ञेचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस कर्ण, शल्य, दुर्योधन; व इतर राजे यांचा अठरा दिवसांत फडशा पाडून धर्मराज सिंहासनारूढ झाले; परंतु पूर्वीं आपण खोटें बोललों, हें धर्मराजाला सारखें जाचत होतें. एकदां धौम्य, व्यास वगैरे ऋषींना बोलावून धर्मराज स्वतः पूर्वीं असत्य अशा केलेल्या भाषणाचें निरसन होण्याविषयीं त्यांस उपाय विचारूं लागले. त्या वेळीं व्यास म्हणतात; हे धर्मा! दक्षिणसमुद्राचे काठीं असणाऱ्या गंधमादनपर्वतावर रामकुंडतीर्थ आहे, तेथें जर जाऊन तूं तीर्थविधी

करशील तर तुझे सर्व दोष नष्ट होतील. नंतर धर्म धौम्यादि ऋषींसह रामकुण्डतीर्थाचेठिकाणीं जाऊन स्नानादि तीर्थविधि करिता झाला. धर्मराजा ह्याप्रमाणें त्या तीर्थाचेठिकाणीं एक महिना राहून नित्य श्राद्धादि तीर्थविधी करून सर्वदोषापासून मुक्त होता झाला. त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, हे धर्मराजा ! तुझ्या ह्या तीर्थविधीनें तूं सर्वपापापासून मुक्त झाला आहेस. तसेच खोटें बोलून द्रोणाचा वध केल्याबद्दल तुला लागलेला दोषहि तुझ्यापासून निघून गेला आहे. आतां तूं स्वस्थपणें स्वनगराला जाऊन राज्योपभोगाचा स्वीकार कर. आकाशवाणीच्या सांगण्याप्रमाणें धर्म सुखानें राज्य करूं लागला. असा ह्या रामकुंडतीर्थाचा महिमा अगाध आहे. ह्या तीर्थाइतकें परम श्रेष्ठ असें दुसरें एकहि तीर्थ भूतलावर अस्तित्वांत नाहीं. जे कोणी हें आख्यान पठण किंवा श्रवण करितील, ते शिवलोकाला प्राप्त होतील.

## अध्याय १९ वा.

### लक्ष्मणतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! रामतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर लक्ष्मणतीर्थाचेठिकाणीं जावें. त्या लक्ष्मणतीर्थांत स्नान करणारांचीं सर्व पापें नष्ट होतात. पूर्वी बलरामाला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें असतां त्या पापाच्या नाशार्थ त्यानें ह्या तीर्थांत स्नान केलें; व तो दोषमुक्त झाला. लक्ष्मणतीर्थाजवळ लक्ष्मणानें एक शिवलिंग स्थापित केलें आहे; त्यास लक्ष्मणेश्वर म्हणतात. लक्ष्मणतीर्थांत स्नान केल्यावर लक्ष्मणेश्वराचें पूजन करावें; म्हणजे सर्वपापें नाहींशीं होऊन, सर्व इच्छा पूर्ण होतात; व शेवटीं मोक्ष मिळतो. बलरामाला ब्रह्महत्त्येचें पातक कां लागलें; व तें नष्ट कसें झालें? असा शौनकादिमुनींनीं प्रश्न केला असतां सूत म्हणतात; हे शौनकादिकहो ! बलराम हा शेषाचा अवतार आहे. कौरवपांडवांचें युद्धांत आपला शिष्य जो दुर्योधन; व इतर मंडळी यांचा नाश झालेला पाहून बलरामाला फार वाईट वाटलें. नंतर तेथून दुःखानें अंतःकरणाच्या स्थिरतेकरितां बलराम तीर्थयात्रा करण्यासाठीं निघाले. अनेक तीर्थें व पुण्यक्षत्रें हिंडत हिंडत ते नैमिषारण्यक्षेत्रांत आले. त्या वेळीं तेथें अनेक ऋषी सूतस्थानापन्न व्यासशिष्यासह पुराणें श्रवण करीत बसले होते. ते ऋषी पुराणकथेनें तल्लीन झाल्यामुळें बलराम आपल्या आश्रमांत आले आहेत, करितां आपल्याला त्यांचा आदरसत्कार केला पाहिजे; हें भान कोणालाहि राहिलें नाहीं. आपण ऋषींच्या आश्रमांत

आलों असतां आपलें आदरातिथ्य झालें नाहीं; व आपला आपमान झाला, असें समजून बलरामाला फारच क्रोध आला, व त्यानें आपल्या खड्गानें सूतस्थानस्थित व्यासशिष्याचें मस्तक तोडिलें, त्यावेळीं जिकडे तिकडे हाहाःकार उडून गेला; व ऋषींनीं बलरामाची पुष्कळ निंदा केली. नंतर सर्व ऋषींनीं मला सूतांच्या आसनावर बसवून बलरामाला सांगितलें कीं, हे रामा! तूं जें केलेंस, हा अधर्म केलास; व त्यायोगें तुला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें आहे. नंतर बलराम ऋषींना म्हणतो कीं, जी गोष्ट घडली तिची सुधारणा होणें अशक्य आहे. आतां केलेल्या ब्रह्महत्त्येच्या निरासार्थ मीं काय करावें? तें मला सांगा. नंतर पैलादि मुनि बलरामास सांगतात कीं, आमच्या ह्या पुण्यकृत्यामध्यें विघ्न उत्पन्न करण्यांकरितां कधीं कधीं इल्वलदैत्याचा पुत्र बल्वल येत असतो; तरी आपण त्याचा नाश करून आमचें कर्म निर्विघ्नपणें पार पडेल असें करा; व नंतर आपण एक वर्षपर्यंत तीर्थयात्रा करा म्हणजे पापमुक्त व्हाल. पुढें एकदां बल्वल दैत्य विघ्न उपस्थित करण्याकरितां प्राप्त झाला असतां बलरामानें आपल्या अस्त्रप्रभावानें त्याला ठार मारिलें; व ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें वर्षपर्यंत तीर्थयात्रा करून तो परत जाऊं लागला. इतकें करूनहि ब्रह्महत्त्या नष्ट झाली नाहीं, व ती आपल्या पाठीस लागली आहे, असें पाहून बलरामाला फार वाईट वाटलें; व तो खिन्न झाला. नंतर आकाशवाणी झाली कीं, हे बलरामा, तूं पुष्कळ तीर्थयात्रा केल्यास खऱ्या; परंतु अजून तुझी ब्रह्महत्त्या नष्ट झाली नाहीं, किंचित् अवशिष्ट राहिली आहे; करितां ब्रह्महत्येच्या नाशार्थ दुसरा कांहीं उपाय करा. अशी आकाशवाणी ऐकून बलराम पुनः नैमिषारण्यांत येऊन ऋषींना झालेलें वर्तमान सांगते झाले. ऋषी बलरामाला सांगतात कीं, तुम्हीं दक्षिणसमुद्रामध्यें असणाऱ्या गंधमादनपर्वतावर लक्ष्मणतीर्थ आहे, तेथें जाऊन व लक्ष्मणेश्वरलिंगाचें पूजन करा; म्हणजे तुमची ब्रह्महत्त्या निःशेषपणें नष्ट होईल. बलरामानें ऋषिवचनाप्रमाणें लक्ष्मणतीर्थावर स्नानादि करितांच पुनः आकाशवाणी झाली कीं, हे बलरामा! आतां तुझी ब्रह्महत्त्या नष्ट झाली आहे. आपण दोषमुक्त झालों, असें पाहून बलरामानें त्या तीर्थाची पुष्कळ स्तुति केली. हें माहात्म्य श्रवण केलें असतांहि ब्रह्महत्त्या दूर होते.

## अध्याय २० वा.

### जटातीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात, हे शौनकादि ऋषिहो! ब्रह्महत्त्येच्या पातकापासून दूर करणाऱ्या अशा लक्ष्मणतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर जटातीर्थाचेठिकाणीं

स्नान करावें. जर आपली चित्तशुद्धि व्हावी; किंवा आपल्याला असामान्य ज्ञान प्राप्त व्हावें, अशी इच्छा असेल तर वेदवेदान्तादि अध्ययनापेक्षांहि ह्या जटातीर्थांत स्नान करणें पुष्कळपटीनें बरें, असें मला वाटतें. वेदशास्त्राध्ययनानें जरी ज्ञान प्राप्त झालें, तरी एकप्रकाराचा त्या ज्ञानाचा अभिमान वाढून दुसऱ्या विद्वानांबरोबर तो वादविवाद करितो; व त्या वादांत जर जय मिळाला नाहीं, तर तो क्रोधादि षड्रिपूंनीं युक्त होऊन चित्ताला अस्वास्थ्य उत्पन्न करितो; करितां शाब्दिक ज्ञानाहून जटातीर्थाचेठिकाणीं स्नान करून देवताप्रसादानें प्राप्त झालेलें ज्ञान; व त्या ज्ञानानें होणारी चित्तशुद्धि विशेष श्रेयस्कर होय; ह्यांत संशय नाहीं. हें तीर्थ शंकरानें गंधमादनपर्वतावर स्थापन केलें आहे. ह्या तीर्थाचेठिकाणीं रामानें रावणाचा वध करून परत जातांना आपली जटा धुतली होती; त्यालाच जटातीर्थ म्हणतात. ह्याबद्दल तुम्हाला शुक व व्यास ह्यांचें झालेलें संभाषण सांगतों; ऐका. चित्तशुद्धि व ज्ञानप्राप्ति होण्यास काय केलें पाहिजे, मी पुष्कळ पुराणें; व इतिहास आपले मुखांतून श्रवण केले असतांहि अजून व्हावी तशी मला चित्तशुद्धि; व ज्ञानप्राप्ति झाली नाहीं; करितां मी आपणास प्रश्न करीत आहें. अशातऱ्हेनें शुकानें नम्रतापूर्वक व्यासाला प्रश्न केला असतां व्यास म्हणतात. हे पुत्रा! दक्षिणसमुद्रामध्यें गंधमादननांवाचा एक पर्वत आहे. त्याठिकाणीं एक जटातीर्थ आहे. त्या तीर्थाचे काठीं स्नानादि तीर्थविधि केले असतां चित्तशुद्धि व ज्ञानप्राप्ती होते. पूर्वी वरुणाचा मुलगा भृगु बापाला शरण जाऊन ज्ञानप्राप्तीचा; व चित्तशुद्धीचा उपाय विचारीत असतां वरुण भृगूला म्हणतात; हे भृगो! तूं जटातीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यास कृतकार्य होशील. ह्याप्रमाणें वरुणाचें भाषण ऐकून भृगु बापाच्या आज्ञेनें जटातीर्थाचेठिकाणीं जाऊन स्नान करतांच द्वंद्वरहित व सर्वज्ञानसंपन्न होऊन शुद्धान्तःकरणयुक्त होते झाले; व शेवटीं शिवस्वरूप झाले. शंकराचा अंशावतार दूर्वास ऋषि जटातीर्थामध्यें स्नान करून चित्तशुद्ध होत्साता ब्रह्मानंदीं निमग्न झाला. विष्णूच्या अंशापासून उत्पन्न झालेले दत्तात्रेयहि ह्याच तीर्थोदकाच्या स्नानानें ब्रह्मरूप झाले. करितां तूं सुद्धां जर जटातीर्थाचेठिकाणीं जाशील तर चित्तशुद्ध व ज्ञानयुक्त होऊन कृतकृत्य होशील. याप्रमाणें व्यासांचें भाषण ऐकून शुक पित्राज्ञेनें जटातीर्थाला जाऊन; व त्याच्या स्नानानें त्याला अंतःकरणशुद्धि व ज्ञानप्राप्ती होऊन तो परमानंदरूपाला प्राप्त होता झाला. ज्यांना ज्यांना म्हणून आपलें चित्त शुद्ध व्हावें; व आपणास ज्ञानाची प्राप्ती व्हावी, अशी इच्छा असेल त्यांनीं त्यांनीं ह्या जटातीर्थांत स्नान करावें. जटातीर्थाचें माहात्म्य वर्णन करणें मला अशक्य आहे. जे कोणी जटातीर्थाचेठिकाणीं पिंडदान

करितील त्यांस गयेचेठिकाणीं पिंड दिल्याचें पुण्य प्राप्त होतें. जे कोणी हें माहात्म्य श्रवण किंवा पठण करतील ते निष्पाप होऊन विष्णुलोकीं जातील.

## अध्याय २१ वा.



### लक्ष्मीतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! जटातीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर लक्ष्मीतीर्थाला जावें. त्या लक्ष्मीतीर्थावर स्नान केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होतात. पूर्वी धर्मराज ह्याच तीर्थाचेठिकाणीं स्नान करून ऐश्वर्य मिळविता झाला. पूर्वी इंद्रप्रस्थाचेठिकाणीं धर्मादि पांच पांडव राहत असतां, कोणी एकेदिवशीं श्रीकृष्ण पांडवांच्या समाचाराला इंद्रप्रस्थामध्यें प्राप्त झाले. पांडवांनीं प्रेमभावानें त्याचें आदरातिथ्य केलें. नंतर धर्मराज कृष्णाला म्हणतात; हे कृष्णा ! ऐश्वर्यसिद्धि कशानें प्राप्त होईल ? तें सांगा. धर्मराजाचा प्रश्न ऐकून कृष्ण म्हणतात; धर्मा ! गंधमादनपर्वतावर एक लक्ष्मीतीर्थ आहे. त्याठिकाणीं स्नानादि शास्त्रोक्तविधि केल्यास तुला ऐश्वर्यप्राप्ती होईल. त्या लक्ष्मीतीर्थाचेठिकाणीं स्नान केलें असतां व्याधी वगैरे उपद्रव नष्ट होतात. ह्याच तीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यामुळें कुबेराला चौदा निधी प्राप्त झाल्या; करितां तूंहि तेथें जा; म्हणजे ऐश्वर्यवान् होशील. ह्याप्रमाणें कृष्णाचें भाषण ऐकून धर्मराज आपल्या बंधूंसह गंधमादनपर्वतावर असणाऱ्या लक्ष्मीतीर्थाचेठिकाणीं जाऊन; व स्नानादि विधी करून ऐश्वर्याप्रत प्राप्त होते झाले. नंतर मोठमोठे यज्ञ करून; व ह्या लोकीं सुख भोगून स्वस्थानाला जाते झाले. हे आख्यान जें श्रवण करितील त्यांना शेवटीं उत्तमगति प्राप्त होईल.

## अध्याय २२ वा.



### अग्नितीर्थाचें माहात्म्य.

सूत म्हणतात; हे ऋषिवर्यहो ! ऐश्वर्य देणाऱ्या अशा लक्ष्मीतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर अग्नितीर्थामध्यें स्नान करण्याकरितां जावें. आतां अग्नितीर्थाची उत्पत्ति सांगतो; ऐका: पूर्वी रामचंद्रानें रावणाला ठार मारून बिभीषणाला लंकेचें राज्य दिलें. नंतर रामचंद्र सीता व लक्ष्मण ह्यांसह बिभीषण व वानरसैन्य बरोबर घेऊन परत गंधमादनपर्वतावर आले. लक्ष्मीती-

र्थाचे काठीं बसून सीतेची शुद्धि करण्याकरितां अग्नि आणिला; व मोठमोठ्या ज्वाळा निघतील असा तो प्रज्वलित केला. नंतर त्या अग्नींत सीता उडी टाकणार तोंच अग्नि रामाला म्हणतो; हे रामचंद्रा! ही सीता लक्ष्मीच आहे. प्रत्येक तुझ्या अवताराबरोबर ही मनुष्यरूपानें अवतीर्ण होऊन तुलाच वरितें. ही अत्यंत शुद्ध आहे. हिच्याविषयीं तुझ्या अंतःकरणांत बिलकुल पापकल्पना येतां कामा नये; तूं हिचें प्रेमानें ग्रहण कर; असें अग्नीचें भाषण ऐकून रामचंद्रानें सीतेचा स्वीकार केला. ज्याठिकाणीं रामानें सीताशुद्ध्यर्थ अग्नी प्रज्वलित केला, त्या स्थानाला अग्नितीर्थ हें नांव प्राप्त झालें आहे. ह्या अग्नितीर्थाचेठिकाणीं स्नान केलें असतां तात्काल मुक्ति प्राप्त होते. अग्नितीर्थाचेठिकाणीं अन्नदान दिल्यास त्याचें फल अपरिमित प्राप्त होतें. अग्नितीर्थाची बरोबरी करणारें तीर्थ दुसरें नाहीं. पूर्वी पाटलिपुत्रनामक नगरामध्यें एक पशुमान् नावाचा वैश्य होता. तो धर्मानें वागणारा व ब्राह्मणावर श्रद्धा ठेवणारा असा होता. तो शेतीभाती, गोरक्षण व सुवर्णव्यापार करीत असे. त्या वैश्याला तीन बायका होत्या. त्यांपैकीं थोरल्या बायकोला सुपण्य, पुण्यवंत व चारुपण्य असे तीन मुलगे झाले. मधल्या बायकोला सुकेश, महाकेश असे दोन झाले. व सर्वांत जी लहान होती, तिला महापण्य, महाकोश व दुष्पण्य असे तीन मुलगे झाले. अशातऱ्हेनें त्या वैश्याला एकंदर आठ मुलगे झाले. ते क्रमानें जसेजसे मोठे होऊं लागले, तसतसा त्यांचा बाप पशुमान् त्यांना व्यापार, शेती वगैरे स्वकर्म शिकविता झाला. सुपण्यादि सात मुलगे पित्राज्ञापरायण होते; मात्र दुष्पण्य हा दुर्वर्तन करणारा; व बापाच्या आज्ञेचें उल्लंघन करणारा असा होता. तो दुष्पण्य लहानपणीं सुद्धां बरोबरच्या दुसऱ्या मुलांना पीडा देत असे. तो लहानमुलांना उचलून विहिरींत व तलावांत फेंकून देत असे; त्यामुळें गांवांतील लोक निर्वंश झाले; व गांव ओसाड होत चालला. दुष्पण्याचें कृत्य लोकांना समजलें नाहीं; व त्यांनीं राजाजवळ जाऊन सर्व प्रकार कथन केला. राजानें आपले नोकर पाळतीवर ठेऊन दुष्पण्य वैश्य गांवांतील लहान मुलांना विहिरींत फेंकून मारतो, असें ठरविलें; व नागरिकांची एक सभा भरून त्यांस सांगितलें कीं, दुष्पण्यनांवाच्या वैश्यपुत्रानें तुमचीं सर्व मुलें मारिलीं आहेत, असें म्हणून व त्याचा बाप जो पशुमान् वैश्य त्यांसहि सांगून तुमच्या मुलास आम्ही ह्या अपराधाबद्दल काय शिक्षा करावी? म्हणून विचारिलें. नंतर परशुमान् राजास म्हणतो; ज्यापेक्षां माझ्या मुलानें आजपर्यंत पुष्कळ मुलांचा नाश केला आहे, त्यापेक्षां ह्याला ठार मारणें हीच देहांतशिक्षा शास्त्रोक्त आहे. हा जरी माझा मुलगा असला तरी ज्यापेक्षां हा बालहत्या करणारा

व दुर्वर्तन करणारा आहे, त्यापेक्षां हा माझा मुलगा नसून माझा शत्रूच आहे; असें समजा. पशुमानाचें हें भाषण ऐकून नागरिकांना मोठें आश्चर्य वाटलें; व त्या वैश्याची ते स्तुति करू लागले; व राजाला बोलले कीं, ह्या दुष्पण्याला देहांत शिक्षा न देतां नगरांतून हांकलून द्यावा, ही शिक्षा ह्यास पुरी आहे. नंतर राजानें दुष्पण्यास बोलावून नगरांतून निघून जाण्यास सांगितलें. राजाज्ञेनें दुष्पण्य वैश्य तेथून जो निघाला तो थेट एका अरण्यांत जेथें मुनींचे पुष्कळ आश्रम आहेत, अशा ठिकाणीं गेला. तो तेथेंहि एका ऋषिपुत्राला तेथील एका सरोवरांत नेऊन बुडविता झाला. त्या मुलाच्या बापानें म्हणजे उग्रश्रवानामक ऋषीनें त्या दुष्पण्याला शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं माझ्या मुलाला पाण्यांत बुडवून ठार मारलेंस, त्यापेक्षां तूं पाण्यामध्यें बुडून मरशील; व नंतर पिशाचजन्माला जाशील. असा शाप ऐकतांच दुष्पण्याला फार वाईट वाटलें; व तो तेथून दुसऱ्या घोर अरण्यांत गेला.तेथें त्यानें एका मेलेल्या हत्तीचा शुष्क असा जमीनीवर पडलेला देह पाहिला. दुष्पण्य थंडीनें कुडकुडलेला असल्यामुळें खिन्न होऊन; व हत्तीच्या तोंडांत शिरून पोटांत जाऊन बसला. तो आंत गेला इतक्यांत मोठा पाऊस पडून जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें; व सर्वत्र पाण्याचे लोट वाहूं लागले; व त्यायोगें तेथें एक नवीन नदी निर्माण झाली. तो नदीचा प्रवाहहि हत्तीच्या मुखांतून शिरून त्याचें सर्व उदर पाण्यानें भरून गेलें, व दुष्पण्याला बाहेर निघतां येईना. नंतर तो दुष्पण्य हत्तीच्या उदरांत शिरलेल्या पाण्यांत बुडून ऋषिशापाप्रमाणें मृत झाला. दुष्पण्याला पिशाचजन्म प्राप्त झाला. कोट्यावधि वर्षें तो पिशाचयोनींत काढून; व सर्वत्र फिरून अगस्त्याश्रमाजवळ प्राप्त झाला; व सर्व ऋषींना उद्देशून तो पिशाच म्हणतो; ऋषिहो ! मी पाटलिपुत्रनामक नगरांत राहणारा दुष्पण्यनामक वैश्य आहे. मी दुराचारी असल्यामुळें मला राजानें घालवून दिलें. नंतर रानांतहि ऋषिकुमाराला पाण्यांत बुडवून मारल्यामुळें मला त्या उग्रश्रवाऋषीनें शाप दिला आहे. करितां तुम्ही मजवर कृपा करून मला ह्या दुःखांतून मुक्त करा. अगस्तिमुनीनें पिशाचाचें सांत्वन करून; व आपल्या सुतीक्ष्ण शिष्याला बोलावून सांगितलें कीं, तूं आतां गंधमादनपर्वतावर जाऊन; व तेथें असणाऱ्या अग्नितीर्थाचेठिकाणीं स्नान करून ह्या पिशाचाचें नांवानें तीर्थविधि कर; म्हणजे पापमुक्त होशील. सुतीक्ष्णानें अगस्तीच्या सांगण्याप्रमाणें अग्नितीर्थाचेठिकाणीं जाऊन स्नानादि करतांच दुष्पण्य पिशाचजन्मापासून मुक्त झाला. जे कोणी अग्नितीर्थाचें माहात्म्य श्रवण किंवा पठण करितील त्यांना पिशाचजन्म प्राप्त न होतां ते सर्व पापापासून मुक्त होऊन; व सर्व भोग भोगून अंतीं स्वर्गाला जातील.



---

## अध्याय २३ वा.

### चक्रतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! अग्नितीर्थामध्यें स्नान केल्यानंतर चक्रतीर्थाला जावें; म्हणजे इच्छित मनकामना पूर्ण होतील. आतां हें तीर्थ कसें उत्पन्न झालें, हा इतिहास सांगतों; ऐका. पूर्वीं अहिर्बुध्न्य-नांवाचा एक ऋषि, दुष्ट राक्षसांचा वध करावा, ह्या उद्देशानें सुदर्शनचक्राची गंधमादनपर्वतावर जाऊन आराधना करिता झाला. आपल्या नाशाकरितां हा ऋषी चक्राची अराधना करीत आहे,असें समजल्यावरून तेथील राक्षसांनीं त्या मुनीच्या तपःकृत्यांत विघ्नें उत्पन्न केलीं. नंतर त्या विघ्नाच्या नाशार्थ अहिर्बु-ध्न्यांच्या प्रार्थनेवरून सुदर्शनचक्र प्रगट झालें; व त्यानें राक्षसांचा नाश केला. त्या दिवसापासून त्या स्थानाला चक्रतीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्या चक्रतीर्थाचेठिकाणीं स्नान केलें असतां राक्षस; व पिशाच यांची पीडा दूर होते. प्रत्यक्ष सूर्याचे हात तुटले असतां त्यानें ह्या चक्रतीर्थांत स्नान केलें; त्याबरोबर त्याला सुवर्णाचे हात प्राप्त झाले. नंतर ऋषि सूतांना विचारतात कीं, सूर्याचे हात कसे तुटले ? तो इतिहास आम्हाला सागा. ह्याप्रमाणें शौन-कादिकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; हे ऋषिहो ! इंद्रादि देवांचा पूर्वी एकदां दैत्यांनीं पराजय केला असतां ते बृहस्पतीला पुढें करून ब्रह्मदेवाकडे गेले. देवांनीं ब्रह्मदेवाला इकडे येण्याचें कारण सांगितलें. ब्रह्मदेव देवांना म्हणतात कीं, तुम्ही भिऊं नका. आपण गंधमादनपर्वतावर असणाऱ्या चक्रतीर्थावर यज्ञाला प्रारंभ करूं; व तेथें यज्ञाला विघ्न करण्याकरितां दैत्य येतील; व ते येताच सुदर्शनचक्राच्या प्रभावानें पराजित होऊन पळून जातील. अहिर्बुध्न्यऋषीच्या कृपेनें त्या तीर्थाचेठिकाणीं सुदर्शन कायमचें राहिलेलें आहे. बृहस्पतीच्या अनुमतानें सर्व देव त्या चक्रतीर्थाचेठिकाणीं जाऊन यज्ञ करूं लागले. त्या यज्ञामध्यें होता बृहस्पति, मैत्रावरुण जयन्त ( इंद्राचा मुलगा), अच्छावाक वसु, ग्रावस्तुद् पराशर, अष्टावक्र हा अध्वर्यु, प्रतिप्रस्थाता विश्वामित्र, नेष्टा वरुण, उन्नेता कुबेर, सूर्य ब्रह्मा, ब्राह्मणाच्छंसी वशिष्ठ, आग्नीध्र शुनःशेप, पोता अग्नि, उद्गाता वायु, प्रस्तोता यम, प्रतिहर्ता अगस्त्य, सुब्रह्मण्य मधु-च्छंदा हे ऋत्विज् असते झाले; व इंद्र स्वतः यजमान झाला; व उपद्रष्टा हा शुक असता झाला. सुदर्शनचक्राच्या प्रभावानें त्या आरंभिलेल्या यज्ञांत दैत्यांचें कांहींएक चाललें नाहीं; व सर्व दैत्य पराजित झाले. शेवटीं चुकून त्या यज्ञांत सूर्यानें प्राशित्रनांवाचा पुरोडाश ग्रहण केल्यामुळें त्या प्राशित्राच्या प्रभावानें

सूर्याचे दोनहि हात तुटून गेले. नंतर हा प्रकार पाहून सर्व देव व ऋषि चिंतातुर झाले. त्यावेळीं अष्टावक्र सर्वांना उद्देशून म्हणतो कीं, मी शंभर ब्रह्मदेव पाहिले आहेत; तरी मी अजून आहे तसाच कायम आहे. पूर्वीं लोकेश्वरनामक ब्रह्मदेवाच्या कारकीर्दींत हरिहरनांवाचा एक ब्राह्मण होता. तो श्यामलनगरींत राहत असे. एकदां मृगयेवर उपजीविका करणारा व्याध तेथें येऊन त्याचा चुकून एक बाण हरिहराच्या पायाला लागला; व त्याचा पाय तुटला. नंतर तो ब्राह्मण ह्याच गंधमादनपर्वतावर येऊन चक्रतीर्थामध्यें स्नान करितां झाला. त्या स्नानाच्या पुण्यप्रभावानें त्याला पूर्वींप्रमाणें पाय उत्पन्न झाला. आतां तूंहि जर त्याच तीर्थांत स्नान करिशील तर तुलाहि हात प्राप्त होतील, असे सूर्याला सांगितलें. सूर्य चक्रतीर्थामध्यें अष्टावक्राच्या सांगण्याप्रमाणें स्नान करून पूर्वींपेक्षां सुंदर असें सुवर्णाचे हात मिळविता झाला. नंतर यज्ञ समाप्त करून इंद्राला स्वर्गाचें राज्य प्राप्त झाले. प्रत्येकानें ह्या तीर्थाचें अवश्य सेवन करावें; म्हणजे शरीरांतील कोणतेंहि व्यंग दूर होईल. जे कोणी हें अख्यान पठण किंवा श्रवण करितील ते पापमुक्त होऊन शिवलोकीं जातील.

---

## अध्याय २४ वा.

### शिवतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! चक्रतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर शिवतीर्थावर जावें. त्याठिकाणीं स्नान केल्यास सर्व पातकें दूर होतात. ह्याठिकाणी कालभैरवानें स्नान केलें; व तो ब्रह्महत्त्येपासून मुक्त झाला. कालभैरवाला ब्रह्महत्त्या कां लागली? असा शौनकादि ऋषींनीं प्रश्न केला असतां सूत त्यांत सांगात कीं; पूर्वीं ब्रह्मदेव व विष्णु ह्यांचा एक वाद उपस्थित झाला. ब्रह्मदेव म्हणे कीं, मी सर्व जगाला उत्पन्न करणारा आहें; विष्णु म्हणे, मी जगाचा उत्पात्तिकर्ता आहे, असा वाद चालला असतां त्याठिकाणीं प्रत्यक्ष चार वेद प्रगट झाले; व ब्रह्मदेवाला आणि विष्णूला उद्देशून बोलले कीं, तुम्ही हा वाद कां करीत आहां. वास्तविक पाहतां तुम्हां दोघांपैकीं एकहि जगताचा उत्पत्तिकर्ता नसून तिसरा जो शंकर तोच सर्व जगाची उत्पात्ति, स्थिति; व लय करणारा आहे; तेव्हां विनाकारण तुम्ही असे भांडूं नका. ह्याप्रमाणें वेदांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव व विष्णु ह्यांस म्हणतात कीं, नित्य पार्वतीजवळ राहणारा स्त्रैण शंकर आम्हांहून श्रेष्ठ व जगत्कर्ता कसा? असा ह्यांचा प्रश्न ऐकून त्यांची खात्री पटण्याकरीतां प्रणवस्वरूपी ॐकारानेंहि वेदांच्या

भांडणाचा अनुवाद करून ब्रह्मदेव व विष्णु ह्यांची खात्री पटवून दिली; तरी सुद्धां ह्यांनीं आपला आग्रह सोडिला नाहीं. ह्याचें जें भाषण होतें न होतें, तोंच शंकरानें आपलें विराट्स्वरूप प्रकट करून सर्वांचे डोळे दिपवून टाकिले. तें भयंकर स्वरूप पाहून ब्रह्मदेवानें म्हटलें कीं, तूं माझ्या मस्तकापासून निर्माण झालेला शंकर आहेस, मी तुला ओळखिलें. नंतर शंकराला राग येऊन त्यानें ब्रह्मदेवाबरोबर युद्ध करण्याकरितां कालभैरवाला पाठविलें. तो कालभैरव ब्रह्मदेवाबरोबर युद्ध करूं लागला. त्या युद्धांत कालभैरवानें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडिलें. नंतर ब्रह्मदेव शंकराला शरण गेले. शंकर ब्रह्मदेवाला आश्वासन देऊन कालभैरवाला म्हणतात कीं, तूं ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक ( कपाल ) हातांत घेऊन भिक्षा मागत फिर, कालभैरव भिक्षा मागत फिरत असतां ब्रह्महत्त्या सारखी त्याच्या पाठीस लागली आहे, हें पाहून शंकरानें पुनः कालभैरवाला ह्मटलें कीं, तूं गंधमादनपर्वतावर असणाऱ्या शिवतीर्थाचेठिकाणीं जाऊन स्नान कर. त्या तीर्थांत स्नान करतांच तुझी ब्रह्महत्त्या नष्ट होईल, ह्याप्रमाणें सांगून शंकर स्वस्थानीं निघून गेले. हातांत कपाल घेतलेला कालभैरव शिवाज्ञेप्रमाणें सर्व इतर तीर्थें हिंडून शेवटीं शिवतीर्थाचेठिकाणीं प्राप्त झाला. शिवतीर्थामध्यें स्नान करतांच कालभैरवाची ब्रह्महत्त्या नष्ट झाली. त्यावेळीं शंकर तेथें प्रकट झाले; व कालभैरवाला म्हणतात कीं, तुझी ब्रह्महत्त्या आज नाहींशी झाली आहे. आतां तुझ्या हातांतील हें कपाल काशीमध्यें स्थापित कर, असें सांगून शंकर स्वस्थानीं निघून गेले. नंतर कालभैरव काशीला जाऊन कपालाची स्थापना करिता झाला. ज्याठिकाणीं काशीमध्यें कालभैरवानें कपालाची स्थापना केली, त्याला कपालतीर्थ हें नांव प्राप्त झालें. हें माहात्म्य स्वर्ग व मोक्ष देणारें असें आहे.

## अध्याय २९ वा.

### शंखतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात, हे शौनकादिक ऋषिहो ! शिवतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर शंखतीर्थामध्यें स्नान करावें. शंखनांवाचा ऋषि पूर्वीं गंधमादनपर्वतावर तप करीत होता. तो ज्याठिकाणीं नित्य स्नान करी, त्या स्थानाला शंखतीर्थ हें नांव प्राप्त झालें. आतां ह्या तीर्थाचेठिकाणीं स्नान करून ज्यांचीं सर्व पातकें नष्ट झालीं, अशा एका ब्राह्मणाचा इतिहास तुम्हाला सांगतो; ऐकाः पूर्वीं वत्सनाभनांवाचा एक ऋषि परम धार्मिक असा होता. तो

इतके दिवस तपश्चर्या करिता झाला कीं, त्याच्या शरीरावर मोठमोठी वारुळें, वाढलीं; परंतु आपल्या अंगावर वारुळें वाढलीं आहेत, हें त्याचें चित्त तपोमग्न असल्यामुळें त्यास समजलें नाहीं. त्या वत्सनाभमुनीची तपश्चर्या इंद्राला न आवडून त्या तपामध्यें विघ्न उत्पन्न करावें, ह्या उद्देशानें इंद्रानें त्या वारुळावर वृष्टि पाडिली. त्या वृष्टीलाहि तो ऋषि जुमानीत नाहींसा झाला. नंतर वारा व विजा इत्यादि तापानें ऋषीला पुष्कळ त्रास दिला, तरीहि तो ऋषि तपापासून भ्रष्ट झाला नाहीं; शेवटीं इंद्रानें आपलें वज्र वारुळावर फेकिलें, त्यायोगें तें वारुळ भग्न होऊन थोडीबहुत ऋषीलाहि पीडा झाली, तथापि तो तप करीतच आहे. त्यावेळीं यमधर्माला दया आली; व त्याचें रक्षण करण्याकरितां एका रेड्याचें स्वरूप घेऊन; व त्या ऋषीला आपल्या पोटाखालीं घेऊन यमधर्म तेथें राहता झाला. ह्याप्रमाणें सात दिवस इंद्रानें एकसारखी ऋषीवर वृष्टी केली. सात दिवस पूर्ण होताच वृष्टि बंद झाली. नंतर वत्सनाभमुनि तपश्चर्या समाप्त करून डोळे उघडून पाहतो, तों आपल्या अंगावर वारुळें वाढलीं असून त्या वारुळावर एक रेडा उभा आहे; व जिकडे तिकडे पाऊस पडल्यामुळें सर्व भूमि जलमय झाली आहे; असें आढळून आलें. वत्सनाभमुनीनें रेड्याला तूं कोण ? म्हणून विचारिलें असतां, तो म्हणतो; मी यमधर्म, तुझें रक्षण करण्याकरितां रेड्याचें रूप घेऊन प्राप्त झालों आहे. तुझी तपश्चर्या व निश्चय पाहून माझें मन प्रसन्न झालें आहे. तूं आतां गंधमादनपर्वतावर जाऊन तेथें शंखतीर्थनांवाचें एक स्थान आहे, त्याठिकाणीं तूं स्नान व तीर्थविधि कर; म्हणजे तुझीं सर्व पापें दग्ध होतील; व शेवटीं अक्षय्य अशा शिवलोकाप्रत तूं प्राप्त होशील. ह्याप्रमाणें यमधर्माचें भाषण ऐकून वत्सनाभमुनि शंखतीर्थामध्यें स्नान करण्याकरितां गंधमादनपर्वतावर गेला. नंतर शंखतीर्थांत स्नान करितांच तो निष्पाप होऊन मुक्त झाला. हे शौनकादि ऋषिहो ! याप्रमाणें शंखतीर्थाचें माहात्म्य तुम्हाला सांगितलें. ह्या तीर्थांत स्नान करणारा प्राणी कृतघ्नतेच्या दोषापासून, तसेंच माता, पिता, गुरु इत्यादि श्रेष्ठ पुरुषांचा द्रोह केल्यामुळें उत्पन्न झालेल्या दोषापासून मुक्त होतो. सर्व पातकांहून श्रेष्ठ असें कृतघ्नतेचें पातक जर ह्या शंखतीर्थांत स्नान केलें असतां नष्ट होतें, तर इतर ब्रह्महत्त्यादि सामान्य पातकें ह्या तीर्थांत स्नान केल्यामुळें नष्ट होतील, हें कांहीं सांगण्याची मुळींच गरज नाहीं. जे कोणी हा अध्याय पठण करितील,ते कृतघ्न मनुष्य असले तरी स्वकृतपापापासून मुक्त होऊन शुद्धान्तःकरणाचे होत्साते ब्रह्मलोकाला प्राप्त होतील.

---

# अध्याय २६ वा.

## यमुना, गंगा व गया ह्या तीर्थांचीं माहात्म्यें.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! शेखतीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर यमुना, गंगा व गया ह्याठिकाणीं जाऊन स्नान करावें. यमुनातीर्थ, गंगातीर्थ, व गयातीर्थ हीं तीन तीर्थें सर्व पातकांचें क्षालन करणारीं आहेत. नंतर शौनकादि ऋषींनीं सूताला प्रश्न केला कीं, यमुना, गंगा व गया; हीं तीर्थें गंधमादनपर्वतावर स्थापित होण्याचें कारण काय? तें सांगा. असा प्रश्न होतांच सूत म्हणतात, हे शौनकादिकहो! पूर्वी रैक्वनांवाचा एक ऋषि गंधमादनपर्वतावर तप करून दीर्घायुष्य मिळविता झाला. रैक्व हा जन्मतः पांगळा होता; त्यामुळें तो अनेकतीर्थांचेठिकाणीं जाऊन तीर्थयात्रा करण्यास असमर्थ होता. जितकीं तीर्थें गंधमादनपर्वतावर होतीं, तितकीं रैक्वमुनीनें बैलाच्या गाडींतून हिंडून पूर्ण केलीं; परंतु गंधमादनपर्वतावर जीं नाहींत तीं तीर्थें आपणास हिंडण्यास कशीं मिळतील, असा विचार करीत रैक्वमुनि बसला असतां त्या मुनीनें आपल्या मंत्रप्रभावानें यमुना, गंगा; व गया ह्या तिघांना बोलावून आपले जवळ आणिलें. त्या तीनहि पुण्यकारक नद्या मनुष्यदेह धारण करून रैक्वाजवळ येऊन म्हणाल्या, हे ऋषे! तुझ्या मंत्रप्रभावानें आम्ही तीघींहि येथें आलों आहों. नंतर रैक्व त्यांची पूजा करून त्यांना म्हणाला, तुम्हीं तिघींजणींनीं ह्या गंधमादनपर्वतावर कायमचें वास्तव्य करावें; अशी माझी इच्छा आहे; व ह्याकरितां मीं तुम्हाला बोलाविलें आहे, रैक्वमुनीच्या प्रार्थनेप्रमाणें यमुना, गंगा; व गया ह्या तीर्थरूपानें गंधमादनपर्वतावर राहत्या झाल्या; व त्या तीर्थांचीं नांवेंही यमुनातीर्थ, गंगातीर्थ; व गयातीर्थ, अशींच ठेविलीं. जे कोणी ह्या गंगा, गया; व यमुना ह्या तीर्थांत स्नान करतात, त्यांचें सर्व अज्ञान नष्ट होऊन ते निष्पाप होतात. रैक्व त्याच तीर्थाचे कांठीं राहून स्नानादि विधीनें आपला काळ घालविता झाला. नंतर कांहीं काळानें जानश्रुति रैक्वाजवळ प्राप्त झाला. जानश्रुति राजाला रैक्वाजवळ येण्याचें कारण असें झालें होतें कीं, जानश्रुतीचा दानविषयक लौकिक श्रवण करून, त्या राजाचा आपल्यावर अनुग्रह व्हावा; म्हणून देवर्षि हंसाचें रूप घेऊन जानश्रुतीकडे यावयास निघाले. राजवाड्याजवळ हंस येतांच त्यांपैकीं एक हंस दुसऱ्या हंसास म्हणतो; हे भल्लाक्ष! (भल्लाक्ष हें त्या हंसाचें नांव होतें) तूं पुढें जाऊं नकोस, कारण राजा पुण्यशील असल्यामुळें, त्याच्या तेजानें तुझा देह दग्ध होईल. असें हंसाचें भाषण ऐकतांच भल्लाक्ष हंस पहिल्या हंसाला म्हणाला;

कीं, हा जानश्रुति राजा कांहीं रैक्कमुनि नव्हे. रैक्कमुनीच्या शतांशानें सुद्धां ह्याची तुलना होणार नाहीं. तूं म्हणतोस त्याप्रमाणें मला भस्म करण्याचें सामर्थ्य एकट्या रैक्कमुनीचे ठिकाणींच आहे. असा त्या हंसाचा संवाद जानश्रुतिराजानें आपल्या गच्चीवरून ऐकिला; व तो आपल्या मनाशीं म्हणतो कीं, मी इतका धर्मशील व दानशूर असतां हे पक्षी माझ्याहून रैक्काचें वर्णन अधिक करितात; करितां आपण आतां रैक्काला शरण जावें; असा विचार करून तो रथांत बसून व सहाशें गाई, पुष्कळ द्रव्य, रथ; व एक घोडी इत्यादि बरोबर घेऊन रैक्काकडे गेला. तेथें रैक्कास जानश्रुतिराजा म्हणाला कीं, हे मुने! आपण हें मी आणलेलें सर्व घेऊन मला उपदेश करा. असें ऐकून रैक्क जानश्रुतीस म्हणतो; हे राजा! हें तूं आणिलेलें मला पुरेंसें नाहीं, तेव्हां असली अपुरी वस्तु संग्रहित करण्यापेक्षां तूं आणलेले सर्व पदार्थ परत घेऊन जा; मला ह्यांपैकी एकाचीहि गरज नाहीं. जानश्रुति म्हणाला; हे मुने! तुम्ही मी आणलेल्या वस्तु घ्या अगर घेऊं नका; परंतु मला ब्रह्मोपदेश करा. अशी प्रार्थना ऐकून रैक्क राजाला म्हणाला कीं, जो संसाराविषयीं अलिप्त आहे, तसेंच पुण्यपापापासूनहि जो अलिप्त आहे, ज्याचें दैव शांत झालें आहे, तोच ज्ञानोपदेश करण्याकरितां योग्य आहे. तूं संसाराविषयीं विरक्त आहेस खरा; परंतु पुण्यपापापासून अजून अलिप्त झाला नाहींस. पुण्यपापाच्या संचयानें पुनर्जन्माची प्राप्ति होते. तूं ज्यापेक्षां मला शरण आला आहेस, त्यापेक्षां मी सांगतों तो उपाय कर; म्हणजे ज्ञानोपदेशाला अधिकारी होशील. तो उपाय हा कीं, तूं ह्या पर्वतावर जाऊन गंगातीर्थ, यमुनातीर्थ व गयातीर्थ ह्याठिकाणीं स्नान कर; म्हणजे तूं कृतार्थ होऊन उपदेशाधिकारी होशील. जानश्रुतिराजा त्या तीन्हीं तीर्थांत स्नान करून अधिकारयुक्त होत्साता रैक्काच्या ब्रह्मोपदेशानें ब्रह्मस्वरूपाला प्राप्त झाला. ह्या तीन तीर्थांचे ठिकाणीं स्नान करून यथाविधि व्रतें करणाराचीं सर्व पातकें नष्ट होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतात. जे कोणी ह्या तीन तीर्थांचें माहात्म्य श्रवण किंवा पठण करितात, ते अज्ञानमुक्त होऊन शिवलोकीं जातात.

---

## अध्याय २७ वा.

### कोटितीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! यमुना, गंगा; व गया ह्या तीर्थांचे ठिकाणीं स्नान केल्यावर कोटितीर्थांत स्नान करावें. कोटितीर्थ हें सर्वत्र

प्रसिद्ध व सर्व पातकें दूर करणारें असून दुःस्वप्नादि दोष दूर करणारें आहे. पूर्वी रामचंद्रानें रावणाचा वध केल्यामुळें लागलेल्या ब्रह्महत्येचें निरसनार्थ गंधमादन पर्वतावर आगमन करून, तेथें त्यानें शिवलिंग स्थापित केलें. त्या लिंगाच्या अभिषेकार्थ उत्तम जल मिळेना; म्हणून धनुष्याच्या कोटीनें म्हणजे अग्रानें जमीन खणून गंगेचें स्मरण केलें. तत्काल गंगा पाताळांतून तेथें प्रकट झाली. गंगाप्रवाह उत्पन्न झालेला पाहून रामचंद्राला आनंद झाला; व त्यानें धनुष्य वर उचलिलें. तो गंगाप्रवाह रामाच्या धनुष्य-कोटीनें भूमि खणल्यामुळें उत्पन्न झाला; म्हणून त्या प्रवाहाला कोटितीर्थ हें नांव प्राप्त झालें. जें पातक इतर तीर्थांत स्नान करून नष्ट होत नाहीं, तें ह्या कोटितीर्थांत स्नान केल्यानें नष्ट होतें. शौनकादि ऋषि सूतास म्हणतात कीं, जर ह्या तीर्थांत स्नान केल्यानें इतर तीर्थांत स्नान करण्याचे श्रम व्यर्थ होतात, तर इतर धर्मादि तीर्थें निर्माण करण्याचें प्रयोजन तरी काय आहे? असा शौनकादिकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; हे शौनकादिकहो, हा तुमचा प्रश्न फारच उत्तम आहे. असाच प्रश्न पूर्वी नारदानें शंकराला केला असतां, शंकरानें नारदास जें काय सांगितलें, तेंच मी तुम्हाला सांगतों; ऐका. शंकर नारदाला म्हणतात; ऋषे! तीर्थयात्रा करीत असतां वाटेंत जर एखादें तीर्थ अगर देवालय दृष्टीस पडलें; व त्याचें दर्शनस्नानादि जर केलें नाहीं, तर तो मनुष्य दोषास पात्र होऊन अधोगतीला जातो. करितां हा दोष तीर्थयात्रा करणारांस लागूं नये; म्हणून आम्हीं प्रत्येक तीर्थाचें माहात्म्य निरनिराळें दिलें आहे. रामचंद्र त्या गंगाप्रवाहानें शिवलिंगाला अभिषेक घालून; व त्या तीर्थांत स्नान करून ब्रह्महत्यादि दोषांपासून मुक्त झाला; व नंतर पुष्पकाविमानांत बसून वानरसैन्यासह अयोध्येंत जाऊन राज्य करूं लागला. जो कोणी ह्या कोटितीर्थांत स्नान करून शिवलिंगाचें पूजन करील, तो रामचंद्राप्रमाणें सर्वदोषापासून रहित होऊन; व सुखोपभोग घेऊन शेवटीं मुक्त होईल. कोटितीर्थाचें काठीं रामानें जें शिवलिंग स्थापिलें, त्याचें नांव रामनाथ होय. ह्या तीर्थांत गंगा स्वतः प्रगट झाल्यामुळें ह्याचें माहात्म्य विशेष आहे. पूर्वी कृष्ण ह्या तीर्थांत स्नान करून कंसाला मारल्याच्या दोषापासून मुक्त झाला. शौनकादि ऋषींनीं कंसाला कृष्णानें कां मारिलें? असा प्रश्न केला असतां सूत म्हणतात, ऋषिहो! यदूच्या वंशांत वसुदेवनांवाचा एक पुरुष शूरसेनापासून उत्पन्न झाला. त्यानें देवकाच्या देवकी नांवाच्या कन्येशीं विवाह लाविला. विवाहामध्यें ज्यावेळीं वरातीची मिरवणूक निघाली, त्यावेळीं वसुदेव-देवकी ज्या रथांत बसलीं होतीं, त्याचें सारथ्यकर्म देवकीचा भाऊ जो कंस तो करीत होता. मोठ्या थाटानें मिरवणूक निघाली असतां, अकस्मात् आकाशवाणी झाली कीं, हे

कंसा ! ज्या आपल्या बहिणीला रथांत बसवून मिरवीत नेत आहेस, त्याच बहिणीचा अर्थात् देवकीचा आठवा पुत्र तुला ठार मारील; असें असतां तूं हा समारंभ कसला मांडला आहेस ? सावध हो. अशी आकाशवाणी कंसाचे कानावर पडतांच तो आश्चर्यचकित होऊन क्रोधानें हातांत तलवार घेऊन देवकीला मारण्यास तयार झाला. नंतर वसुदेव कंसाला म्हणतो कीं, तूं हिला मारूं नको. हिच्या आठव्या मुलापासून जर तुझा नाश आहे, तर मी हिचे पहिले आठ पुत्र उपजतांच तुझ्या स्वाधीन करितो; म्हणजे तुझें मरणहि टळेल; व हिचें जीवितहि कायमचें राहील. ही युक्ति कंसाला पसंत पडली. नंतर कंसानें वसुदेव व देवकी यांना बंदींत ठेविलें. वसुदेवानें पहिले साहा पुत्र कंसाला नेऊन दिलें; व त्यानें त्या साही पुत्रांचा नाश केला. देवकीचा सातवा गर्भ मायेनें रोहिणीच्या गर्भांत गुप्तपणें काढून घातल्यामुळें सातव्या खेपेला देवकी प्रसूत न होतां कंसाच्या भीतीनें तो गर्भ पोटांतच जिरून गेला असावा, असा सर्वांचा तर्क झाला. आठव्या खेपेला श्रीविष्णूनें स्वतः देवकीचें उदरीं अवतार घेतला; व मायेला यशोदेचें पोटीं अवतीर्ण होण्यास सांगितलें. दहाव्या महिन्यामध्यें देवकीच्या पुढें आठवर्षांची सर्वायुधपूर्ण व सुंदर अशी विष्णूची कृष्ण या नांवानें एक मूर्ति उभी राहिली. तें भगवत्स्वरूप पाहून वसुदेवानें त्याची स्तुति केली. नंतर विष्णु म्हणतात कीं, मी कंसाचा नाश करणार आहे, तुम्ही भिऊं नका. आतां तुम्ही येथून नंदपत्नी जी यशोदा ती प्रसूत होऊन तिला नुकतीच मुलगी झाली आहे. तेथें मला न्या; व ती मुलगी तुम्ही येथें आणा, असें विष्णूनें वसुदेवाला सांगितलें.विष्णूच्या म्हणजे कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें वसुदेवानें तसें केलें. परत यशोदेची मुलगी बंदिखान्यांत आणून तिला वसुदेव देवकीच्या शय्येवर ठेवणार, तोंच ती मोठ्यांदां रुदन करूं लागली. तो शब्द ऐकताच द्वारपाळांनीं देवकी प्रसूत झाल्याची वरदी कंसाला दिली. हें देवकीचें आठवें संतान म्हणजे आपला खरा शत्रु असल्यामुळें कंस धांवत धांवत बंदिखान्यांत येऊन त्या मुलीला घेऊन दगडावर हापटणार, तोंच ती त्याचे हातून निसटून आकाशांत जाऊन; व आयुधासह आठ हांत धारण करून आकाशांतून कंसाला म्हणाली कीं, हे कंसा ! तुझा शत्रु पृथ्वीवर कोठेतरी वाढत आहे; तूं आपल्या मृत्यूची वाट पाहत बस. तुझा नाश जवळच प्राप्त झाला आहे, असें समज. कांहीं दिवसानें रोहिणीपुत्र राम ( बळराम ); व यशोदापुत्र कृष्ण हे उभयतां मोठे झाले. बाल्यावस्थेंत ह्या उभयतांनीं अनेक बालक्रीडा, गोरक्षण वगैरे कृत्यें केलीं. कंसाच्या आज्ञेनें अक्रूरानें रामकृष्णांना मथुरेंत धनुर्यागाच्या निमित्तानें आणिलें. पुढें क्रमानें कुवलयापीडनांवाच्या हत्तीला मारून त्याचे

दोन दांत दोघांनीं आपल्या हातांत घेतले; व ते पुढें रंगभूमीवर गेले, त्याठिकाणीं उभयतांनीं मिळून मल्लयुद्धांत चाणूर मुष्टिक, तोशल वगैरे मल्लांना यमसदनीं पाठविलें. पुढें कृष्णानें कंसाचे अंगावर झडप घालून त्याला सिंहासनाखालीं पाडिलें; व त्याचे दोन पाय धरून व आकाशांत गरगर फिरवून जमीनीवर आंपटिलें, त्यायोगें कंस तत्काल गतप्राण झाला. नंतर वसुदेवदेवकीला बंदींतून मुक्त करून उग्रसेनाला राज्यासनावर स्थापित केलें. पुढें नारदऋषि कृष्णाकडे आले असतां कृष्ण नारदाला म्हणतात कीं, नारदा! कंस हा माझा मामा असल्यामुळें त्याला मारणें हा शास्त्रांत दोष सांगितला आहे; तरी कंसाला मारल्याबद्दल जो मला दोष लागला, त्याच्या प्रायश्चित्तार्थ मी काय करावें, तें मला सांगा. नंतर नारद कृष्णाला म्हणतात कीं, आपण परमेश्वर असल्यामुळें निर्दोषच आहां; तथापि लोकांना पद्धत घालून देण्याकरितां जर प्रायश्चित्ताचरण करणार असाल, तर रामसेतु जो गंधमादनपर्वत, तेथें रामनाथ या नांवाचें कोटितीर्थाचे शेजारीं एक स्थान आहे, त्या तीर्थांत स्नान करून रामनाथाचें पूजन करा; म्हणजे आपण ह्या दोषापासून मुक्त व्हाल. श्रीकृष्ण नारदाच्या सांगण्याप्रमाणें कोटितीर्थांत स्नान करून; व रामनाथपूजन करून कंसाला मारण्याच्या दोषापासून मुक्त झाले. सूत म्हणतात; ऋषिहो! ह्याप्रमाणें हें कोटितीर्थ ब्रह्महत्त्यादिदोषापासून मुक्त करणारें आहे. हें माहात्म्य श्रवण करणारे निष्पाप होऊन मोक्षाला जातात.

---

## अध्याय २८ वा.

### साध्यामृततीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! कोटितीर्थावर स्नान केल्यानंतर साध्यामृततीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ सर्वदुःखांचें व पापांचें नाशन करणारें आहे. तपानें, ब्रह्मचर्यादिव्रतानें किंवा यज्ञानें जी गति प्राप्त होत नाहीं, ती केवळ ह्या तीर्थांत स्नान केल्यानेंच प्राप्त होते. साध्यामृततीर्थामध्यें देह विसर्जित केला असतां जितके दिवस ह्या तीर्थांत मनुष्याचा अस्थि राहतील, तितकीं वर्षें तो मनुष्य शिवलोकीं पूज्य होतो. पूर्वीं पुरूरवाराजा तुंबुरूच्या शापानें उर्वशीच्या वियोगजन्य दुःखाला प्राप्त होऊन ह्या तीर्थांत स्नान केल्यामुळें दुःखमुक्त झाला; असा ह्या तीर्थाचा महिमा आहे. नंतर पुरूरव्याला शाप होण्याचें कारण सूताला विचारिलें असतां सूत शौनकादि ऋषींना सांगतात; पूर्वीं इंद्राप्रमाणें पराक्रमी असा एक पुरूरवानांवाचा सार्व-

भौम राजा होता. त्यानें पुष्कळ यज्ञदानादि अनेक पुण्यकर्में करून प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन केलें. उर्वशीहि वरुणाच्या शापानें पृथ्वीवर येती झाली. ती उर्वशी राजमहालाचे आसपास असणाऱ्या बागेंत बसून गायन करूं लागली असतां पुरूरवाहि त्याच वेळीं क्रीडा करण्याकरितां तेथें प्राप्त झाला. आपल्या बागेंत गात बसलेल्या उर्वशीला पाहून कामातुर झालेला राजा तिला पत्नी होण्याविषयीं विनवूं लागला.राजाचें भाषण ऐकून उर्वशी राजाला म्हणते कीं,पुत्राप्रमाणें रक्षण केलेल्या ह्या माझ्या दोन मेंढ्या आहेत; त्याचें जर तूं उत्तमतऱ्हेनें संरक्षण करिशील तर मी तुझ्याजवळ राहीन;असे उर्वशीचें भाषण ऐकून राजानें तिच्या सर्व अटी कबूल केल्या; व तो तिच्यासह आनंदानें कांहीं काळ क्रीडा करून सुखोपभोग घेता झाला. ती उर्वशी पुरूरव्याजवळ कायमची राहिल्यामुळें तें उर्वशीचें कृत्य देवांना पसंत न पडून तिला स्वर्गांत बोलाविण्याकरीतां देवांनीं विश्वावसुगंधर्वाला भूमीवर पाठविलें. उर्वशीला नकळत तिच्या मेंढ्या विश्वावसूनें स्वर्गीं नेल्या. तो गेल्यानंतर उर्वशीला मेंढ्या जाग्यावर नाहींत, असें पाहून फार दुःख झालें; व ती पुरूरव्यापासून निघून स्वर्गीं गेली. नंतर त्या मेंढ्या सोडून आणण्याकरितां पुरूरव्यानें विश्वावसूच्या मागोमाग जाऊन व गंधर्वांना जिंकून मेंढ्या सोडविल्या. पुरूरवा घरीं येऊन पाहतों, तों उर्वशी अंतःपुरांतून निसटून गेली, असें त्यास आढळून आलें. पुरूरवा उर्वशीच्या विरहजन्य दुःखानें पृथ्वीवर भटकूं लागला. पुढें कुरुक्षेत्रांतील एका सुंदर सरोवराचे काठीं अप्सरासह क्रीडा करीत असलेल्या उर्वशीला पाहून तो राजा तिचेजवळ धावत गेला; व मंदिरांत परत येण्याविषयीं तिला विनवूं लागला. पुनः पुरूरवा व उर्वशी ह्यांचें सख्य झालें. पुरूरव्यानें अनेक यज्ञ करून उर्वशीसह तो गंधर्वलोकाला जाता झाला. तेथें एकेदिवशीं तंबुरु आला असतां पुरूवा व उर्वशी यांनीं त्याला उद्देशून हास्य केलें. आपला उपहास केलेला पाहून तुंबुरूला राग आला; व त्यानें उर्वशीला व पुरूरव्याला शाप दिला; कीं, तुम्ही ज्यापेक्षां माझा उपहास केलात त्यापेक्षां तुमचा वियोग होऊन तुम्हाला परस्परांच्या वियोगाचें अत्यंत दुःख होईल. शाप ऐकून त्यांना दुःख झालें; व ते हात जोडून उच्छाप मिळण्याबद्दल तुंबुरूची प्रार्थना करूं लागले. नंतर तुंबुरु प्रसन्न होऊन उच्छाप देता झाला कीं, तुम्हीं जेव्हां गंधमादनपर्वतावर साध्यामृततीर्थाचेठिकाणीं स्नान कराल, तेव्हां शापमुक्त व्हाल. पुरूरवा व उर्वशी ही तुंबुरूच्या सांगण्याप्रमाणें साध्यामृततीर्थाचेठिकाणीं जाऊन; व स्नान करून शापमुक्त झाली; व त्यामुळें तो उर्वशीसह आनंदानें क्रीडा करूं लागला. जे कोणी हें कथानक श्रवण किंवा पठण करितील, ते निष्पाप होत्साते शिवलोकीं जातील.

---

# अध्याय २९ वा.

## सर्वतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; ऋषिहो ! साध्यामृततीर्थाचेठिकाणीं स्नान केल्यानंतर सर्वतीर्थावर जावें. गायत्र्यादि महामंत्राचें अनुष्ठान केल्याचें फल, तसेंच चारहि वेदांच्या अध्ययनाचें फल ह्या तीर्थांत स्नान केलें असतां मिळतें. ह्या तीर्थाला सर्वतीर्थ हें नांव कां प्राप्त झालें, असा शौनकादिऋषींनीं प्रश्न केला असतां सूत म्हणतात; ऋषिहो ! पूर्वीं सुचरितनांवाचा एक ऋषि भृगुवंशांत उत्पन्न झालेला असा होता. तो मुनि अंधळा असल्यामुळें तीर्थयात्रा करण्यास असमर्थ झाला; परंतु त्याची सर्वतीर्थांत स्नान करण्याची उत्कट इच्छा होती. तो कसाबसा गंधमादनपर्वतावर येऊन शंकराची आराधना करूं लागला. त्याच्या घोर तपश्चर्येनें शंकर प्रसन्न होऊन सुचरितमुनींला त्यानें दिव्य दृष्टि दिली. सुचरिताला शिवदर्शनानें अत्यानंद झाला; व तो शंकराची स्तुति करून त्याची प्रार्थना करूं लागला.

ह्याप्रमाणें प्रार्थनावश झालेला शंकर सुचरितमुनीला वर मागण्याविषयीं म्हणूं लागला असतां सुचरितमुनि शंकराला म्हणतो कीं, मी वृद्ध असल्यामुळें जरी मला नेत्रप्राप्ती झाली आहे, तरी सुद्धां तीर्थयात्रा करण्यास असमर्थ आहें; व माझी तर सर्व तीर्थांचेठिकाणीं स्नान करण्याची इच्छा आहे; करितां जेथें स्नान केलें असतां सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लागेल, असें एकादें तीर्थ आपण मला दाखवावें. यावर शंकर म्हणतात; मुने ! मी तीर्थांना घेऊन ह्या पर्वतावर तूं जेथें तप केलेंस तेथें आणून स्थापित करितों; म्हणजे तुझ्या इच्छेप्रमाणें तुला सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लागेल; असें सांगितल्यानंतर शंकरानें सर्व तीर्थांची स्थापना तेथें करून त्याचें नांव सर्वतीर्थ असें ठेविलें. सुचरितमुनि सर्वतीर्थांत स्नान केल्यामुळें त्यांस सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य प्राप्त झालें. त्याप्रमाणें सर्वतीर्थाची स्थापना करून शंकर गुप्त झाले. तो सुचरितमुनि सर्वतीर्थाचे काठीं राहून; तेथील स्नानादि शुभ कर्मांनें निष्पाप होऊन अंतीं शिवलोकाला प्राप्त होता झाला.

# अध्याय ३० वा.

## धनुष्कोटितीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; ऋषिहो ! सर्वतीर्थांत स्नान केल्यानंतर धनुष्कोटितीर्थाला जावें; त्यायोगें मनुष्य कितीहि पापी असला तरी अठ्ठावीस प्रकारच्या नरकापासून त्याची सुटका होते. ते नरक क्रमेंकरून तामिस्र, अंधतामिस्र, महारौरव, रौरव कुम्भीपाक, कालसूत्र, असिपत्रवन, क्रमिभक्ष, अंधकूप, संदंश, शाल्मली, सूर्मि, वैतरणी, प्राणरोध, विशसन, लालाभक्ष, अवीचि, सारमेयोदन, वज्रकणक, क्षारकर्दम. रक्षोगणाशन, शूलप्रोत, वितोदन, दंदशूकासन, पर्यावर्तन, तिरोधान, सूचीमुख, पूयशोणितभक्ष; व विषाग्निपरिपीडन अशा नांवानें अठ्ठावीस आहेत. धनुष्कोटीचेठिकाणीं स्नान केल्यामुळें ह्या नरकयातनापासून प्राण्याची मुक्तता होते. जे स्वामिद्रोह करून परधनाचें हरण करितात; ते अंधतामिस्र व तामिस्र ह्या नरकामध्यें जाऊन पडतात. जे प्राणिद्रोह करितात, ते महारौरव व रौरवनरकाला जातात. जे निर्दयपणानें पशुपक्ष्यांना पीडा देतात, ते कुंभीपाकांत जाऊन पडतात. अशाचतऱ्हेच्या स्वस्वकर्मांनें दूषित लोक यथाधिकार त्या त्या नरकांत जाऊन दुःखें भोगतात. जर आपणाला नरकापासून सुटका करून घ्यावयाची असेल तर ह्या धनुष्कोटितीर्थांत एकदा तरी आपण स्नान केलेंच पाहिजे. जे लोक सर्व पातकांचें क्षालन करण्यास समर्थ असणाऱ्या धनुष्कोटितीर्थांत स्नान न करितां अन्यठिकाणीं गमन करितात, त्यांच्या मूर्खपणाची कमालच झाली ह्मणावयाची, अशा पुरुषांना धिक्कार असो. आतां ह्याला धनुष्कोटितीर्थ हें नांव प्राप्त होण्याचें कारण काय ! तें सांगतो; ऐका. पूर्वी रामचंद्रानें रावणाचा वध करून बिभीषणास लंकाधिपति केल्यावर रामचंद्र परिवारांसह गंधमादनपर्ततावर आले. नंतर तेथें बिभीषण रामचंद्रास म्हणतात कीं, हा जो आपण लंकेपर्यंत बांधलेला सेतु, तो आम्हाला फारच त्रासदायक होणार. बलवान् राजे पायरस्त्यानें सेतूच्या मार्गानें सैन्यासह लंकेंत येऊन कदाचित् आमचें राज्यहि लूटून नेतील; करितां आपण हा सेतु मध्यंतरी धनुष्याच्या टोंकानें म्हणजे अग्रानें फोडून टाकावा. अशी बिभीषणाची प्रार्थना ऐकतांच रामचंद्रानें आपल्या धनुष्याच्या अग्रानें सेतूला फोडून लंकेंत जाण्याची पायवाट बंद केली. ज्याठिकाणीं सेतु दुभांगला तेंच हें धनुष्यकोटितिर्थ होय. ह्या सेतूचा भेद धनुष्यकोटीनें केला म्हणून तेथील तीर्थाला धनुष्कोटी हें नाव प्राप्त झालें. पृथ्वीवर असणारीं दहा अब्ज तीर्थें ह्या धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं

राहत असल्यामुळें ह्या तीर्थाचें माहात्म्य सर्वतीर्थांहून श्रेष्ठ आहे. ह्या तीर्थाचे ठिकाणीं पितृश्राद्ध केल्यास पितरांची कल्पपर्यंत तृप्ति होते. पूर्वी अश्वत्थाम्यानें पांडवांच्या मुलांना बेसावधास्थितींत मारल्यामुळें लागलेलें जें पाप तें धनुष्कोटितीर्थांत स्नान करून नष्ट केलें; असा ह्या तीर्थाचा महिमा आहे. ह्या तीर्थमाहात्म्याच्या श्रवणानें सर्व पातकें नष्ट होऊन मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय ३१ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य ( पुढें चालू. )

शौनक म्हणतात, सूता ! अश्वत्थाम्यानें पांडवांच्या पांच मुलांना बेसावधपणांत असतांना कां मारिलें ? तें सांगा. असा शौनकांचा प्रश्न ऐकून सूत सांगतात, ऋषिहो ! पूर्वी राज्याकरितां पांडव व कौरव ह्यांचें युद्ध सुरू असतां त्यांत दहा दिवसामध्यें भीष्म, पांच दिवसांत द्रोण, दोन दिवसांत कर्ण व एक दिवसांत शल्य ह्याप्रमाणें अठरा दिवसांत भीष्मादि सर्व वीरांचा पांडवानें नाश केला. शेवटीं अठराव्या दिवशीं शल्याला मारल्यानंतर दुर्योधन व भीम याचें द्वंद्वयुद्ध होऊन त्यांत दुर्योधन भीमाच्या गदेनें खालीं पडला. नंतर दुर्योधन मरणोन्मुख निश्चेष्ट पडलेला पाहून श्रीकृष्णासह पांडव स्वशिबिराला निघून गेले. पुढें कृतवर्मा, कृप व अश्वत्थामा हे दुर्योधनाजवळ येऊन फारच शोक करूं लागले. दुर्योधनाची ही स्थिति पाहून क्रोधानें लालभडक झालेला अश्वत्थामा दुर्योधनाला म्हणतो कीं, आज रात्रीं मी पांडवांच्या शिबिराला जाऊन तेथें निद्रित झालेल्या पांची पांडवाचा अकस्मात् वध करितों. अशी प्रतिज्ञा करून; व दुर्योधनाची आज्ञा घेऊन अश्वत्थामा पांडवांच्या शिबिराकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्यानें शंकराची आराधना करून एक तलवार मिळविली; व ती घेऊन अश्वत्थामा पांडवांच्या शिबिराला प्राप्त झाला असतां श्रीकृष्ण त्रिकालज्ञ असल्यामुळें अश्वत्थामा पांडवांना मारण्यास शिबिराला येईल, हें पूर्वीच जाणून तेथून ते पांडवांसह दुसरीकडे गेले होते. नंतर अश्वत्थामा शिबिराला येऊन पाहतों, तों तेथें पांडवांच्या सारखीं स्वरूपें धारण केलेले पांच पाण्डवांचे पुत्र रांगेनें निजले आहेत. हे पांडवपुत्र, हें त्यास माहीत नसल्यामुळें अश्वत्थाम्यानें निजलेले हे धर्मादिपांडवच आहेत, अशा कल्पनेनें त्यांचा वध केला. नंतर अश्वत्थामा तेथून निघून नर्मदानदीचे काठीं अनेक ऋषि कथा श्रवण करीत होते, तेथें प्राप्त झाला. त्या ऋषींनीं अश्वत्थाम्याकडे पाहून योगबलानें हा महापापी व कृतघ्न आहे, असें जाणून त्यास सांगितलें कीं, तूं निद्रित

झालेल्या लहान बालांचा नुकताच कृतघ्नपणानें वध केल्यामुळें महापापी आहेस; करितां तूं येथें राहून आम्हाला आपलें मुखहि दाखवूं नको. तुझ्या दर्शनानें आम्हीहि महापापी होऊं; येथून आतां निघून जा. नंतर अश्वत्थामा लज्जेनें तेथून निघून आपण केलेल्या पापाच्या क्षालनार्थ काशी वगैरे अनेक तीर्थें हिंडला; पण व्यर्थ. शेवटी अश्वत्थामा कंटाळून बदरिकाश्रमामध्यें व्यासाजवळ प्राप्त झाला; व स्वकृतपापाच्या क्षालनाचा उपाय विचारूं लागला. व्यास अश्वत्थाम्याला म्हणतात कीं, तूं जर दक्षिणसमुद्रांत गंधमादनपर्वतावर धनुष्कोटिनांवाचें तीर्थ आहे; तेथें जाऊन स्नानविधी करितील तर ह्या वरील पापापासून मुक्त होशील. व्यासाज्ञेप्रमाणें अश्वत्थामा धनुष्कोटितीर्था-मध्यें स्नानविधी करतांच दोषापासून मुक्त झाला, त्याच पुण्यप्रभावानें शंकर अश्वत्थाम्यावर प्रसन्न होऊन तेथें प्रगट झाले. शंकराची अश्वत्थाम्यानें स्तुति केली असतां शंकरानें वर मागण्यास सांगितलें. अश्वत्थामा म्हणतो; देवा ! माझी भक्ति तुझेठिकाणीं सतत असो, एवढाच वर आम्हाला द्यावा. असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून शंकर बरें आहे, असें म्हणून तेथेंच गुप्त झाले. ह्याप्रमाणें अश्वत्थामा महापापी असतांहि धनु-ष्कोटितीर्थांत स्नान केल्यामुळें निष्पाप झाला; असा ह्या तीर्थाचा महिमा अगाध आहे. हें आख्यान श्रवण कणारे निष्पाप होऊन शिवलोकीं जातात.

---

## अध्याय ३२ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य ( पुढें चालू. )

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! पुनः तुम्हांला धनुष्कोटितीर्थाचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी नंद ह्या नांवाचा चंद्रवंशांत उत्पन्न झालेला सार्वभौम राजा होता. त्याला धर्मगुप्तनांवाचा एक मुलगा होता. वृद्धावस्था प्राप्त झाली असतां नंदराजा स्वपुत्राला म्हणचे धर्मगुप्ताला सिंहासनारूढ करून स्वतः तपादि करण्याकरितां अरण्यामध्यें जाता झाला. बापाचे पश्चात् धर्मगुप्तहि प्रजेचें पालन उत्तमतऱ्हेनें करीत असे. कोणी एकेदिवशीं धर्मगुप्त घोड्यावर बसून मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां फिरतां फिरतां तेथेंच त्यास सायंकाळ झाली. नंतर धर्मगुप्त त्याच अरण्यांत सायंसंध्यादि नित्य विधि उरकून गायत्रीजप करीत असतां इतक्यांत तेथें एक सिंहानें पिटाळून दिलेला असा अस्वल प्राप्त झाला. तो अस्वल झाडावर चढून खालीं पाहतो, तों धर्मगुप्तराजाकडे त्याची नजर गेली. त्या राजाला पाहतांच अस्वल त्यास म्हणतो कीं, तूं बिलकूल

भीति बाळगूं नकोस. अर्धीरात्र तूं झोंप घे; व मी तुझें अन्य सिंहादिश्वापदांपासून जागृत राहून रक्षण करितों; व नंतर मी झोंपेन, व तूं जागा राहून सकाळपर्यंत माझें रक्षण कर. अशीं राजाचीं व अस्वलाचीं भाषणें होऊन; व त्यांवर एकमेकांचा विश्वास बसून राजा अस्वलाच्या सांगण्याप्रमाणें झोंपीं गेला; व अस्वल त्याचें रक्षण करीत बसला. राजाला झोंप लागल्यानंतर सिंह तेथें येऊन अस्वलाला म्हणतो कीं, राजाला झोंप लागली आहे; तूं आतां इतका त्रास करून ह्याचें रक्षण कां करितोस. ह्याप्रमाणें सिंहाचें कपट अस्वलाचें लक्षांत येऊन तो सिंहाला म्हणतो कीं, कोणीहि कोणाचा विश्वासघात करूं नये, असा धर्म आहे. जर कोणाचा विश्वासघात केला, तर मोठमोठीं दुःखें विश्वासघात करणारावर येऊन कोसळतात. त्या दुःखांचा परिहार मात्र कोणत्याहि उपायानें होत नसतो; करितां असलें दुष्कृत्य करण्याची बुद्धि तूं मला देऊं नयेस. याप्रमाणें अस्वलाचें भाषण ऐकून सिंह जरासा दूर जाऊन लपून बसला. अर्धीरात्र होतांच राजा जागा झाला; व अस्वल झोंपीं गेला. पूर्वी ठरल्याप्रमाणें राजा हातांत धनुष्यबाण घेऊन अस्वलाचें रक्षण करीत बसला. नंतर सिंह राजाजवळ येऊन ह्मणतो; राजा! हा अस्वल आतां निजला आहे, ही शिकार मी येथें आणिली आहे, तूं ह्याचें रक्षण करण्याचें कार्य सोडून निघून जा. ह्याप्रमाणें सिंहाचें भाषण ऐकून राजानें अस्वलाला सोडून दिलें. इतक्यांत अस्वल राजाच्या दुर्दैवानें जागा झाला; व म्हणतो कीं, ज्यापेक्षां तूं माझा विश्वासघात केलास, त्यापेक्षां तूं उन्मत्त असा जगांत फिरत राहशील; असा शाप देऊन अस्वल सिंहाला म्हणतो कीं, तूं पूर्वी कुबेराचा प्रधान होतास. गौतमाच्या शापामुळें तुला सिंहाचा जन्म प्राप्त झाला आहे; करितां निरपराधी अशा मला उगीच कां मारतोस. ह्याप्रमाणें अस्वलाच्या भाषणानें सिंहाला पश्चात्ताप होऊन तो सिंहस्वरूप सोडून शापमुक्त होत्साता स्वस्थानाला प्राप्त झाला. राजा उन्मत्तपणें आपल्या नगरीला परत आला. प्रधानादिकांनीं राजाचें उन्मत्तपणाचें वर्तन पाहून त्याचा बाप जो नंदराजा तो नर्मदानदीचें काठीं बसला होता, तेथें ते त्यास घेऊन आले; व त्यांनीं त्यास सर्व वर्तमान सांगितलें. नंतर नंदराजा आपला पुत्र जो धर्मगुप्त त्याला घेऊन जैमिनीच्या आश्रमाला आला; व त्यानें त्यास आपल्या पुत्राची अशी स्थिति होण्याचें कारण सांगितलें; व ह्या स्थितीचा नाश होण्यास काय करावें? असेंहि विचारिलें. नंतर जैमिनी नंदराजाला म्हणतो कीं, तूं ह्या पुत्राला गंधमादनपर्वतावर धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं घेऊन जा; व ह्यास स्नान घाल; म्हणजे तत्काळ हा शापमुक्त होईल. जैमिनीच्या सांगण्याप्रमाणें नंदराजा पुत्राला घेऊन; व त्यातीर्थांत त्यास स्नान घालून त्यास शापमुक्त करिता झाला. नंदराजाचा पुत्र

धर्मगुप्त प्रधानांसह स्वनगरांत येऊन पूर्वीप्रमाणें राज्य करूं लागला; व नंद पूर्ववत् नर्मदातीरीं जाऊन तप करूं लागला. धनुष्कोटितीर्थ सोडून दुसऱ्या-तीर्थाला जाणें; म्हणजे गाईचें दूध सोडून रुईचें दूध घेण्यास गेल्याप्रमाणें होय. नुसत्या धनुष्कोटी ह्या नांवाचें तीन वेळां स्मरण करून मग कोठेंहि स्नान केलें तरी धनुष्कोटितीर्थांत स्नान केल्याचें फल मिळतें. ही कथा श्रवण करणारा ब्रह्म-हत्यादि पातकापासून मुक्त होऊन सर्वैश्वर्यसंपन्न होत्साता मोक्षाला जातो.

## अध्याय ३३ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य ( पुढें चालू. )

सूत म्हणतात; ऋषिहो ! आणखी तुम्हाला धनुष्कोटितीर्थाचें माहात्म्य सांगतों. पूर्वी बृहद्युम्ननांवाचा एक सार्वभौम राजा होता. तो प्रजेचें पुत्रा-प्रमाणें पालन करीत असे. त्यानें यज्ञयागादिकांनीं देवांनाहि थक्क करून सोडिलें होतें. त्याचा उपाध्याय जो रैभ्य मुनि, त्याला अर्वावसु व परावसु ह्या नांवाचे दोन पुत्र होते. ते चौदा विद्या व चौसष्ट कला ह्यांत निष्णात होते. ते दोघे रैभ्याच्या आज्ञेप्रमाणें बृहद्युम्नाच्या यज्ञामध्यें एकदां गेले असतां त्याकर्मांत किंचितूहि न्यून न पडून तें निर्विघ्नपणें पार पाडिलें. इतक्यांत त्या यज्ञशाळेंत वासिष्ठादि ऋषि प्राप्त झाले. राजानें त्या सर्वांची मोठ्या आदरानें पूजा केली. रैभ्य मुनि पुत्रांची विद्वत्ता पाहून आश्चर्य-चकित झाले. अर्वावसूला तेथेंच सोडून परावसु घरी येण्यास निघाला. राना-मध्यें त्याचा बाप जो रैभ्य तो हिंडत होता. परावसूनें सायंकाल झाल्यामुळें लांबून हें कोणी तरी श्वापद येत असावें, अशा कल्पनेनें त्याला मारिलें; नंतर जवळ येऊन पाहतो तों हें श्वापद नसून प्रत्यक्ष आपला बापच आहे,असें पाहून तो फार शोक करूं लागला; व पुनः परत बृहद्युम्नाच्या सत्रामध्यें प्राप्त झाला.तो आपल्या हांतून चुकीनें घडलेलें दुष्कृत्य आपला भाऊ जो अर्वावसु त्यास सांगता झाला. परावसुचें हें भाषण ऐकून अर्वावसूलाहि फारच वाईट वाटलें. परावसु अर्वावसूला म्हणतो कीं, मी पितृहत्त्या केल्यामुळें जें मला पातक लागलें आहे, त्याच्या नाशार्थ माझ्या बदली तूं तप कर. अर्वावसु अरण्यांत जाऊन बारा वर्षें तप करून परत बृहद्युम्नाचे यज्ञशाळेंत प्राप्त झाला. इकडे परावसु बृह-द्युम्नाच्या यज्ञाला प्रारंभ करीत असतां बारा वर्षांनीं प्राप्त झालेल्या व आपल्या ब्रह्महत्त्येच्या नाशार्थ आपल्या बदली पाठविलेल्या अर्वावसूला पाहून तो बृहद्युम्नाला म्हणतो कीं, हा ब्रह्महत्त्या व पितृहत्त्य करणारा अर्वावसु तुमच्या

यज्ञशाळेंत येत आहे; ह्याला बाहेर घालवून लावा, नाहीं तर यज्ञकर्म निष्फळ होईल; असें खोटेंच सांगितलें. अर्वावसूनें राजाला पुष्कळ सांगितलें; पण तें त्याला खोटें वाटलें. त्यामुळें अर्वावसु पुनः वनांत जाऊन मोठी तपश्चर्या करूं लागला. त्याच्या तपानें प्रत्यक्ष सूर्य संतुष्ट होऊन अर्वावसूला वर मागण्याविषयीं सांगता झाला. अर्वावसूनें सूर्याची परावसूच्या दोषाचें निरसन करण्याविषयीं प्रार्थना केली. सूर्यनारायण अर्वावसूला सांगतात कीं, तूं भावाला घेऊन दक्षिणसमुद्राचेठिकाणीं गंधमादनपर्वतावर धनुष्कोटिनांवाचें तीर्थ आहे, तेथें जा; व त्यास तेथें स्नान करण्यास सांगा; म्हणजे तुझा भाऊ केलेल्या दोषापासून मुक्त होईल.नंतर अर्वावसु परावसूला घेऊन धनुष्कोटितीर्थांत स्नान घालता झाला; त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, हे परावसो ! ह्या तीर्थांत तूं स्नान केल्यामुळें आजपर्यंत केलेलीं ब्रह्महत्त्यादि तुझीं पातकें नष्ट झालीं आहेत; आतां स्वस्थानीं गमन कर. अशाप्रमाणें आकाशवाणी ऐकतांच ते दोघे स्वाश्रमाला निष्पाप होत्साते मोठ्या आनंदानें निघून गेले. नंतर घरीं जाऊन पाहतो तों परावसु व अर्वावसु ह्यांचा पिता जो रैभ्य, ज्याला परावसूनें अज्ञानानें मारिलें होतें, तो जिवंत झाला आहे; असें त्यांच्या दृष्टीस पडलें. हा सर्व प्रभाव धनुष्कोटितीर्थाचा आहे; असें त्यांस वाटून त्यांनीं त्या तीर्थाची वाहवा केली; व शेवटीं ते मुक्त झाले.

---

## अध्याय ३४ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य. ( पुढें चालू. )

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! पुनः आणखी एक धनुष्कोटितीर्थाला उद्देशून इतिहास सांगतो; ऐका. एक कोल्हा व वानर हे परस्पर फारच प्रेमी असे मित्र होते. पूर्वजन्मीं ह्या उभयतांना मनुष्यजन्म प्राप्त झालेले होते; व त्यांतहि ते परस्परांवर मित्रभावानें प्रेम करीत असत. मात्र पूर्वपुण्यानें त्यांना ह्या जन्मीं पूर्वजन्माचें स्मरण होतें. एकेदिवशीं वानर कोल्ह्याला म्हणतो कीं, हे कोल्ह्या ! तूं कोणतें पातक पूर्वी केलें होतेस कीं, ज्या योगें तुला हा वाईट जन्म प्राप्त झाला आहे. ह्या जन्मांत तुला श्मशानांत राहावें लागतें; व अशा वाईट हवेमध्यें दुर्गंधयुक्त पदार्थांचेंहि सेवन करावें लागतें, हें पाहून मला फारच वाईट वाटतें. ह्याप्रमाणें वानराचें भाषण ऐकून कोल्हा वानरास ह्मणतो; हे वानरा ! मी पूर्वजन्मीं वेदशास्त्रांत निष्णात असा वेदशर्मा नांवाचा ब्राह्मण होतो. मजजवळ पुष्कळ द्रव्य असूनहि मी ब्राह्मणांना आमंत्रण देऊन त्यांना

दान वगैरे दिलें नाहीं, उलट मी त्यांची निर्भर्त्सना करीत असे; ह्या पापामुळें मला हा कोल्ह्याचा जन्म प्राप्त झाला आहे. ब्राह्मणाला बोलावून त्याला दान देतों; म्हणून सांगून जर कांहींहि न देता त्यास परत पाठविलें, तर दाहा जन्मांत केलेल्या पुण्याचा एका क्षणांत क्षय होतो.आतां पूर्वीं केलेलें हें माझें पाप केव्हां नष्ट होईल, हें कांहीं समजत नाहीं. आतां तूं पूर्वीं कोणतें पाप केलें होतेस कीं, ज्यामुळें तुला हा वानराचा जन्म आला आहे. नंतर कोल्ह्याचें भाषण ऐकून; व त्यानें केलेला प्रश्नहि श्रवण करून वानर कोल्ह्याला म्हणतो; हे मित्रा! मी पूर्वजन्मीं वेदनाथनांवाचा एक ब्राह्मण होतो. माझ्या बापाचें नांव विश्वनाथ; व आईचें नांव कमलालया होतें. जसें हल्लीं आपलें उभयतांचें सख्य आहे, असेंच पूर्वजन्मींहि होतें. मी शंकराची आराधना करून त्रिकालज्ञान मिळविलें होतें. एकेदिवशीं मी ब्राह्मणाच्या द्रव्याचा अपहार केला; त्यामुळें मला हा वानरजन्म प्राप्त झाला आहे. ब्राह्मणाचें द्रव्य कधींहि हरण करूं नये. जर ब्राह्मणद्रव्य हरण केलें, तर नरकप्राप्ती होते. ह्या उभयतांचें जें इतकें भाषण होतें, तोंच एक सिंधुद्वीपनांवाचा मुनि त्यांच्याजवळ प्राप्त झाला. त्याला पाहून कोल्हा व वानर ऋषीला म्हणतात; हे मुने! आम्हीं पूर्वजन्मीं केलेल्या दुष्कर्मानें आम्हाला हे वाईट जन्म प्राप्त झाले आहेत; करितां आपण आम्हांवर कृपा करून आम्हास ह्या दोषापासून; व निंद्य जन्मापासून मुक्त करा. नंतर सिंधुद्वीप त्या दोघांना म्हणतो कीं, मी तुम्हाला ओळखतों. तुम्ही आतां गंधमादनपर्वतावर असणाऱ्या धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं जाऊन स्नान करा; म्हणजे सर्वपापापासून मुक्त व्हाल. पूर्वीं भिल्लिणीच्या संपर्कामुळें सुमतिब्राह्मणाला मद्यप्राशन करण्याचा प्रसंग आला; व त्यामुळें त्याला मोठें पाप लागून तो ब्राह्मणत्वापासून भ्रष्ट झाला. शेवटीं तो धनुष्कोटितीर्थांत स्नान केल्यामुळें सर्व महापापापासून मुक्त होऊन स्वर्गीं गेला. पुढें वानर व कोल्हा ह्यानीं ऋषीला सुमतिब्राह्मणाची साद्यंत कथा श्रवण करण्याची इच्छा प्रदर्शित केल्यामुळें सिंधुद्वीप मुनि त्यांना म्हणतो की, महाराष्ट्रदेशांत एक यज्ञदेव नांवाचा ब्राह्मण होता. त्यालाच सुमति नांवाचा पुत्र झाला. हा सर्वांचा त्याग करून तो एका भिल्लिणीशीं रत होता झाला. द्रव्यभावामुळें पुढें पुढें ती सुमतीचा त्याग करूं लागली असतां तो तिच्या प्राप्तीच्या लालसेनें पुष्कळ द्रव्य चोरून आणून तिला अर्पण करी. तिच्याच घरीं हा भोजन करीत असे. तो एके दिवशीं भिल्लाचा वेष घेऊन चोरी करण्याकरितां एका ब्राह्मणाच्या घरांत शिरला. शेवटीं त्या ब्राह्मणाला ठार मारून भिल्लवेषधारी सुमतिब्राह्मणानें पुष्कळ द्रव्य आणून भिल्लिणीला दिलें. सुमतिब्राह्मणानें ब्राह्मणाला ठार मारल्यामुळें त्याला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व ती ब्रह्म-

हत्या सुमतीचे पाठीस लागली. हें वर्तमान सुमतीचा बाप जो यज्ञदेव त्याला समजताच त्याला फार वाईट वाटलें; व तो सुमतीच्या ब्रह्महत्त्येचा नाश कसा होईल, असा विचार करूं लागला. सुदैवानें दुर्वासऋषीची व यज्ञदेवाची गाठ पडली असतां त्यानें सुमतीचें सर्व वर्तमान दुर्वासाला निवेदन केलें. नंतर दुर्वासा म्हणतो कीं, हे यज्ञदेवा! तुझ्या मुलाचें पाप इतकें भयंकर आहे कीं, त्याचा नाश होणें फारच कठीण आहे. आतां तुला जर ब्रह्महत्त्येच्या नाशनाचा उपाय हवा असेल, तर सांगतों ऐक; जर तुझा मुलगा धनुष्कोटितीर्थांचेठिकाणीं जाऊन; व स्नान करून शिवालिंगाचें पूजन करील, तरच त्याची ब्रह्महत्त्या नष्ट होईल. पूर्वीं ह्या तीर्थांत दुर्विनीत नांवाचा ब्राह्मण स्नान करून गुरुस्त्रीचेठिकाणीं गमन केल्याबद्दलच्या दोषापासून मुक्त झाला. ह्या तीर्थांच्या स्नानानें ब्रह्महत्त्यादि दोष नष्ट होतात.

---

## अध्याय ३५ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य (पुढें चालू.)

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! नंतर यज्ञदेव दुर्वासाला म्हणाले; हे मुने! मागील अध्यायांत आपण सांगितलें कीं, दुर्विनीत नामक ब्राह्मण ह्या धनुष्कोटितीर्थांत स्नान करून गुरुस्त्रीजवळ गमन केल्याच्या दोषापासून मुक्त झाला; तरी ती कथा आम्हाला सांगावी. नंतर दुर्वासा यज्ञदेवाला म्हणतो; हे यज्ञदेवा! पूर्वीं पांड्यदेशामध्यें कोणी एक इध्मवाह नांवाचा विद्वान् ब्राह्मण होता. त्याच्या बायकोचें नांव रुचि होतें. त्याच ब्राह्मणाला दुर्विनीतनांवाचा एक पुत्र झाला. दुर्विनीताच्या लहानपणींच त्याचा बाप इध्मवाह मृत झाल्यामुळें, त्याची माता रुचि विधवाधर्मानें वागत असे. तो दुर्विनीत कांहीं दिवस मातेजवळ राहिला असतां, बारा वर्षें दुष्काळ पडल्यामुळें आईला घेऊन गौकर्णक्षेत्रीं गेला. तेथें पुष्कळ दिवस राहिल्यानंतर पूर्वजन्मार्जित पातकानें युक्त होत्साता तो दुर्विनीत आपल्या मातेशीं ती नको नको म्हणत असतां बलात्कारानें कामासक्त होऊन तिचा उपभोग घेऊं लागला. शेवटीं त्या दुर्विनीताला पश्चात्ताप होऊन; व तेथें वास्तव्य करणाऱ्या व्यासमुनीजवळ जाऊन तो त्यास केलेल्या पातकाच्या क्षालनार्थ उपाय विचारूं लागला. ह्या पातकाच्या नाशार्थ जरी देहत्याग करावा लागला, तरीहि माझी तयारी आहे. अशी त्याची दीन वाणी ऐकून व्यास दुर्विनीताला म्हणतात कीं, तूं जर गंधमादन पर्वतावर जाऊन तेथें असणाऱ्या धनुष्कोटितीर्थांत

स्नान करिशील तर मातृगमनाच्या पापापासून मुक्त होशील. ह्याप्रमाणें व्यासाचें भाषण ऐकून दुर्विनीत आपल्या मातेसह धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं जाऊन; व एकमहिना तेथें राहून, उपोषण, स्नान वगैरे केल्यानंतर तीं उभयतां स्वकृत पातकापासून मुक्त झालीं. नंतर पापमुक्त झालेला दुर्विनीत व्यासाजवळ येऊन म्हणतो कीं, मी आतां पापमुक्त झालों आहें, ह्यापुढें आम्ही काय करावें, तें सांगा. व्यास दुर्विनीताला म्हणतात; तूं आतां विवाह करून गृहस्थधर्मानें वाग; म्हणजे त्यांत तुझें कल्याण होईल. तूं कोणाची हिंसा करूं नको. तूं धर्मानें वागून " ॐ नमः शिवाय " ह्या षडक्षर मंत्राचा सतत जप कर; म्हणजे मुक्त होशील. ह्याप्रमाणें तीं धर्मानें वागून मुक्त झालीं.

दुर्वास यज्ञदेवाला म्हणतो कीं, मी तुम्हाला दुर्विनीताचें आख्यान व धनुष्कोटितीर्थाचा महिमा सांगितला आहे. आतां तूं विलंब न लावितां आपल्या पुत्राला ह्या तीर्थामध्यें घेऊन जा; व त्यास स्नान घाल; म्हणजे तो सर्व पापापासून मुक्त होईल. सिंधुद्वीपमुनि वानर व कोल्हा ह्यांस म्हणतो कीं, यज्ञदेव आपल्या पुत्रासह धनुष्कोटितीर्थांत सहा महिने राहून स्नानादिधी करिता झाला. त्या तीर्थांत स्नान करून सहा महिने पुरे होतात, तोंच आकाशवाणी झाली कीं, यज्ञदेवाच्या मुलाची ब्रह्महत्त्या नष्ट झाली आहे; व दुसरींहि सर्व पातकें नाश पावलीं आहेत. आकाशवाणी ऐकून यज्ञदेवाला मोठा आनंद झाला. करितां हे वानरश्रेष्ठा ! तूं कोल्ह्याला बरोबर घेऊन धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं जा; व तुम्ही उभयतां स्नान करा; म्हणजे पापमुक्त व्हाल. सूत म्हणतात; हे मुनिहो ! ' नंतर सिंधुद्वीपाच्या सांगण्याप्रमाणें वानर व कोल्हा दोघेहि धनुष्कोटितीर्थांत स्नान करतांच मुक्त झाले. जे कोणी हें आख्यान पठण किंवा श्रवण करितील, ते सर्व पातकापासून मुक्त होऊन स्वर्गाला जातील.

---

## अध्याय ३६ वा.

### धनुष्कोटिमाहात्म्य ( पुढें चालू ).

सूत म्हणात; ऋषिहो ! पुनः धनुष्कोटितीर्थाचें माहात्म्य सांगतों; ऐका दुराचारनांवाचा ब्राह्मण गोतमीनदीचे काठीं राहत होता. त्याला दुर्जनांची संगति॰ लागल्यामुळें तोहि स्वतः दुर्जन बनला होता. तो ब्राह्मण ब्रह्मत्वापासून भ्रष्ट व महापापी झाल्यामुळें वेताळानें त्याला घेरून टाकिलें. नंतर दुराचार ब्राह्मण परस्वाधीन होऊन बसला. दुराचाराला ह्याबद्दल फारच वाईट वाटलें; व तो देशोदेशीं दुःखानें भटकूं लागला. कर्मधर्मसंयोगानें तो फिरत-

फिरत धनुष्कोटितीर्थाचेठिकाणीं प्राप्त झाला. त्या तीर्थांत स्नान करितांच त्याची वेतालाच्या पीडेपासून मुक्तता झाली. हा चमत्कार पाहून दुराचारब्राह्मणाला मोठें आश्चर्य वाटून, एवढें पापनाशन करणारें स्थान तरी किंनामक आहे; ह्याचा तो विचार करीत बसला. नंतर तो तेथेंच राहणाऱ्या दत्तात्रेयाला शरण जाऊन ह्या स्थानाचें नांव; व महिमा त्यास विचारिता झाला. दत्तात्रेय दुराचारब्राह्मणाला म्हणतात कीं, हे ब्राह्मणा! ह्या तीर्थाला धनुष्कोटितीर्थ म्हणतात. ह्याठिकाणीं स्नान केलें असतां प्राण्यांची कितीहि मोठीं पातकें असलीं तरी तीं सर्व नष्ट होतात; असा ह्या तीर्थाचा महिमा आहे. तूं ह्या तीर्थांत, स्नान केल्यामुळें तुझें पूर्वीचें सर्व पाप; व वेताळपीडाहि सांप्रत नष्ट झाली आहे. भाद्रपद कृष्णपक्षांत महालयश्राद्ध पितरांच्या नांवानें करावें, असा शास्त्रनियम आहे; व त्याप्रमाणें ह्या वेताळानें पूर्वजन्मीं केलें नाहीं; म्हणून त्याला पितरांनीं तूं वेताळ हो, असा शाप दिला. नंतर शापाप्रमाणें ह्याला वेताळजन्म येऊन तुझ्या संगतीनें धनुष्कोटितीर्थांत स्नान केल्यामुळें ह्या वेताळाचीहि शापापासून मुक्तता झाली आहे. करितां भाद्रपदवद्यांत पितरांचे नांवानें अवश्य श्राद्ध करावें. भाद्रपद वद्य प्रतिपदेला महालय श्राद्ध केल्यास अग्निप्रमुख देवता प्रसन्न होऊन दहा हजार कल्पपर्यंत पितर संतुष्ट राहतात. भाद्रपद वद्य द्वितीयेला महालयश्राद्ध केल्यास शंकर प्रसन्न होऊन पितरांना कैलासप्राप्ती होते. भाद्रपद वद्य तृतीयेच्या दिवशीं श्राद्ध केल्यास कुबेर प्रसन्न होऊन पितरांच्या तृप्तीमुळें पुष्कल द्रव्यप्राप्ती होते. चतुर्थीचे दिवशीं श्राद्ध केल्यास गणपति प्रसन्न होतात. पंचमीच्या दिवशीं महालयश्राद्ध केल्यास लक्ष्मी प्रसन्न होते; व त्यायोगें पांच कल्पपर्यंत पितर तृप्त होतात. षष्ठी तिथीला श्राद्ध केल्यास कार्तिकस्वामी प्रसन्न होऊन साठ कल्पपर्यंत पितर तृप्त होतात. सप्तमीला श्राद्ध केल्यास सत्तर वर्षेंपर्यंत पितरांची तृप्ति होते. भाद्रपद वद्य अष्टमीला श्राद्ध केलें असतां शंकर प्रसन्न होऊन पितरांना शिवलोकप्राप्ती होते. जे नवमीला श्राद्ध करितात; त्यायोगें पार्वती प्रसन्न होऊन यजमानाला परिवारांसह क्षय, अपस्मार, कुष्ठ वगैरे रोगानें रहित करिते; व पितरांची नव्वद कोटी कल्पपर्यंत तृप्ति होते. भाद्रपद वद्य दशमीला महालयश्राद्ध केलें असतां, चंद्र प्रसन्न होऊन पितरांची दहा हजार कल्पपर्यंत तृप्ति होते. पुढें एकादशीला श्राद्ध केल्यास शंकर प्रसन्न होऊन, ते सर्वांचीं दुःखें नष्टहींशीं करून त्यांस मोक्षप्राप्ति करून देतात. द्वादशीला श्राद्ध केल्यास विष्णु प्रसन्न होऊन ते पितरांना वैकुंठी घेऊन जातात; व ते वैकुंठलोकांत बारा हजार कल्पपर्यंत राहून सायुज्यमुक्तीप्रत प्राप्त होतात. त्रयोदशीला श्राद्ध केल्यास

मदन प्रसन्न होतो; व श्राद्ध करण्याऱ्या यजमानास पितरांच्या प्रसादानें अनेक वस्तूंचा भोग मिळून, त्यास शेवटीं शिवप्राप्ती होते. चतुर्दशीला महालयश्राद्ध केल्यास शंकर प्रसन्न होऊन, त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात; व कितीहि पापी पितर असले तरी ह्या श्राद्धानें पापमुक्त होऊन शिवलोकीं जातात. जे कोणी भाद्रपद वद्य अमावास्येला महालयश्राद्ध करितील त्यांच्या पितरांची अक्षय्य तृप्ती होईल, ह्यांत शंका नाहीं. जे कोणी अमावास्येला श्राद्ध करणार नाहींत, त्याचे पितर जरी ब्रह्मलोकाला प्राप्त झाले असले, तरी नरकाला जातील; करितां अमावास्येला नित्यश्राद्ध करावें, ह्मणजे पितर तृप्त होऊन त्यांस मुक्ति मिळते. भाद्रपद महिना प्राप्त झाला असतां महिनाभर रोज एकेक तरी ब्राह्मण पंक्तीला घेऊन भोजन करावें. विशेषेंकरून भाद्रपद कृष्णपक्षाचें माहात्म्य विशेष आहे. भाद्रपद महिन्यांत सूतकादि अपरिहार्य कारणामुळें जर श्राद्धकर्मांत अडथळा आला, तर सूतकांतून मोकळें होतांच श्राद्धाला आरंभ करावा; व वृश्चिकसंक्रांत लागेपर्यंत हा श्राद्धविधि चालवावा; म्हणजे पितरांची तृप्ति होऊन त्यांच्याच आशीर्वादानें धनधान्यादिकांची प्राप्ति होते; व शेवटीं मोक्षहि मिळतो. महालयामध्यें नऊ ब्राह्मणांना आमंत्रण करावें. पैकीं पिता, पितामह, प्रपितामह, मातामह, मातृपितामह, मातृप्रपितामह ह्या साहांना उद्देशून एक एक ह्याप्रमाणें साहा ब्राह्मण नियुक्त करावें. दोन विश्वेदेवांकरितां व एक विष्णूच्या नांवानें; असे एकंदर नऊ ब्राह्मण बोलावून महालयश्राद्धाला आरंभ करावा. जो यथायोग्य महालयश्राद्ध करितो, त्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लागतें; तसेंच चांद्रायणादि प्रायश्चित्ताचरण केल्याचें, गायत्रीजप केल्याचें, सर्व पुराणें; व इतिहास श्रवण केल्याचेंहि फल त्यास प्राप्त होतें. पूर्वीं दशरथानें वसिष्ठाच्या सांगण्यावरून भाद्रपदांत श्राद्धें केलीं, त्यामुळें विष्णु प्रसन्न झाला; व त्या पुण्यामुळें त्यानें रामादि चार पुत्रांची प्राप्ती करून घेतली. ययातिराजाहि महालयश्राद्धाच्या पुण्यानें यदु वगैरे पुत्रांना मिळविता झाला. दुष्यन्तालाहि भरतपुत्राची प्राप्ती ह्याच श्राद्धविधीमुळें झाली. हरिश्चंद्राचें सत्त्वरक्षण ह्याच महालयश्राद्धाच्या आचरणानें झालें आहे. अशातऱ्हेनें बली, रामचंद्र, अत्रिप्रमुख ऋषि वगैरे लोकांनाहि ह्याच श्राद्धविधीच्या आचरणानें सर्व संकटांपासून मुक्त होतां येऊन सर्वेच्छा तृप्त करून घेता आल्या. असा श्राद्धाचा महिमा आहे, ह्या ब्राह्मणानें महालयश्राद्ध न केल्यामुळें ह्याला वेताळाचा जन्म आला होता; करितां हे दुराचार ब्राह्मणा! तूंहि महालयश्राद्ध कर, म्हणजे तुझ्या पितरांनाहि मोक्षप्राप्ति होऊन तुलाहि सद्गति प्राप्त होईल. नंतर दुराचारानें महालयश्राद्ध करितांच त्याचे पितर शिवलोकाला प्राप्त झाले; व शेवटीं तोहि निष्पाप होऊन शिवलोकीं निघून गेला.

---

## अध्याय ३७ वा.

### क्षीरकुंडमाहात्म्य.

शौनकादिमुनींनीं क्षीरकुंडाचें माहात्म्य विचारल्यावरून सूत म्हणतात; हे मुने ! तुम्हाला प्रथम क्षीरकुंडाची उत्पत्ति सांगतों. एकदां मुद्गलऋषीनें फुल्ल-ग्रामनांवानें प्रसिद्ध असणाऱ्या दक्षिणसमुद्राचे काठच्या प्रदेशांत एक मोठा यज्ञ केला. त्यावेळीं प्रत्यक्ष विष्णु प्रसन्न होऊन तेथें प्रगट झाले. विष्णूला पाहून मुद्गलानें त्यांची पुष्कळ स्तुति केली; व त्यांस प्रत्यक्ष यज्ञीय हविर्भागहि अर्पण केले. नंतर विष्णु प्रसन्न होऊन वर मागण्याविषयीं मुद्गलाला सांगूं लागले असतां मुद्गलमुनि म्हणतात; हे विष्णो ! पहिला वर म्हटला म्हणजे माझी तुझेठिकाणी कायमची भक्ति असावी, हा होय. दुसरा वर, माझी इच्छा कामधेनूच्या दुधानें नित्य यज्ञादि करून तुला हविर्भाग अर्पण करिता यावें, हा होय, परंतु माझ्याजवळ कामधेनु नसल्यामुळें ही इच्छा आपल्या कृपे-शिवाय सिद्धीस जाणें शक्य नाहीं. असे मुद्गलाचें भाषण ऐकतांच विष्णूनें विश्वकर्म्याकडून एक सरोवर निर्माण केलें; व कामधेनूला बोलावून सांगितलें कीं, मुद्गलाला तुझ्या दुधाचा नित्य होम करावयाचा आहे; करितां नित्य सकाळ संध्याकाळ येथें येऊन हें सरोवर तूं आपल्या दुधांनीं भरून ठेवित जा; अशातऱ्हेनें मुद्गलाची इच्छा पूर्ण करून विष्णु गुप्त झाले. त्यादिवसापासून ह्या सरोवराला क्षीरकुंड हें नांव प्राप्त झालें आहे. ह्यातीर्थांत स्नान करणाऱ्यांचीं पंचमहापातकें नष्ट होतात. मुद्गलहि विष्णूच्या कृपेनें त्या ठिकाणीं कामधेनूच्या दुधानें यज्ञयागादि कर्में करून कृतार्थ होत्साता वैकुंठलोकीं जाऊन तेथून शिवलोकींहि जाता झाला. ह्याप्रमाणें तुम्हाला क्षीरकुंडाची उत्पत्ति सांगितली. ह्याच कुंडांत स्नान करून काश्यपाची स्त्री कद्रू सवतीच्या छला-पासून व अनेक बंधनापासून मुक्त झाली. क्षीरकुंडाचेठिकाणीं स्नान केल्या-मुळें नरककुंडे निष्फळ ठरतात. ह्या कुंडामध्यें स्नान करणारास अलभ्य असें कांहींच नाहीं. हें आख्यान श्रवण; व पठण करणारे शिवलोकीं जातील.

## अध्याय ३८ वा.

### क्षीरकुंडमाहात्म्य ( पुढें चालू. )

प्रथम शौनकादि ऋषींनीं सूताला प्रश्न केला कीं, कश्यपाची पत्नी जी कद्रू, ती क्षीरकुंडांत स्नान केल्यामुळें स्वदोषापासून मुक्त झाली. असें मागील

अध्यायांत सांगितलें; तर ती कशी मुक्त झाली ? ती कोणाची मुलगी ? तिनें सवतीचा छळ कां केला ? तिला कोणते दोष प्राप्त झाले होते ? वगैरे सर्व सांगा. ह्याप्रमाणें शौनकादिकांचा प्रश्न ऐकून सूत ऋषींना म्हणतात, हे ऋषिहो! दक्षप्रजापतीला कद्रू व विनता अशा दोन मुली झाल्या; व त्यानें त्या दोन्ही कश्यपाला दिल्या. एके दिवशीं कद्रू व विनता ह्या दोघीं एका बागेंत खेळत बसल्या असतां एक उच्चैःश्रवानांवाचा घोडा पाहून ईर्ष्येनें कद्रू विनतेला म्हणते कीं, हा घोडा पांढरा आहे; किंवा काळा आहे. असा प्रश्न केला असतां विनता कद्रूला म्हणते; माझ्या दृष्टीनें हा घोडा पांढरा आहे; तुला कसें वाटतें, तें सांग पाहूं. नंतर पुनः कद्रू विनतेला म्हणते, हा घोडा काळा आहे; असें मला वाटतें. विनतेचें व कद्रूचें मोठें भांडण जुंपलें; व उभयतांनीं पैज मारिली कीं, जिचें वचन खोटें ठरेल, तिनें दुसरीचें दास्यत्व पत्करावें; असें म्हणून त्या स्वस्थानीं निघून गेल्या. नंतर कद्रूनें आपले पुत्र जे वासुकिप्रमुख सर्प त्यांना झालेलें वर्तमान सांगून विनतेचें दास्यत्व करण्याची पाळी ज्यायोगें येणार नाहीं, असा एकादा उपाय योजण्याविषयीं सांगितलें. सर्पांना कद्रूचें भाषण न आवडून त्यांनीं ती गोष्ट नाकारिली; त्यामुळें कद्रूला राग आला; व तिनें आपल्या पुत्रांना शाप दिला कीं, तुम्ही जनमेजयाच्या यज्ञामध्यें नाश पावाल. नंतर त्या सर्पांपैकीं कर्कोटकनांवाचा सर्प कद्रूला शरण जाऊन म्हणतो कीं, मी तुझ्या इच्छेप्रमाणें उच्चैःश्रवानामक घोड्याचा हल्लीं असलेला पांढरा वर्ण काळा होण्याविषयीं प्रयत्न करितों. नंतर कर्कोटकनागानें आपल्या अवाढव्य शरीरानें उच्चैःश्रव्याचें शरीर व्यापून टाकिलें; त्यामुळें त्याचा देह कृष्णवर्ण दिसूं लागला. कद्रू व विनता दोघींजणीं जवळ जाऊन अश्व पाहतात, तो उच्चैःश्रवा पांढरा नसून काळा आहे, असें दिसलें. आपली प्रतिज्ञा भंग झाली, असें वाटून विनतेला फार वाईट वाटलें; व तिनें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कद्रूचें दास्यत्व करण्याचें पत्करिलें. नंतर एकदा विनतेनें आपला पुत्र जो गरुड त्याला झालेलें वर्तमान सांगून, मी कद्रूची दासी असल्यामुळें तूं आतां दासीपुत्र झाला आहेस, असेंहि सांगितलें. मला पाताळांत पुत्रांसह जाण्याची इच्छा असल्यामुळें तुझा पुत्र जो गरुड त्याला माझे पुत्रांना वाहून नेण्यास सांग. असें कद्रूनें विनतेला सांगितलें. विनतेनें गरुडाकडून सर्पांना पाताळीं नेलें. विनतेला दास्यांतून मुक्त कशी करावी, हें गरुडानें सर्पांना विचारिलें असतां सर्प म्हणतात कीं, जर तूं इंद्रलोकीं जाऊन आम्हाला अमृत आणून देशील, तर आम्ही तुझ्या मातेला दास्यत्वापासून मुक्त करूं. ह्याप्रमाणें सर्पांचें भाषण ऐकून गरुड विनतामातेजवळ येऊन म्हणतो कीं, मी तुला दास्यमुक्त करण्याकरितां सर्पांना अमृत आणून देणार आहे; व त्याकरितां मी इंद्रलोकाला

जाणार आहे, करितां तूं मला कांहींतरी पाथेय माझ्याबरोबर दे. विनता गरुडाला म्हणते कीं, समुद्रांत शबर राहतात, त्यांना खाऊन तूं अमृत घेऊन ये. नंतर मातेच्या वचनाप्रमाणें गरुड शबरांकडे गेला. तेथें एक ब्राह्मण एका शबरीचेठिकाणी आसक्त होता, त्याला गरुड म्हणतो कीं, तूं येथून निघून जा; असे म्हणून त्यास शबरीसह तेथून हाकलून लाविलें; व इतर शबरांना मारून व त्यांच्यावर निर्वाह करून गरूड अमृत आणण्याकरितां इंद्रलोकाला जाण्यास निघाला; वाटेंत कश्यपाची गाठ पडली; आणि तो त्यांजवळहि क्षुधानिवारणार्थ कांहीं तरी मागूं लागला. "कश्यप गरुडाला म्हणतो कीं, विभावसु व सुप्रतीक ह्या दोन हत्तींना शापामुळें कांसवांचे जन्म प्राप्त झाले असून ते अजूनहि अपसाअपसांत मारामाऱ्या करीत आहेत, करितां तूं त्यांना मारून आपली भूक भागीव, कश्यपाच्या सांगण्याप्रमाणें गरुडानें कांसवांचा खरपूस समाचार घेऊन क्षुधा निवारण केली; व तो स्वर्गाला जाण्यास निघाला. गरुड अमृत मागण्याकरितां आपल्याकडे येत आहे, असें बृहस्पतीच्या सांगण्यावरून समजलें असतां इंद्रानें त्याला न येऊं देण्याकरितां देवांना पुढें पाठविलें. नंतर देवांचें व गरुडाचें भयंकर युद्ध होऊन गरुडानें देवांचा पराजय केला व अमृत हिरावून घेतलें. विष्णूला त्या गरुडाच्या पराक्रमाचें कौतुक वाटून त्याला विष्णूनें आपलें वाहन केलें. अमृत आणून गरुड सर्पांना म्हणतो कीं, मी हा अमृताचा घट दर्भांवर ठेवतों. आपण स्नान करून येऊन नंतर ह्या अमृताचें प्राशन करावें; असें म्हणून गरुडानें अमृतघट दर्भांवर ठेविला. सर्पांनें अमृतघटाच्या प्राप्तीनें विनतेला दास्यत्वापासून मुक्त केलें. सर्प स्नान करण्याकरितां गेले असतां इंद्र गुप्तरूपानें तेथें अमृतघट घेऊन निघून गेला. सर्प स्नान करून;व घाईनें येऊन दर्भांवर आपल्या जिभा अमृतप्राशनाच्या लालसेनें घासू लागले असतां तत्काळ त्या जिभा चिरल्यामुळें सर्पांना द्विजिव्ह म्हणजे दोन जिभांचे हें नांव प्राप्त झालें. गरुडानें कद्रूला शाप दिला कीं, ज्या पेक्षां तूं माझ्या मातेला त्रास दिलास त्यापेक्षां तूं पतिसेवेला अयोग्य होशील. नंतर कद्रू; व विनता कश्यपाकडे आली असतां कश्यप कद्रूला म्हणतो कीं, तूं माझ्या सेवेला अयोग्य आहेस.हें ऐकून कद्रूला फार वाईट वाटलें;व तिनें विनतेकडून कश्यपाची सेवा घेण्याबद्दल प्रार्थना करविली. कद्रू कश्यपाला म्हणते कीं, मी जें दुष्कृत केलें आहे; व ज्याकरितां आपण माझा त्याग केलात,त्या दोषाचा नाश होण्यास आपण एखादा उपाय सांगावा. कश्यप कद्रूला म्हणतात; तूं दक्षिणसमुद्राचे काठीं क्षीरकुंडनांवाचें तीर्थ आहे, तेथें स्नान कर; म्हणजे दोषमुक्त होशील. कश्यपाच्या सांगण्याप्रमाणें कद्रूनें क्षीरकुंडाचे काठीं जाऊन स्नान केल्यामुळें ती दोषमुक्त झाली. कद्रू स्वस्थानीं आल्यावर ती दोषमुक्त आहे, असें पाहून

त्यानें तिची सेवा घेण्यास प्रारंभ केला. ह्याप्रमाणें कद्रूला दोषप्राप्ती कशी झाली ? व ती त्यादोषापासून कशी मुक्त झाली ? वगैरे तुम्हाला सांगितलें आहे. ह्या क्षीरकुंडतीर्थांत स्नान केलें असतां मोक्षप्राप्ती होते. जे कोणी ह्या अध्याय एकाग्र अंतःकरणानें श्रवण किंवा पठण करितील त्यांचीं सर्व पापें नष्ट होऊन; त्यांस क्षीरकुंडांत स्नान केल्याचें पुण्य लागेल; व ते ह्या लोकीं सुखी होत्साते अंतकालीं शिवलोकाला प्राप्त होतील. तसेंच ह्या तीर्थांत स्नान केल्यास अश्वमेधादि यज्ञ केल्याचें; व हजारों गाई दिल्याचें पुण्य प्राप्त होतें.

---

## अध्याय ३९ वा.

### कपितीर्थमाहात्म्य.

सूत शौनकादि ऋषींस म्हणतात कीं, आतां कपींनीं स्थापिलेल्या कपितीर्थाचें माहात्म्य सांगतों, ऐका. रावणादिकांचा वध झाल्यानंतर हनुमान् वगैरे वानरांनीं ह्याठिकाणीं स्नान केलें; म्हणूनच ह्याला कपितीर्थ म्हणतात. ह्या तीर्थांत स्नान करणारांना नरकप्राप्तीचें भय उरत नाहीं. गायत्र्यादिकांच्या जपानें जें पुण्य प्राप्त होतें; तसेंच हजारों गाई दान दिल्यानें जें पुण्य मिळतें; चार वेदांचें अध्ययन करून जें फल प्राप्त होतें; तें सर्व ह्या तीर्थांत स्नान केल्यानें प्राप्त होतें. पूर्वीं विश्वामित्राच्या शापानें रंभा शिळा होऊन पडली असतां ह्या तीर्थाच्या स्नानानें ती शापमुक्त झाली. नंतर शौनकादिकांनीं रंभेला शाप होण्याचें कारण विचारिलें असतां सूत म्हणतात; ऋषिवर्यहो ! कुशिकवंशांत उत्पन्न झालेला विश्वामित्र फिरत फिरत वसिष्ठऋषींच्या आश्रमाला प्राप्त झाला; व कामधेनूची याचना करूं लागला. कामधेनूला देण्याचें वसिष्ठानें नाकारिलें; व तिच्यापासून म्लेच्छ उत्पन्न करून विश्वामित्राचा पराजय केला. विश्वामित्राचें व वसिष्ठाचें युद्ध होऊन विश्वामित्राचीं अस्त्रें वसिष्ठाच्या तपःसामर्थ्यानें निरुपयोगीं झालीं. तेव्हां क्षात्रतेजाहून ब्रह्मतेज अधिक आहे, असें समजून तें ब्रह्मतेज मिळविण्याकरितां विश्वामित्र उत्तर दिशेला हिमालयपर्वतावर जाऊन कौशिकीनदीच्या कांठीं देवांचीं हजार वर्षें पुरीं होईपर्यंत लोहपिष्ठ भक्षण करून पंचाग्निसाधनादि विधीनें तप करूं लागले. त्यांची घोर तपश्चर्या पाहून तपांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां देवांनीं रंभेला विश्वामित्राकडे पाठविलें. रंभेनें विश्वामित्राकडे जाऊन आपल्या चातुर्यानें त्याला मोहित करण्यास आरंभ केला. रंभेचा अभिप्राय जाणून विश्वामित्राला क्रोध आला; व त्यानें शाप दिला कीं, तूं शिळा होऊन पडशील. पुढें एकदां त्याच ठिकाणीं

श्वेतमुनीचें व एका राक्षसीचें युद्ध सुरू झालें असतां श्वेतमुनीनें वायव्यास्त्र सोडिलें. वायव्यास्त्रानें शिळा झालेली रंभा आकाशमार्गानें कपितीर्थांत अकस्मात् पडली; व ती तत्काळ शापमुक्त होऊन स्वस्थानीं निघून गेली. नंतर श्वेतमुनीबरोबर युद्ध करणारी राक्षसीसुद्धां त्याच वायव्यास्त्राच्या जोरानें कपितीर्थांत पडून मुक्त झाली. ही राक्षसी देवाची एक वारांगना होती. तिला अगस्तीच्या शापानें राक्षसीचा जन्म प्राप्त झाला होता.

---

# अध्याय ४० वा.

## गायत्रीसरस्वतीतीर्थमाहात्म्य.

शौनकादिऋषि सूताला प्रश्न करितात कीं, गायत्री व सरस्वती ह्यांचें ऐक्य गंधमादनपर्वतावर कसें झालें ? असा प्रश्न ऐकून सूत सांगतात; ऋषिहो ! पूर्वी ब्रह्मदेव आपली कन्या जी सरस्वती तिच्यावर मोहित झाला. बापाची कुबुद्धि ओळखून सरस्वतीनें हरिणीचें रूप धारण केलें. तें पाहतांच ब्रह्मदेवहि हरिण होऊन तिची इच्छा करूं लागला. ह्या ब्रह्मदेवाच्या कृत्याला सर्व देवांनीं दोष दिला. ब्रह्मदेवाची खोडकी मोडण्याकरितां हरिणीच्या मागोमाग हरण रूप घेतलेले ब्रह्मदेव धांवत असतां शंकर हातांत धनुष्यबाण घेऊन व्याधरूपानें हरिणाच्या पाठीस लागले. बरेच दूर धावत गेल्यावर शंकरानें हरिणरूपधारी ब्रह्मदेवाला एक बाण मारला. तत्काल तो हरिण जमिनीवर पडून, त्यांतून एक तेज बाहेर पडलें; व मृगशिर ह्या रूपानें आकाशांत जाऊन चमकूं लागलें. नंतर भिल्लरूप धारण केलेले शंकर आर्द्रानक्षत्रानें आकाशांत जाऊन राहिले. हा प्रकार पाहून गायत्री व सावित्री भर्तृहीन होत्सात्या फार शोक करूं लागल्या. आपला पती पूर्ववत् जिवंत व्हावा; म्हणून गायत्री व सावित्री गंधमादनपर्वतावर जाऊन शिवाराधना करूं लागली. ज्याठिकाणी ह्या उभयतांनीं स्नान केलें, तीं त्यांच्या त्यांच्या नांवांनीं दोन तीर्थें उत्पन्न झालीं. त्यांपैकीं एक गायत्रीतीर्थ व दुसरें सावित्रीतीर्थ होय. त्यांच्या तपश्चर्येनें शंकर प्रसन्न होऊन त्यांस इच्छित वर देते झाले. ब्रह्मदेवाला जिवंत करून शंकरानें त्यास सावित्री व गायत्री ह्यांच्या हवालीं केलें. ब्रह्मदेवानें शंकराची स्तुति केली. नंतर शंकर गायत्री व सावित्री ह्यांस म्हणतात कीं, तुम्हीं माझ्या आज्ञेनें ब्रह्मदेवासह स्वस्थानीं जाऊन रहा. हीं तीर्थें तुमच्या दोघाच्या नांवानें प्रसिद्ध होतील. ह्या दोनहि कुंडांत स्नान केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होऊन अंतीं शिवलोकाची प्राप्ति होते. ह्याठिकाणीं स्नान करणारास गायत्रीजपाचें, वेदाध्ययनाचें; व होमादि

कर्मे केल्याचें पुण्य प्राप्त होतें. ह्याप्रमाणें सांगून शंकर स्वस्थानीं निघून गेले. शिवाज्ञेप्रमाणें गायत्री; व सावित्री सत्यलोकीं जाऊन ब्रह्मदेवासह राहत्या झाल्या. ह्याप्रमाणें गायत्रीतीर्थ; व सावित्रीतीर्थ ह्यांचें माहात्म्य तुम्हास सांगितलें.हें आख्यान जे श्रवण करितील ते निष्पाप होत्साते शिवलोकास जातील.

# अध्याय ४१ वा.

## काश्यपपापमोचन.

सूत म्हणतात;–मी तुम्हाला गायत्री व सरस्वती या तीर्थीसंबंधानें आणखी एक कथा सांगतो; ऐका. एकदां परीक्षितूराजा मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां फार थकून तहानेनें व्याकुळ होत्साता कोठें पाणी प्यावयास मिळेल, ह्या आशेनें एका ऋषीच्या आश्रमाला प्राप्त झाला. त्यावेळीं तो ऋषि ध्यानस्थ असल्यामुळें राजाचें आदरातिथ्य त्याचेकडून घडलें नाहीं. राजानें हा ढोंगी आहे, असें समजून त्या ऋषीची परीक्षा पाहण्याकरितां त्याचे गळ्यांत एक मेलेला साप घातला; व तो रागावून आपल्या राजधानींत निघून आला. लवकरच त्या ऋषीचा शृंगी नांवाचा एक पुत्र होता, तो बापाजवळ येऊन; व बापाच्या गळ्यांत कोणीं तरी सर्प घातलेला आहे, असें पाहून त्यानें शाप दिला कीं, ज्यानें माझ्या बापाच्या गळ्यांत मृतसर्प घातला, तो आजपासून सातवे दिवशीं सर्पदंश होऊन मृत होईल. कांहीं वेळानें हा सर्व प्रकार जाणून ऋषि आपल्या पुत्राला म्हणतात कीं, तूं विनाकारण राजाला शाप दिलास. जरी एकाद्यानें अपराध केला, तरी त्याला शिक्षा करणें, हें ब्राह्मणाचें कार्य नव्हें; असें म्हणून ऋषीनें राजास शापाची वर्दी देऊन सात दिवसांत जन्माचें सार्थक करून घे, असाहि निरोप पाठविला. ज्या ऋषीच्या गळ्यांत मृतसर्प घातला होता, त्याचें नांव शमीक असें होतें. आपण सात दिवसांनीं सर्पदंश होऊन मरणार, असें समजतांच राजाला फार वाईट वाटलें. नंतर आपल्या प्राणाचा बचाव व्हावा; म्हणून राजानें गंगेमध्यें एक खांब रोंवून त्यावर असा एक मंडप उभारिला कीं, ज्यांत सर्पादिकांचा प्रवेश होऊं नये. त्या मंडपांत राजा परीक्षितानें बसून त्यानें आपल्या सभोंवार गारुडी व सर्पमंत्रामध्यें निष्णात असे लोक बसविले. त्याठिकाणीं पुष्कळ ऋषीहि प्राप्त झाले होते; त्या मंडळीमध्यें काश्यप नांवाचा एक धन्वंतरी राजाचें रक्षण करण्याकरितां राजाकडे येत होता. धन्वंतरीला वाटेंत राजाला मारण्याकरितां येणाऱ्या तक्षकसर्पाची गांठ पडली. तक्षकसर्पानें काश्यपास कोठें जातां असें विचारल्यावरून,

काश्यपानें सांगितलें कीं, आज सर्पदंश होऊन राजा मरणार आहे; तेव्हां मी त्याला जिवंत करण्यास जात आहें. नंतर तक्षक काश्यपाला म्हणतो कीं, मीच तक्षक सर्प असून राजाला मारण्यास जात आहे, मीं एकदां दंश केलेला मनुष्य शेंकडों मांत्रिकांच्या मंत्रानेंहि जिवंत होणार नाहीं; मग तूं त्याला कसें जिवंत करणार ? हें मला कळत नाहीं. जर तुझ्या मंत्रांत सामर्थ्य असेल; तर मी ह्या वृक्षाला दंश करून ह्याचें भस्म करितों, तूं ह्यास कसा जिवंत कर-तोस, तें बघूं; असें म्हणून तक्षकानें त्या वृक्षाला दंश केला असतां कश्यपानें आपल्या मंत्रबलानें पुनः तो वृक्ष पूर्ववत् निर्माण करून तक्षकाला आपलें सामर्थ्य दाखविलें. तक्षक कश्यपाला म्हणतो कीं, राजा तुला द्रव्य देईल त्याच्या चौपट द्रव्य मी तुला देतों; व तूं परत निघून जा; असें म्हणून कश्यपास पुष्कळ द्रव्य देऊन त्यास परत पाठविलें; व तक्षक परीक्षित्-राजाकडे जावयास निघाला. तक्षक इतर सर्पांना म्हणतो कीं, तुम्ही सर्व ऋषींचीं स्वरूपें धारण करून राजाला नजराणे देण्याच्या मिषानें हातात फळफळावळ घेऊन राजाकडे जा; व मी त्यांतील एका फळामध्यें किड्याचें रूप घेऊन बसतों. ह्याप्रमाणें विचार करून तक्षक कृमिरूप घेऊन; व त्या फळामध्यें बसून परीक्षित्राजाकडे गेला; व तें फळ फोडतांच त्यांतून तक्षक स्वस्वरूप प्रकट करून बाहेर पडला; व परीक्षिताला दंश करून त्यानें त्याचें भस्म केलें. राजा मृत झाल्यावर त्या राज्यावर परीक्षित्राजाचा पुत्र जो जनमे-जय ह्यास बसविलें. काश्यप हा तक्षकाच्या द्रव्यानें लुब्ध होऊन राजाचें रक्षण न केल्यामुळें लोकांत निंदेस पात्र झाला; व तो सर्वत्र भटकूं लागला. फिरतां फिरतां काश्यपाला शाकल्यऋषीची भेट होऊन तो त्याला स्वकृतदोषाच्या शांत्यर्थ उपाय विचारूं लागला. शाकल्यमुनि काश्यपाला म्हणतो कीं, दक्षिणसमुद्रांत गंधमादनपर्वतावर सरस्वती व गायत्री अशीं दोन तीर्थें आहेत; तेथें जर तूं स्नानादि सत्कर्म करिशील तर दोषमुक्त होशील नंतर काश्यप गंधमादनपर्वतावर जाऊन स्नानादि करतांच पापमुक्त झाला. ह्या आख्यानाच्या श्रवणानें; व पठणानें तीर्थस्नानाचें फल मिळतें.

---

## अध्याय ४२ वा.

### ऋणमोचनादितीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; नंतर ऋणमोचनतीर्थांत स्नान करावें. ज्यायोगें प्राणी तीनहि ऋणापासून मुक्त होतात. तीं तीन ऋणें म्हणजे ब्रह्मऋण, देवऋण; व पितृऋण हीं होत. प्रत्येक मनुष्य जन्मतःच तीन ऋणांनीं युक्त असतो. ब्रह्म-

चर्याच्या अनुष्ठानानें ब्रह्मऋणापासून मुक्त होतां येतें. यज्ञादिकर्माच्या अनुष्ठानानें देवऋणापासून मुक्त होता येतें; व संततीच्या उत्पत्तीनें पितृऋणापासून मुक्त होतां येतें; परंतु ह्या तीर्थांत स्नान करणारा एकदम इतर कोणतेंहि कर्म न करतां तीनहि ऋणापासून मुक्त होतो; म्हणून ह्याला ऋणमोचनतीर्थ हें नांव प्राप्त झालें आहे. ऋणमोचनतीर्थानजीक एक पांडवानें स्थापित केलेलें पांडवतीर्थ आहे; तेथें स्नान करणारें सर्वपापापासून मुक्त होतात. अहोरात्र पांडवतीर्थाचें स्मरण करणारा शिवलोकाला जातो. नंतर त्याजवळज असणाऱ्या देवकुंडांत स्नान करावें. ह्या देवकुंडांत स्नान करणाराला अश्वमेधयज्ञाचें फळ मिळून, शेवटीं विष्णुलोकहि मिळतो. नंतर सुग्रीवतीर्थांत स्नान करावें; ह्या तीर्थांत स्नान करणारा निष्पाप होऊन, सूर्यलोकाला जातो. नंतर नलतीर्थांत स्नान करावें; ह्या तीर्थांत स्नान करणारे पापमुक्त होऊन; व अग्निष्टोम, अतिरात्र वगैरे कर्मांचीं फळें मिळवून पितरांसह शिवलोकाला प्राप्त होतात. हा सेतु अग्नीचा मुलगा जो नल त्यानेंच बांधलेला आहे; व त्या सेतुबंधनकर्मांत विघ्न येऊं नयें, म्हणून नलानें प्रथम ह्या तीर्थाची व शिवलिंगाची स्थापना केली; म्हणून ह्या तीर्थास नलतीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्याचप्रमाणें अंगदनांवाच्या वानरानें, तसेंच गज, गवय व इतर रामसैन्यांतील प्रत्येक वानरानें आपआपल्या नांवानीं एक एक तीर्थ निर्माण करून, एक एक शिवलिंगहि स्थापिलें आहे. बिभीषणानेंहि आपलें नांवानें एक तीर्थ स्थापित केलें आहे, त्यास बिभीषणतीर्थ म्हणतात. अशीं असंख्य तीर्थें गंधमादनपर्वतावर स्थापित केलेलीं आहेत. ह्या सर्व तीर्थांचें माहात्म्य श्रवण; व पठण करणारांचीं सर्व पापें नष्ट होऊन, त्यांस सद्गति प्राप्त होते.

## अध्याय ४२ वा.

### रामनाथतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! रामानें स्थापित केलेल्या रामनाथतीर्थाचें माहात्म्य मी तुम्हाला सांगतों. जे कोणी रामनाथाचें दर्शन घेतात, ते शिवलोकाला प्राप्त होतात. कृतयुगामध्यें दहा वर्षें केलेलें पुण्य, त्रेतायुगांत एक वर्ष केलेलें पुण्य; व द्वापारयुगांत एक मास केलेलें पुण्य कलियुगांत एकदिवस केलेल्या रामनाथ पूजनाच्या पुण्याबरोबर आहे. रामनाथतीर्थामध्यें सर्व त्रैलोक्यांतील तीर्थें राहतात. जे कोणी प्रतिदिवशीं एकदां, दोनदां; किंवा तीनदां रामनाथाचें पूजन करितात, ते सर्वपापापासून मुक्त होतात.

रामनाथाचें पूजन करणारे प्रत्यक्ष रुद्रच होत. रामनाथाचें पूजन करणा-रांना कधींहि यमपीडा होत नाहीं. केवळ रामनाथाच्या दर्शनानेंहि ब्रह्महत्त्यादि शेंकडों पातकें नष्ट होतात; मग प्रत्यक्ष पूजनादि केल्यास पाप दूर होईल, हें कशाला सांगावयास पाहिजे. संपूर्ण यज्ञ, तप, दान इत्यादि केल्यानें जें फळ प्राप्त व्हावयाचें, त्याचे कोटिपट अधिक फल फक्त रामनाथाच्या सेवेनें प्राप्त होतें. ह्याच तीर्थाच्या सेवेनें एकवीस कुळांचा उद्धार होतो. रामनाथाच्या दर्शनानें मनुष्य श्रीमान् होऊन व ह्या लोकीं अनेकप्रकारचीं सुखें भोगून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतो. रामनाथाच्या तोडीचें लिंग सर्व त्रैलोक्यांत मिळावयाचें नाहीं. रामेश्वरदेवाला जो गांव अर्पण करितो, तो अंतीं शिव-रूपच होतो. रामनाथाच्या पूजेकरितां जे फुलझाडें लावितात त्यांस अश्व-मेधयज्ञाचें फल प्राप्त होतें. रामेश्वरमाहात्म्यापुढें वेदाध्ययन, तीर्थयात्रा वगैरेचें माहात्म्य व्यर्थ होय. जे गंगोदक आणून भक्तीनें रामनाथाला म्हणजे रामेश्वराला अर्पण करितात, तें प्रत्यक्ष शंकराकडून पूजा घेण्यास योग्य होतात. जोंपर्यंत मनुष्याला वृद्धावस्थादि शरीरापत्ति प्राप्त झाल्या नाहींत. तोंपर्यंतच त्यानें रामेश्वराचें एकदां तरी दर्शन घ्यावें. जे रामनाथाची म्हणजे रामेश्वराची भक्तीनें सेवा करितात, ते ह्यालोकीं सुख भोगून अंतीं मुक्त होतात.

---

## अध्याय ४४ वा.

---

### रामनाथलिंगस्थापना.

रामनाथाचें लिंग कोणीं व कसें स्थापित केलें ? असा शौनकादिकांनीं प्रश्न केल्यावरून सूत सांतात; हे ऋषिहो ! हें लिंग रामचंद्रानें स्थापित केलें आहे. ज्यावेळीं सीतेला रावणानें पळवून लंकेला नेलें, त्यावेळीं रामचंद्र वानरसेनेसह गंधमादनपर्वतावर आले. नंतर सेतु ( पूल ) बांधून रामचंद्र सर्वांसह लंकेत शिरले; व तेथें रावणाबरोबर युद्ध करून सैन्यासह रावणाचा रामचंद्रानें वध केला. त्रैलोक्याला अजिंक्य अशा रावणाचा नाश झालेला पाहून देवांना आनंद झाला; व त्यांनीं रामचंद्राची पुष्कळ स्तुति केली. त्या स्तुतीनें संतुष्ट झालेले रामचंद्र ऋषींना व देवांना उद्देशून म्हणतात कीं, मी तुमच्या कल्याणाकरितां रावणाचा वध केला खरा; परंतु मजला लागलेल्या ब्रह्महत्त्येचा नाश होण्याचा कांहीं उपाय असल्यास आपण सांगावा. अशी रामचंद्राची विनंति ऐकून ऋषि; व देव रामचंद्राला म्हणतात कीं, आपण एकादें गंधमादनपर्वतावर शिवलिंग स्थापून त्याचें पूजन करावें; त्यायोगें आपलीं

ब्रह्महत्यादि पातकें नष्ट होऊन, एकप्रकारचा हा लोकांवर अनुग्रहच केल्यासारखें होणार आहे. आपण स्थापिलेल्या लिंगाच्या दर्शनाचें फल काशींतील काशीविश्वेश्वराच्या दर्शनफलाहून कोटिपटीनें अधिक आहे. ह्याला कोणी रामनाथलिंग म्हणतील; व कोणी रामेश्वरलिंग म्हणतील. नंतर ह्याप्रमाणें ऋषींचें भाषण ऐकून, रामानें हनुमंताला शिवलिंग आणण्याकरितां कैलासाला पाठविलें. कैलासपर्वतावर जाऊनसुद्धां शंकर कोठेंहि दिसेनात, म्हणून शंकराच्या दर्शनाकरितां हनुमंत तेथेंच तप करूं लागला; त्यामुळें हनुमंताला रामाकडे येण्यास विलंब लागला. तेव्हां मुहूर्ताची वेळ निघून जात असल्यामुळें ऋषींच्या वचनावरून, सीतेनें तयार केलेलें वाळूचें शिवलिंग गंधमादनपर्वतावर रामानें स्थापित केलें. त्या दिवशीं ज्येष्ठ शुद्ध दशमी बुधवार असून, हस्तनक्षत्र होतें. रामानें त्या लिंगाचें पूजन केलें असतां, शंकर पार्वतीसह रामचंद्रावर प्रसन्न होऊन त्यास ब्रह्महत्त्यादि पातकांपासून मुक्त करते झाले. शिवलिंगाला अभिषेक घालण्याकरितां रामानें एक बाण जमिनींत मारून एक तलाव तयार केला; व त्यांतील उदकानें शिवावर अभिषेक केला. त्या रामेश्वरलिंगाचे सभोंवार प्रत्येक वानरानें एक एक लिंग स्थापित केल्यामुळें त्याठिकाणीं कोट्यवधि तीर्थें व कोट्यवधि लिंगें निर्माण झालीं आहेत. रामेश्वरलिंगाच्या स्थापनेची ही कथा जे श्रवण किंवा पठण करितील ते निष्पाप होत्साते अंतकाळीं शिवलोकाला जातील.

---

## अध्याय ४५ वा.

### हनुमदीश्वरमाहात्म्य.

सूत म्हणतात; ह्याप्रमाणें रामचंद्रानें रामेश्वरलिंग स्थापिल्यानंतर मारुती शिवलिंग घेऊन रामाकडे आला; आणि पाहतो तों रामानें वाळूचें शिवलिंग करून स्थापिलें आहे; व त्याचें पूजन सीता करीत बसली आहे. हा प्रकार पाहून; व आपण केलेलें श्रम व्यर्थ झाले, असें समजून हनुमंताला फारच राग आला; व असलें हें निरुपयोगी शरीर जिवंत ठेवून काय उपयोग ! तेव्हां आपण शरीराचा त्याग करावा, असा विचार करून हनुमान् देहत्याग करण्याकरितां निघाला असतां सर्व वानरमंडळींनीं हनुमंताचा पुष्कळ राग शांत करून त्याला देहत्यागाचा आग्रह सोडून देण्याविषयीं त्याची प्रार्थना केली; तथापि हनुमंतानें आपला आग्रह सोडिला नाहीं; त्यावेळीं रामचंद्रानें स्वतः आपला भक्त जो हनुमान् त्याची पुष्कळप्रकारें समजूत करण्याच्या

उद्देशानें उपदेश केला कीं, हे मारुते ! जन्माला आलेल्या प्रत्येक प्राण्याला मरण हें ठरलेलेंच आहे. आत्महत्त्येच्या योगें अनेक दोष लागतात; तेव्हां तूं देहत्यागाच्या भानगडींत न पडतां शोक सोडून देऊन स्वस्थ राहा. शरीर हें मलादिकांनीं ग्रस्त असल्यामुळें दुःखमूलच आहे; करितां त्याबद्दल शोक करणें व्यर्थ होय आतां जर तुला आपलें कल्याण करून घ्यावयाचें असेल, तर मलयुक्त देहाबद्दल बेफिकीर राहून सद्रूप व निर्मल अशा ब्रह्मस्वरूपाचें ध्यान कर. आतां तूं जें लिंग कैलासाहून मोठ्या श्रमानें येथें आणिलें आहेस, तें तूं आपल्या नांवानें स्थापित कर; व त्या लिंगाचें नांव आजपासून हनुमदीश्वर असें ठेव. तूं स्थापिलेल्या हनुमदीश्वराच्या पूजेवांचून मीं स्थापित केलेल्या रामेश्वराचें पूजन निष्फळ होय; करितां प्रथम तुझ्या लिंगाचेंच पूजन केलें पाहिजे, असें मी ह्या हनुमदीश्वरलिंगास वरप्रदान देतों. इतकें सांगितलें तरी ह्या रामवचनाला तुच्छ मानून, रामानें स्थापिलेलें वाळूचे लिंग उपटून टाकण्याचा व त्याठिकाणीं आपण कैलासपर्वताहून आणिलेलें शिवलिंग स्थापण्याचा हनुमंतानें विचार करून, तें वालुकालिंग तो उपटूं लागला. मारुतीनें आपलें सर्व सामर्थ्य त्या कामाकडे खर्ची घातलें; पण वालुकालिंग एक केसभर सुद्धां आपल्या स्वस्थानापासून हललें नाहीं. हें पाहून मारुतीला आश्चर्य वाटलें; व त्यानें आपला हेका सोडून रामाच्या सांगण्याप्रमाणें हनुमदीश्वर या नांवानें आपण आणिलेलें लिंग रामेश्वरासन्निध स्थापित केलें. ह्या लिंगाचा महिमा रामेश्वराचे बरोबरीनें आहे. ह्या हनुमदीश्वरलिंगाचें पूजन करणारावर शंकर स्वतः प्रसन्न होऊन त्यास इच्छित वर देतात; व ते अंतीं त्यास स्वस्थानाला घेऊन जातात. जे कोणी हें आख्यान श्रवण किंवा पठण करितात, त्यांच्या इच्छा इहलोकीं पूर्ण होऊन ते शिवलोकाला जातात.

---

## अध्याय ४६ वा.

### राममारुतीसंवाद.

नंतर रामचंद्र पुनः मारुतीला संतुष्ट करण्याकरितां त्यानें केलेल्या पूर्वीच्या पराक्रमाचें वर्णन करून त्याला म्हणतात; मारुते ! तुझे मजवर किती उपकार झाले आहेत, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. मला बंधूची किंवा माझ्या कौसल्यादि मातांचीहि आठवण नित्य होत नाहीं, परंतु तुझी आठवण झाल्याशिवाय मात्र माझा एकहि दिवस जात नाहीं. तूं माझ्याकरितां समुद्राचें उल्लंघन केलेंस, मैनाकाचा पराजय केलास, नागांची आई जी सुरसा तिला जिंकि-

लेंस, सीताशुद्धि केलीस, अशोक वनांतील वृक्ष मोडिलेस, अक्षाचा वध केलास, लंका जाळलीस; तेव्हां तुझे उपकार मजवर फारच झालेले आहेत. ह्याप्रमाणें रामाचें भाषण ऐकून मारुतीचा कंठ गहिंवरून आला; व नेत्रांतून अश्रू येऊन भक्तिभावानें मारुती रामाची स्तुति करूं लागला. तो म्हणाला रामा! आपण आतांपर्यंत जें माझें वर्णन केलेंत, इतकें वर्णन करून घेण्यास मी अयोग्य आहें, आपण सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति, व प्रलय करणारे आहां. आपण मत्स्य, कूर्म इत्यादि अवतार धारण केले असून, त्यांपैकीं हा आपला सातवा अवतार होय. आपण दुष्टांचा नाश करून साधूंचें पालन करणारे आहां; अशा तुह्माला माझा साष्टांग नमस्कार असो. माझा सर्व आग्रह व अभिमान आपल्या उपदेशानें विरघळून गेला आहे. असें मारुतीचें भाषण ऐकून रामचंद्र मारुतीला ह्मणतात कीं, मारुते! तूं स्थापित केलेलें जें हनुमदीश्वर लिंग तें सर्व पातकांचें क्षालन करणारें असल्यामुळें ह्याचें अवश्य पूजन करावें. ह्या ठिकाणीं श्राद्धादि विधि करणारांचे पितर शिवलोकास जातात. जे कोणी हें आख्यान श्रवण करितील तेहि शिवलोकीं जातील.

## अध्याय ४७ वा.

### रामनाथतीर्थमाहात्म्य.

शौनकादि ऋषि सूतांना प्रश्न करितात कीं, पूर्वीं आपण आम्हाला सांगितलें कीं, रामाला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व त्यामुळें रामानें शंकराचें लिंग स्थापून ते ब्रह्महत्त्येपासून मुक्त झाले. ह्याबद्दल मला अशी शंका उत्पन्न झाली आहे कीं, ब्राह्मणाच्या वधानें ब्रह्महत्त्या होते, असा नियम असतां दुष्ट अशा रावण राक्षसाच्या नाशानें रामाला ब्रह्महत्त्या लागली कशी? ह्या प्रश्नाचें आपण समाधान करावें. नंतर सूत म्हणतात; ऋषिहो! ब्रह्मदेवाला पुलस्त्य नांवाचा एक पुत्र झाला. पुलस्त्याचा पुत्र विश्रवा तप करीत असतां सुमाली राक्षस पाताळांतून कैकसीनामक कन्येला घेऊन बाहेर आला; व ह्या आपल्या कन्येला विश्रवाचा पुत्र जो कुबेर त्याप्रमाणें सर्वैश्वर्यसंपन्न असा पुत्र व्हावा; म्हणून ही कन्या विश्रवालाच देण्याचा त्यानें विचार केला; व तिला विश्रवाकडे जाण्याची सुमालीनें आज्ञा केली. ती बापाच्या आज्ञेप्रमाणें विश्रवाकडे गेली; त्या वेळीं विश्रवा अग्निहोत्रकर्मांत निमग्न झाला होता. नंतर कैकसी विश्रव्याला म्हणते कीं, मी सुमाली नांवाच्या राक्षसाची कैकसी नांवाची मुलगी आहें. माझ्या बापांनीं तुला

वरण्याकरितां मला तुझ्याकडे पाठविलें आहे; त्याची इच्छा अशी आहे कीं, आपल्यापासून माझेठिकाणीं कुबेराप्रमाणें श्रेष्ठ असा पुत्र व्हावा; तेव्हां माझ्या बापाची इच्छा पूर्ण करणें आपलेकडे आहे. ह्याप्रमाणें कैकसीचें भाषण ऐकून विश्रवा म्हणतो; हे स्त्रिये! तूं ज्यापेक्षां मजजवळ येऊन भलत्याच वेळीं म्हणजे राक्षसवेळीं पुत्रेच्छा धरून आलीस, त्यापेक्षां तुला दुष्ट व क्रूर असे पुत्र होतील. असें सांगून विश्रवा व कैकसी यांनीं एकेठिकाणीं कांहीं काळ आनंदांत घालविल्यानंतर तिला विश्रवापासून रावणादि पुत्र झाले. अर्थात् रावण हा विश्रवाब्राह्मणाच्या बीजापासून झाल्यामुळें ब्राह्मण होय; व त्याला मारल्यामुळें रामाला ब्रह्महत्त्या लागली, हेंहि बरोबरच आहे. रामाला ब्रह्महत्त्या लागल्यामुळें त्याला शिवलिंग स्थापावें लागलें, हेंहि योग्यच होय. रामानें स्थापिलेल्या रामनाथलिंगाच्या म्हणजे रामेश्वराच्या दोन बाजूला सूर्य व चंद्र हे वास्तव्य करितात. रामेश्वराच्या पूर्वेस अग्नि, त्याच्या पूर्वेस इंद्र, आग्नेयीस अग्नि, दक्षिणेस यम; नैऋत्येस निर्ऋति, पश्चिमेस वरुण, वायव्येस वायु, उत्तरेस कुबेर व इशान्येस ईश्वर, अशा ह्या आठ देवता आठ दिशांस राहतात. ह्याप्रमाणें रामेश्वरस्थापना करून व त्याचें पूजन करून रामचंद्र ब्रह्महत्त्यामुक्त होत्साते ब्राह्मणांना पुष्कळ द्रव्य, गाई, व वस्त्रादि देऊन कृतार्थ होते झाले. ह्या अध्यायाचें श्रवण करणारांस ब्रह्महत्त्यादि दोष लागत नाहींत.

---

## अध्याय ४८ वा.

### रामनाथमाहात्म्य ( पुढें चालू ).

सूत म्हणतात: हे ऋषिवर्य हो! आतां तुम्हाला रामनाथतीर्थाला उद्देशून एक इतिहास सांगतों; श्रवण करा. पूर्वीं पाण्ड्य देशांत शंकर नांवाचा एक राजा होता. तो सद्धर्मानें वागणारा असून प्रजेचें पालन उत्तमतऱ्हेनें करीत असे. तो एके दिवशीं मृगया करीत करीत एका अरण्यांत शिरला असतां वाघाचें कातडें पांघरलेला ब्राह्मण त्याचे दृष्टीस पडला; व हा वाघच आहे, अशा कल्पनेनें त्यानें एक बाण त्यावर सोडिला. त्या ब्राह्मणाजवळ त्याची बायकोहि होती. त्या दोघांना राजाचा बाण लागला. त्याचा मुलगाहि तेथें होताच; त्या पुत्रानें आपलीं मातापितरें राजाच्या बाणानें ताडित होऊन मृत झाल्याबद्दल अत्यंत शोक केला. राजानें दुरूनच अत्यंत शोक करणाऱ्या ब्राह्मणपुत्राला पाहून त्याचे जवळ राजा आला; व आसपासचे ऋषिहि त्याठिकाणीं प्राप्त झाले. आपल्या हातून ब्रह्महत्त्या घडली, असें पाहून

राजाहि अत्यंत शोक करूं लागला. नंतर ऋषि राजाचें व ब्रह्मपुत्राचें पुष्कळ प्रकारें सांत्वन करूं लागले. ऋषि ब्रह्मपुत्रास म्हणतात कीं, तूं रामनाथक्षेत्राचेठिकाणीं जाऊन बापाचे व आईचें नांवानें श्राद्ध कर; म्हणजे त्यांचा उद्धार होईल; व तुलाहि ह्या लोकीं सर्व सुखें मिळून अंतीं मुक्ति मिळेल. ऋषींच्या भाषणाप्रमाणें त्या पुत्रानें रामनाथक्षेत्रांत जाऊन मातापितरांच्या नांवानें श्राद्ध केलें; व शेवटीं आपल्या पितरांना विष्णुस्वरूप झालेले पाहून त्यास फार आनंद झाला. नंतर तो आपल्या आश्रमांत येऊन सर्व वर्तमान ऋषींस सांगता झाला. तें ऐकून ऋषींनाहि अत्यानंद झाला. ऋषि शंकरराजाला म्हणतात कीं, तूं ज्यापेक्षां ब्राह्मणाचा घात केलास, त्यापेक्षां तुला देहान्तच केला पाहिजे; ह्याशिवाय तूं पापापासून मुक्त होणार नाहींस. शंकारानें ऋषिवाक्य ऐकून देहत्यागाचा निश्चय केला; व आपल्या सुरुचिनामक पुत्राला गादीवर बसवून सर्वांच्या संमतीनें एक चिता तयार करून त्यानें देहत्याग करण्याचा विचार केला. अग्नीला तीन प्रदक्षिणा करून चितेंत उडी टाकणार, इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, हे राजा! उगीच अग्नींत उडी टाकूं नकोस; तुला ब्रह्महत्त्येची पीडा बाधणार नाहीं. तूं गंधमादनपर्वतावर असणाऱ्या रामनाथतीर्थावर जाऊन स्नान व रामेश्वरपूजन कर; म्हणजे दोषमुक्त होशील. ह्याप्रमाणें आकाशवाणी ऐकून शंकरराजा देहत्यागापासून परावृत्त होऊन रामनाथतीर्थाला जाण्यास निघाला. तेथें तो एक वर्ष राहून नित्य तीन वेळ स्नानादि करून शिवपूजा करिता झाला, एक वर्ष पुरें होतांच राजानें ब्राह्मणांना पुष्कळ द्रव्य दान दिलें. त्याच्या ह्या कृत्यानें साक्षात् ईश्वर प्रसन्न होऊन राजापुढें येऊन उभे राहिले. ईश्वराला पाहून शंकरराजाला फारच आनंद झाला व तो ईश्वराची स्तुति करूं लागला. त्याच्या स्तुतीनें संतुष्ट झालेल्या ईश्वरानें शंकरराजाचे स्त्रीहत्त्या, ब्रह्महत्त्यादि सर्व दोष दूर करून त्यास पापमुक्त केलें. ईश्वर शंकरराजाला म्हणाले कीं, जे कोणी ह्या रामनाथतीर्थांत स्नान करून रामेश्वराचें पूजन करितात, त्यांचे ब्रह्महत्त्यादि अनंत दोष मी स्वसंतोषानें दूर करितों. त्याप्रमाणें ह्या तीर्थांत स्नान करणारांना मद्यपानादि दोष लागत नाहींत, व ते ह्या लोकीं अनेक सुखें भोगून अंतकाळीं माझ्या लोकाला म्हणजे शिवलोकाला प्राप्त होतात. नंतर शंकराला ईश्वरानें विमानांत घालून आपल्या लोकाला नेले. सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! हा वृत्तांत इतर ऋषींना कळतांच त्यांनीं शंकरराजाची स्तुति केली, जे कोणी हें आख्यान श्रवण किंवा पठण करितील ते इहलोकीं पुष्कळप्रकारचीं सुखें भोगून अंतीं ब्रह्महत्त्यादि दोषांपासून मुक्त होत्साते शिवसायुज्यतेला प्राप्त होतील.

---

# अध्याय ४९ वा.

## रामनाथमाहात्म्य ( पुढें चालू. )

सूत म्हणतात, ऋषिहो ! ज्यावेळीं रामनाथतीर्थाची व रामेश्वरलिंगाची स्थापना झाली, त्यावेळीं प्रथम रामचंद्रानें रामेश्वराची भक्तियुक्त अंतःकरणानें स्तुति केली कीं, हे शंकरा ! आपण हातांत शूलादि अनेक आयुधें धारण करणारे आहां, भक्तांचीं संकटें दूर करणारे आपणच आहां, आपण त्रैलोक्याचे अधिपति आहां, आपण मोठमोठ्या पातकांचा नाश करणारे असून, कालाचाहि संहार करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे; तेव्हां अशा आपणाला माझा नमस्कार असो. अशातऱ्हेनें रामानें ईश्वराची स्तुति केल्या नंतर लक्ष्मणानेंहि ईश्वराची स्तुति करण्यास आरंभ केला. हे शंकरा ! आपण त्रिपुरासुराचा नाश करून लोकांना सुखी केलें आहे, जगत् हा आपला संसारच होय; सूर्य व चंद्र हे आपले डोळे आहेत; जगाची उत्पत्ति, स्थिति व संहारहि आपणच करतां; आपलें स्वरूप भयंकर असून आपण श्रेष्ठ असल्यामुळें आपल्यास महादेव म्हणतात;त्या आपणाला माझा साष्टांग नमस्कार असो. नंतर सीतेनेंहि रामेश्वराची स्तुति करून रामनाथाचें माहात्म्य वर्णन केलें. आपण जगताच्या उत्पत्तीला कारणीभूत आहां, करितां माझी शुद्ध व पवित्र अशी सद्बुद्धि रामाचेठिकाणीं अनन्यभावनेनें आसक्त झालेली असो; अशी मी आपल्या पायांशीं याचना करिते. तुझी लीला वर्णन करावी तीतकी थोडीच आहे. अशातऱ्हेनें सीतेनें रामेश्वरमहिमा वर्णन केल्यावर मारुती, अंगद, जांबुवान्, नील, नल, कुमुद, पनस, गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, सुग्रीव, बिभीषण, व दुसऱ्या वानरांनींहि आपल्या शक्त्यनुरूप रामनाथतीर्थाचें माहात्म्य वर्णन करून रामेश्वराचेंहि वर्णन व स्तुति केली. नंतर त्या ठिकाणीं आलेले ब्रह्मदेव, इंद्र, यम, वरुण, कुबेर, आदित्य, सोम, अग्नि वायु, बृहस्पति, शुक्र इत्यादि देवांनींहि रामेश्वरस्तुति केली. नंतर रामाला उद्देशून तेथें प्रगट झालेले शंकर म्हणाले कीं, हें स्तोत्र व हा अध्याय पठण करणाराचीं सर्व दुःखें नष्ट होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतात.

# अध्याय ५० वा.

## सेतुमाधवमाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो; आतां तुम्हाला सेतुमाधवाचें माहात्म्य सांगतों, श्रवण करा. पूर्वी पुण्यनिधि नांवाचा एक चंद्रवंशीय राजा होता. तो मधुरानगरीचें पालन करीत असे. पुढें त्यानें आपल्या पुत्राला राज्यासनावर स्थापित करून रामेश्वराला गमन केलें. धनुष्कोटी वगैरे तीर्थांत स्नान केल्यावर तो रामेश्वराला प्राप्त झाला; व त्यानें रामनाथतीर्थांत स्नान केलें. नंतर त्याठिकाणीं पुष्कळ दिवस राहून रामेश्वरसेवा करीत असतां त्याची भक्ति पाहण्याकरितां विष्णूनें लक्ष्मीला सुंदर तरुणीचें मोहक रूप घ्यावयास सांगून पुण्यनिधीकडे गंधमादनपर्वतावर जाण्यास सांगितलें. नंतर ती पुण्यनिधीकडे येतांच त्यानें तिची चौकशी केली. तिनें आपली सर्व हकीकत सांगून त्याचे घरीं राहण्याची इच्छाहि प्रदर्शित केली; व ती म्हणाली कीं, जर मला कोणी स्पर्श करील किंवा जर माझ्यावर कोणी बलात्कार करील, तर त्याला शिक्षा केली पाहिजे; असें जर तूं मला वचन देत असशील, तर माझी इच्छा तुझे घरीं राहण्याची आहे. नंतर ह्याप्रमाणें लक्ष्मीचें भाषण ऐकून राजानें त्या सर्व अटी कबूल केल्या; व तिला आपले घरीं आणिलें. पुढें विष्णु ब्राह्मणाचें रूप घेऊन, तिचा शोध करीत रामनाथतीर्थाला प्राप्त झाले. लक्ष्मी नित्य रामनाथाला फुलें वेंचण्याकरितां येत असे. त्याठिकाणीं ब्राह्मणरूपधारी विष्णूची व लक्ष्मीची गांठ पडली, आणि त्यानें तिचा हात धरिला. तिनें तत्काल आरडाओरड केली; ती गडबड ऐकून पुण्यनिधि तेथें प्राप्त झाला. त्यानें आपल्या मुलीवर म्हणजे लक्ष्मीवर एका ब्राह्मणानें हात टाकलेला पाहिला; व त्या ब्राह्मणाचे हातपाय बांधून, आणि त्यास रामनाथाच्या मंडपाजवळ आणून एका खांबाला बांधिलें; आणि राजा आपल्या घरीं निघून आला. त्याच रात्रीं पुण्यनिधि राजाला स्वप्नांत शंखचक्रादि आयुधें धारण केलेला चतुर्भुज असा आपल्या मुलीवर दिवसा बलात्कार करणारा तोच ब्राह्मण दिसला, व त्यानें त्या ब्राह्मणाच्या मांडीवर लक्ष्मीप्रमाणें शोभणारी आपली मुलगी बसली आहे, असेंहि पाहिलें. नंतर रामनाथ मंडपांत येऊन पाहतो तों तेथें ब्राह्मण नसून साक्षात् विष्णुच आहेत; व ही लक्ष्मी मुलगी नसून प्रत्यक्ष लक्ष्मीच आहे. असें त्यांच्या दृष्टीस पडलें. नंतर पुण्यनिधीनें लक्ष्मीनारायणाची पुष्कळप्रकारें स्तुति केली, व आपल्या अपराधाची वारंवार क्षमा मागितली. विष्णु व लक्ष्मी ह्यांनींहि अनेकप्रकारें राजाला वर देऊन; व त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करून

पुण्यनिधीस सांगितलें कीं, आम्ही ह्याठिकाणीं सेतुमाधव ह्या नांवानें राहतों. जे कोणी आमची पूजा करितील, ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतील; नंतर त्या राजाला त्याठिकाणीं मुक्ति प्राप्त झाली.

---

## अध्याय ५१ वा.

### सेतुयात्राक्रमवर्णन.

सूत म्हणतात; शौनकादिऋषिहो ! सेतूमध्यें असणाऱ्या तीर्थांची यात्रा कसकशी व कोणत्या पद्धतीनें करावी, हें आपणास सांगतों; ऐका. ज्यावेळीं आपणास सेतुयात्रा करण्याची इच्छा प्राप्त होईल, त्यावेळीं प्रातःकाळीं उठून, स्नान करून शुद्धान्तःकरणानें ब्राह्मणांना उत्तम पक्वान्नांनीं युक्त असें भोजन घालून; व स्वतः आपल्या आंगाला भस्म, गोपीचंदन वगैरे लावून रुद्राक्षादि धारण करावे. नंतर मी सेतुयात्रा करतों, असा संकल्प करावा. स्वतः उपोषण करून; व पायांत खडावा घालून "ॐनमः सदाशिवाय" ह्या अष्टाक्षर मंत्राचा अगर "नमः शिवाय" ह्या पंचाक्षरी मंत्राचा जप करीत करीत घरांतून बाहेर पडावें; कोणाशींहि भाषण न करतां मौन धारण करावें; स्त्री-समागम वर्ज्य करावा. शुद्धान्तःकरणानें मात्र योग्य वेळीं संध्यादि नित्यकर्में करावीं; गायत्रीची उपासना करावी. यात्रा करीत असतां वाटेंत रामचिंतन व सेतुमाहात्म्य वर्णन केलें असतां; रामायण किंवा दुसरीं अनेक पुराणें पठण करीत यात्रा कराव्या; कोणापासून दानादि घेऊं नयेत; वाटेंत शिव; व विष्णु ह्यांचीं पूजनें करावीत; यथाशक्ति पंचमहायज्ञ करावे. शिवस्तोत्रें; व विष्णुस्तोत्रें पठण करावींत; अशातऱ्हेनें सर्व नियम पाळून यात्रा करण्यास प्रारंभ करावा. प्रथम समुद्रांत एक दगड टाकावा; नंतर समुद्राचें आवाहन करून त्याची षोडशोपचार पूजा करावी; व त्याला नमस्कार करावा. प्रार्थना करतेवेळीं चारहि दिशांना सुग्रीव, नल, मैंद व द्विविद यांची कल्पना करून व राम, सीता, लक्ष्मण हीं तिघें तेथें बसलीं आहेत; ह्या कल्पनेनें ध्यान करावें. आपल्या नाभीला हात लावून "हिरण्य-शृंग" हा मंत्र म्हणावा, व नारायणाचें ध्यान करावें. समुद्रांत स्नान करतेवेळीं 'वेदादिर्यो, इदं तेऽन्याभि, समुद्रादूर्मि, द्यौसमुद्रो' इत्यादि मंत्र म्हणावें. ध्यानानंतर तर्पण करावें. पिप्पलाद, कवि, कण्व, कृतांत, जीवितेश्वर, मन्यु, काल-रात्रि, विद्या, अहर्गणेश्वर, वसिष्ठ, वामदेव, पराशर, उमापति वाल्मीकि, नारद, वालखिल्य मुनि, नल, नील, गवाक्ष, गवय, गंधमादन, मैंद, द्विविद, शरभ,

हनूमंत वेगदर्शन, राम, लक्ष्मण, सीता, इतक्या ह्या तर्पणाच्या देवता आहेत. प्रत्येक देवतेला उद्देशून तीन तीन वेळा तर्पण करावें. तर्पणकाळी देवतांच्या नांवाचा चतुर्थीविभक्तींत उच्चार करावा; व तर्पण करावें. नंतर पितृतर्पण, ऋषितर्पण; व देवतर्पण हीं नित्यनियमाप्रमाणें करावींत. शेवटीं अंगावर पांघरण्यास घेतलेल्या वस्त्राचें टोंक तिलोदकांत बुडवून तें पिळावें; म्हणजे निपुत्रिक व अनधिकारी असेहि पितर तृप्त होतात. गाई, भूमि सुवर्ण वगैरे दानेंहि त्याठिकाणीं द्यावींत. ह्याप्रमाणें सेतुचे जागीं सर्व विधि उरकून नंतर चक्रतीर्थाला जावें. चक्रतीर्थाला जाऊन तेथें स्नान; व नारायणपूजन करून तेथून मागच्या बाजूनें कपितीर्थाला जावें. तेथें स्नान करून सीता कुंडाला जावें. ऋणमोचनतर्थि, लक्ष्मणतीर्थ ह्या तीर्थांत स्नान करून मुंडनादि विधीहि करावेत. त्यायोगें सर्व पातकांचें क्षालन होतें. तेथून रामतीर्थाला जाऊन स्नान करावें. तेथून पापविनाशनतीर्थ व गंगायमुनातीर्थ ह्याठिकाणीं जाऊन स्नान; व पूजन करावें; म्हणजे सर्व पातकें नष्ट होतात. त्यानंतर सावित्रीतीर्थ, सरस्वतीतीर्थ, गायत्रीतीर्थ ह्या तीन तीर्थांत स्नान करून हनुमत्कुडांत स्नान व पूजन करावें. नंतर ब्रह्मकुंड, अग्नितीर्थ ह्या तीर्थांत स्नान करावें; व श्राद्धादि विधीही करून ईशपूजन करावें; म्हणजे त्यायोगें सर्व पितरांचा उद्धार होऊन स्वतःला सद्गति प्राप्त होते. रामेश्वर, सेतुमाधव ह्या तीर्थांना जाऊन राम, लक्ष्मण, सीता, मारुती तसेच दुसरेहि वानर ह्यांना नमस्कार करावा; व तीर्थांत स्नान करावें. सर्व देवतेची यथाशक्ति पूजा करून ब्राह्मणांना दक्षिणाहि द्यावी. रामेश्वराची प्रार्थना करून त्यापासून इच्छित वर मागून घ्यावा. ज्यांना ही यात्रा करण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं ह्या ग्रंथाचें वाचन व पूजन नित्य करावें; म्हणजे त्यास यात्रा केल्याचें फल प्राप्त होईल. ही यात्रा श्रवण करणारे शिवलोकाला जातील.

---

## अध्याय ९२ वा.

### सेतुमाहात्म्य व फलश्रुति.

सूत म्हणतात; पुनः तुम्हाला सेतूचें माहात्म्य व त्यापासून मिळणारें फळ सांगतों; श्रवण करा. सर्व पवित्र स्थानामध्यें हें स्थान श्रेष्ठ आहे. ह्याठिकाणीं कोणतें कर्म केलें तरी तें अक्षय्य फळ देणारें आहे. धनुष्कोटितीर्थांत स्नान करून रामेश्वराचें दर्शन घेतलें असतां दहा वर्षें काशीला राहिल्याचें फळ मिळतें. ह्याठिकाणीं शिवमंत्राचा एकशें आठ वेळा जप केला असतां शिवसायुज्यमुक्ति प्राप्त होते. धनुष्कोटितीर्थांत स्नान केलें असतां मध्यार्जुन,

कुंभकोण, मायूर, श्वेतारण्य, हालास्य, गजारण्य, वेदारण्य, नैमिष्य, श्रीरंग, अरुणाचल, वेंकाटाचल, कांची, ब्रह्मपुर इत्यादि स्थानांत एक वर्ष राहिल्याचें श्रेय प्राप्त होतें. चौदा विद्या व चौसष्ट कला ह्या सेतूचेठिकाणीं राहतात. माघमासीं तीर्थयात्रा केल्यास त्याचें फळ सर्वांहून श्रेष्ठ आहे. सेतूचेठिकाणीं केलेलें पुण्य अनंत फल देणारें आहे. सेतुस्नानानें कोणतेंहि पातक अवशिष्ट न राहतां सर्व देवता संतुष्ट होतात. आतां सेतूचेठिकाणीं स्नान केल्यानंतर जे ब्राह्मणांना दान द्यावयाचें, त्याला अधिकारी ब्राह्मण कोण ? तें आपणास सांगतो. वेदशास्त्राध्ययन करून सदाचारसंपन्न असे जे ब्राह्मण ते दान देण्यास योग्य होत; तसेंच गरीब असून सन्मार्गानें गृहस्थाश्रम-विधीचें आचरण करणारा जो ब्राह्मण असेल, त्याला दान द्यावें. अयोग्य ब्राह्मणाला दान दिल्यास त्याला मोठें पातक लागून, त्यायोगें पुढें अनुक्रमें गाढव. बेडूक व चांडाळ असे तीन जन्म प्राप्त होतात. सत्पात्र ब्राह्मण मिळाला तरच दान द्यावें, नाहींपेक्षां मुळींच देऊं नये. भोजनहि सत्पात्र ब्राह्मणालाच द्यावें; शिवाचा "ॐ नमः शिवाय" हा षडक्षरी मंत्र; व "ॐ नमो नारायणाय" हा विष्णूचा अष्टाक्षरी मंत्र, ह्याचें सतत पठण करावें; हे मंत्र त्रैलोक्याहून श्रेष्ठ आहेत. ह्या सेतूचेठिकाणीं सेतुमाहात्म्याचा एकहि अध्याय जरी पठण केला, तरी त्यास अश्वमेधयज्ञाचें फल प्राप्त होतें; दहा अध्यायाच्या पठणानें गोमेधाचें फल प्राप्त होतें; वीस अध्याय पठण केले असतां ब्रह्मलोकाची प्राप्ति होते; तीस अध्याय पठण केले असतां विष्णुलोकाची प्राप्ति होते; चाळीस अध्याय वाचिलें असतां रुद्रलोक प्राप्त होतो; पन्नास अध्याय पठण केले असतां शिवसायुज्यमुक्ति मिळते; असा ह्या सेतुमाहात्म्यपठणाचा प्रभाव आहे. ज्याचे घरीं हें पुस्तक आहे, त्याला भूत, वेताळ, पिशाचपीडा होत नाहींत. विशेषतः हें माहात्म्य श्रावण, भाद्रपद, पौष ह्या महिन्यांत श्रवण करावें. ह्यांत अनेक शिवविष्णुप्रमुख देवतांची, तीर्थांचीं व ऋषींचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. हें सेतुमाहात्म्य धौम्यांनीं पांडवांना कथन केलें होतें; त्या योगें पांडवांना सर्व सुखें प्राप्त होऊन त्यांना सायुज्यमुक्तिहि प्राप्त झाली. सूत म्हणतात; ऋषिहो ! तुम्ही माझ्यापासून श्रवण केलेलें सेतुमाहात्म्य नित्य पठण करावें; म्हणजे त्यायोगें कृतार्थ व्हाल. ह्याप्रमाणें सूतानें शौनकादि ऋषींना सांगून; व गुरु जे व्यास यांचें स्मरण करून नृत्य करण्यास प्रारंभ केला. तत्काल व्यास तेथें प्रकट झाले. व्यासांना पाहून सूतादि ऋषींनीं त्यांना नमस्कार केला. नंतर व्यासांना योग्य आसनावर बसवून त्यांची यथाविधि पूजा केली. व्यासांनीं सर्व ऋषींना उपदेश केला, व ते कैलासपर्वतावर निघून गेले.

## सेतुमाहात्म्य समाप्त ॥ १ ॥

# स्कंदपुराण.

## ब्रह्मखंड ३. ( धर्मारण्यखंड २ ).

### अध्याय १ ला.

#### धर्मारण्यप्रस्तावना.

प्रथम त्रैलोक्याला विसाव्याप्रमाणें असणारा जो रामचंद्र त्याची; व ज्यावर सर्व जगत् अवलंबून आहे, अशा धर्मांची महती वर्णन करून सूतानें शौनकादि ऋषींस धर्मारण्याचें माहात्म्य सांगण्यास प्रारंभ केला. सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो ! पूर्वी एकदां यमधर्म ब्रह्मदेवाच्या सभेंत गेला असतां त्याठिकाणीं व्यासानें यमधर्माला धर्मारण्याची कथा सांगितली; त्यायोगें यमधर्म पुर्वीच्या क्रूरस्वभावाचा त्याग करून तो शांतचित्त, ज्ञानी; व दयाळु असा असता झाला. नंतर एकदां नारदऋषी यमधर्माकडे आले असतां नारद यमाला म्हणतात; हे यमधर्मा ! तुझ्या स्वभावांत पुष्कळ बदल झालेला दिसतो. तूं मूळचा क्रूर असतां, तुझेठिकाणीं इतकी शांतता कोठून प्राप्त झाली, तें सांग. नंतर यम नारदास म्हणतात कीं, मी एकदां ब्रह्मसभेंत गेलों असतां व्यासांच्या मुखापासून धर्मारण्यमाहात्म्य श्रवण केलें; व त्या दिवसापासून माझ्या स्वभावांत एकदम इतका फरक पडला आहे. हें ऐकून नारदाला मोठें आश्चर्य वाटलें; व त्यांनीं यमापासून हें धर्मारण्यमाहात्म्य श्रवण केलें. पुढें पुष्कळ काळ निघून गेल्यावर द्वापारयुग व कलियुग ह्यांच्या दरम्यान युधिष्ठिर हस्तिनापुरचें राज्य करीत असतां त्याजकडे नारदऋषी प्राप्त झाले. युधिष्ठिरानें म्हणजे धर्मराजानें नारदाला आसनादि देऊन त्यांची मधुपर्कादि पूजाहि केली. नंतर नारद धर्मराजाला कुशलप्रश्न वगैरे विचारून सदुपदेशानें; व सदाशीर्वादानें धर्मराजाच्या मनाला उत्साह उत्पन्न करते झाले. त्यावेळीं धर्मराज नारदाला म्हणतात कीं, आम्ही सर्व आपल्या कृपाप्रसादानें खुशाल आहों; परंतु आपण कोठून आला; व आपली काय आज्ञा आहे, तें सांगा. नंतर धर्मानें नारदाचें विनयपूर्वक आदरातिथ्य केलें असतां नारद म्हणतात; धर्मा ! मी यमलोकांत गेलो असतां यमानें धर्मारण्यमाहात्म्य ज्यांत वर्णिलें आहे, अशी एक कथा मला सांगितली. ती श्रवण केली असतां सर्व दुर्वासना; व कामक्रोधादि षड्रिपु ह्यांचा नाश होतो. अशातऱ्हेनें नारदाचें भाषण ऐकून धर्मराज म्हणतात; नारदा !

अशी जर ती कथा मोठी पुण्यफल देणारी आहे, तर ती मला सांगा. नारद म्हणतात; धर्मा! सांप्रत माझी स्नानसंध्यादि कर्में करण्याची वेळ झाली काहे; तेव्हां मला कथा सांगत बसण्यास आतां वेळ नाहीं. मी तुला एक गोष्ट सांगतों, ती ऐक. सर्व महिन्यामध्यें माघाचा महिना श्रेष्ठ आहे. हा माघ महिना स्नानादि पुण्यकर्में करणारास फारच फलदायक आहे, करितां तूं ह्या वेळीं गंगेमध्यें स्नान करण्याकरितां जा, व व्यासहि तेथें येतील; आणि त्यांना तूं धर्मारण्यकथा विचारिली असतां ते तुला ही कथा सांगतील. ह्याप्रमाणें नारद धर्माला सांगून, स्वस्थानीं निघून गेले. नंतर धर्मराज नारदाच्या सांगण्याप्रमाणें गंगेंत स्नान करण्यास गेले असतां, व्यासहि तेथें प्राप्त झाले. व्यास आलेले पाहून धर्मराजादि सर्व मंडळी उठून उभी राहिली, व त्यास प्रणाम करून मधुपर्कादिविधीनें त्यांची धर्मराजानें पूजा केली; आणि आसनहि दिलें. नंतर व्यास धर्मराजाला इकडच्या तिकडच्या भगवद्गुणवर्णनपर कथा सांगत असतां, धर्मराज व्यासांना विचारितात कीं, आपण मला पुष्कळप्रकारच्या कथा, आपद्धर्म, राजधर्म, मोक्षधर्म व अनेक तीर्थांचीं माहात्म्येंहि सांगितलीं; आणि तीं ऐकून माझ्या मनाला संतोषहि झाला, परंतु आतां मला धर्मारण्यमाहात्म्यकथा श्रवण करण्याची इच्छा प्राप्त झाली आहे, करितां ती इच्छा तृप्त करणें आपलेकडे आहे. ह्या धर्मारण्यांतील तीर्थें कोणीं, केव्हां व कशी स्थापित केलीं! ह्याप्रमाणें धर्मराजाचा प्रश्न ऐकून, व्यास कथेला प्रारंभ करतात.

---

## अध्याय २ रा.

### धर्मारण्यमाहात्म्य.

व्यास म्हणतात, धर्मा! आपण केलेला प्रश्न ऐकून माझें मनाला फारच संतोष झाला आहे. आपला प्रश्न फारच चांगला आहे. ह्या धर्मारण्यांत सर्व तीर्थें राहत असल्यामुळें ह्याला ऊषर म्हणतात. ह्याठिकाणीं ब्रह्मादि देव येऊन राहत असल्यामुळें ह्याचें माहात्म्य अवर्णनीय आहे. ह्या अरण्यामध्यें अनेक ऋषि यज्ञयागादि कृत्यें करीत असल्यामुळें ती अरण्यभूमि फारच पवित्रतेला प्राप्त झाली आहे. ह्या अरण्यामध्यें अनेक सुशोभित वृक्ष, वेली, श्वापदें असल्यामुळें ह्याला फारच शोभा आली होती. ह्या धर्मारण्यामध्यें अठरा हजार तीर्थें आहेत. असें व्यासाचें भाषण ऐकून धर्मराज व्यासांना प्रश्न करतात कीं, हीं अठरा हजार तीर्थें कशाकरितां स्थापित केलीं; त्यांचीं माहात्म्यें व फलें काय आहेत. चारहि वेदांत निपुण अशाप्रकारचे ब्राह्मण

कोणत्या वंशांत उत्पन्न झाले. ब्राह्मण ह्याठिकाणीं शुभ कर्मे आचरित असतां त्यांना दैत्य, दानव, भूत, वेताल, राक्षस, पिशाच वगैरे दुष्ट प्राणी कां पीडा देत नाहींत; वगैरे ह्या प्रश्नांचीं उत्तरें मजला सांगत द्यावींत.

## अध्याय ३ रा.

### यमाची तपश्चर्या.

व्यास म्हणतात; धर्मा ! एकदा यमधर्म तप करीत असतां त्याची ती घोर तपश्चर्या पाहून देव घाबरून गेले; व ते ब्रह्मदेवाकडे जाऊन यमाच्या तपश्चर्येचें वर्णन करिते झाले. नंतर ब्रह्मदेव इंद्रादि देवांना घेऊन कैलासपर्वतावर गेला, व त्यानें शंकराची स्तुति केली. शंकरानें कुशल विचारल्यावर ब्रह्मादि देवांनीं यमाच्या तपश्चर्येनें आम्हाला फारच पीडा होते, तेव्हां आमचे त्यापासून रक्षण करा, असें सांगितलें. देवांना अभय देऊन परत त्यांस स्वस्थानीं पाठविल्यावर शंकर पार्वतीसह क्रीडेंत निमग्न होते झाले. जरी शंकराकडून इंद्राला अभय मिळालें, तरी त्यानें यमधर्म आपलें स्थान घेण्याकरितां तप करीत आहे, असें समजून बृहस्पतीच्या मतानें उर्वश्यादि अप्सरांना बोलावून यमधर्माच्या तपांत विघ्न आणण्याकरितां त्यांना यमाकडे पाठविलें. नंतर त्या उर्वश्यादि अनेक अप्सरांपैकीं वर्धनी नांवाची एक अप्सरा होती, तिनें पैज मारून इतर उर्वश्यादिकांना सांगितलें कीं, मी एकटी यमाकडे जाऊन त्याच्या तपांत विघ्न आणिते;असें म्हणून ती वर्धनी अप्सरा एकटीच यमाकडे जाण्यास निघाली.

## अध्याय ४ था.

### धर्मेश्वरस्थापना.

नंतर यमधर्मानें वर्धनीनामक अप्सरेला पाहून व तिला कोण, कोठील; वगैरे प्रश्न विचारून इकडे येण्याचें कारणहि विचारिलें. वर्धनीनें यमाला सर्व हकीगत सांगून त्याच्या तपांत विघ्न आणण्यास ती उद्युक्त झाली. पुढें धर्मापासून इंद्राला मुळीच भय नाहीं; व यमधर्म इंद्रराज्यप्राप्तीकरितां तप करीत नाहीं, असें समजतांच ती परत इंद्राकडे गेली; व तिच्याकडून सर्व हकीगत ऐकून इंद्राची भीति दूर झाली. यमानें ज्येष्ठमहिन्यांत उन्हांत बसून तप केलें. श्रावणांत पावसांत बसून; व पौषांत नदींत बसून तप केलें. अशातऱ्हेनें अत्यंत भयंकर

व त्रैलोक्याला दिपवून टाकणारी अशी घोर तपश्चर्या करून शंकर प्रसन्न झाल्यावर यमधर्मानें त्याची पुष्कळ स्तुति केली. शंकरानें वर मागण्याबद्दल यमधर्माची विनवणी केल्यावरून यमधर्म शंकराला म्हणतात कीं, हें स्थान म्हणजे हें अरण्य माझ्या नांवानें म्हणजे धर्मारण्य ह्या नांवानें प्रसिद्ध व्हावें; असा वर आपण द्यावा; तसेंच आठ कोस लांबरुंद असें एक तीर्थ ह्याठिकाणीं माझ्या नांवानें निर्माण व्हावें. ह्या धर्मक्षेत्रांत स्नानदानादि कारणारे मुक्त होऊन सर्वप्रकारच्या सुखानें युक्त होवोत. ह्याप्रमाणें यमधर्माचा व शंकराचा संवाद चालू असतां त्यावेळीं आकांशातून देवांनीं यमावर पुष्पवृष्टि केली. यमधर्म पुनः शंकराला म्हणतात कीं, आपण ह्या स्थानाचा त्याग करून कधींहि जाऊं नये. सूत म्हणतात; हे ऋषे ! ह्याप्रमाणें यमधर्मानें स्थापिलेलें धर्मेश्वरलिंग मोठे पुण्यकारक; व सुख देणारें आहे. जे कोणी ह्या धर्मारण्यांतील धर्मवापींत स्नान करून धर्माचे नांवानें तर्पण करितात, त्यांचें सर्व पितर मुक्त होऊन स्वतःहि ते सर्वप्रकारच्या सुखांचा अनुभव घेऊन अंतीं स्वर्गलोकाला प्राप्त होतात. ह्याठिकाणीं प्रत्येक पर्वणीला; व अमावास्येला श्राद्ध करावें; म्हणजे पितरांना सद्गति मिळते. धर्मेश्वरतीर्थाचे पश्चिम भागापासून तों विश्वेश्वरतीर्थापर्यंतचा जो प्रदेश त्यास धर्मवापी ही संज्ञा आहे. जे धर्मवापीमध्यें स्नान करितात, त्यांना पुनः गर्भवासाची भीति उरत नाहीं; व त्यांना कुम्भीपाक, महारौद्र, रौरव, अंधतामिस्र वगैरे नरकांची भीतिहि उरत नाहीं. ह्या धर्मवापींत एक वर्षपर्यंत स्नान केल्यास; व तर्पणादि केल्यास सर्व इच्छा पूर्ण होऊन आपल्या इच्छेविरुद्ध एकहि गोष्ट घडून येणार नाहीं. बर्हिषद्नांवांचे पितर; तसेंच आज्यप, सोमप, अग्निष्वात्त वगैरेहि पितर ह्या धर्मवापींत स्नान केल्यानें तृप्त होतात. कुरुक्षेत्र, अयोध्या, पुष्कर इत्यादि जीं तीर्थें आहेत, त्या सर्व तीर्थांहून अधिक पुण्य देणारें असें हें धर्मवापीतीर्थ आहे. ह्या धर्मवापीमध्यें दान, जप, होम, तप इत्यादि कोणतेंहि शुभ कर्म केल्यास तें अक्षय्य फल देणारें आहे. मंत्रसिद्धि ह्याठिकाणींच होत असते; करिता ह्याठिकाणीं वेदमंत्राचें अवश्य पठणपाठण करावें. कृतयुगांत दहा लक्ष, त्रेतायुगांत पांच लक्ष; व द्वापारांत एक लक्ष वर्षेपर्यंत ह्या तीर्थाचें सेवन करून जें पुण्य मिळावयाचें तेंच पुण्य कलियुगांत एक दिवस ह्या तीर्थांत स्नान केलें असतां; व धर्मेश्वराचें पूजन केलें असतां मिळतें.

---

# अध्याय ५ वा.

## सदाचारवर्णन.

व्यास म्हणतात; हे धर्मराजा ! आतां धर्मारण्यांत राहणाऱ्या लोकांनीं कसें वागावें ? तें सांगतो; ऐक. ब्रह्मदेव, विष्णु व शंकर ह्यांनीं उत्पन्न केलेले असे धर्मारण्यांत राहणारे जे ब्राह्मण आहेत, त्या सदाचारसंपन्न अशा ब्राह्मणांच्या दर्शनानें सर्व पातकें दग्ध होतात. आतां अशातऱ्हेचे ब्राह्मण ज्या सदाचारानें श्रेष्ठत्वाला पावले, ते सदाचार कोणते ? ते सांगतो. आचार हा सर्व पुण्यकर्मामध्यें श्रेष्ठ आहे. हें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् ह्याच आचारानें धार्मिकतेला पावलें आहे. ब्रह्मण, क्षत्रिय, वैश्य; व शूद्र ह्या चारहि वर्णांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. त्या ब्राह्मणांमध्यें तपश्चर्या करणारे मुनि श्रेष्ठ होत. तपश्चर्या करणाऱ्या मुनींपेक्षां विद्वान् ब्राह्मण श्रेष्ठ होय. विद्वान् ब्राह्मणांहून बुद्धिवान् ब्राह्मण श्रेष्ठ होय. त्यांहूनहि ब्रह्म जाणणारा सदाचारसंपन्न ब्राह्मण श्रेष्ठ होय. अशा श्रेष्ठ ब्राह्मणानें जें धर्माला अनुसरून केलेलें आचरण त्यासच सदाचरण असें म्हणतात. सदाचरण करणारा प्राणी शंभर वर्षे जिवंत राहतो. दुराचारी पुरुषाची लोक निंदा करितात; व त्याला सतत अधिव्याधींनें फारच पीडा होऊन तो नित्य दुःखाचाच अनुभव घेतो. विद्वान् पुरुषानें यमनियमादि योगांचा अवश्य अभ्यास करावा. कामक्रोधादि सहा शत्रूंना जिंकून प्रत्येकानें धर्मवृद्धि करावी. प्राणि जसा स्वतः एकटाच जन्माला येतो तसाच शेवटीं स्वस्थानालाहि एकटाच गमन करितो. जो दुष्कर्म करतो त्यास दुःख मिळतें. धर्माच्या साहाय्यानें दुःखरूपी अज्ञानसागराचें उल्लंघन करावें. सज्जन कोण ? व दुर्जन कोण ? ह्याचा पूर्वी विचार करून सज्जनांचें अनुकरण करावें. सत्कर्माचरणानें ब्राह्मणाला ब्राह्मणत्व प्राप्त होतें; व दुष्कर्माचरणानें ब्राह्मणाला शूद्रत्व प्राप्त होतें, करितां सत्कर्म करण्याविषयीं निदान ब्राह्मणांनीं तरी झटलें पाहिजे. पावणेदोन तास रात्र अवशिष्ट राहिली कीं, प्रत्येकानें हंथरुणावरून उठून प्रातःस्मरणादि कृत्य करावें. नंतर शौचविधि, मुखमार्जन करावें. शौच करण्यास गांवाच्या बाहेर एक मैलावर नैर्ऋत्यदिशेस जाऊन जेथें शौच करावयाचे त्या जागेवर गवत हंतरावें. नंतर डोक्यावरून वस्त्र घेऊन व कानांवर जानवें ठेऊन उत्तरेकडे तोंड करून बसावें. शौचाचे वेळीं मौन धरावें. शौच विधि पुरा होतांच डाव्या हातांत शिस्न धरून उठावें. नंतर पवित्र जागेंतील मृत्तिका घेऊन हात पाय धुवावे. मृत्तिकेचे पांच गोळे गुदाला लावून

गुदप्रक्षालन करावें. तीन तीन गोळे लावून हात पाय धुवावे. नंतर मुखशुद्धि करावी. प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी व नवमी ह्या तिथीला रविवारीं दांत घासण्याकरितां दंतकाष्ठ आणून त्यानें नित्य दांत घासावे. जर दंतकाष्ठ मिळालें नाहीं, तर बारा चुळी भरून टाकाव्या; म्हणजे दंतकाष्ठानें दांत घासल्याचें फळ मिळतें. अशातऱ्हेनें दांत घासून मुखशुद्धि केल्यानंतर स्नान करावें. त्यांतल्या त्यांत प्रातःस्नानाचें फळ विशेष आहे. प्रातःस्नान हें पापनाशक असून ऐश्वर्य देणारें आहे; तसेंच तें संतोष, पुष्टि, शुद्धता वगैरेहि देणारें आहे. नंतर प्रातःसंध्या करावी. प्रत्येक आचमन करतांना प्राणायाम करावा. प्रातःसंध्येच्या योगें सायंकाळीं केलेलें पाप नाहींसे होतें. तसेंच प्राणायामपूर्वक सायंसंध्यानुष्ठान केलें असतां दिवसा केलेलें पाप नष्ट होतें. जो ब्राह्मण प्रातःसंध्या व सायंसंध्या करीत नाहीं, तो शूद्राप्रमाणें ब्रह्मभ्रष्ट होत्साता बहिष्कार घालण्यास योग होतो. नदीतीरीं अनुष्ठित केलेल्या संध्येचें फळ विशेष आहे. संध्यासमयीं "**आपोहिष्ठा**" ह्या मंत्रानें मार्जन करावें. नंतर "**ऋतं च सत्यं**" ह्या मंत्रानें अघमर्षण करावें. सूर्याच्या उदयकाळीं मार्गांत आड येणारे जे मंदेहनामक राक्षस, त्यांच्या नाशनार्थ गायत्रीमंत्रानें सूर्याला उद्देशून तीन अर्घ्यें देऊन गायत्रीजप करावा. नंतर उभें राहून सूर्याची स्तुति करावी. ह्याप्रमाणें संध्याविधी समाप्त झाल्यावर तर्पण करावें. त्यामध्यें ब्रह्मादिदेव, मरीच्यादिऋषि, व पितर ह्यांना उदकदान देऊन तृप्त करावें. तर्पण संपूर्ण झाल्यानंतर आपलें यज्ञोपवीत साखळीसारखें निवीती करून तें तिलोदकांत बुडवून पिळावें; व म्हणावें कीं, ब्रह्मदेवापासून किड्यामुंग्यापर्यंतचे सर्व प्राणि तसेंच देव, ऋषि पितर व मनुष्यें, त्याप्रमाणें माता, मातामह वगैरे सर्व ह्या उदकग्रहणानें तृप्त होवोत. नंतर होमहवनादि कर्म करावें; त्या नंतर वेदाध्ययन करावें. नंतर वैश्वदेव करून पंचमहायज्ञ करावा. काकबलि दिल्यानंतर अतिथींची वाट पाहत एक घटकाभर घराबाहेर उभें रहावें. नित्य श्राद्धें काकबलि देण्याचे पूर्वीं करावीं. नित्य श्राद्धामध्यें तीन किंवा दोन असे ब्राह्मण आमंत्रित करावे. ह्यास पितृयज्ञ म्हणतात. हा पितृयज्ञ दक्षिणारहित असतो. ह्या यज्ञामध्यें फक्त ब्राह्मणभोजनच असते. अशातऱ्हेनें सर्व व्यवस्था झाल्यानंतर स्वतः यजमानानें भोजन करावें. हातांत दर्भमुष्टि घेऊन भोजन करणाराला विशेष फळ प्राप्त होतें, भोजनानंतर पुनः आचमन करावें. आचमन झाल्यावर मुखशुद्धि करावी. त्यानंतर पुराणश्रवण व भगवद्भजन करावें. संध्याकाळीं दोन घटका दिवस शिल्लक आहे, तोंच सायंध्येला प्रारंभ करावा. घरांत संध्या केल्याचें फळ सामान्य होय. गाईच्या गोठ्यात संध्या केल्यास त्याहून दसप-

टीनें अधिक फळ मिळतें. तीच संध्या नदीचे काठीं केल्यास अनंत फळ प्राप्त होतें; अशा संध्या केल्यास खोटे बोलणें, मद्यप्राशन करणें, दिवसा मैथुन करणें, शूद्रस्त्रीशीं संबंध ठेवणें वगेरे दोष समूळ नष्ट होतात. त्याप्रमाणें सदाचारानें वागून धर्मारण्यांत वास करणारा ब्राह्मण त्रैलोक्यांत धन्य होय.

---

## अध्याय ६ वा.

### गृहस्थाश्रमधर्म.

व्यास म्हणतात; धर्मा ! गृहस्थाश्रमी ब्राह्मणानें सदाचरण केलें असतां सर्व जगाचें कल्याण होतें; असा ह्या सदाचरणाचा महिमा अगाध आहे. पितर, मुनि, देव, सर्व इतर प्राणी, भूतें, मुंग्या, किडे, पक्षी दैत्य हे सर्व गृहस्थाश्रमी पुरुषावर अवलंबून आहेत. वेदरूपी धेनूची सेवा करणारा गृहस्थाश्रमी ब्राह्मण सर्वांत श्रेष्ठ असा गणलेला आहे; व त्यासच स्वर्ग मिळतो. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें संध्या, पंचमहायज्ञ करणारा गृहस्थाश्रमी ब्राह्मण त्रैलोक्याला वंद्य होऊन स्वर्गामध्यें जाऊन सुखानें राहतो. गृहस्थाश्रमी पुरुषाला जर आलेल्या अतिथीचा सत्कार करता आला नाहीं, तर तो अतिथी त्या गृहस्थाश्रमी पुरुषास आपलें पाप देऊन आपण त्याचें पुण्य घेऊन नंतर स्वस्थानीं निघून जातो. 'ज्या विधीनें मनुष्याला गृहस्थाश्रमत्व प्राप्त होतें, तो विवाहविधि आठप्रकारचा असल्यामुळें त्यांपैकीं श्रेष्ठविधी कोणता ? हें सांगा,' असा धर्माचा प्रश्न ऐकून व्यास म्हणतात; धर्मा ! ब्राह्मविधि इतर सर्व विधींमध्यें श्रेष्ठ आहे; व इतर दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस व पैशाच हें ह्याहून कमी दर्जाचे आहेत. ब्राह्मविवाहानें परिणित केलेल्या पत्नीचे-ठिकाणीं जी संतति होते, ती धर्मसंतति होय. गांधर्व, आसुर; व राक्षस हे विधि गौणत्वानें क्षत्रिय व वैश्य ह्यांस उक्त होत. आठवा पैशाचविधी मात्र अत्यंत नीच होय. ह्या विधीनें कधींहि विवाह करूं नये. अर्धवट उगवलेला व अस्ताला गेलेला सूर्य पाहूं नये. तसेंच ग्रहणहि पाहूं नये. रजस्वला स्त्रीशीं संपर्क करूं नये. पापीलोकांशी सहवास ठेवल्यानें संसर्गजन्य दोष लागतो. हातानें डोकें खाजवूं नये, दातांनीं नखें काढूं नयेत; कुमार्गांनीं गमन करूं नये; मूर्खांबरोबर भाषण करूं नये;उभ्यानें पाणी पिऊं नये; शूद्राला उच्चासन देऊं नये; शूद्राला धर्मोपदेश करूं नये; हातानें ताडन करूं नये; ओरडूं नये; व केस कधींहि उपटूं नयेत; शास्त्रनिषिद्ध वर्तन करूं नये. खरें बोलावें; व तें प्रियहि असावें; परंतु जें भाषण दुसऱ्यास आवडणार नाहीं, असें खरें भाषण करूं नये; त्याचप्रमाणें

लोकाला बरें वाटावें; म्हणून खोटेंहि बोलूं नये; अशा-हेनें वर्तन ठेवणारा पुरुष धर्माधिष्ठित होतो. हवीतशी फाजील बडबड करूं नये; मनांत जितक्या गोष्टी येतील तितक्या सर्व अंमलांत न आणितां त्याज्य गोष्टींचा त्याग करून ग्राह्य गोष्टी वर्तनांत आणाव्या; जितक्या वस्तु जिभेला गोड लागतील इतक्या सर्व खाऊं नयेत; तर त्यामध्यें सदसताचा व पथ्यापथ्याचा विचार करावा. श्रद्धेनें केलेलें कोणतेंहि कृत्य फल देणारें असतें. ह्याप्रमाणें धर्मारण्यक्षेत्रांतील लोकांचे वेदशोस्त्रोक्त सदाचार आपणाला सांगितले आहेत.

## अध्याय ७ वा.

### पतिव्रताधर्माचारवर्णन.

व्यास म्हणतात; धर्मा! मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें धर्मारण्यांत राहून सदाचारवर्तमानें वागावें. नित्य धर्मवापीचेठिकाणीं स्नान करून पितृतर्पण करावें; म्हणजे कल्पपर्यंत पितर तृप्त होतात. जे कोणी लोभी, व्यभिचार करणारे, दुसऱ्याचा द्रोह करणारे, दुसऱ्याची निंदा करणारे असतील; व जे कलहादि दुष्कृत्यें करणारे; व महापापी असतील, त्यांनीं ह्या धर्मवापींत स्नान केल्यास ते निष्पाप व निर्दोष होऊन मुक्त होतील. नंतर शौनकादिकांनीं पतिव्रताधर्म विचारल्यावरून सूत म्हणतात, हे शौनकादिक ऋषिहो! ज्याची स्त्री अनसूयेप्रमाणें पतिव्रताधर्मानें वागणारी असेल, तो पुरुष त्रैलोक्यांत धन्य होय. आतां प्रथम पतिव्रता कोणाला म्हणावें? तें सांगतों; ऐका. पति भोजन केल्यानंतर स्वतः भोजन करणारी; पति उपाशी असेल तर आपण उपाशी राहणारी; पतीमागून निजून पतीच्या अगोदर उठणारी; पति परदेशाला गेला असतां स्वतः अलंकार धारण न करून पति परत घरीं येईपर्यंत दुःखांत राहणारी; पतीचें नांव स्वमुखानें कधींहि न उच्चारणारी; परपुरुषाचें नांव न घेणारी; पतीनें ओढून ताडण केलें असतांहि आक्रोश न करितां आनंदांत राहणारी, 'हें करा, हें करूं नका, असें तुम्हाला बोललेंच पाहिजे, हें तुम्हांला मानलेंच पाहिजे,' अशा वरचढ, कठोर व सर्कीच्या भाषणानें पतीला आज्ञा न करणारी; एकसारखी सतत दरवाज्यांत उभी न राहणारी; दुसऱ्याच्या घरीं न जाणारी; स्वतः पतिसेवा करून पतीची आज्ञा शिरसा मान्य करणारी; पतीचें भोजन झाल्यानंतर पत्युच्छिष्ट सेवन करणारी; पतीला टाकून उत्सव, सभा, यात्रा वगैरे पाहण्याकरितां न जाणारी; पति सुखांत असल्यास स्वतः सुखी होऊन पतीच्या इच्छेनुरूप क्रीडा कर-

णारी; स्वतः रजस्वला झाल्यावर पतीला पहिले तीन दिवस आपले मुख न दाखविणारी; व चवथे दिवशीं स्नान करतांच पतीवाचून अन्यपुरुषाचें मुख न पाहणारी; पतिनिंदा करणाऱ्या स्त्रीशीं संबंध न ठेवणारी; एकटी कोठेंहि न राहणारी; व नग्न स्नान न करणारी जी स्त्री तिला पतिव्रता म्हणतात. पति नपुंसक असो, दुःखी असो, रोगी असो; किंवा दुर्वर्तनी असो त्याचेठिकाणीं ईश्वराप्रमाणें पूज्यबुद्धि ठेवणारी जी स्त्री तिलाहि पतिव्रता असें म्हटलें जातें. जी परपुरुषाशीं गमन करते, ती घुबडीच्या जन्माला प्राप्त होते. पतिव्रता-स्त्रीनें पति बाहेरून येतांच तत्काळ आपण उठून त्यास पाय धुण्यास पाणी द्यावें. नंतर तांबूल देऊन त्यास पंख्यानें वारा घालावा; व त्याचे पाय चेपावे. जिनें पतीला प्रसन्न केलें तिनें त्रैलोक्य प्रसन्न केल्याप्रमाणें आहे. बाप, आई, भाऊ, पुत्र वगैरे सर्व आप्तेष्ट लोक आपण जें मागूं तेंच देतील; परंतु पति अनंत अशा; व न मागता येणाऱ्या अशा किती गोष्टी देईल, ह्याचें वर्णन करणें अशक्य आहे. तेव्हां ईश्वराहूनहि अधिक अशा आपल्या पतीची पूजा कोण करणार नाहीं ? करितां सर्व गोष्टींचा त्याग करून स्त्रीनें मुख्यतः पतिसेवाच करावी; व अशी पतिसेवा जी करित्ये तिलाच पति-व्रता म्हणतात. ज्या देहामध्यें जीव नाहीं, तो देह जसा अशुद्ध, तसाच स्त्रीजन पतिवांचून अशुद्ध होय. विधवा स्त्री सर्व अमंगल वस्तुहून अमंगल आहे. विधवेच्या दर्शनानें कधींहि कोणाचें कल्याण होत नाहीं. फक्त माता जर विधवा असेल तर ती मात्र अमंगलतेला योग्य होत नाहीं. पति मृत झाला असतां सहगमन करण्याच्या इच्छेनें पतीबरोबर गमन करणारी जी स्त्री तिला प्रत्येक पावलामागें अश्वमेधाचें पुण्य लागतें. जी स्त्री सहगमन करिते ती स्त्री आपल्या पतीच्या बेचाळीस कुळांचा उद्धार करिते. रूपवान्, सुस्वभावी अशी स्त्री मिळेल; परंतु पतिव्रता स्त्री दुर्लभ आहे. पत्नि हेंच गृहस्थाश्रम्याच्या सुखाचें, धर्माचें; व वंशवृद्धीचें मूळ कारण आहे. ज्याप्रमाणें गंगेंत स्नान केलें असतां शरीर पवित्र होतें, त्याप्रमाणें घरांत पतिव्रता स्त्री असतां गृहहि पवित्र होतें. जर विधवा स्त्री पलंगावर शयन करील, तर ती आपल्या पतिप्रमुख बेचाळीस कुळांना नरकांत नेऊन टाकील. विधवास्त्रीनें सुगंधिद्रव्य अंगाला लावून स्नान करूं नये; पतीला नित्य तर्पणविधीनें पाणी देऊन तृप्त करावें; पतीच्या बुद्धीनें विष्णुपूजन करावें; जी जी वस्तु पतीला प्रिय होती, ती ती विद्वान् ब्राह्मणाला अर्पण करावी; वैशाख; व कार्तिक ह्या दोन महिन्या-मध्यें व्रतनियम आचरावें; स्नान, दान, यात्रा; व पुराण श्रवण करावें; वैशाखांत पाण्यानें भरलेला मातीचा घट विद्वान् ब्राह्मणाला द्यावा; कार्तिकांत देवापुढें तुपाचे दिवे लावावे; वैशाखांत पाणपोया कराव्या; व देवा-

वर पाण्याची अहोरात्र गळती धरावी; पंखा, वाळा, छत्री, बारीक वस्त्रें हीं ब्राह्मणास द्यावीं; चतुर्दशगुणी विडा ब्राह्मणाला द्यावा; उसाचा रस, पन्हें, हें ब्राह्मणास द्यावें. वैशाखांत वांगें, सूरण, द्विदल धान्यें वर्ज्य करावीं; कार्तिकांत तेल खाऊं नये; कांस्यपात्रावर जेऊं नये; कार्तिकांत मौनव्रताचा नियम करून ब्राह्मणाला घंटादान करावें; पत्रावळीवर भोजन केल्यास तुपानें भरलेलें काशाचें पात्र ब्राह्मणास द्यावें; ज्या ज्या वस्तूंचा आपण त्याग करितों ती ती वस्तु ब्राह्मणाला अर्पण करावी; ह्याप्रमाणें विधवास्त्रियांचे नियम सांगितलें. ब्रह्मदेवानें असें सांगितलें आहे कीं, धर्मवापीचे काठीं जें कांहीं शुभाशुभ कर्म केलें जातें त्याच्या त्याच्या शतपट अधिक फल वरील धर्म आचरणारास मिळतें. जे कोणी स्वाचारभ्रष्ट झाले असतील त्यांनीं ह्या तीर्थामध्यें स्नान करून तीर्थाचें ग्रहण केल्यास ते पूर्वकृतदोषापासून मुक्त होतील. जे कोणी ह्या धर्मवापीचे तीरावर श्राद्धादि कर्म करितील. त्यांचे सर्व पितर तृप्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतील. हें धर्मारण्यक्षेत्र कामी पुरुषांची कामना पूर्ण करणारें आहे, योग्यांना मुक्ति देणारें आहे; व सिद्धीची इच्छा करणारांना सिद्धि देणारें आहे. ह्या माहात्म्याच्या श्रवणानें मोक्षहि मिळतो.

---

## अध्याय ८ वा.

### शिवस्कंदसंवाद.

व्यास म्हणतात; धर्मा ! धर्मारण्यमाहात्म्याची जी कथा पूर्वीं शंकरानें स्कंदाला सांगितली, तीच मी तुम्हाला सांगतों; ऐका. एकदां सर्व देवांसह बसलेल्या; व पांच मुखें, दहा हात, तीन नेत्र व शूळ धारण केलेल्या शंकराला पाहून स्कंद म्हणतात; हे प्रभो ! आपल्या दर्शनाच्या इच्छेनें हे सर्व देव येथें एकत्र जमले आहेत, ह्यांच्यावर आपण अनुग्रह करावा. नंतर शंकर म्हणतात; स्कंदा ! धर्मारण्यनांवाचें एक पुण्यक्षेत्र आहे; त्याठिकाणी तूं सर्व देवांना घेऊन जा; व तेथें तुम्ही स्नानादि करा; म्हणजे तुमचें कल्याण होईल. आतां त्या धर्मारण्याचें माहात्म्य किती आहे, तें सांगतों; ऐका. सर्व सृष्टि ज्यावेळीं जलमय झाली, त्यावेळीं एकटा ब्रह्मदेव निर्गुणस्वरूपामध्यें राहत होता. प्रथम म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीच्या प्रारंभीं महत्तत्त्व निर्माण झालें; व त्यापासून चोवीस तत्त्वें निर्माण झालीं. नंतर ब्रह्मदेवानें तपश्चर्या करून विष्णूच्या रूपानें स्थावरजंगमात्मक सृष्टि निर्माण केली. त्याप्रमाणें त्यानें सप्तर्षि; दक्ष, कश्यप वगैरे प्रजापति; एकादश रुद्र; द्वादशादित्य; यक्ष; पिशाच; साध्य;

पितर; ब्रह्मर्षि वगैरेहि निर्माण केले. ग्रहनक्षत्रचक्रें; व मन्वन्तरादि निर्माण केले: तसेच कालमानहि उत्पन्न केलें; ब्रह्मदेवाच्या मनापासून मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु हे साहा महर्षि उत्पन्न झाले. मरीचीला कश्यपनांवाचा पुत्र झाला. कश्यपाला दक्षानें आपल्या तेरा कन्या दिल्या. त्यांचीं नांवें अदिति, दिति, दनु, काला, दनायु, सिंहिका, क्रोधा, प्रोवा, वासिष्ठा, विनता, कपिला, कद्रू, सुनेत्रा ह्याप्रमाणें होत. अदितीपासून देव, दितीपासून दैत्य, दनुपासून दानव, कालेपासून कालेय वगैरे उत्पन्न झाले. सूर्याला यमधर्म नांवाचा पुत्र झाला. त्याच यमधर्मानें हें धर्मारण्य निर्माण केलें आहे. मी सुद्धां आतां धर्मारण्यांतच जाण्याकरितां निघत आहे; जर तुमची कोणाची इच्छा असेल तर त्यांनीं माझे बरोबर यावें. नंतर स्कंद व ब्रह्मदेव इतर इंद्रादिदेवांसह शंकराच्या सांगण्याप्रमाणें धर्मारण्यांत येण्याकरितां निघाले, ते प्रथम वैकुंठाला प्राप्त झाले. तेथें येतांच ब्रह्मदेवप्रमुख सर्व देव विष्णूची स्तुति करूं लागले. ब्रह्मदेव म्हणतो; हे विष्णो ! आपण जगताची उत्पत्ति, स्थिति; व लय करणारे आहां; आपण मत्स्यादि अनेक अवतार धारण करून; व दुष्ट दैत्यांचा नाश करून सज्जनांचें पालन करितां; तेव्हां अनेक गुणांनीं युक्त अशा आपणाला नमस्कार असो. ती ब्रह्मकृत स्तुति ऐकून विष्णु प्रसन्न झाले; व त्यांनीं देवांना दर्शन दिलें. नंतर विष्णूनें सर्व देवांना स्तुति करण्याचें कारण विचारिलें.

---

## अध्याय ९ वा.

### गोत्रदेवीकथा.

नंतर ब्रह्मदेव विष्णूला म्हणतात; विष्णो, आपल्या कृपेनें आम्हीं सर्व खुशाल आहों; तथापि एक प्रार्थना आपले चरणकमलाशीं आहे. आम्ही सर्व धर्मारण्यक्षेत्रांत जाण्याकरितां निघालों आहों; तरी आपण आमचे बरोबर यावें. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें विष्णुहि धर्मारण्यक्षेत्रांत येण्याकरितां निघाले. नंतर ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर इंद्रादिदेवांसह धर्मारण्यक्षेत्रांत यमधर्माजवळ येऊन त्यास म्हणतात; हे धर्मा ! आपली इच्छा काय आहे, तें आपण निवेदन करावें. ह्याप्रमाणें ब्रह्मादिदेवांचें भाषण ऐकून यमधर्म म्हणतात; देवहो ! जर आपण मजवर प्रसन्न झाला असाल, तर धर्मारण्यक्षेत्रांत ऋषींचे आश्रम स्थापावे, किं ज्या आश्रमांत अनेक होमहवनादि कर्में चालतात. नंतर यमधर्माच्या प्रार्थनेप्रमाणें विष्णूनें अनेक धर्मांत कुशल व

वेदशास्त्रपारंगत असे अठरा हजार ऋषि बोलावून त्यांचे आश्रम धर्मारण्य-क्षेत्रांत स्थापिले. आतां ते अठरा हजार ब्राह्मण अनेक गोत्रांत व कुळांत उत्पन्न झालेले होते; त्यांचीं नांवें थोडक्यांत सांगतों; ऐका. एकंदर मुख्य गोत्रें चोवीस आहेत. नंतर त्यांच्या शाखाभेदांनीं गोत्रांचे अनेक भेद झाले आहेत. तीं चोवीस गोत्रें येणेंप्रमाणेंः—भारद्वाज, वत्स, कौशिक, कुश, शांडिल्य, काश्यप, गौतम, शांधन, जातुकर्ण्य, वाशिष्ठ, अत्रि, धारण, आत्रेय, भांडिल, कृष्णायव उपमन्यु, गार्ग्य, मुद्गल, मौषक, पुण्यासन, पराशर, कौंडिण्य, गान्यासन; व लौकिक अशीं हीं चोवीस गोत्रें होत. जामदग्न्य गोत्र पंचप्रवरी आहे; त्याचे ऋषि भार्गव, च्यवन, आप्नवान, और्व; व जमदग्नी हे होत. ह्याप्रमाणें चोवीस गोत्रांपासून ब्राह्मणोत्पत्ति आहे. अत्रिगोत्राचा प्रवर तीन ऋषींनीं युक्त आहे. त्याचे आत्रेय, अर्चनानस, श्यावास्य हे ऋषि होत. मांडव्य गोत्रहि पंचप्रवरी आहे; त्याप्रवराचे भार्गव, च्यावन, अत्रि, आप्नवान् व और्व हे ऋषी होत. गार्ग्यगोत्र त्रिप्रवरी आहे; तें अंगिरा, अंबरीष व यौवनाश्व-ऋषींनीं युक्त आहे. कश्यप, वत्स व वासिष्ठ ह्या तीन गोत्रांत उत्पन्न झालेले ब्राह्मण सदाचरणसंपन्न असतात. वत्सगोत्र व वात्स्यायनगोत्र हींहि पंच प्रवरींच गोत्रें होत. कश्यपगोत्र त्रिप्रवरी आहे. आत्रेयगोत्रांतील ब्राह्मण पंचप्रवरी होत. त्याचे आत्रेय, अर्चनानास, श्यावाश्व, आंगिरस व अत्री हे ऋषि होत. ह्या गोत्रांत उत्पन्न झालेले ब्राह्मण तेजस्वी, विद्वान् व सत्कर्मरत असतात. अशातऱ्हेनें अनेक गोत्रांत उत्पन्न झालेले ब्राह्मण विष्णूच्या सांगण्या-वरून धर्मारण्यांत राहण्यास आले असतां तेथें त्यांस जृंभकनांवाचा यक्ष फारच पीडा देत असे. नंतर त्या ब्राह्मणांनीं विचार करून देवांना हा यक्षाचा प्रकार निवेदन केला. देवांनीं ब्राह्मणांना पीडा देणाऱ्या यक्षादिकांच्या नाशार्थ धर्मा-रण्यामध्यें सिद्ध अशा योगीनी व मातृदेवता यांची स्थापना केली. ज्या देवीची ज्या गोत्रांतील ब्राह्मणांना रक्षण रण्याची शक्ति होती त्या देवीला त्या गोत्रां-तील कुलदेवता यानांवानें प्रसिद्ध केलें. त्या देवतांचीं नांवें पुढीलप्रमाणें होत; श्रीमाता, तारिणी, आशापूरी, गोत्रपा, पिप्पली, विकारवशा, जगन्माता, महामाता, सिद्धा, भट्टारिका, कदंबा, विकरा, मीठा, सुपर्णा, वसुजा, मातंगी, महादेवी, वाणी, मुकुटेश्वरी, भद्री, महाशक्ति, संहारी, महाबला, चामुंडा ह्या वरील गोत्रांच्या कुलदेवता होत. ह्यांची स्थापना विष्णूंनीं केली. नंतर ब्रह्मादि देव स्वस्थानीं निघून गेले. नंतर शंभर वर्षांनीं पुनः ब्रह्मादि देव धर्मारण्यांत येऊन पाहतांत तों सर्व ब्राह्मण आपआपल्या पूर्वस्थानीं निघून गेले आहेत; व धर्मारण्यांत एकहि ब्राह्मण राहिलेला नाहीं, असें पाहून त्यांनीं विचार केला कीं, ब्राह्मणांच्या संरक्षणार्थ एकादि वस्तु जर येथें निर्माण केली तरच ब्राह्मण येथें राहतील; असा विचार करून ब्रह्मदेवानें कामधेनूला बोलावून येथें आणिलें.

# अध्याय १० वा.

## वणिग्विवाह.

व्यास म्हणतात; धर्मा ! धर्मारण्यांत राहणाऱ्या ब्राह्मणांच्या धर्मकृत्यांत विघ्नें येऊं नयेत, त्यांना सुख व्हावें; म्हणून त्यांच्या कल्याणाकरितां देवांनीं कामधेनूला धर्मारण्यामध्यें बोलाविलें; व सांगितलें कीं, येथें राहणाऱ्या लोकांच्या कल्याणार्थ व त्यांच्या रक्षणार्थ प्रत्येकाच्या दोन दोन वाटणीला येतील असे सेवक निर्माण कर. अशी देवांची आज्ञा होतांच कामधेनूनें आपल्या देहामधून शिखा व यज्ञोपवीत धारण केलेले असे छत्तीस हजार वणिज् ( वैश्य ) निर्माण केले. ते वैश्य सर्वशास्त्रांत पारंगत असून ब्रह्मभक्त असे होते. नंतर प्रत्येक ब्राह्मणाला दोन ह्याप्रमाणें ते वैश्य वाटून दिले; व त्यांस सांगितलें कीं, तुम्हीं ह्या ब्राह्मणांना कोणतीहि न्यूनता पडूं न देतां ह्यांच्या हुकमांत वागून ह्यांचें रक्षण करीत जा. ह्याप्रमाणें धर्मारण्यांत राहणाऱ्या ब्राह्मणांची व्यवस्था करून ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर कृतार्थ होत्साते आपआपल्या लोकाला निघून गेले; व कामधेनूहि देवकार्य करून स्वस्थानीं निघून गेली. नंतर विश्वावसुनांवाच्या गंधर्वाच्या घरीं साठ हजार कन्या राहत होत्या. त्यांना पाहून नंदीनें शंकराला सांगितल्याप्रमाणें शंकरानें ह्या सर्व गंधर्वकन्या धर्मारण्यांत राहणाऱ्या कामधेनूपासून उत्पन्न झालेल्या वैश्यांना देण्याविषयीं खटपट चालविली. प्रथम शंकरानें आपला विजयनांवाचा गण विश्वावसूकडे पाठवून आपली इच्छा त्यास कळविली. शंकराचा निरोप ऐकून विश्वावसु गंधर्व विजयनामक शंकराच्या गणाला म्हणतो कीं, मी गन्धर्व आहे, तेव्हां माझ्या मुली मनुष्याला कशा देणार ? असा परत निरोप विजयानें शंकराला कळविला. नंतर शंकराला राग येऊन तो सैन्यासह गंधर्वनगरींत शिरला. शंकर आपल्याशीं युद्ध करण्याकरितां आले आहेत, हें समजतांच विश्वावसु तेथून पळून मेरुपर्वतावर गेला. नंतर शंकरानें विश्वावसुगंधर्वाच्या सर्व मुली आपलेबरोबर घेऊन आपल्या समक्ष धर्मारण्यामध्यें वैश्यांना विवाहविधीनें अर्पण केल्या. नंतर त्या गंधर्वकन्यांचेठिकाणीं वैश्यांपासून तेथें अनंतकोटि पुत्रपौत्रादि प्रजा निर्माण झाली. वैश्यापासून उत्पन्न झालेले सर्व वैश्य ब्राह्मणांच्या सेवेकडे नियोजित केले. क्षत्रियांनाहि ब्राह्मणांची नोकरी करण्याकरितां धर्मारण्यांत पाठविले. इतकें करून शंकर कैलासाला निघून गेल्यावर इकडे ब्राह्मण, क्षत्रिय; व वैश्य हे शिवनियोजिक स्वकर्मांत रत होऊन शिवभक्ति करूं लागले. नंतर ब्राह्मण, क्षत्रिय; व वैश्य

एकमतानें वागून यज्ञयागादि पुण्यकर्मांचे योगें धर्मारण्यक्षेत्रांतील भूमिका अत्यंत शुद्ध व तप करण्यास योग्य अशी तयार करिते झाले.

## अध्याय ११ वा.

### सत्यमंदिरस्थापना.

व्यास म्हणतात; धर्मा! नंतर मध्यंतरीं पुष्कळ काळ लोटल्यावर त्रेतायुगाचे आरंभीं लोलजिव्हनांवाचा एक राक्षस उत्पन्न झाला. त्यानें सर्व त्रैलोक्य जिंकून धर्मारण्यक्षेत्रहि जाळण्याचा विचार केला. इतक्यांत ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर ह्यांनीं धर्मारण्यांत राहणाऱ्या लोकांचें रक्षणार्थ निर्माण केलेल्या ज्या मातृदेवता त्यांचें; व लोलजिव्ह राक्षसाचें मोठें युद्ध झालें. धर्मारण्यांत बरीच गडबड उडालेली पाहून इंद्रानें चौकशी करण्याकरितां आपला सेवक तेथें पाठविला. नंतर त्या इंद्रसेवकानें धर्मारण्यांत चाललेल्या मातृदेवता व लोलजिव्ह राक्षस ह्यांच्या युद्धाची बातमी इंद्राला कळविली असतां तो लोलजिव्हाच्या नाशार्थ देवांसह वैकुंठाला जाऊन तेथें विष्णूला सर्व वर्तमान निवेदन करिता झाला. विष्णूनें तत्काळ सुदर्शनचक्र त्या राक्षसावर सोडून लोलजिव्हाचा प्राण घेतला; व धर्मारण्यांतील ब्राह्मणांचें रक्षण केलें. हा प्रकार पाहून देवांनीं विष्णूची स्तुति केली. नंतर ब्राह्मण विष्णूला म्हणतात कीं, आपण आमच्या रक्षणाकरितां मुद्दाम सत्यलोकांतून देवांसह येथें प्राप्त झाला असून, आपणच ह्या धर्मारण्याचें रक्षण केलें. करितां ह्याच धर्मारण्याला आजपासून सत्यमंदिर हें नांव प्राप्त होवो, अशी आमची इच्छा आहे. कृतयुगांत ह्याला धर्मारण्य ह्मणतील; व त्रेतायुगांत ह्याला सत्यमंदिर या नांवानें जाणतील. ह्याप्रमाणें ब्राह्मणाचें प्रेमपुरःसर भाषण ऐकून विष्णुप्रमुख देवांनीं त्याच्या प्रार्थनेला रुकार दिला. त्या दिवसापासून त्या सत्यमंदिरांत म्हणजे धर्मारण्यांत राहणारे ब्राह्मण मोठ्या आनंदानें सत्कर्मरत होऊन दुःखमुक्त होत्साते तेथें राहते झाले.

## अध्याय १२ वा.

### गणेशस्थापना.

व्यास म्हणतात; धर्मा! ह्याप्रमाणें सत्यलोकांतून भगवंतानें धर्मारण्यक्षेत्रांत पीडा देणाऱ्या राक्षसाचा नाश केल्यामुळें ज्या धर्मारण्याला सत्यमंदिर हें नांव

नवीन प्राप्त झालें आहे; त्या मंदिराच्या सभोंवार देवांनीं चार दिशेला धर्मेश्वर, गणेशेश्वर, बकुलार्क व मुक्तेशेश्वर अशीं चार लिंगें तेथें स्थापिलीं आहेत. त्या चार लिंगांपैकीं दक्षिण दिशेला स्थापिलेलें जें गणेशालिंग त्याचें कथानक सांगतों; तें श्रवण करा. ह्या गणेशलिंगाची स्थापना सर्वदेवांनीं व मातृदेवतांनीं केली आहे. धर्मेश्वराचें आख्यान पूर्वीं सांगितलेंच आहे. एकदा पार्वती आपलें आंग सुगंधी तैलांनीं युक्त असतां तिच्या अंगापासून जो मळ निघाला, त्याची तिनें एक मूर्ति तयार केली; व त्यांत जीव घातला. तत्काल ती मूर्ति पार्वतीपुढें उभी राहून पार्वतीला म्हणाली कीं, मला कांहीं तरी काम सांगावें. नंतर पार्वती म्हणते; पुत्रा ! मी स्नान करून पुनः येथें येईपर्यंत तूं थांब; मग मी तुला एकादें काम सांगेन. जर येथें कोणी येईल तर त्यास येऊं देऊं नको. अशी आज्ञा करून पार्वती स्नानाकरितां निघून गेली. नंतर थोड्याच वेळानें शंकर पार्वतीच्या मंदिरांत जाण्याकरीतां निघाले. शंकर पार्वतीच्या मंदिरांत शिरणार, इतक्यांत त्या मूर्तीनें त्यास आंत जाण्याचा प्रतिबंध केला; व शंकरास आंत सोडिलें नाहीं. हा प्रकार पाहून शंकराला राग आला; व ते त्या मूर्तीबरोबर युद्ध करूं लागले. उभयतांचें मोठें युद्ध चाललें असतां शंकरानें क्रोधवश होऊन त्या मूर्तीचें मस्तक त्रिशूळानें तोडिलें. इतक्यांत पार्वती तेथें येऊन; व हा झालेला प्रकार पाहून फारच आक्रोश करूं लागली. पार्वतीचा शोक पाहून शंकरालाहि फार वाईट वाटलें; व त्यास कृतकर्माचा पश्चात्ताप झाला. त्या मूर्तीला जिवंत करण्याच्या इच्छेनें शंकरानें गजासुराचें मस्तक कापून त्याला चिकटविलें.ह्याप्रमाणें मस्तक लावलेल्या त्या मूर्तीकडे शंकरानें अमृतपूर्णदृष्टीनें पाहून त्यास जिवंत केलें. पार्वतीलाहि आनंद झाला; व तिनें आपल्या पुत्राला आलिंगन दिलें. नंतर शंकरपार्वतीनें त्याचीं गजानन, गणपति, गणेश इत्यादि नांवें ठेवून त्यास पुष्कळ आशीर्वादहि दिले. नंतर गणेशानें धर्मारण्यामध्यें येऊन देवांसह शिवाराधना करून एक शिवलिंगहि स्थापिलें; व त्या लिंगास गणेशेश्वर असें नांव ठेविलें. अशात-हेनें जे कोणी हें गणेशेश्वरस्थापनाख्यान श्रवण करितील, त्यांचीं सर्व कार्यें निर्विघ्नपणें पार पडून ते शिवलोकाला जातील. असें माहात्म्य ऐकून सर्व देवांनींहि तेथें असणाऱ्या गणेशेश्वराची प्रार्थना व स्तुति केली. नंतर गणेशेश्वर देवांवर प्रसन्न होऊन त्यांस इच्छित वर देता झाला. सर्व इच्छित आशा सफल झाल्यामुळें देव व ब्राह्मण ह्यांनीं पुनः तेथें गणेशेश्वराचें पूजन केलें; व ते स्वस्थानाला निघून गेले. जे कोणी गणेशेश्वराचें पूजन करितील, ते ह्या मृत्युलोकीं सुख भोगून अंतीं स्वर्गाला प्राप्त होतील.

---

# अध्याय १३ वा.

## बकुलार्कमाहात्म्य.

व्यास म्हणतात; धर्मा ! धर्मारण्याच्या पश्चिमेकडे बकुलार्काची स्थापना केली आहे; त्या स्थानाला कोणी रविक्षेत्र म्हणतात. त्याचठिकाणीं अश्विनौदेवांची उत्पत्ति झाली. तेच पुढें रोगनाशक अशा वैद्य ह्या नांवानें लोकांत प्रसिद्धीस आले. पूर्वी विश्वकर्म्याला संज्ञा ह्या नांवाची मुलगी झाली. ती मुलगी विश्वकर्म्यानें सूर्याला दिली. संज्ञा सूर्यतेजानें दिपून जात असल्यामुळें तिला त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवतां येत नसे. सूर्याला पाहिलें कीं, संज्ञा डोळे दिपल्यामुळें मिटून घेत असे. हा प्रकार सूर्याला न आवडून सूर्यानें संज्ञेला शाप दिला कीं, तुला प्रजांचा नाश करणारा यमनांवाचा दुष्ट व क्रूर असा मुलगा होईल. नंतर हा शाप ऐकून संज्ञेनें चंचलदृष्टीनें घाबऱ्या घाबऱ्या सूर्याकडे पाहिलें, त्यावेळीं सूर्य म्हणतो कीं, ज्यापेक्षां तूं मजकडे चपलदृष्टीनें पाहिलेंस त्यापेक्षां तुला चपलदृष्टीची अशी मुलगी होईल; असा शाप; व वर देऊन सूर्य स्वस्थानीं गेला; संज्ञेला शापाप्रमाणें यमनांवाचा क्रूर पुत्र झाला; व वराप्रमाणें यमुनानांवाची मुलगी झाली. यमुना ही नदीस्वरूपानें पुण्यक्षेत्रांतून चापल्य-भावानें हिंडूं लागली. नंतर संज्ञा आपल्या माहेरीं बरेच दिवस येऊन राहिली असतां संज्ञेचा बाप विश्वकर्मा तिला म्हणतो कीं, मुलीनें बरेच दिवस माहेरीं राहणें धर्मशास्त्रानें निंद्य आहे; करितां तूं आतां सूर्याकडे जावें, हे चांगलें. नंतर बापाच्या सांगण्याप्रमाणें संज्ञा ही पितृगृहांतून निघाली खरी; परंतु ती सूर्याकडे न जातां धर्मारण्यामध्यें येऊन घोडीचें रूप घेऊन तप करूं लागली. पुष्कळ काळ गेल्यावर सूर्याला हें वर्तमान समजतांच सूर्य घोड्याचें रूप घेऊन तिजजवळ आला; व तिच्या नासिकेंत लिंगप्रवेश करून त्यानें आपली इच्छा व कामवासना पूर्ण करून घेतली. त्या उभयसंसर्गानें घोडीला ( वडवेला ) नाकपुड्यांतून दोन पुत्र झाले. त्यांसच आपण अश्विनौदेव म्हणतो. त्या-ठिकाणी घोडाघोडीच्या खुरप्रहारानें एक संदक उत्पन्न होऊन; त्यांत पाणीहि उत्पन्न झालें. ज्यावेळीं अश्विनौदेव उत्पन्न झाले. त्यावेळीं ब्रह्मादिदेवहि तेथें येऊन वडवेचें रूप घेतलेल्या संज्ञेला इच्छित वर देते झाले. नंतर त्या-ठिकाणीं सूर्य व संज्ञा ह्यांनीं ब्रह्मादिदेवांच्या समक्ष एक शिवलिंग स्थापिलें; व त्याला आपलें नांव दिलें. त्याठिकाणीं पुष्कळ बकुलीचीं झाडें असल्यामुळें त्याला बकुलार्क असें नांव प्राप्त झालें; व त्या खुरप्रहारानें उत्पन्न झालेल्या

जलयुक्त खंदकाला बकुलार्ककुंड हें नांव प्राप्त झालें. ह्या कुंडांत स्नान करून बकुलार्काची पूजा करणारे सर्व पापापासून मुक्त होऊन ते सूर्यलोकीं जाऊन राहतात. ह्याठिकाणीं स्नान व पूजन करणारे सर्व रोगापासून मुक्त होतात. हें आख्यान श्रवण करणारेहि पापमुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय १४ वा.

### विष्णुशिरोनाशवर्णन.

व्यास म्हणतात; धर्मा ! ह्याठिकाणीं साक्षात् विष्णूनें भयंकर तप केलें होतें. विष्णूला तप करण्याचें कारण हयग्रीव अवतारामध्यें प्राप्त झालेलें जें अश्वमुख तें पुनः पूर्ववत् सुस्वरूप व्हावें, एवढाच मुख्य हेतु होता. नंतर विष्णूला अश्वमुख कां प्राप्त झालें? असा धर्मानीं प्रश्न केल्यावरून व्यास पुनः सांगतात कीं, पूर्वीं देवानीं पृथ्वीतलावर एक यज्ञ आरंभिला. त्यावेळीं विष्णूला आमंत्रण करण्याकरितां शिवप्रमुख सर्व देव सत्यलोकांत, वैकुंठांत; व पाताळांतहि गेले; परंतु विष्णुदर्शन झालें नाहीं. नंतर विष्णूचें दर्शन कसें होईल, असा विचार करीत सर्व देव बसले असतां त्याठिकाणीं बृहस्पति प्राप्त झाला. त्यांनीं बृहस्पतीला विष्णूचें दर्शन होण्याविषयीं उपाय विचारला. बृहस्पतीसह सर्व देव विष्णु जेथें बसले होते तेथें आले;व पाहतात तों, विष्णु हातांत शार्ङ्गधनुष्य; व बाण घेऊन स्वस्थ समाधियोगांत निमग्न होत्साते झोपी गेले आहेत. नंतर देवांनीं विष्णूला जागे करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण व्यर्थ. त्यावेळीं तेथेंच ऊधईनांवाचे किडे होते; ते देवांना म्हणतात कीं, जर तुम्ही ह्याच्या हातांतील धनुष्याची दोरी तोडाल, तरच हा विष्णु जागा होईल; त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि अन्य उपायानें होणार नाहीं. ह्याप्रमाणें त्या किड्यांचें भाषण ऐकून देवांनीं त्यांना असें सांगितलें कीं, तुम्ही आमच्यावर उपकार केलेत, ह्याबद्दल आम्ही तुम्हाला बक्षिस देऊं; व आमच्या चालू असलेल्या यज्ञांत तुम्हाला हविर्भाग देऊं; परंतु हें धनुष्याची दोरी तोडण्याचें काम तुम्हींच करावें. ह्याप्रमाणें प्रार्थनापूर्वक देववाक्य श्रवण करून त्या ऊधईनामक किड्यांनीं तें देवकार्य करण्याचें वचन दिलें. नंतर त्या किड्यांनीं ती धनुष्याची दोरी तोडण्याबद्दल पुष्कळ खटपट केली; पण तिचा कांहीं तितका उपयोग झाला नाहीं. नंतर ती दोरी तोडण्याकरितां देवांनीं मोठमोठीं पर्वतासारखीं वारुळें त्या दोरीवर टाकिलीं; त्यायोगें दोरी तुटून व तसेंच विष्णूचें शिर म्हणजे मस्तकहि तुटून स्वर्गाला निघून गेलें.

विष्णूला आमंत्रण द्यावयास आपण गेलो काय ? व हा प्रकार झाला कसा ? ह्यांचें त्यांस आश्चर्य वाटलें; व मनाला फार खेदहि झाला. नंतर सर्व देव विष्णूचें शिर म्हणजे मस्तक कोठें उडालें, हें पाहण्याकरितां जिकडे तिकडे धावूं लागले; परंतु पुष्कळ काळपर्यंत त्या मस्तकाचा पत्ता लागला नाहीं.

---

## अध्याय १५ वा.

### मुक्तेश्वरमाहात्म्य.

व्यास म्हणतात; धर्मा ! ज्या वेळीं विष्णूचें मस्तक कोठें दिसेना त्यावेळीं ब्रह्मादि देवांनीं विश्वकर्म्याला सांगितलें कीं, अशाप्रकारांनीं विष्णूचें मस्तक उडून कोठें नाहींसें झालें आहे; करितां तशाचतऱ्हेचें एक मस्तक तूं तयार कर; कारण तूं सर्व जगत् निर्माण करणारा आहेस. ह्याप्रमाणें ब्रह्मादिकांचें भाषण ऐकून विश्वकर्मा त्यांस म्हणतो कीं, तुम्ही जे यज्ञ करिता, त्या यज्ञांत मजला एकहि हविर्भाग देत नाहीं, असे असतां मी तुमचें हें कार्य काय म्हणून करावें ? तें सांगा. नंतर ब्रह्मदेव विश्वकर्म्याला म्हणतात कीं, आजपासून तुला प्रत्येक यज्ञामध्यें हविर्भाग मिळेल; व विशेषतः सोमयागामध्यें तर तुला सर्वांच्या अगोदर हवि मिळेल. अशी ब्रह्मदेवाची आशीर्वादरूप वाणी ऐकून विश्वकर्म्याला फार आनंद झाला; व त्यानें देवांना पुष्कळप्रकारचीं मस्तकें तयार करून दाखविलीं; परंतु विष्णूच्या मस्तकासारखें मस्तक त्या विश्वकर्म्याला तयार करतां येईना. शेवटीं सूर्योदयकाळीं सूर्याच्या रथाला जे घोडे लावले होते त्यांपैकीं त्यानें एका घोड्याचें मस्तक तोडून आणिलें; व विश्वकर्म्यानें तें विष्णूच्या देहाला चिकटविलें. तें चिकटवितांच विष्णु सजीवत्वाला प्राप्त होऊन देवांना येथें येण्याचें कारण विचारिता झाला. नंतर ब्रह्मादि देव विष्णूची स्तुति करूं लागले असतां विश्वकर्म्यानें ह्याला हयाचें म्हणजें घोड्याचें ग्रीवा म्हणजे मुख लाविलें; म्हणून ह्यास त्या दिवसापासून हयग्रीव असें नांव प्राप्त झालें. हाच विष्णूचा हयग्रीवावतार होय. नंतर देवांनीं विष्णूला सांगितलें कीं, आम्ही यज्ञारंभ केला आहे, व त्या यज्ञांत अनेकप्रकारचे राक्षस आह्मांला पीडा देऊन यज्ञांत विघ्न आणितात; तेव्हां आमच्या यज्ञाचें रक्षण करावें; एवढ्याकरितां आम्हीं आपणाला आमंत्रण देण्यास येथें आलों आहों. नंतर हयग्रीवावतारी विष्णूनें देवांसह यज्ञस्थानीं जाऊन त्यांचा यज्ञ निर्विघ्नपणें समाप्त केला. देवांनीं यज्ञामध्यें ऊधईनांवाच्या किड्यांना व विश्वकर्म्याला हविर्भाग देऊन व दुसरींहि बक्षिसें देऊन संतुष्ट

केलें. नंतर धर्मानें व्यासाला पुनः प्रश्न केला कीं, विष्णु जगाच्या उत्पत्त्यादिकांचें आदिकरण असतां त्याला घोड्याचें मुख कां प्राप्त झालें ? असा प्रश्न ऐकून व्यास म्हणतात; धर्मा! पूर्वी एके दिवशीं ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें इंद्रादि देव बसले असतां विष्णूहि तेथें प्राप्त झाला. त्यावेळीं कोण श्रेष्ठ; व कोण कनिष्ठ हा वाद चालू असतां विष्णु सर्वांहून श्रेष्ठ असें बहुमत ठरलें; तें ब्रह्मदेवाला सहन न होऊन त्यानें विष्णूला शाप दिला कीं, तुझें मुख तुटून जाऊन तुला घोड्याचें मुख प्राप्त होईल; त्या ब्रह्मशापाप्रमाणें विष्णूला हें घोड्याचें मुख प्राप्त झालें. ज्या मुखानें ब्रह्मदेवानें विष्णूला शाप दिला, तें ब्रह्मदेवाचें पांचवें व्याघ्रमुख कांहीं काळानें शंकरानें तोडून टांकिलें; असो. नंतर देवकार्य करून हयग्रीवावतारी विष्णूनें पूर्ववत् स्वमुखप्राप्तीकरितां धर्मारण्यामध्यें तप केलें. तपश्चर्येनें संतुष्ट झालेल्या शंकरानें विष्णूच्या सर्व इच्छा सफल करून त्याठिकाणीं मुक्तेश नांवानें एक शिवलिंग स्थापित केलें. विष्णूचें मुखहि ईश्वराच्या कृपेनें पूर्ववत् सुंदर होऊन प्रसन्न असतें झालें. नंतर शंकर विष्णूला म्हणतात कीं, जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करितील ते पापमुक्त होतील. मुक्तेशतीर्थ व मुक्तेशलिंग हीं खरोखर प्राणिमात्राला मुक्ति देण्यास कारणीभूत स्थानें आहेत. जे कोणी मुक्तेशतीर्थांत पितृश्राद्ध करितात; त्यांचे सर्व पितर मुक्त होतात. त्याचेंच सन्निद्ध देवसरतीर्थ आहे, तेथें स्नान, दान, श्राद्ध वगैरे करणारांस सर्व सुखें मिळून त्यांच्या बेचाळीस कुळांचा उद्धार होतो. हें हयग्रीवाख्यान व मुक्तेश्वरमाहात्म्य श्रवण करणारे पापमुक्त होऊन शिवस्थानाला प्राप्त होतात, असें म्हणून शंकर विष्णूसह स्वस्वस्थानाला निघून गेले.

---

## अध्याय १६ वा.

### शक्तिस्थापनवर्णन.

धर्मारण्यांत राहणाऱ्या लोकांच्या रक्षणाकरितां ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर ह्यांनीं ज्या शक्ति स्थापिल्या, त्यांचीं नांवें व स्थानें आम्हाला सांगा, असा धर्मराजाचा प्रश्न ऐकून व्यास धर्माला म्हणतात; बा धर्मा ! धर्मारण्यांतील देवसराचेठिकाणीं आनंदानांवाची शक्ति स्थापिली मदारिकास्थानामध्यें श्रीमाताशक्ति, नंदपुरामध्यें शांताशक्ति, अशातऱ्हेनें शक्ती स्थापिल्या. ह्या सर्व शक्ति देवांसह धर्मारण्यांत आपआपल्या स्थानीं राहून ब्राह्मणांचें रक्षण करितात. धर्मारण्यामध्यें मुख्यत्वेंकरून जी शक्ति स्थापिली, तिला सावित्रीशक्ति म्हणतात. त्याचप्रमाणें धर्मारण्यांत गात्रायी, पक्षिणी छत्रजा, शीहोरी

चूटसंज्ञा, पिप्पलाशा ह्या व अशासारख्या दुसऱ्याहि पुष्कळ शाक्ति तेथें स्थापित केल्या. प्रत्येक शक्तींचीं वाहनें, आयुधें, भूषणें स्वरूपें, स्वभाव हे अगदींच भिन्न आहेत. ह्या शक्तींपैकी जी छत्रजा शक्ति आहे, ती सिंहावर बसलेली, शुद्धस्वरूप धारण केलेली, हातांत मद्यपान घेतलेली, खड्ग वगैरे आयुधें धारण केलेली, लाल वस्त्र नेसलेली, जिचें स्तन पुष्ट, व उंच आहेत अशी, रक्तवर्णाचे जिचे ओठ आहेत, अशी असून तिची स्थापना सत्यमंदिर-स्थानाचेठिकाणीं ब्रह्मादिकांनीं केली आहे. जेथें छत्रजाशक्तीची स्थापना केली, तेथें एक सरोवरहि निर्माण केलें. त्या सरोवराचेठिकाणीं स्नान, तर्पण, पिंडदान वगैरे केलें असतां त्याचें फल अक्षय्य मिळतें. जे कोणी ह्या सरो-वराचेठिकाणीं स्नान करून छत्रजाशक्तीची षोडशोपचारानें पूजा करितात, त्यांच्या सर्व व्याधी नष्ट होऊन; व त्यांच्या शत्रूंचा नाशहि होऊन ते मुक्त होतात. त्याचप्रमाणें आनंदानांवाची जी शक्ति देवसराचेठिकाणीं स्थापित केली आहे; तिचें पूजन केल्यास शत्रुनाश होऊन त्यांस सर्वप्रकारचीं सुखें प्राप्त होतात. ज्या आनंदाशक्तीचें स्वरूप शांतवर्णाचें आहे, जिनें पांढरें वस्त्र परिधान केलें आहे; व स्वर्णालंकार अंगावर धारण केले आहेत, जी सिंहावर बसली आहे, जिला चार हात आहेत, जिनें मस्तकावर अर्धचंद्र धारण केला आहे, तिचें पूजन केल्यास सर्व इच्छा तृप्त होतात. देवसराचेठिकाणीं स्नान करून आनंदाशक्तीचें पूजन करणारास चवदा विद्यांचें ज्ञान प्राप्त होतें. हें आख्यान श्रवण करणारा सुद्धां पापमुक्त होऊन सर्व सिद्धींना मिळवितो.

---

## अध्याय १७ वा.

### श्रीमातामाहात्म्य.

व्यास म्हणतात; धर्मा! नंतर दक्षिणदिशेला शांतादेवीची स्थापना केली. जिनें चीट परिधान केलें आहे; गळ्यांत पुष्पमाळा घातल्या आहेत; जिनें तमःस्वभाव धारण केला आहे; मधूकैटभादि दैत्य जिनें मारले आहेत; जिला आठ हात आहेत, अशी ती शांतादेवी पूजकाला धनधान्यादि देण्यास समर्थ आहे. ह्याच शांतादेवीला मागाहून श्रीमाता हें नांव प्राप्त झालें. आतां ह्या श्रीमाताशक्तीचें माहात्म्य सांगतों. ही श्रीमाता कुलमाता असून सर्वांचें रक्षणार्थ निर्माण झाली आहे. हिलाच स्थानमाता, महाशक्ति, कुमारी, ब्रह्म-पुत्री अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. त्याप्रमाणें आदिमाता, स्थानत्राणकरा, कमण्डलुधरा, दैत्यघ्नी, कामदा, ॐकारा, महापुण्या वगैरेहि नांवें तिला तिच्या

कृत्यामुळें प्राप्त झाली आहेत. ही श्रीमाता सर्वांचीं दुःखें नाहींशीं करणारी आहे. ज्याप्रमाणें आपण निर्विघ्नपणें कार्यसिद्धि व्हावी; म्हणून प्रत्येक कार्याचें आरंभीं गणपतीची पूजा करितो, त्याप्रमाणें सर्व कार्यांतील दुःखें नष्ट व्हावी; म्हणून श्रीमतेचीहि प्रत्येकानें पूजा करावी. हेमंतऋतु किंवा शिशिरऋतु प्राप्त झाला असतां एक सोन्याचा पत्रा करून; व त्यावर श्रीमातेची मूर्ति काढून त्या मूर्तीची पूजा करावी. नंतर स्नानादि विधीनें शुचिर्भूत होऊन अंगाला तीळ, आंवळे वाटून लावावे, चांगलीं धूतवस्त्रें परिधापित करावींत, चंदनाची अंगाला उटी लावावी, शेंदुरादि सुगंधि द्रव्येंहि अंगाला लावून विद्वान् ब्राह्मणाला ती मूर्ती अर्पण करावी. मोदकादि पक्वान्नें करून तीं श्रीमाताशक्तीला; व ब्राह्मणांना अर्पण करावींत. श्रीमातेची पूजा करून आपण एकहि ब्राह्मण जरी तृप्त केला, तरी त्यास हजार ब्राह्मण तृप्त केल्याचें फळ प्राप्त होतें. श्रीमाताशक्ति संतुष्ट झाली असतां पूजा करणाऱ्या भक्तास वर देऊन त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करिते. ज्याला पुत्र नसेल त्यानें श्रीमातेचें पूजन केल्यास पुत्रप्राप्ती होईल. जो दरिद्री असेल त्याला श्रीमातेच्या पूजेनें द्रव्यप्राप्ति होईल. ज्याला राज्याची इच्छा असेल त्याला राज्य प्राप्त होईल; व ज्याला विद्येची अभिरुचि आहे, त्याला विद्येची प्राप्ति होईल. ज्याला कल्याणाची इच्छा असेल त्याला कल्याणप्राप्ती होइल. जो जो जें जें इच्छील त्याला तें तें श्रीमातेच्या कृपाप्रसादानें प्राप्त होईल; व सद्गतिहि प्राप्त होईल.

---

## अध्याय १८ वा.

### मातंगीकर्णाटकोपाख्यान.

व्यास म्हणतात; धर्मा! आतां तुम्हाला श्रीमातेनें मातंगीचें रूप घेऊन कर्णाटकराक्षसाचा वध कसा केला ? तें सांगतो; ऐका. पूर्वीं कर्णाटकनांवाचा एक राक्षस होता. त्यानें आपल्या पराक्रमानें सर्व त्रैलोक्य पादाक्रांत केलें होतें. ज्याठिकाणीं देव; व ऋषि राहतात, अशाठिकाणीं जाऊन त्यांच्या शुभ-कृत्यांत हा राक्षस विघ्न उत्पन्न करीत असे. राक्षसाच्या भीतीनें वेदाध्यन, यज्ञादि पुण्यकृत्यें, संध्यादि नित्यनैमित्तिक कर्में बंद पडलीं. जरी हा राक्षस सर्व त्रैलोक्यांत जाऊन तेथील लोकांस पीडा देत असे, तथापि त्याचें सामर्थ्य धर्मारण्यांमध्यें येण्याचें नव्हतें. त्या राक्षसानें कधींहि धर्मारण्यांत राहणाऱ्या एकाहि प्राण्याला पीडा दिली नाहीं. कारण देवांनीं त्याठिकाणीं ज्या शक्ती स्थापिल्या होत्या, त्यांना हा राक्षस फार भीत असे. तो पुष्कळ दिवस धर्मा-

रण्यांत येण्याविषयीं काय उपाय करावा ? असा विचार करीत होता. एके दिवशीं त्या राक्षसानें एका ब्राह्मणाचें रूप घेऊन धर्मारण्यांतील एका ब्राह्मणाच्या घरीं विवाहसमारंभ चालू असतां तेथें प्रवेश केला; व त्यानें वधूवराला उचलून आकाशमार्गानें धर्मारण्याच्या बाहेर दूर अंतरावर नेलें; व तो त्या वधूशीं रममाण होऊन त्या दोघांनाहि फार त्रास देऊं लागला. पुढें त्या राक्षसानें ब्राह्मणरूप घ्यावें; व धर्मारण्यांतील स्त्रियांना उचलून घेऊन जावें; व त्यांच्याशीं बलात्कार करून त्यांस पीडा द्यावी, असा त्याचा पुष्कळ दिवस क्रम चालू होता. पुढें हा प्रकार सर्व धर्मारण्यांत जिकडे तिकडे पसरून लोकांना त्या कर्णाटकराक्षसाचें भय वाटलें; व ते धर्मारण्यांतून निघून दाही दिशांना पळून गेले. धर्मारण्यांत राहणाऱ्या ब्राह्मण, क्षत्रिय; व वैश्य यांनीं कर्णाटकराक्षसाला मारण्यास काय उपाय योजावा ? असा विचार चालविला असतां तितक्यांत आकाशवाणी झाली कीं, तुम्ही श्रीमातानांवाची जी शक्ति आहे, तिची आराधना करा; म्हणजे तुम्ही दुःखमुक्त व्हाल. अशी आकाशवाणी ऐकून सर्व ब्राह्मण श्रीमातेची आराधना करूं लागले. नंतर सर्व ब्राह्मणांनीं पूजनादि सर्व आटोपल्यावर श्रीमातेची स्तुति करण्यास सुरुवात केली. त्यांची स्तुति ऐकून प्रसन्न झालेली श्रीमाता धर्मारण्यस्थ ब्राह्मणांस म्हणते; कीं, तुम्ही येथें कशाकरितां आला आहां ? व तुम्हाला त्रास कोणी दिला ? तें सांगा. अशा तऱ्हेनें श्रीमातेचें भाषण ऐकून ब्राह्मण श्रीमातेला ह्मणतात; हे माते ! आह्माला कर्णाटकराक्षस फार त्रास देतो; तरी आमचें त्यापासून रक्षण करा. अशी ब्राह्मणांची दीनवाणी ऐकून श्रीमातेला कर्णाटकाचा राग आला; व क्रोधानें लाल होऊन भव्य मातंगीचें रूप धारण केलें. जिनें आठ हात धारण करून प्रत्येक हातांत धनुष्य, खड्ग, खेटक, कुऱ्हाड, सुरी, त्रिशूल पद्मपात्र, गदा वगैरे आयुधें धारण केलेलीं आहेत, अशी ती मातंगीचें रूप घेतलेली श्रीमाता कर्नाटकराक्षसाबरोबर युद्ध करण्यास निघाली. आतां श्रीमातेची; व कर्नाटकाची गांठ कशी पडली तें सांगतो; ऐका. ज्यांच्या सर्व बायका कर्नाटकानें पळवून नेल्या आहेत, अशा त्या धर्मारण्यांतील विद्वान् ब्राह्मणांनीं यज्ञयागादि कृत्यें व वेदाध्ययनादि कर्में करण्यास सुरवात केली; त्यावेळीं तो सर्व ब्राह्मणांचा वेदघोष त्रैलोक्यांत दुमदुमूं लागला. वेदघोष ऐकतांच कर्नाटकराक्षस तेथें त्या ब्राह्मणांच्या कृत्यांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां नित्यनियमाप्रमाणें प्राप्त झाला. कर्नाटकराक्षसाला पाहतांच भीतीनें सर्व ब्राह्मणांनीं एकदम आरडाओरड केली. ती गडबड श्रीमातेच्या कानीं पडतांच ती पुढें सरसावून राक्षसाशीं युद्ध करूं लागली. उभयतांचें घनघोर युद्ध होऊन श्रीमातेनें मध्या-

ऱ्हाचे वेळीं कर्णाटक राक्षसाचा प्राण घेतला. नंतर ब्राह्मणांना मोठा आनंद झाला; व त्यांनीं श्रीमातेची पूजा करून पुष्कळ प्रकारें तिची स्तुतिहि केली. शेवटीं ब्राह्मणांनीं पूजाविधि विचारल्यामुळें श्रीमातेनें आपला पूजनविधि त्यांस सांगितला. नंतर सर्व ब्राह्मणांनीं पुनः यथाविधीनें श्रीमातेचें पूजन करून तिजकडून इच्छित वर मागून घेतले. माघ महिन्यामध्यें विशेषेंकरून श्रीमातेचें पूजन अधिक फल देणारें आहे. ज्या ठिकाणीं कर्णाटक राक्षस राहत होता त्यालाच आपण कर्णाटक देश म्हणतों. धर्मारण्याची कथा जे श्रवण करितील किंवा कथन करितील; व तसेंच श्रीमातादेवीचेंहि हें माहात्म्य जे श्रवण किंवा पठण करितील; त्यांच्या कुळांत कधींहि कोणाला अरिष्ट प्राप्त होणार नाहीं.

---

## अध्याय १९ वा.

### इंद्रेश्वर व जयंतेश्वर यांचीं माहात्म्यें.

व्यास म्हणतात; धर्मा ! धर्मारण्यांत असणाऱ्या इंद्रसरामध्यें प्रथम स्नान करून इंद्रेश्वराचें पूजन केलें असतां सात जन्मांचीं पातकें नष्ट होतात. हीं तीर्थें कोणी निर्माण केलीं, असा धर्मानें प्रश्न केल्यावरून व्यास सांगतात कीं, इंद्रानें ज्यावेळीं वृत्राला मारिलें; त्यावेळीं त्यास ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व तें पातक नष्ट व्हावें म्हणून त्यानें धर्मारण्यांत येऊन मोठी तपश्चर्या केली. एकाग्र अंतःकरणानें केलेल्या त्याच्या तपःप्रभावानें संतुष्ट झालेले शंकर धर्मारण्यांत इंद्राजवळ येऊन उभे राहिले. शंकर आपल्याकडे आलेले पाहून इंद्राला मोठा आनंद झाला; व त्यानें त्याची पुष्कळ स्तुति केली. नंतर शंकरानें इंद्राला इच्छित वर देऊन त्याचीं ब्रह्महत्यादि पातकें नष्ट केलीं. इंद्रानें शंकराला सांगितलें कीं, ह्या ठिकाणीं माझें नांवानें आपण एक शिवलिंग स्थापित करावें. अशी इंद्राची प्रार्थना ऐकून शंकरानें त्या ठिकाणीं इंद्रेश्वर नांवानें एक लिंग स्थापून इंद्रसर नांवाचें एक कुंडहि स्थापित केलें. ह्या ठिकाणीं स्नान करून शिवलिंगपूजन करणारांचीं ब्रह्महत्त्यादिक पातकें नष्ट होऊन त्यांस शिवलोकगति प्राप्त होते. जे कोणी इंद्रसरांत स्नान करून पितरांचें तर्पण व श्राद्धादि कर्म करतात; त्यांचीं बेचाळीस कुळें उद्धरून ते मुक्त होतात. ह्या कुंडांत स्नान करतांच दिव्य देह प्राप्त होतो. ह्या कुंडांत स्नान करून शिवपूजा करणारास एक दिवसा आड, दोन दिवसा आड, तीन दिवसा आड व चार दिवसा आड येणारा ज्वर, तसाच विषमज्वर वगैरेपासून पीडा होत नाहीं. जी स्त्री वंध्या असेल

तिनें ह्या कुंडांत जर स्नान केलें, तर तिला सुंदर पुत्ररत्नाची प्राप्ति होईल; वगैरे सांगून शंकर स्वस्थानीं गेले; व इंद्रहि स्वर्गाला निघून गेला. पुढें कांहीं काळानें इंद्रेश्वरासंनिध इंद्रपुत्र जो जयंत त्यानें तप करून शंकराला प्रसन्न करून घेतलें. नंतर शंकरानें त्या ठिकाणीं जयंताचें नांवानें जयंतेश्वर नांवाचें एक शिवलिंग स्थापित केलें. दररोज इंद्र जयंतपुत्रासह तेथें येऊन; व इंद्रसरकुंडांत स्नान करून, इंद्रेश्वर व जयंतेश्वर यांचें पूजन करीत असे; त्यायोगें इंद्र व जयंत ह्यांना सुखसौभाग्यादि प्राप्त होऊन अखंड लक्ष्मीहि प्राप्त झाली. इंद्रेश्वराचें पूजन करून जें फळ मिळतें तेंच फळ जयंतेश्वराचें पूजनानें प्राप्त होतें; असा शंकरानें त्या लिंगास वर दिला आहे. एकाग्र अंतःकरणानें ह्या इंद्रसरकुंडांत स्नान करून शिवलिंगपूजन करणाराचें व हें आख्यान श्रवण करणाराचें सर्व पाप नष्ट होऊन ते शिवलोकीं जातात.

---

## अध्याय २० वा.

### शिवतीर्थमाहात्म्य व धराक्षेत्रवर्णन.

व्यास म्हणतात.–धर्मा! आतां तुम्हाला शिवतीर्थमाहात्म्य सांगतों; ऐका. ह्या ठिकाणीं पार्वतीनें शंकराला अवतार घेण्यास लाविलें. पार्वतीला असे करण्याचें कारण काय? असा धर्मानें प्रश्न विचारल्यावरून व्यास सांगतात कीं, शंकरानें पूर्वीं अनेक मंत्र निर्माण केले; व त्यांस अथर्वणवेदाचा उपवेद असें नांव देऊन ते मंत्र सर्वत्र प्रसिद्ध केले. त्या मंत्रांमध्यें शाकिनी, डाकिनी, काकिनी, हाकिनी, एकिनी व लाकिनी असे देवताभेदानें मंत्रभेद निर्माण केले. नंतर त्या मंत्रांचीं बीजें व माला तयार करून ते मंत्रयुक्त ग्रंथ पार्वतीला शंकरानें वांचून दाखविले. नंतर पार्वतीनें शंकराला ह्या मंत्रांचा जपविधि व मंत्रोद्धार विचारला असतां, शंकरानें तें सांगण्याचें साफ नाकारिलें; त्या वेळीं पार्वतीनें काकुळतीस येऊन शंकराला तें मंत्रोद्धारविधान सांगण्याबद्दल फारच आग्रह धरिला; आणि शंकराची अनेक प्रकारानें स्तुतिहि केली. त्या स्तुतीनें प्रसन्न झालेल्या शंकरानें पार्वतीला दुसरे कोणासहि हें मंत्रोद्धारतत्त्व सांगूं नको, असा प्रतिबंध करून सर्व मंत्रविधान तिला सांगितलें. मंत्रांतील बीजामध्यें मुख्य मायाबीज हेंच होय. सर्व वर्णामध्यें अनुस्वार हा श्रेष्ठ आहे. अनुस्वारालाच नादब्रह्म म्हणतात. वन्हिबीज, कूर्मबीज, आदित्यबीज, शक्तिबीज, ब्राह्मबीज, कालबीज, पृथ्विबीज, नृसिंहबीज वगैरे बीजें हीं मंत्रतत्त्वाचें महत्त्व वाढविणारीं आहेत. ह्याप्रमाणें मंत्रोद्धार शंकराकडून

श्रवण करीत असतां पार्वती मोहित होऊन निश्चेष्ट पडती झाली. हें पाहून शंकरानें पार्वतीला सावध केलें; व हंसून म्हटलें कीं, हा मंत्रोद्धार श्रवण करून तुझी अशी स्थिति कां झाली ? त्यावेळीं पार्वतीला वाईट वाटून तिनें शंकराला धर्मारण्यांत जाण्याची परवानगी दिली. हें वर्तमान इतर शिवगणांना समजतांच तेहि शंकराकडे धर्मारण्यामध्यें प्राप्त झाले. पुढें शंकराची समजूत घालण्याकरितां पार्वतीहि तेथें येऊन लज्जित होत्साती खालीं मान घालून शंकरापुढें उभी राहिली. तिच्या प्रार्थनेनें शंकर संतुष्ट न होऊन उलट तिचा तिरस्कार करूं लागले. हा प्रकार पाहून पार्वतीनें त्या ठिकाणीं तप करण्याचा विचार केला; व धूम्रपान, पंचाग्निसाधन वगैरे घोर प्रकार आचरून तिनें शंकराला संतुष्ट केलें. ज्या ठिकाणीं पार्वतीनें तप केलें, त्याला धराक्षेत्र म्हणतात; व जेथें शंकर बसले होते त्याला शिवतीर्थ म्हणतात. जे कोणी धराक्षेत्रांत स्नान करून व शिवतीर्थांतहि स्नान करून शिवपूजन करितात, ते पापमुक्त होत्साते शिवलोकाला जातात.

---

# अध्याय २१ वा.

## गोत्रप्रवरादिकथावर्णन.

व्यास म्हणतात, धर्मा ! नंतर क्रुद्ध झालेल्या पार्वतीच्या शरीरापासून तपःसामर्थ्यानें बावीस कुलदेवता निर्माण झाल्या. त्यांना भट्टारिका, छत्रा, ओंविका, ज्ञानजा, भद्रकाली, माहेशी, सिंहोरी, धनमर्दनी, गात्रा, शांता, शेषदेवी, वाराही, भद्रयोगिनी, योगीश्वरी, मोहलज्जा, कुलेशी, शकुलाचिता, तारणी, कनकानंदा, चामुंडा, सुरेश्वरी; व दारभट्टिका अशीं बावीस नांवें प्राप्त झालीं. पुन्हां प्रत्येक देवतेपासून शंभर शंभर ह्याप्रमाणें एकंदर बावीसशें कुलदेवता उत्पन्न झाल्या. आतां त्या सर्वांचीं गोत्रप्रवरें सांगतों ऐका; गात्रा देवीचे प्रवर तीन; औपमन्यव, वसिष्ठ व भरद्वाज हे होत. ज्ञानजादेवीचे प्रवर पांच; इंद्रप्रमद, काश्यप, अवत्सार, रैभ्य व गृत्समद हे होत. दारभट्टारिकादेवीचे प्रवर तीन; भार्गव, च्यवन व मांडव्य हे होत. तारणीदेवीचे प्रवर पांच; आत्रि, अवि, जमदग्नि, कुशिक, जामदग्न्य हे होत. महाबला देवीचे प्रवर तीन; विश्वामित्र, देवराज व उद्दालक हे होत. शांतादेवीचे प्रवर तीन; भार्गव, गार्त्समद, अर्णेनहोत्र हे होत. कृष्णात्रेयगोत्रापासून उत्पन्न झालेल्या भद्रयोगिनीदेवतेचे प्रवर तीन; आत्रेय, अर्चनानस, श्यावाश्व हे होत. सिंहोरीदेवीचे प्रवर पांच; काश्यप, अवत्सार, शांडिल्य, असित व देवल हे होत. छत्रा

देवीचे प्रवर तीन; अगस्त्य, दार्वच्युत व दध्यवाहन हे होत. चामुंडादेवीचे प्रवर तीन; काश्यप, अवत्सार, नैध्रुव हे होत. भद्रयोगिनीदेवीचे प्रवर तीन; काश्यप, वसिष्ठ व अवत्सार हे होत. ज्या ज्या प्रवरामध्यें पुनः पुनः एकाच ऋषीचें जर ग्रहण केलें असेल, तर त्या त्या प्रवराशीं त्या त्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या वधूवरांचा परस्पर विवाहसंबंध होत नाहीं; असें समजावें. एकाच ऋषीचें नांव जर अनेक प्रवरांत उच्चारिलें असेल, तर त्या ऋषिकुलांत वधूवरांशीं त्या त्या प्रवरांतील वधूवराबरोबर कधींहि विवाहसंबंध होणें शक्य नाहीं. कात्यायनऋषीचेंहि असेंच मत आहे कीं, जर वर सांगितलेला नियम न पाळतां सगोत्र कन्येशीं विवाह लाविल्यास त्यानें त्या कन्येचा त्याग करून, तत्प्रायश्चित्तार्थ चांद्रायणादि व्रत करावें व तसें जर न करील; तर तो जातिभ्रष्ट होईल. याज्ञवल्क्यऋषीचेंहि असेंच मत आहे कीं, निरोगी, सगोत्रांत न गणलेली, पांच किंवा सात वर्षांहून जिचें वय अधिक आहे; अशा सर्वलक्षणसंपन्न कन्येशीं विवाह लावावा. एक गोत्रांत उत्पन्न झालेली कन्या भगिनीप्रमाणें समजावी. थोरल्या भावाचा विवाह व्हावयाचा असतां, जर धाकट्या भावानें आपला विवाह करून घेतला, तर तो महापातकाला योग्य होतो; व अशा धाकट्या भावास 'परिवेत्ता' व थोरल्या भावास 'परिवित्ति' अशा शास्त्रीय संज्ञा आहेत. पुनर्विवाह शूद्राशिवाय इतरांस वर्ज्य आहे. आतां मुख्य जीं एकोणतीस *उपनांवें आहेत, तीं ह्यापुढें सांगतों; ऐका. गोत्र, पात्र, दात्र, त्राशयत्र, लडकात्र, मंडकीयात्र, विडलात्र, रहिला, भादिला, वालूआ, पोकीया, वाकीया, मकाल्या, लाडआ, माणवेदा, कालीया, ताली, वेलीया, पांवलडिया, मूडा, पीतूला, धिगममध, भूतपादवादी, होफोया, शेवार्दत, वपार, वथार, साधकार, बहुधिया; ह्याप्रमाणें हीं उपनांवें होत. मामाची मुलगी व सगोत्र मुलगी ह्यांच्याशीं जर विवाह लावला, तर त्यानें चांद्रायणव्रताचें आचरण करून पापापासून मुक्त व्हावें. व्यास म्हणतात,—धर्मा! जर ह्या वरील सर्व नियमांना धरून धर्माचरण केलें; तर त्या मनुष्याला सद्गतीची प्राप्ति होते.

---

* हीं उपनांवें कोणत्या आधारानें घेतलीं आहेत ह्यांचा पत्ता लागत नाहीं. कारण हीं सर्व उपनांवें अश्रुतपूर्व, अशुद्ध; व अपरिचित आहेत, परंतु मूळग्रंथांत दिलीं असल्यामुळें जशीच्या तशीं येथें देतों.

# अध्याय २२ वा.

## देवतास्थानवर्णन.

व्यास म्हणतात; धर्मा ! तूं सर्वज्ञ व कुलीन आहेस; करितां पूर्वी सांगित-
ा देवतांची स्थानस्थिति आपणांस वर्णन करून सांगतों, ऐका. पूर्वी कथन
ल्या सर्व देवता अनेक अलंकार धारण करणाऱ्या, अनेक प्रकारचीं वस्त्रें
ेल्या, अनेक जातींच्या वाहनांवर बसलेल्या, अनेकतऱ्हेनें शब्दोच्चार
ाऱ्या; व सर्वांचें भय नाशन करणाऱ्या अशा पार्वतीच्या शरीरापासून
ाण झालेल्या आहेत. पैकीं आठहि दिशाना अशापुरी, गात्राई, छत्राई,
जा, पिप्पलांबा, शांता, सिद्धा, भट्टारिका, कदंबा, विकटा, मीठा, सुपर्णा,
ा, मातंगी, महादेवी, वाराही, मुकुटेश्वरी, भद्रा, महाशक्ति, सिंहारा,
चला इत्यादि देवता स्थापिलेल्या आहे. आणखीहि पूर्व दिशेला वसंतीदेवी-
ास करित्ये. नैर्ऋत्येला शातादेवी राहते. पश्चिमेला निंबजादेवी राहते.
व्येला क्षेत्रधारदेवि राहते. तशाच इतर दिशेला ब्रह्माणीप्रमुख देवताहि
ा असतात. सर्व देवतांचीं स्थानें व माहात्म्यें वर्णन करणें प्रत्यक्ष
लाहि कठिण आहे; मग आमच्यासारख्या सामान्य जनास तें कसें वर्णितां
र ? ह्याप्रमाणें जलदेवताहि अनेक रूपें घेऊन दशदिशेमध्यें जाऊन राहतात.

---

# अध्याय २३ वा.

## शंभुग्रामस्थापना.

व्यास म्हणतात; धर्मा ! पूर्वी एकदां देव व दैत्य ह्यांचें युद्ध होऊन त्यांत
चा पराजय झाला असतां ते ब्रह्मदेवाला शरण गेले; व म्हणूं लागले कीं,
चे शत्रु जे दैत्य त्यांचा पराजय कशानें होईल, तें सांगा. तितक्यांत
ाणी श्रवण करून ब्रह्मदेव देवांना म्हणतात कीं, पूर्वी मी, शंकर; व विष्णु
तिघांनीं यमधर्माच्या तपःप्रभावानें संतुष्ट होऊन एक धर्मारण्यनांवाचें
निर्माण केलें. त्या क्षेत्रांत जाऊन जे प्राणी थोडेंबहुत दानादि पुण्यकर्म
तील त्यांना त्यांना त्या कर्माच्या कोटिपटीनें अधीक पुण्य मिळेल; असा
क्षेत्राचा महिमा आहे. आतां तुम्हीं सर्व धर्मारण्यांत जाऊन शत्रुनाशार्थ
दा यज्ञ कराल, तर तुमची कार्यसिद्धी होईल. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची वाणी
ा सर्व देव ब्रह्मदेवासह धर्मारण्यांत येण्याकरितां निघाले. नंतर तेथें

जाऊन यज्ञाची सर्व सिद्धता केली; व आंगिरा, मार्कण्डेय ह्यांस आचार्य-स्थानीं नेमिलें. अत्रि व कश्यप हे होतृस्थानीं, जमदग्नि व गौतम हे अध्वर्युस्थानीं अशातऱ्हेनें अनेक ऋषींना यथायोग्य स्थानीं नेमून देवांनीं यज्ञ करण्यास प्रारंभ केला. रोज हजारों ब्राह्मणांना भोजनहि घातलें. अशाप्रकारें एक हजार वर्षें तो यज्ञ चालू ठेविला असतां यज्ञाच्या पुण्यप्रभावानें इंद्रादिवांना विजय प्राप्त होऊन सर्व दैत्याचा नाश झाला. त्यायोगें ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर ह्यांनाहि मोठा आनंद झाला. पुढें कित्येक काळ निघून गेल्यावर जेव्हां कृतयुगाला प्रारंभ झाला, तेव्हां लोहासुर नांवाचा ब्राह्मणवेषधारी एक राक्षस सर्वांना पीडा देऊं लागला. तो नित्य पीडा देत असल्यामुळें शंभुनांवाच्या एका चतुर व्यापाऱ्यानें आपल्या नांवानें एक नगर तयार करून तेथें सर्वांना आणून ठेविलें; व त्यांचें लोहासुरापासून रक्षण केलें; त्यालाच शंभुग्राम ह्मणतात. अशाप्रकारें लोहासुरानें धर्मारण्यांतील लोकांना पीडा देऊन तें स्थान उध्वस्त करून टाकिलें; व तो दैत्य तेथून निघून गेला.

---

## अध्याय २४ वा.

---

### धर्मारण्यप्रभाव.

व्यास ह्मणतात; धर्मा ! ह्या धर्मारण्यक्षेत्राचें माहात्म्य किती मोठें आहे, हें सांगणें फारच दुर्लभ आहे. ह्या ठिकाणी राहणाराचीं पूर्वजन्मांत केलेलीं सर्व पापें नष्ट होतात. हें क्षेत्र सर्व इतर क्षेत्रांहून श्रेष्ठ आहे. ह्या क्षेत्राचें माहात्म्य पूर्वी शंकरानें कार्तिकस्वामीला सांगितलें होतें. तूंहि ह्या क्षेत्रांत स्नान कर; म्हणजे सर्व पातकांपासून मुक्त होशील. ह्याप्रमाणें व्यासाच्या सांगण्यावरून धर्मराज धर्मारण्यक्षेत्रांत जाऊन; व तेथील अनेक तीर्थांत स्नान करून त्यानें तेथें इष्टापूर्तादि अनेक कर्मेंहि केलीं; व तो निष्पाप होऊन परत इंद्र प्रस्थाला निघून गेला. नंतर तो कांहीं वर्षे पृथ्वीच्या राज्याचा उपभोग घेऊन शेवटीं मुक्त झाला. जे कोणी ह्या धर्मारण्यक्षेत्रांत येऊन धर्मारण्यमाहात्म्याचें श्रवण किंवा पठण करितील त्यांना ह्या लोकीं सर्व सुखें मिळून अंतकाळीं मोक्ष प्राप्त होईल. जे कोणी येथें येऊन श्राद्धविधीनें पितरांना तृप्त करतात, त्यांचे पितर अक्षय्यकालपर्यंत शिवलोकीं जाऊन राहतात. धर्मवापीमध्यें तिलोदक दान दिल्यास गयाश्राद्धाचें फळ मिळतें. अन्नादि न देतां धर्मवापीचें उदकदानहि जरि केलें तरी कोट्यावधि जन्मांचीं पापें नष्ट होतात.

---

# अध्याय २५ वा.

## सरस्वतीतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषिहो! आतां तुम्हाला सत्यलोकांतून धर्मारण्यांत आलेली जी सरस्वती तिचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी एकदा मार्कण्डेय ऋषि एकांतांत तप करीत बसले असतां त्याठिकाणीं इतर ऋषिमंडळी येऊन मार्कण्डेयास प्रश्न करतात कीं, हे मुने! आपण सत्यलोकांतून भूमंडळावर आणलेली जी सरस्वती तिचें माहात्म्य सांगा. ह्याप्रमाणें ऋषींचा प्रश्न ऐकून मार्कण्डेय, म्हणतात, ऋषिहो! मी धर्मारण्यानजीक असणाऱ्या सुख-नांवाच्या पर्वतावर पूर्वी तपःप्रभावानें लोकहितार्थ सरस्वती आणून तेथें एक सरस्वतीतीर्थ निर्माण केलें. भाद्रपद शुक्ल द्वादशीला ह्या तीर्थामध्यें स्नान करून पिंडदानादि करणारांचे पितर स्वर्गाला जातात. सरस्वतीतीर्थाच्या उदका एवढें पुण्यकारक दुसरें उदकच नाहीं. ह्या सरस्वतीतीर्थमहात्म्याचें कथानक पठण व श्रवण करणाराला मोक्षप्राप्ति होते. जशी कामधेनु इच्छित फळ देणारी आहे, तशीच सरस्वतीनदीहि श्रोत्यांस इच्छित फळ देणारी आहे.

---

# अध्याय २६ वा.

## द्वारिकामाहात्म्य.

व्यास म्हणतात; धर्मा! पूर्वी दक्षिणायनामध्यें स्वर्गद्वार झांकिलें असतां मार्कण्डेयानें उदगयनाचें आरंभीं ज्याठिकाणीं तें द्वार उघडिलें, त्या स्थानाला द्वारिकातीर्थ म्हणतात. त्या द्वारिकेचें माहात्म्य किती वर्णावें? विष्णुलोकाची प्राप्ति व्हावी, ह्या इच्छेनें देहत्याग केला असतां ह्या द्वारिकेच्या स्थानप्रभावानें त्यास विष्णुलोकाची तत्काळ प्राप्ति होते. जे कोणी उपोषणादि करून ह्या द्वारिकातीर्थांत स्नान करतात, किंवा देहत्याग करतात, त्यांसहि विष्णुलोकाची प्राप्ति होते. हें द्वारिकातीर्थ मुमुक्षूंना मुक्ति देणारें, द्रव्येच्छूंना द्रव्य देणारें, दीर्घायुष्याची इच्छा करणाऱ्यांना दीर्घायुष्य देणारें; व जो जो जें जें इच्छील तें तें त्यास देणारें असें असल्यामुळें सर्वश्रेष्ठ आहे. ह्या तीर्थाचे-काठीं जें कांहीं अल्पस्वल्प दान केलें असेल त्याचें फल मात्र अक्षय्य मिळतें. एकादशीचे दिवशीं ह्या तीर्थांत श्राद्ध करणाराचे पितर नरकांतून उद्धरून जातात.

## गोवत्सलिंगमाहात्म्य.

सूत म्हणतात; हे शौनकादि ऋषि हो ! द्वारिकातीर्थाचेंच नजीक एक गोवत्सनांवाचें दुसरें तीर्थ आहे. त्याठिकाणीं शंकर गोवत्साच्या ( गाईच्या व वासराच्या ) रूपानें अवतीर्ण झाले. एके दिवशीं बलाहकनांवाचा राजा मृगया करीत त्याच अरण्यांत आला असतां त्यानें त्या गोवत्साला पाहून त्यास धरण्यासाठीं प्रयत्न केला. तो राजा गोवत्साला धरणार इतक्यांत तेथें गोवत्स अदृश्य होऊन एक शिवलिंग उत्पन्न झालें. नंतर बलाहक राजा तें शिवलिंग पाहून आश्चर्यचकित होत्साता विचार करूं लागला, तोंच त्या राजावर पुष्पवृष्टि झाली; व तो विमानांत बसून शिवलोकीं निघून गेला. त्या राजाला शिवलोकीं गेल्यावर समजलें कीं, गोवत्साचें स्वरूप शंकरानेंच घेतलें होतें; व तेंच पुनः त्या स्वरूपानें गुप्त होऊन लिंगस्वरूपानें प्रगट झालें. ही शिवलीला ऐकून बलाहकराजाला मोठा आनंद झाला; व त्यानें शंकराची स्तुति केली. देवांनीं शंकराची गोवत्सलिंगस्वरूपानें त्या स्थळीं राहण्याविषयीं प्रार्थना केल्यावरून शंकरानें त्या लिंगाचें माहात्म्य वर्णन करून देवांची इच्छा पूर्ण केली. नंतर शंकर म्हणतात; देवहो ! जे ह्या लिंगाचें पूजन करितील, ते निर्भयपणें ह्या लोकीं सुख भोगून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतील. जे ह्या-ठिकाणीं पितरांचे श्राद्ध करितील त्यांचे पितर मुक्त होऊन शिवलोकाला जातील. जे कोणी येथें स्नानादि करून रात्रीं जागरण करितील ते एकशें एक कुळांचा उद्धार करून कृतार्थ होतील. जोंपर्यंत गोवत्सलिंगाचें दर्शन घेतलें नाहीं, तोंपर्यंतच नैमिष, पुष्कर, गया प्रयाग, प्रभास, वगैरे तीर्थांचें महत्त्व आहे; ह्या लिंगाचें पूजन केल्यास सर्व तीर्थांतील स्नान, दान, पूजनादिकांचें फल प्राप्त होतें. हें गोवत्सलिंग प्रत्येक दिवशीं एक एक अणुप्रमाण वाढूं लगलें असतां देवांना मोठी भीति वाटली; व ते शंकराची स्तुति करूं लागले; तेव्हां आकाशवाणीनें शंकर देवांना ह्मणतात कीं, माझ्या लिंगासमोर एक चांडाळ आणून उभा करा; म्हणजे माझी वाढ खुंटेल. अशी आकाशवाणी ऐकताच देवांनीं एका चांडाळाला गोवत्सलिंगापुढें आणून उभें केलें; तथापि त्या लिंगाची वाढ खुंटेना. नंतर पुनः आकाशवाणी झाली कीं, देवहो ! तुह्मी माझ्या पुढें जो चांडाळ उभा केला आहे, तो फक्त जातीनेंच चांडाळ आहे, करितां जो कर्मानें चांडाळ असेल; मग तो जातीनें ब्राह्मण असला तरी हरकत नाहीं, त्याला माझ्या ह्या लिंगासमोर आणून उभें

करा; म्हणजे तुमच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं गोष्टी घडून येतील. अशी आकाशवाणी ऐकतांच त्या जातीच्या चांडाळाला तेथून सोडून त्या- ठिकाणीं एक दुर्वर्तन करणारा कर्मचांडाळ ब्राह्मण आणून उभा केला. नंतर त्या गोवत्सलिंगाची वाढ खुंटून त्याची स्थिती कायम राहिली. गोवत्सापुढें आणून उभा केलेला जो कर्मचांडाळ ब्राह्मण, त्याची व गोवत्सलिंगाची नजरानजर होताच त्या चांडाळब्राह्मणाचें भस्म झालें. ज्याठिकाणीं चांडाळाचें भस्म झालें त्या स्थळाला चांडाळस्थळ, असें नांव प्राप्त झालें. भस्म झालेल्या चांडाळ ब्राह्मणाचें मात्र लिंगदर्शनानें सर्व पाप नष्ट होऊन त्यास मुक्ति मिळाली. भाद्रपद अमावास्येला ह्या तीर्थांत स्नान केलें असतां पितरांचा उद्धार होतो. ह्याठिकाणीं ब्राह्मणाला स्वर्णदान केलें असतां शिवलोकाची प्राप्ती होते. हें तीर्थ स्नानानें स्वर्गप्राप्ति देणारें आहे, ह्या तीर्थाचें उदक प्राशन केल्यास पापनाश होतो, ह्या लिंगाचें माहात्म्य श्रवण किंवा पठण केल्यास पुण्यप्राप्ति होते; व येथें कायमची वस्ती केल्यास मोक्षप्राप्ति होते. मनुष्य कितीहि पापी असला तरी ह्या लिंगाच्या दर्शनानें मुक्त होतो.

---

## अध्याय २८ वा

### लोहयष्टितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात,–गोवत्सलिंगाच्या नैर्ऋत्यदिशेला एक लोहयष्टिका- नांवाचें तीर्थ आहे. भाद्रपद अमावास्येला ह्या लोहयष्टिकातीर्थांत स्नान करून, एकवीस वेळां पितृश्राद्ध करणाराला गयाश्राद्धाचें फळ प्राप्त होतें; व त्याचे एकशे एक पितर उद्धरून शिवलोकाला जातात. ह्या तीर्थांत स्नान करून पांढऱ्या तिळानें पितृतर्पण करावें; म्हणजे त्यांची अक्षय्य तृप्ति होते. रुद्रतीर्थामध्यें गोप्रदान दिल्यानें जें पुण्य प्राप्त होतें, विष्णुतीर्थांत स्वर्णदानानें जें पुण्य मिळतें, गयाश्राद्धाच्या योगें जी पितृतृप्ति होते, तीं सर्व शुभ फळें मला ह्या लोहयष्टितीर्थांत स्नानदानतर्पणादिकांच्या योगें प्राप्त होवोत; असें म्हणून तेथें शुभकर्मे आचरावीं. ह्या लोहयष्टितीर्थांत जलदान दिल्यानें पितर तृप्त होऊन अखंड सुखानें स्वर्गांत राहतात; व त्यांचे कुळांत कधीहि दुःखदारिद्र्याची बाधा होत नाहीं, व त्यांची वंशवृद्धि होऊन, त्यास सर्व सुखें प्राप्त होतात.

## लोहासुराख्यान.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो ! आतां तुम्हाला लोहासुराचें आख्यान सांगतों; ऐका. लोहासुर दैत्यानें आपले दोन भाऊ वृद्ध होऊन मुक्त झाल्याबद्दल वर्तमान श्रवण करून तत्काल त्यास वैराग्य प्राप्त झालें; व तो शंकराची आराधना करूं लागला. शंकर प्रसन्न होऊन लोहासुराला वर मागण्याविषयीं म्हणूं लागले. नंतर लोहासुर म्हणतो; देवा ! जर आपण मला वर देणारच आहां, तर माझें शरीर कधींहि वृद्ध होऊं नये; व मला कधींहि मृत्यु येऊं नये, असा वर द्या. त्याचप्रमाणें आपण माझ्या हृदयामध्यें सतत राहून माझी सर्वत्र कीर्ति पसरावी, असाहिपण आपण वर द्या. नंतर शंकरानें बरें आहे, असें म्हटल्यावर; पुनः तो लोहासुर तप करूं लागला. त्यावेळीं मात्र इंद्राला धास्ती वाटून तो त्या दैत्याच्या तपामध्यें विघ्न उत्पन्न करूं लागला. त्यावेळीं इंद्र आपल्या तपांत विघ्न आणीत आहे, हें पाहून लोहासुराला फारच राग आला; व तो इंद्राबरोबर युद्ध करूं लागला. त्या युद्धांत इंद्राचा पराजय होऊन तो विष्णूला शरण गेला. नंतर विष्णूचें व लोहासुराचें शंभर वर्षेंपर्यंत मोठें युद्ध झालें. त्या युद्धामध्यें विष्णूचाहि पराजय झाला. शेवटीं मोठ्या शिकस्तीनें विष्णूनें त्या दैत्याला पृथ्वीवर पाडिलें असतां शंकर व ब्रह्मदेव त्या ठिकाणीं प्रगट होऊन म्हणाले कीं, हे लोहासुरा ! तूं आमच्या आज्ञेनें आमची भक्ति करीत येथेंच राहावें. नंतर लोहासुर देवांना म्हणतो कीं, जर तुम्ही तिघेहि माझे शरीराचे ठिकाणीं कायमचे राहत असाल, तर मला काय कमी आहे ? मी खुशीनें तुमची आज्ञा पाळून येथें राहतों. हें माझें पृथ्वीवर आडवें पडलेलें शरीर माझे नांवानें प्रसिद्ध व्हावें. अशी लोहासुराची नम्र भाषा ऐकून ब्रह्मदेव ह्मणतो; दैत्या ! तूं म्हणतोस त्याप्रमाणें सर्व कांहीं पूर्ण होईल. हें माझें शरीर तीर्थस्वरूपानें राहील. ह्या तीर्थांत स्नान करून पितृश्राद्धादि कर्म केल्यास सर्व पितरांचा उद्धार होईल. ऋषिहो, ह्याप्रमाणें तुम्हाला लोहासुराख्यान सांगितलें. हें श्रवण केलें असतां ब्रह्महत्त्यादि सर्व पापें नष्ट होऊन त्यास अखंड शिवलोकाची प्राप्ति होते.

---

## अध्याय ३० वा.

## रामचरित्रवर्णन.

व्यास म्हणतात ! धर्मा ! पूर्वीं त्रेत्रायुगामध्यें विष्णूनें सूर्यवंशामध्यें राम या नांवानें एक अवतार घेतला होता; व शेषानें लक्ष्मण या नांवानें अवतार

घेतला. ते उभयतां लहान असतांनाच विश्वामित्रानें त्यांस यज्ञरक्षणाकरितां आपल्या आश्रमाला नेलें. वाटेनें येतांना विश्वामित्राच्या आज्ञेनें रामचंद्रानें ताटका नांवाच्या राक्षसीचा वध केला. विश्वामित्राच्या आश्रमांत आल्यावर विश्वामित्रानें राम-लक्ष्मणांना धनुर्विद्या शिकविली. नंतर विश्वामित्राच्या यज्ञ-कार्यांत विघ्न आणणारे जे मारीच व सुबाहू नांवाचे राक्षस, त्यांपैकीं मारीचाला पळवून लावून सुबाहूला राम-लक्ष्मणांनीं मारून टाकिलें; नंतर रामानें जन-काच्या विवाहमंडपांत विश्वामित्र व लक्ष्मण ह्यांसह जाऊन; व धनुर्भंग करून सीतेचें पाणिग्रहण केलें. नंतर राम-लक्ष्मण परत अयोध्येंत येत असता वाटेंत परशुरामाचा गर्व हरण करून ते स्वगृहीं प्राप्त झाले. नंतर बारा वर्षें तेथें सीतेसह क्रीडा करून सत्ताविसावे वर्षी रामचंद्राला राज्यारूढ करण्याची वाटाघाट चालली असतां, दशरथाजवळ अनामत ठेव म्हणून पूर्वीं ठेवलेले जे दोन वर, ते मागून घेऊन कैकयीनें रामाला वनवास व भरताला राज्य मिळण्याबद्दल दशरथाची प्रार्थना केली. कैकयीला खुष ठेवण्याकरितां रामानें वनाला जाण्याचें कबूल करून, तो सीता व लक्ष्मण ह्यांसह पित्राज्ञेनें चौदा वर्षें वनवास स्वीकारिता झाला. रामाच्या विरहजन्य दुःखानें दशरथानें " राम राम " असा आक्रोश करून प्राणत्याग केला. भरत व शत्रुघ्न ह्यांना हें वर्तमान समजतांच, त्यांनीं कैकयीला पुष्कळ दोष देऊन रामदर्शनाकरितां चित्रकूटावर प्रयाण केलें. रामानें भरत-शत्रुघ्नांना पुष्कळ प्रकारें उपदेश करून, परत अयोध्येंत पाठविलें. नंतर भरत व शत्रुघ्न हे नंदिग्राम नांवाच्या स्थळीं येऊन राहिले; व रामपादुकांच्या पूजारूपी आज्ञेनें त्यांनीं राज्यकारभार चालविला. नंतर राम व लक्ष्मण साडे तेरा वर्षें पंचवटीमध्यें राहते झाले. तेथें शूर्पणखेला विरूप केल्यामुळें, तिनें रावणाला रामाचा पराक्रम निवेदन केला. तो रामपराक्रम सहन न होऊन रावण सीतेचें हरण करण्याकरितां, माघ शुक्ल अष्टमीस पंचवटीमध्यें येऊन, रामाला नकळत सीतेचें हरण करिता झाला. वाटेंत जटायुषाचें व रावणाचें युद्ध झालें; त्यांत जटायुष पराजय पावला. माघ कृष्ण नवमीचे दिवशीं राम व लक्ष्मण सीतेचा शोध करीत करीत, ऋष्यमूक पर्वतावर प्राप्त झाले. नंतर तेथें सुग्रीवाबरोबर सख्य करून, रामानें वालीचा वध केला. पुढें सीतेचा शोध लावण्याकरितां मारुतिप्रमुख वानर पाठविले असतां, त्यांची व संपाती नांवाच्या गृध्राची गांठ पडली. सीता रावणानें लंकेंत नेऊन अशोकवनांत ठेविली आहे, असें संपातीचें भाषण ऐकून मारुतीनें समुद्रोल्लंघन करून सीताशुद्धि केली. परत मारुति मधुवनांत येऊन मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला रामाला येऊन भेटला; व त्यानें सीतेसंबंधीं सर्व वर्त-मान त्यास निवेदन केलें. नंतर फाल्गुन कृष्ण अष्टमीला विजयमुहूर्तावर

दोन प्रहरीं बारा वाजतां रावणाबरोबर युद्ध करण्याकरितां, रामचंद्र वानरसेनेसह निघाले. पौष शुक्ल प्रतिपदेपासून तृतीयेपर्यंत, रामचंद्रानें समुद्राची तरून जाण्याबद्दल प्रार्थना केली. चतुर्थीच्या दिवशीं बिभीषणाशीं रामाचें सख्य झालें. पुढें पौष शुक्ल दशमीपासून समुद्रावर सेतू [ पूल ] बांधण्यास प्रारंभ झाला. पौष शुक्ल पौर्णिमेला राम सैन्यासह समुद्रोल्लंघन करून सुवेलाचल पर्वतावर आले. रामानें लंकेला वेढा घातल्यानंतर माघ शुक्ल द्वितीया व तृतीया ह्या दोन दिवशीं राम–रावणांचें घोर युद्ध झालें. माघ शुक्ल नवमीला इंद्रजित्, एकादशीला धूम्राक्ष दैत्य, चतुर्दशीला प्रहस्त दैत्य, माघ कृष्ण नवमीला कुंभकर्ण, फाल्गुन शुद्ध पक्षांत नरांतकादि दैत्य; व निकुंभ, कुंभ, मकराक्ष वगैरे दैत्य मारिल्यानंतर चैत्र शुक्ल एकादशीच्या दिवशीं रामाला बसण्याकरितां चार घोडे लाविलेला; व मातलि ज्यावर सारथ्यकर्म करीत आहे, असा सशस्त्र रथ रामाकडे प्राप्त झाला. चैत्र वद्य चतुर्दशीला रामानें रावणाचा वध केला. नंतर अमावास्येला रावणाचा अंत्यविधी स्वतः रामानें उरकला. ह्याप्रमाणें बहात्तर दिवस युद्ध झाल्यावर रामानें विश्रांति घेऊन वैशाख शुद्ध प्रतिपदेला बिभीषणाला लंकेच्या राज्यावर अभिषिक्त केलें नंतर सीतेची गांठ पडून दशरथहि तेथें रामाला भेटला. वैशाख शुक्ल चतुर्थीला रामचंद्र सेनेसह सीतेला बरोबर घेऊन पुष्पक विमानांत बसून अयोध्येला येण्याकरितां निघाले.चौदा वर्षें पूर्ण होतांच वैशाख शुद्ध पंचमीला भारद्वाज ऋषींच्या आश्रमाला येऊन तेथून सीतेसह राम नंदिग्रामांत भरताला वैशाख शुक्ल षष्ठीला भेटले. सप्तमीस रामाला सीतेसह राज्याभिषेक केला. राम आपल्या वयाच्या बेचाळीसावे वर्षी राज्यारूढ झाले. त्या वेळीं सीतेला बात्तिसावें वर्ष लागलें होतें. नंतर रामानें त्या ठिकाणीं राहून दहा हजार दहाशें इतकीं वर्षें अयोध्येचें राज्य केलें. राम राज्यारूढ झाल्यामुळें सर्वांना मोठा आनंद झाला. यांच्या राज्यामध्यें अधर्म हा नामशेष झाला होता. मध्यंतरीं कांहीं काळ निघून गेल्यानंतर वसिष्ठऋषींला रामानें तीर्थयात्रामाहात्म्य विचारिलें असतां, रामचंद्राला ते पुढें सांगितल्याप्रमाणें तीर्थमाहात्म्य सांगूं लागले.

---

## अध्याय ३१ वा.

### तीर्थयात्रामाहात्म्य.

रामचंद्रानें वसिष्ठ ऋषींला तीर्थयात्रामाहात्म्य विचारल्यावरून वसिष्ठ ह्मणतात; रामा ! गंगा, नर्मदा, तापी, यमुना, सरस्वती, गंडकी, गोमती, पूर्णा,

वगैरे नद्या पुण्य देणाऱ्या आहेत. ह्या सर्व नद्यांमध्यें नर्मदा नदी श्रेष्ठ आहे. ही नर्मदा दर्शन करणाऱ्या पापी पुरुषाचें सर्व पाप जाळून टाकिते. नर्मदेचें दर्शन होतांच हजारों जन्मांत केलेलीं पातकें नष्ट होतात. नर्मदा शब्दाचा नामघोष करणारा मनुष्य जरी चारशें कोस दूर अंतरावर असला तरी तो महापातकापासून मुक्त होतो; व वैकुंठाला जातो. जे कोणी गंगेमध्यें फाल्गुनांतील अमावास्येला स्नान व पितृतर्पण करितात, त्यांच्या कुळांचा उद्धार होतो. कार्तिकशुक्ल पूर्णिमेला सरस्वती नदींत स्नान करणारा विष्णुलोकाला जातो. गंडकीतीर्थांत स्नान करणारा पुनर्जन्मादि दुःखापासून मुक्त होतो. चर्मण्वती नदींत स्नान करणारांचे पितर मुक्त होतात. जे प्रभासक्षेत्रांत जाऊन तीन रात्र तेथें राहतात; व स्नानादि शुभ कृत्यें करतात, त्यांना कुंभीपाकादि नरकयातना भोगण्याचा प्रसंग मुळींच येत नाहीं. नैमिषारण्यांत राहणारा पुरुष प्रत्यक्ष देवच होतो. कुरुक्षेत्रांत राहणारा मनुष्य जन्ममरणरूप संसारापासून मुक्त होतो. जे कोणी वैशाख महिन्यांत उज्जयिनीमध्यें राहून क्षिप्रानदींत स्नान करतात; ते सर्व पातकांपासून मुक्त होतात. जे सिंधुनदींत स्नान करतात ते शिवलोकीं जाऊन राहतात. कोटितीर्थांत स्नान करणारांचे ब्रह्महत्यादि सर्व दोष नाश पावतात. जितकीं म्हणून ह्या पृथ्वीतलावर तीर्थें आहेत तीं सर्व स्नानपानादि कर्मांच्या योगें सर्व दोषांपासून प्राणिमात्रास मुक्त करून त्यांस सद्गतीची प्राप्ति करून देतात. असें जरी आहे, तथापि सर्व तीर्थांहून श्रेष्ठ असें एकच धर्मारण्यक्षेत्र आहे. त्या क्षेत्रांत असणाऱ्या तीर्थांत स्नान केलें असतां व पितृश्राद्धादि कर्में केलीं असतां प्राणिमात्र सर्व ब्रह्महत्यादि महादोषांपासून मुक्त होऊन; व त्यांच्या पितरांनाहि सद्गति व शेवटीं विष्णुलोक मिळतो. धर्मारण्याएवढें श्रेष्ठ क्षेत्र त्रैलोक्यांत मिळणें अशक्य आहे. हें क्षेत्र स्वर्ग देणारें, कीर्ति देणारें, आयुर्वृद्धि करणारें, इच्छित फल देणारें, व मोक्ष देणारें आहे; करितां रामा! तुला रावणनाशामुळें प्राप्त झालेली ब्रह्महत्त्या दूर व्हावी, अशी इच्छा असेल, तर तूं धर्मारण्यांत जाऊन स्नानादि कर; म्हणजे दोषमुक्त होशील.

व्यास म्हणतात; धर्मा! ह्याप्रमाणें वसिष्ठांचें भाषण ऐकून रामाला फारच आनंद झाला; व त्यानें धर्मारण्याला जाण्याविषयींचा आपला हेतु वसिष्ठासमक्ष सर्वांना निवेदित केला. नंतर सीता, लक्ष्मणादि बंधु, मारुति, कौसल्या, सुमित्रा, कैकयी वगैरे दुसरीहि मंडळी बरोबर घेऊन रामचंद्र वसिष्ठासहवर्तमान धर्मारण्याला जाण्याकरितां निघाले. रामचंद्र मंडळींसह चार दिशांकडे असणारीं तीर्थें हिंडत हिंडत; व त्या त्या तीर्थांचीं माहात्म्यें वसिष्ठांकडून श्रवण करीत करीत दहावे दिवशीं धर्मारण्यक्षेत्रांत प्राप्त झाले. धर्मारण्यक्षेत्र भयंकर व उध्वस्त झालेलें पाहून सर्वांना भीति व विस्मय वाटला; व त्या क्षेत्रांतील

मार्ग बिकट असल्यामुळें पायांनीं चालणेंहि जरा त्रासाचें होऊं लागलें. त्यावेळीं नजीक राहणाऱ्या वैश्यवर्गाला बोलावून पालख्या तयार करवून त्यांतून सर्व मंडळी धर्मारण्यक्षेत्रांत जाऊं लागली. ज्यावेळीं ते बरेच दूर गेले, त्यावेळीं त्यांच्या पालख्या कुंठितगति झाल्या. नंतर वसिष्ठ रामाला म्हणतात; बा रामा! पूर्वींची पद्धत ह्मटली म्हणजे धर्मारण्यक्षेत्रांत पायांनीं चालत जाण्याची होती, ती सोडून तुम्ही पालखींतून जात आहां, हें परमेश्वराला न आवडून त्यानेंच ह्या आपल्या पालख्यांची गति कुंठित केली आहे. अशी वसिष्ठ ऋषींची वाणी ऐकून रामचंद्रानें सर्व मंडळींसह पायींच धर्मारण्यांत जाण्याचा विचार केला; व तेथेंच पालख्या ठेवून ते पुढें जाऊं लागले. प्रथम रामचंद्र मंडळीसह मधुवासन नांवाच्या गांवांत येऊन; व तेथील मातृकांचें पूजन करून सुवर्णाक्षा नदीच्या उत्तरतीरावर असणाऱ्या धर्मस्थानाला प्राप्त झाले. नंतर तेथें श्राद्धविधि करून राम सर्वांसह जवळच वसिष्ठाच्या आज्ञेवरून रामेश्वर लिंगाची स्थापना करिता झाला. नंतर तेथें एक रात्र राहून रामानें मंडळीसह ह्या नदीचे कांठीं निद्रा घेतली. मध्यरात्रीचे सुमारास एकाएकीं कोणी तरी एक स्त्री मोठमोठ्यानें आक्रोश करीत आहे, असें रामाला समजलें. तत्काळ रामानें सर्व मंडळींना जागृत करून आपले दूत आक्रोश करणाऱ्या त्या स्त्रीचा शोध करण्यास पाठविले. रामदूत बरेच दूर शोध करण्याकरितां गेले असतां त्यांना ती स्त्री आढळून आली; त्यावेळीं ते दूत तिला विचारितात, हे स्त्रिये! तूं कोण? व कोणाची पत्नी आहेस? आणि येथें कां रडतेस? तें सांग; आम्हाला रामानें तुझ्याकडे चौकशीकरितां पाठविलें आहे. तें ऐकून ती स्त्री दूतांना म्हणाली, रामालाच इकडे पाठवून दे; म्हणजे माझें दुःख काय आहे? हें मी प्रत्यक्ष त्याला सांगेन. असें तिचें भाषण ऐकतांच दूत रामाकडे परत येऊन त्यांनीं सर्व वर्तमान त्याला निवेदन केलें.

---

# अध्याय ३२ वा.

## सत्यमंदिरस्थापना.

व्यास म्हणतात; धर्मा! नंतर दूतांच्या सांगण्याप्रमाणें रामचंद्र तत्काळ एकटेच त्या दुःखी स्त्रीजवळ येऊन विचारतात कीं, हे स्त्रिये! तूं कोणाची पत्नी आहेस! तुला कोणीं पीडा दिली? किंवा दुसरें कोणतें संकट तुजवर आलें आहे? तें सांग; असें म्हणून रामानें तिला साष्टांग नमस्कार घातला. हें

रामकृत्य पाहून त्या स्त्रीला फारच आनंद झाला; व ती गोड वाणीनें रामाला म्हणाली: रामा! आपण ज्याकरितां अवतार धारण केलात, तें रावणादि दुष्टांचा नाश करण्याचें कृत्य समाप्त झालें आहे. तुझ्या दर्शनानें आज सर्व जगत् धन्य झालें आहे. मी धर्मारण्याची मुख्य देवता आहें. आज मी बारा वर्षें अशीच दुःखानें काळ कंठित आहें; लोहासुराच्या भीतीनें धर्मारण्यांतील सर्व-लोक दाही दिशांला निघून गेल्यामुळें हें क्षेत्र लोकरहित झालें आहे. धर्म-वापीमध्यें मृत झालेले वराहादि प्राणि पडून तें तीर्थोदक भ्रष्ट झालें आहे; ही धर्मारण्यक्षेत्राची दुःस्थिति पाहून मला फार वाईट वाटतें; म्हणून मी अशी आज बारा वर्षें रडत पडल्यें आहें. यास्तव आपण लोहासुराचा बंदोबस्त करून धर्मारण्यांत सर्व लोक पूर्वीप्रमाणें राहण्यास येतील; असें करा; तरच माझें दुःख नाहींसें होईल, नंतर राम म्हणतात,-हे धर्मारण्यदेवते! मी लोहासुराचा बंदोबस्त करूं शकेन; परंतु धर्मारण्यांत राहणारे लोक माझ्या परि-चयाचे नसल्यामुळें जर तूं त्या लोकांचीं नांवें, गोत्रें, व जाति वगैरे सांगशील तर मी त्यांना शोधून येथें आणून तुझें दुःख दूर करीन. ह्याप्रमाणें रामभाषण ऐकून श्रीमाता देवता म्हणते,-हे रामा। ब्रह्मदेव, विष्णु व शंकर यांनीं ह्या धर्मारण्यक्षेत्रांत अठरा हजार ब्राह्मण स्थापून त्यांची व्यवस्था केली होती. ते ब्राह्मण वेदशास्त्रांचें संपूर्ण अध्ययन केलेले, असे असून त्यांचीं एकंदर गोत्रें चौसष्ट आहेत.त्या ब्राह्मणांच्या सेवेकरितां छत्तीस हजार वैश्य धर्मारण्यांत आणून ठेविले होते. याप्रमाणें त्या ब्राह्मणांची सर्व हकीगत रामाला सांगितल्यावर राम श्रीमातेला म्हणतात,-हे देवि! मी तुझ्या इच्छेप्रमाणें धर्मारण्यांतून पळून; व भिऊन गेलेले सर्व ब्राह्मण पूर्वीप्रमाणें येथें आणून; आणि निर्भयपणानें त्यांची सर्व व्यवस्था करून ठेवितों; तूं आतां कोणत्याहि तऱ्हेची काळजी करूं नको. तूं ह्या ठिकाणीं माझेजवळ सर्व वर्तमान खरें म्हणजे सत्य निवे-दन केलेंस; म्हणून ह्या स्थानाला आजपासून सत्यमंदिर हें नांव प्राप्त होईल, असें सांगून रामचंद्र स्वस्थानीं येऊन, आपल्या एक लक्ष दूतांना दाही दिशां-कडे ब्राह्मणांचा शोध करण्याकरितां त्यानें पाठविलें. नंतर रामदूतांनीं रामाज्ञे-प्रमाणें सर्व ब्राह्मणांना शोधून आदरपूर्वक रामाजवळ आणिलें. रामानेंहि ब्राह्मणांना साष्टांग नमस्कार घालून, त्यांचेकडून आशीर्वाद घेतले. रामानें सर्व ब्राह्मणांची अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजा केली; व त्यांस अनेक अलंकार देऊन प्रत्येकास शेंकडों गोप्रदानेंहि दिलीं.

---

## अध्याय ३३ वा.

### धर्मारण्यक्षेत्रजीर्णोद्धार.

रामचंद्र ब्राह्मणांना म्हणतात,–ब्राह्मणहो ! तुम्ही लोहासुराच्या भीतीनें चोहोंकडे जाऊन राहिलां आहां; हें वर्तमान मला श्रीमातेच्या मुखानें कळल्या-मुळें आतां ह्यापुढें धर्मारण्येक्षत्राची पूर्ववत् भरभराट रहावी, ह्या इच्छेनें व धर्मारण्यक्षेत्राचा जीर्णोद्धार करावा; ह्या बुद्धीनें तुम्हांला येथें आणिलें आहे. आजपासून मीं लोहासुराचा बंदोबस्त केला आहे. लोहासुरापासून तुम्हांला काडीमात्र पीडा होणार नाहीं. ह्याप्रमाणें रामाचें भाषण ऐकून ब्राह्मणांना अतिशय आनंद झाला, व त्यांनीं रामचंद्राची स्तुति करण्यास सुरुवात केली. त्या स्तुतीनें संतुष्ट झालेल्या रामानें धर्मारण्यांत पूर्ववत् यज्ञयागादि कर्में चालावीं; म्हणून मोठी यज्ञशाला तयार करून त्यांत पर्वतप्राय एक वेदिका तयार करविली; व त्या वेदिकेवर स्थंडिल रचून तेथें ब्राह्मणांना यज्ञादि कर्में करण्यास सांगितलें; व त्या ब्राह्मणांना धर्मारण्यांत आश्रम बांधून देऊन त्यांच्या सेवेकरितां पूर्वींच्या वैश्यांचीच स्थापना केली. नंतर ब्राह्मणांच्या रक्षणाकरितां ब्रह्मदेव, श्रीमाता, विष्णु, शिवगण वगैरेंचीहि तेथें स्थापना केली. त्या दिवसापासून धर्मारण्यक्षेत्र पूर्वींहूनहि फारच शोभूं लागलें. जे कोणी ह्या धर्मारण्यक्षेत्रांत येऊन श्रीमाता व बकुलार्क यांचें पूजन करणार नाहींत; त्यांच्या कार्यांत अनेक विघ्नें प्राप्त होतील; करितां धर्मारण्यक्षेत्रांत येतांच प्रथम श्रीमातेची व बकुलार्काची पूजा केली पाहिजे; असा त्या उभय स्थानांला रामानें वर दिला. नंतर रामानें मारुतीला हांक मारून सांगितलें कीं, सर्व लोक तुझी पूजा करितील; करितां तूं येथें ह्या क्षेत्राचे रक्षणाकरितां राहा; असें त्यास सांगून त्याची धर्मारण्यक्षेत्राचे पूर्वद्वारावर स्थापना केली. राम सर्व मंडळींसह श्रीमाता व बकुलार्क यांची पूजा करून आणि तेथील तीर्थांत स्नान करून कृतार्थ होत्साते परत अयोध्येंत येण्यास निघाले.

---

## अध्याय ३४ वा.

### रामाज्ञाताम्रपट्ट लेख.

व्यास म्हणतात; धर्मा ! रामचंद्रानें धर्मारण्यक्षेत्राचा जीर्णोद्धार केल्यानंतर तेथील लोकांनीं व यात्रेकरूंनीं अमुक अमुक नियमानेंच वागलें पाहिजे;

अशाबद्दल तांब्याच्या पत्र्यावर कोरून एक नियमलेख लिहून ठेविला; व सांगितलें कीं, जो कोणी ह्या माझ्या आज्ञारूपी लेखाचा अपमान करील, त्याला मी कडक शिक्षा करीन; व त्यानें केलेल्या कर्माचें त्याला काडीमात्रहि फळ मिळणार नाहीं. आतां ते नियम कोणते, तें सांगतों; ऐका. " अहो भगवद्भक्तहो ! खालीं लिहिलेला ताम्रलेख रामानें लिहिलेला आहे. ज्या रामानें पाषाणत्वाला पावलेल्या आहिल्येचा उद्धार केला; ज्यानें रावणादि राक्षसांचा वध करून सीतेला सोडवून आणिलें; ज्यानें मेलेल्या ऋषिपुत्राला यमलोकांहून आणिलें, अशा रामाचा हा आज्ञा लेख आहे " असें प्रथम आपल्या वंशाचें व पराक्रमाचें वर्णन करून सर्वांस इषारा दिला कीं; ' लोकहो ! हें धर्मारण्यक्षेत्र पापी लोकांच्या उद्धाराकरितां निर्माण केलेलें आहे. ह्याठिकाणीं भूमिदान करणाराला पितर आशीर्वाद देऊन कुलोद्धार करितात. धर्मारण्यांत येणाऱ्यांनीं श्रीमातादि देवतांचें व मारुतीचें प्रथम पूजन केलें पाहिजे " असें आज्ञापत्र लिहून श्रीमातास्थान, बकुलार्क; व धर्मस्थान, ह्याठिकाणीं तो लेख स्थापित केला; व धर्मारण्यक्षेत्राची व्यवस्था उत्तमप्रकारें लावून रामचंद्र परत अयोध्येंत येऊन राज्य करूं लागले.

## अध्याय ३५ वा.

### सीतापुरस्थापना.

नारद ब्रह्मदेवाला विचारितात; देवा ! ह्याप्रमाणें सर्व व्यवस्था करून राम अयोध्येंत येऊन सिंहासनारूढ झाल्यानंतर पुढें काय झालें तें सांगा; असा प्रश्न ऐकून ब्रह्मदेव नारदाला म्हणतात; नंतर रामानें वसिष्ठाला प्रयागमाहात्म्य व त्रिवेणीसंगममाहात्म्य विचारिलें असतां वसिष्ठानें त्याला प्रयागाचें व त्रिवेणीचें माहात्म्य सांगितलें. नंतर रामाचे मनांत पुनः धर्मारण्यांत जाण्याचें आल्यामुळें तो लक्ष्मण, भरत, व शत्रुघ्न ह्यांसह मोहरकपुरामध्यें प्राप्त झाला. तेथें धर्मारण्यक्षेत्रांत जाऊन कोणतें कार्य करावें, असा रामानें वसिष्ठाला प्रश्न केल्यावरून वसिष्ठ म्हणतात; रामा ! तूं धर्मारण्यांत जाऊन यज्ञ कर. नंतर रामानें वसिष्ठाच्या साहाय्यानें धर्मारण्यक्षेत्रांत जाऊन यज्ञ केला. त्यावेळीं सीता रामाला म्हणाली कीं, आपण पूर्वीं एकदां आलों होतों, त्यावेळीं विद्वान् ब्राह्मणांना शोधून आणून त्यांची येथें स्थापना केली होती; ते ब्राह्मण जर आज येथें येतील, तर आपला यज्ञ सफल होईल. ह्याप्रमाणें सीतेचें भाषण ऐकून रामाला फार आनंद झाला; व तत्काळ

रामानें त्या सर्व ब्राह्मणांना आमंत्रण दिलें; त्या वेळीं कुशिक, कौशिक, वत्स, उपमन्यु, काश्यप, कृष्णात्रेय, भरद्वाज, धारिण, शौनक, मांडव्य, भार्गव, पैंग्य, वात्स्य, लौगाक्ष, गांगायन, गांगेय, शुनक, शौनक हेहि ऋषि तेथें प्राप्त झाले. नंतर सर्व विप्रांच्या कृपाशीर्वादानें यज्ञाची पूर्तता झाल्यावर रामानें अवभृथ-स्नान केलें. नंतर सीता रामाला म्हणाली कीं, ह्या आलेल्या ब्राह्मणांना योग्य दक्षिणा देऊन येथें माझ्या नांवानें एक पुर स्थापित करा. नंतर रामानें सर्व ब्राह्मणांना दक्षिणादिकांनीं संतुष्ट करून तेथें सीतापुर नांवाचें एक नगर निर्माण केलें. हें सीतापुर मोहेरकपुरापासून बारा कोसांवर आहे. नंतर राम सर्वांसह धर्मालयाला जाऊन, सोळाप्रकारचीं महादानें देता झाला. सीतापुरापासून सत्यमंदिरपर्यंत असणारीं जीं पन्नास शहरें तीं रामचंद्रानें वसिष्ठाच्या व सीतेच्या अनुज्ञेनें वंशवृद्ध्यर्थ ब्राह्मणांना देऊन टाकिलीं. वात्स्यायन, उपमन्यु जातूकर्ण्य, पिंगल, भारद्वाज, वत्स, कौशिक, कुश, शांडिल्य, कश्यप, गौतम, छांधन, कृष्णात्रेय, वत्स, वासिष्ठ, धारण, भांडिल, यौवनाश्व, कृष्णायन, उपमन्यु, गार्ग्य, मुद्गल, मौखक, पुशि, पराशर; व कौंडिन्य हीं सर्व धर्मारण्यांतील अठरा हजार ब्राह्मणांच्या कुळांचीं नावें होत. आतां रामानें जीं पन्नास शहरें ब्राम्हणांना दिलीं त्यांचीं *नावें पुढीलप्रमाणें आहेत; तीं येणेंप्रमाणें:—सीतापुर, श्रीक्षेत्र, मुशली, मुद्गली, ज्येष्ठला, श्रेयःस्थान, दंताली, वटपत्रका, राजपूर, कृष्णवाट, देह, लोह, वन-स्थान, कोहेड, चंदनक्षेत्र, थल, हस्तिनापुर, कर्पट, कंनजान्हवी, वनोडक, फनावली, मोहोध, शमोहोरली, गोविंदपुर, थलत्यज, चारणासिद्ध, सोद्गीत्र, अभोज्य, वाटमालिका, गोधर, मारणज, मात्रमध्य, मातृपुर, बलवती, गंधवती, ईआम्ली, राज्यज, रूपावली, बहुधन, छत्रीट, वंशज, जायासंरण, गोतिकी, चित्रलेख, दुग्धावली, हंसावली, वैहोल, चैल्लज, नासावली, आसावली, सुहाली, कामपुर; सत्यमंदिर हीं त्या गांवांचीं नांवें आहेत. ह्याप्रमाणें ब्राह्मणांना गांवें, वस्त्रें व भूषणें वगैरे देऊन सर्वांचे मनोरथ रामानें पूर्ण केले. रामानें सर्व शूद्रांना आज्ञा केली कीं, तुम्ही ब्राह्मणांची सेवा अवश्य केली पाहिजे; तरच तुम्ही कृतार्थ व्हाल. ब्राह्मणसेवा करणारा शूद्र स्वर्गाला प्राप्त होतो. ब्राह्मणांची सेवा न करणारा शूद्र दारिद्र्याला प्राप्त होऊन, संततिहीन होतो. जो कोणी ह्या धर्मारण्यक्षेत्रांत शुभकर्म करणाऱ्या पुरुषांच्या सत्कृत्यांत विघ्न उत्पन्न

* हीं गांवांचीं नांवें बहुतेक अप्रसिद्ध व अर्थसंदर्भाला सोडून असल्यामुळें शुद्ध आहेत कीं अशुद्ध आहेत ह्याविषयीं मन साशंक आहे. मूळ संस्कृत ग्रंथाप्रमाणें उतारा केला आहे; व तो बरोबर आहे. संशोधकांसाठीं हीं सर्व नावें येथें मुद्दाम घेतलीं आहेत.

करितो; मग तो अन्यधर्मी असो, दैत्य असो; किंवा राक्षस असो, तत्काळ भस्म होतो. ब्रह्मदेव म्हणतात; नारदा ! नंतर रामचंद्र सर्व मंडळींसह ब्राह्मणांना प्रदक्षिणा करून; व नमस्कार घालून सर्वांच्या आशीर्वादानें युक्त होत्साता परत अयोध्येंत येण्याकरितां निघाला, त्यावेळीं सर्व ब्राह्मण मोठ्या आनंदानें क्षेत्रसीमेपर्यंत रामाला पोंचविण्याकरितां येते झाले. नंतर रामचंद्र मोठ्या समारंभानें अयोध्येंत येऊन; व वसिष्ठाच्या कृपेनें राज्यासनारूढ होऊन प्रजेचें पुत्राप्रमाणें सद्धर्मानें पालन करिते झाले. कांहीं काळ मध्यंतरीं गेल्यावर रामाच्या वंशाची वृद्धि करण्याकरितां सीता गरोदर राहून तिला एक सर्वगुण संपन्न असा पुत्र झाला.

---

## अध्याय ३६ वा.

### कलिप्रभाव.

रामानें ज्या धर्मारण्यक्षेत्राचा जीर्णोद्धार केला, तें क्षेत्र पुढें कोणत्या स्थितीला प्राप्त झालें, तें सांगा; असा नारदाचा प्रश्न ऐकून ब्रह्मदेव नारदाला म्हणतात; नारदा ! धर्मारण्यांत येणाऱ्या व राहणाऱ्या लोकांनीं आपले नियम पाळावे; व कोणीहि धर्मारण्यक्षेत्राचा नाश करूं नये; म्हणून त्या क्षेत्राचे रक्षणाकरितां रामानें मारुतीची स्थापना केली होती, हा विस्तृत कथाभाग पूर्वी वर्णन केला आहेच. रामाज्ञेप्रमाणें मारुतीनें धर्मारण्यक्षेत्रांत राहून त्रेतायुग द्वापरयुग, ह्यांचा शेवट होऊन कलियुगाचा आरंभ होईपर्यंत त्या क्षेत्राचें रक्षण केलें; परंतु ज्यावेळीं कलिकालाचा प्रारंभ झाला; त्यावेळीं मारुतीला धर्मारण्यरक्षण करणें कठीण झालें. सर्व देव कलीच्या भीतीनें धर्मारण्यांतून निघून नैमिषारण्यांत जाऊन राहूं लागले. रामहि धर्मारण्य सोडून सेतुबंधाला जाऊन राहिला; कारण कलियुगामध्यें लोक असत्य भाषण करणारे, ब्रह्मद्वेष करणारे, दुर्वर्तन करणारे असे असल्यामुळें सर्वत्र अनर्थ पसरला; व सर्व जग दुःखरूप बनलें. अशी स्थिति झाल्यामुळें धर्मारण्याचें रक्षण करणें अशक्य झालें.

कान्यकुब्ज देशामध्यें आम नांवाचा एक राजा होता. कलियुग प्राप्त होताच त्या राजाला पापकर्म करण्याची बुद्धि झाली. त्यानें बौद्धधर्म स्वीकारल्यामुळें सर्वत्र वैष्णवधर्माचा प्रसार झाला. त्या राजाची मामा नांवाची बायको होती. तिला रत्नगंगा नांवाची एक सुंदर मुलगी झाली. नंतर आमराजानें आपली मुलगी ब्रह्मावर्तदेशाचा राजा जो कुंभीपाल त्याला दिली; व मोहेरकपुर जावयाला

आंदण म्हणून दिलें. नंतर आमराजानें धर्मारण्याला येऊन आपली राजधानी केली. धर्मारण्यांत राहणाऱ्या सर्व देवादिकांना त्यानें बोद्धधर्माचा उपदेश करून जिकडे तिकडे त्याच धर्माचा प्रसार केला. धर्मारण्यांत राहणाऱ्या ब्राह्मणांनीं राजाला पुष्कळ उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. राजा म्हणाला कीं, हें धर्मारण्यक्षेत्र ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर यांनीं निर्माण केलें आहे; परंतु ते आतां ह्या ठिकाणीं कुठें राहतात ? मला त्यांच्यांशीं काय करावयाचें आहे. त्याचप्रमाणें ज्या रामानें ह्या क्षेत्राचा उद्धार केला तो राम; व ज्याला क्षेत्ररक्षणार्थ रामानें स्थापिलें तो मारुति तरी आहे कोठें ! आम्ही राम; व मारुति; आणि रामशासन कांहीं एक जाणत नाहीं. अशी निषेधपूर्वक राजभाषा ऐकतांच ब्राह्मणांना फार वाईट वाटलें; व ते राजाला म्हणाले; राजा ! तूं मूर्ख आहेस. तूं हें भाषण गर्वानें उन्मत्त होऊन करीत आहेस; असें म्हणून खिन्न होत्साते सर्व ब्राह्मण सेतुबंधाचे ठिकाणीं जाण्याचा विचार करून निघाले.पुष्कळ दिवस मार्ग आक्रमीत व रामाचें व मारुतीचें चिंतन करीत चालले असतां अर्ध्या वाटेंतच त्यांची अन्नसामुग्री संपून त्यांस उपवास घडले. तेव्हां रामाला त्यांची दया आली; व त्यानें मारुतीला त्या ब्राह्मणांकडे पाठवून दिलें. मारुतीनें ब्राह्मणांजवळ येऊन सर्व हकीगत विचारिली असतां ब्राह्मण म्हणाले; मारुते ! आम्ही धर्मारण्याहून येथें आलों आहों. आम्ही फारच दुःखी असल्यामुळें रामाला व मारुतीला पाहण्याकरितां सेतुबंधाकडे जात आहों; तोंच आपली येथें गांठ पडली आहे. आम्हाला आमनांवाचा राजा रामाज्ञा न मानितां फारच त्रास देऊन जैनधर्माचा उद्धार करीत आहे. तो राजा रामाची व मारुतीची निंदा करीत आहे. तेव्हां त्यापासून आमचें रक्षण करा. इत्यादि ब्राह्मणांचें भाषण ऐकून मारुतीला दया आली, व तो ब्राह्मणांना म्हणाला कीं, मलाच मारुति म्हणतात; व मी रामाज्ञेवरून तुम्हाकडे आलों आहें. आपण आतां निष्काळजी असावें.

---

## अध्याय ३७ वा.

### ब्राह्मणांचें धर्मारण्यांत आगमन.

ब्राह्मणांना मारुतीचें दर्शन होतांच त्यांनीं मारुतीची पुष्कळप्रकारें स्तुति केली. ब्राह्मणांच्या स्तुतीनें संतुष्ट झालेला मारुति त्यांना वर मागण्याची आज्ञा करूं लागला असतां ब्राह्मण म्हणतात; हे मारुते ! आपण लंकेंत जातांना कोणतें रूप धारण केलें होतें तें दाखवा; तसेंच ह्या जैनधर्मप्रवर्तक राजाचा

नाश करून आमचें रक्षण करा. नंतर मारुति म्हणाला; माझें दर्शन कलियुगांत दुर्लभ आहे, तरी सुद्धां तुमच्या स्तुतीनें प्रसन्न झालेला मी तुम्हाला माझें स्वरूप दाखवितों. नंतर थोड्याच अवकाशांत मारुतीचें दिव्य व अवाढव्य रूप पाहून त्यास सर्व ब्राह्मण हसूं लागले. नंतर मारुतीनें ब्राह्मणांना पुष्कळ फळें वगैरे भक्षण करण्याकरितां दिल्यावर त्यांनीं तीं मोठ्या आदरानें भक्षण केलीं. मारुति ब्राह्मणांना म्हणाले कीं, मी स्वतः धर्मारण्यक्षेत्रांत येत नाहीं, तर तुम्हांला दोन पुड्या देतों. पैकीं एक पुडी राजाच्या द्वारावर आपटा; म्हणजे त्याला पश्चात्ताप होऊन तो तुम्हाला पूर्वस्थान देऊन, रामाज्ञा पालन करील; व दुसरी पुडी धर्मारण्यांत गेल्यावर धर्मक्षेत्रांत आपटा; म्हणजे तुमची नष्ट झालेली पुत्रपौत्रादि संतति तुम्हास मिळून तुम्ही पूर्ववत् आनंदानें राहाल. असें मारुतीचें भाषण ऐकून, व त्यानें दिलेल्या दोन पुड्या घेऊन ब्राह्मण तेथून धर्मारण्यांत येण्याकरितां निघाले. कालांतरानें धर्मारण्यांत येतांच, ब्राह्मणांना त्यांचीं मुलेंबाळें सामोरीं येऊन आनंद प्रदर्शित करूं लागलीं. दुसरे दिवशीं सर्व ब्राह्मण मारुतीनें दिलेल्या पुड्या घेऊन आमराजाकडे गेले; त्यांपैकीं कांहीं ब्राह्मण रथांत बसून, तर कांहीं पालखींत, तर कांहीं बैलावर, कांहीं घोड्यांवर, बसून आलेले आहेत; असें द्वारपालाकडून समजतांच, राजाला मोठा विस्मय वाटून त्यानें ब्राह्मणांना सभेंत बोलावण्याचा हुकूम केला.

---

# अध्याय ३८ वा.

## रामाज्ञापालन.

सभेंत ब्राह्मणांनीं राजाला कुशलप्रश्न विचारल्यावर प्रथम सामोपचारानें आमची वृत्ति आम्हाला द्या, अशी प्रार्थना केली, तरी सुद्धां राजा त्यांचें भाषण झिटकारून बोलला कीं, तुम्हाला आमचेकडून कांहींहि मिळावयाचें नाहीं, तुम्हाला जें काय हवें असेल तें रामाजवळ व मारुतीजवळ जाऊन मागा. आम्ही तुम्हाला कांहीं देणार नाहीं. असें राजाचें भाषण ऐकतांच मारुतीनें दिलेली एक पुडी ब्राह्मणांनीं दरवाज्यावर आपटली. तत्काल जिकडे तिकडे अग्नि उत्पन्न होऊन राजाचे सर्व पदार्थ व राजसेवकहि जळूं लागले. हा प्रकार पाहून राजाला पश्चात्ताप झाला; व तो ब्राह्मणांचे पायां पडून अग्नि शांत करण्याविषयीं त्यांची प्रार्थना करूं लागला; तो म्हणाला, तुम्हीं माझ्या डोळ्यांत रामनामाचें काजळ घालून मला शुद्धीवर आणिलें आहे. तुमचे मजवर फार उपकार आहेत; असे म्हणून ब्राह्मणांपुढें तो राजा लोटांगण घालूं लागला

असतां ब्राह्मणांना राजाची दया आली; व त्यांनीं दुसरी पुडी आपटली. नंतर तत्काळ अग्नि शांत होऊन ब्राह्मणांचें नष्ट झालेलें सर्व पुत्रपौत्रादि कुळ सजीव होऊन त्याठिकाणीं प्राप्त झालें. नंतर त्या दिवसापासून आमराजा रामाज्ञा पालन करून ब्राह्मणांच्या अर्ध्या वचनांत राहता झाला. त्या दिवसापासून रामभक्ति न करणाऱ्या मनुष्याला सक्तीनें रामभक्ति करण्यास लावून राजानें सर्व प्रजेला रामोपासक बनविलें. नंतर राजा ब्राह्मणांना म्हणाला कीं, मी आजपर्यंत तुम्हाला त्रास दिला, ह्याबद्दल मला जें पाप लागलें, त्याच्या निवृत्त्यर्थ आपण एकादा उपाय योजावा. नंतर ब्राह्मण राजाला म्हणतात; राजा ! तुला झालेल्या गोष्टीचा शोक करण्याचें कारण नाहीं. आवश्यक होणाऱ्या गोष्टी कधींहि बदलत नसतात; करितां तूं धर्मारण्यक्षेत्रांत स्नान करून स्वर्णादि दानें देऊन शुभकर्माचें आचरण कर; म्हणजे पापमुक्त होशील. असें ब्राह्मणांचें भाषण ऐकून राजानें त्याप्रमाणें सर्व कृत्य करून; व ब्राह्मणांना खुष ठेवून तो पापमुक्त झाला. राजानें ब्राह्मणांना त्यांच्या वृत्तिहि देऊन टाकिल्या. अशातऱ्हेनें कलियुगांत धर्मारण्यक्षेत्राची हानि झाली असतां रामप्रसादानें हें क्षेत्र पुनः पूर्ववत् भरभराटीस आलें. एकंदर धर्मारण्यक्षत्र तीन वेळां नष्ट होऊन तितके वेळां त्याचा जीर्णोद्धार झाला.

---

## अध्याय ३९ वा.

### जातीभेदवर्णन.

ब्रह्मदेव म्हणतात; नारदा ! आमराजाला उपदेश करून सन्मार्गाला लावणारे धर्मारण्यांतील ब्राह्मण रामाज्ञेचें पालन करून; व स्वकर्मांत रत होऊन स्वाध्यायादिकांचें परिशीलन करीत असतां, एकदा त्यांच्या दर्शनप्राप्तीचा इच्छेनें त्या ठिकाणीं ब्रह्मदेव, विष्णु; व शंकर हे प्राप्त झाले. ब्रह्मादि देव आलेले पाहून ब्राह्मणांना मोठा आनंद झाला; व त्यांनीं त्यांची अर्घ्यपाद्यादि मधुपर्कविधीनें पूजा केली. नंतर ब्राह्मणांनीं त्यांच्या संनिध उभें राहून स्तुतिपूर्वक वेदपठणाला प्रारंभ केला. सामवेदीय ब्राह्मणांनीं गायन करून यज्ञीय अशा 'यजामहे' ह्या चार अक्षरांच्या, 'अस्तु श्रौषट्,' ह्याहि चार अक्षरांच्या अनुवाकांचा जप केला. तसेच 'यज' ह्या दोन अक्षरांच्या, "येयजामहे" ह्या पांच अक्षरांच्या व "वौषट्" ह्या दोन अक्षरांच्या अनुवाकांचाहि जप केला. अशा ह्या पांच अनुवाक मिळून सतरा अक्षरांच्या मंत्रांचा जप करणारा विष्णुलोकाला जातो. ब्रह्मादि देवांनीं तेथील ब्राह्मणांची भक्ति व

आचार पाहून; व संतुष्ट होऊन ब्राह्मणांची प्रशंसा केली. नंतर ब्रह्मादिकांनीं चार वेदांचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांना बोलावून त्यामध्यें जातिभेद विभाग कल्पिले. आतां त्या ब्रह्मणांचीं गोत्रें पंधरा आहेत. त्यांचीं नावें अनुक्रमें भारद्वाज, वत्स, कौशिक, कुश, शांडिल्य, कश्यप, गौतम. छांदन, जातूकर्ण्य, कुंत, वसिष्ठ, धारण, आत्रेय, मांडिल, लौगाक्ष अशीं आहेत. आतां त्या ब्राह्मणांना राहण्याकरितां ब्रह्मादिकांनीं निरनिराळीं स्थानें नेमून दिलीं. तीं अनुक्रमें सीतापुर, श्रीक्षेत्र, मगोडी, ज्येष्ठलोज, शेरथा, छेद, ताली, वनोडी, गोव्यंदली, कंटावोपली, कोहेच, चंदन, थलगांव, सोहगांव, हाथंज, कपडवाणक, होडी, वनोडी, फीणा, वगोल, दृण वगैरे होत. आतां सीतापुरनगरामध्यें कुशगोत्राचे, व वत्सगोत्राचे ब्राह्मण राहतात; श्रीक्षेत्रांत छांदनसगोत्रांत उत्पन्न झालेले, वत्सगोत्रांत उत्पन्न झालेले; व कुशगोत्रांत उत्पन्न झालेले ब्राह्मण वास करितात; मगोडीपुरामध्यें मुद्गल, कुश; व भारद्वाज ह्या गोत्रांत उत्पन्न झालेले ब्राह्मण राहतात; शाहोली-नगरांत कुशवंशीय ब्राह्मण राहतात; ज्येष्ठलानगरींत वत्सगोत्रीय व कुशगोत्रीच ब्राह्मण राहतात; तसेंच शेरथा व दंताली नगरांत भारद्वाजगोत्रांतील ब्राह्मण राहतात; वटस्थानपुरामध्यें कुश, कुत्स; व भरद्वाज ह्या गोत्रांचे ब्राह्मण वास करितात. छेदपुरामध्यें भारद्वाजगोत्रीय, कृष्णवाटनगरांत कुशगोत्रीय, दहलोड-पुरींत वत्सगोत्रीय, चेखलीशहरांत वसिष्ठ व कुशगोत्रीय ब्राह्मण राहतात. त्या-प्रमाणें चांचोदरवे, देहोलोडी ह्या दोन शहरांत अत्रिगोत्री ब्राह्मण राहतात. भारद्वाज, वत्स; व कुत्स ह्या गोत्राचे ब्राह्मण ताली व वनोडी ह्या शहरांत राहतात. ह्याप्रमाणें ब्रह्मादिदेवांनीं पंचावन्न गांवांत पंधरा गोत्रांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणांची यथायोग्य स्थापना केली. आतां ‘ गोत्रदेवींची ’ व्यवस्था कशी लाविली तें सांगतों. विश्वामित्र, देवरात, दल, भार्गव, च्यवन, आप्नव, और्व, जमदग्नि ह्या प्रवरांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणांची कुलदेवता शीतवाडीया होय. आंगिरस, अंबरीष, यौवनाश्व, ह्यांची गोत्रदेवता भट्टारिका होय. भारद्वाज, कुत्स, वगैरे गोत्रांचे ब्राह्मणांची मगोडोआही कुलदेवता होय. विश्वामित्र व देवरात ह्यांची गोत्रदेवता चचाई ही होय; तशीच, वत्स व कुत्स गोत्रांचीहि देवता चचाईच आहे. अशातऱ्हेनें पंचदश गोत्रीय ब्राह्मणांच्या गोत्रदेवतांची एकंदर पंचावन्न स्थानें वर्णन केलेलीं आहेत. नंतर ब्रह्मादि देवांनीं मोढ जातींच्या ब्राह्मणांना साबरमती नदीच्या उत्तरकांठीं असणाऱ्या श्रीक्षेत्रशह-रांत राहण्यास सांगितलें. अशातऱ्हेनें सर्व व्यवस्था लावून, ब्रह्मादि देव स्वस्थानीं निघून गेले. धर्मारण्यांत राहणारे वैश्य गोसेवा व ब्राह्मणसेवा करून, मोठ्या आनंदानें राहते झाले. पुढें पुष्कळ काळ गेल्यावर विधवा अशा ब्राह्मणस्त्रियांशीं वैश्यांनीं संबंध ठेविल्यामुळें, त्यांपासून कातीभ, गोलक,

कुंड, गोवर्धन ह्या जातीचे लोक उत्पन्न झाले. ते लोक भिक्षा मागून निर्वाह करतात. ह्या वरील कातीभादिकांपासून त्रिदलज नांवाचे लोक उत्पन्न झाले. अशा तऱ्हेनें अनुलोम व प्रतिलोम अनेक जाती ह्यांपासून उत्पन्न झाल्या आहेत.

## अध्याय ४० वा.

### धर्मारण्यमाहात्म्यफलश्रुति.

ब्रह्मदेव म्हणतात; नारदा ! देवांनीं नेमून दिलेल्या आपापल्या स्थानीं अग्निहोत्रादि कर्मे करून सन्मार्गानें काळ घालवीत ते ब्राह्मण धर्मारण्यांत राहूं लागले; व आपल्या लोकांना धर्मोपदेश करून सांगूं लागले कीं, जे ब्राह्मण धर्मारण्यक्षेत्राची उपासना करितात, ते सर्वश्रेष्ठतेला प्राप्त होतात. जे रामाची मूर्ति तयार करून त्या मूर्तीचें पूजन करितात त्यांचे व्यभिचारादि सर्व दोष नाश पावतात. प्रत्येकानें आपल्या शरीरावर रामाच्या मूर्तीचें चिन्ह तप्तमुद्रेनें घ्यावें. पंक्तिभेद कधींहि करूं नये; केल्यास हजार गाईंचा नाश केल्याचें पातक लागतें. मारुतीची पूजा केली असतां तो पूजकाच्या सर्व इच्छा पूर्ण करितो. जो कोणी नियमोल्लंघन करील तो महापापी समजून त्याच्या वाक्यावर विश्वास ठेवूं नये, त्याच्याशीं अन्नपानव्यवहार करूं नये. जे कोणी मूर्ख पुरुष पाखंडमताचा स्वीकार करितात ते पूर्वपुण्यापासून पराङ्मुख होऊन नरकगतीला प्राप्त होतात. करितां प्रत्येकानें कुलाचार, स्थानाचार, गोत्राचार, ह्या सर्व सदाचारांचें पालन करावें. ह्याप्रमाणें हे धर्मा ! तुम्हाला धर्मारण्यमाहात्म्य यथाशक्ति वर्णन करून सांगितलें. ह्या धर्मारण्याला त्रेतायुगांत सत्यमंदिर हें नांव प्राप्त झाले आहे, द्वापरयुगांत वेदभवन नांव प्राप्त झालें. व कलियुगांत मोहेरक हें नांव प्राप्त होईल. कृतयुगांत ह्याला धर्मारण्य म्हणतात. जे कोणी हें धर्मारण्यमाहात्म्य श्रवण करितील त्यांचीं कायिक, वाचिक, व मानसिक अशीं त्रिविध पापें नष्ट होतील. ह्या आख्यानाच्या श्रवणानें हजार गाई दान दिल्याचें पुण्य प्राप्त होतें; व अपुत्रिकाला पुत्र, निर्धनाला धन, रोग्याचा रोगनाश वगैरे सर्व इच्छित फलहि प्राप्त होतें. पुण्यदेशामध्यें ह्या पुस्तकांचें पूजन करून दान केल्यास सर्व इच्छा पूर्ण होतात.

धर्मारण्यखंड समाप्त ॥ २ ॥

# स्कंदपुराण.

## ब्रह्मखंड ३. ( ब्रह्मोत्तरखंड ३ ).

### अध्याय १ ला.

### दाशार्हराजाचें आख्यान.

प्रथम ग्रंथारंभीं शंकराला प्रणाम करून, व्यासमहाराज ग्रंथाला प्रारंभ करितात. एकदां नैमिषारण्यांत शौनकादि ऋषि पुराणश्रवणाच्या इच्छेनें एकत्र जमले असतां त्याठिकाणीं सूतांचें आगमन झालें. ऋषींनीं सूताला अर्घ्यपाद्यादिकांनीं आतिथ्य केल्यानंतर प्रश्न केला कीं, सूता ! आपल्या मुखानें शिवमाहात्म्य श्रवण करावें; अशी आम्हाला इच्छा झाली आहे. असा शौनकादि ऋषींचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; शौनकादि मुनिहो ! तुम्हाला मी शंकराचें व शिवभक्तांचें माहात्म्य सांगतो; ऐका. सर्व मंत्रामध्यें शिवपंचाक्षरी व षडक्षरी असे दोन मंत्र श्रेष्ठ आहेत. 'ॐ नमः शिवाय' हा षडक्षरी मंत्र होय; व 'नमः शिवाय' हा पंचाक्षरी मंत्र होय. षडक्षरीमंत्रांत प्रणव असल्यामुळें त्याचा द्विजांनींच जप करावा; व स्त्रियांनीं पंचाक्षरी मंत्राचा जप करावा. ह्या मंत्राच्या जपानें सर्व सिद्धि प्राप्त होतात. ह्या मंत्राचा सतत जप करावा. हा मंत्र जपल्यास सर्व पापें नष्ट होतात. पूर्वीं मथुरानगरींत दाशार्हनांवाचा एक राजा होता. त्याची कलावती नांवाची बायको होती. एकदा त्यानें आपल्या बायकोला आलिंगन दिलें असतां त्याचा देह पत्नीच्या व्रतप्रभावानें दग्ध होऊं लागला. तेव्हां ती त्याला ह्मणते कीं, मी व्रतस्थ असल्यामुळें तुह्मी मला जो स्पर्श केला, त्यायोगें तुमची अशी स्थिति झाली. मी शिवमंत्राचा जप करीत असल्यामुळें निष्पाप झाल्ये आहे; करितां आपणहि गर्गमुनीकडे जाऊन शिवमंत्राचा उपदेश ग्रहण करावा; म्हणजे त्यामुळें तुम्हीहि माझ्याप्रमाणेंच निष्पाप होऊन सुखी व्हाल; व मला आलिंगन दिल्यास तुम्हालाहि सुख होईल. नंतर दाशार्हराजानें गर्गमुनीकडे जाऊन त्याचे मुखानें षडक्षरमंत्राचा उपदेश घेतला. उपदेश मिळताच त्या राजाचे शरीरांत असणारीं पातकें कावळ्याच्या स्वरूपानें तडफडत बाहेर पडून निघून गेलीं; व भस्म झालीं. त्या दिवसापासून तो राजा शिवमंत्राचा जप करूं लागला. तो निष्पाप होत्साता पत्नीसह आलिंगनादि क्रिडेनें रतिसुख घेऊन मोठ्या आनंदानें; व सुखानें शिवध्यान करीत राहता झाला. हें दाशार्हाख्यान श्रवण व पठण करणारे सर्वपापापासून मुक्त होतात.

---

# अध्याय २ वा.

## मित्रसहराजाची कथा.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो ! तुम्हाला आणखी एक कथानक सांगतो; ऐका. माघ कृष्ण शिवरात्रीचे दिवशीं शिवपूजन करणारे पापमुक्त होतात. एक सूर्यवंशांत मित्रसहनांवाचा राजा होता. तो अरण्यांत जाऊन मृगया करीत असतां त्याचें हातून एक राक्षस चुकून मारला गेला. त्याच्या भावानें तें पाहून त्याबद्दल राजाचा सूड घेण्याच्या बुद्धीनें स्वयंपाक्याचें सोंग घेऊन मित्रसहराजाचे नगरांत प्रवेश केला. नंतर मित्रसहराजानें आपल्या घरीं स्वयंपाक करण्याकरितां म्हणून त्या राक्षसाला ठेविलें. एकदां श्राद्धतिथि जवळ आली असतां मित्रसहानें वशिष्ठाला आमंत्रण दिलें. वशिष्ठऋषी आले असतां कपटानें त्या राक्षसानें वशिष्ठाच्या पानांत नरमांस शिजवून वाढलें. तें पाहतांच वशिष्ठाला राग आला; व त्यानें राजाला शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं राक्षसाप्रमाणें माझें पानांत नरमांस वाढलेस, त्यापेक्षां तूं बारा वर्षे राक्षस होऊन अरण्यांत हिंडशील, असा वशिष्ठाचा शाप होताच विनाकारण शाप दिल्यामुळें मित्रसहाला राग आला; व त्यानें हातांत उदक घेऊन वशिष्ठाला शाप देणार, तोंच त्या राजाची स्त्री जी मदयंती तिनें ‘ गुरूला शाप देणें योग्य नाहीं ’ असें राजाला सांगून त्यापासून त्यास परावृत्त केलें. नंतर राजानें तें उदक आपल्या पायावर टाकल्यामुळें त्याचे पाय काळे पडले; व त्यामुळें त्याला दुसरें कल्माषपाद हें नांव प्राप्त झालें. वशिष्ठशापानें तो राजा राक्षस होऊन अरण्यांत हिंडत असतां एक ब्राह्मण पत्नीसह तेथें हिंडत असलेला त्याचे दृष्टीस पडला. त्या राक्षसरूपी राजानें त्या ब्राह्मणाला मारून त्याच्या अस्थि ब्राह्मणपत्नीपुढें टाकिल्या. तिनें राजाला रागानें शाप दिला कीं, तूं माझ्या पतीला मारल्यामुळें जशी मी पतिविरहानें शोक करीत आहे, तशीच तुझी बायको तुझ्या समागमाच्या अभावामुळें शोक करील, व जर तूं स्त्रीसंग करिशील तर नाश पावशील. असा शाप देऊन तिनें पतीच्या अस्थि गोळा करून त्यांसह सहगमन केलें. बारा वर्षांनंतर कल्माषपाद आपल्या स्त्रीला झालेलें वर्तमान सांगून शोक करूं लागला. नंतर कल्माषपाद यात्रा करण्याकरितां निघाला असतां अरण्यांत केलेल्या ब्रह्महत्येच्या पातकामुळें ती ब्रह्महत्त्या पिशाचरूपानें राजाचे पाठीस लागली. वाटेंत राजाला गौतमऋषींची गाठ पडली. राजानें गौमाला साष्टांग नस्कार करून झालेलें वर्तमान सांगितलें; व ब्रह्महत्त्येचा नाश होण्याचा उपाय विचा-

रिला. तेव्हां गौतम म्हणतात; राजा! तू गोकर्णक्षेत्रांत जाऊन महाबळेश्वराचें पूजन कर; म्हणजे ब्राह्महत्त्यादि महापातकांपासून मुक्त होशील. त्या महाबळेश्वराची स्थापना गजाननानें केली असून त्याठिकाणीं महाबळेश्वराचें पूजन करून; व तप करुन सनत्कुमार, अग्नि, मदन, रावण, कुंभकर्ण, इत्यादिकांना सिद्धि प्राप्त झाल्या. तूं माघी शिवरात्रीला तेथें जा; व पूजन कर. मीहि आतां गोकर्णक्षेत्रांतूनच येथें आलों आहे. येतांना वाटेंत एक चमत्कार पाहिला.

---

## अध्याय ३ रा.

---

### गोकर्णक्षेत्रमाहात्म्य.

गौतमऋषि म्हणतात; राजा! मी तुम्हाला गोकर्णक्षेत्रमाहात्म्य सांगतों; ऐका. मी गोकर्णक्षेत्रांतून परत येत असतां एका वडाचे झाडाखालीं विश्रांति घेण्याकरितां बसलो. जवळच एक वृद्ध मरणोन्मुख झालेली चांडाळीण माझे दृष्टीस पडली. थोड्याच वेळानें शिवदूत त्याठिकाणीं एक विमान घेऊन प्राप्त झाले, मी त्यांना प्रश्न केला कीं, तुम्ही हें विमान घेऊन घेऊन कोणाचा उद्धार करण्याकरितां जात आहां! तेव्हां शिवदूत मला म्हणतात, ही चांडाळीण मरणोन्मुख झाल्यामुळें हिला नेण्याकरितां शंकरानें आम्हांला पाठविलें आहे. मी त्यांस म्हणालो कीं, ही चांडाळीण दुराचारी; व महापातकी असतां हिचा उद्धार करण्याजोगें हिनें एवढें कोणतें पुण्य केलें होतें कीं, ज्यामुळें तुम्ही हिचा उद्धार करण्याकरितां येथें आला आहां. असें मीं म्हटल्यानंतर शिवदूत म्हणाले कीं, ही चांडाळीण पूर्वजन्मीं कैकयनांवाच्या ब्राह्मणाची मुलगी होती. हिचें नांव सुमित्रा होतें; ती पतीसह कांहीं दिवस आनंदांत राहत असतां, कांहीं काळानें तिचा पति मृत झाला; व सुमित्रा विधवा झाली. ती तरुण असल्यामुळें एका शूद्राचे घरीं जाऊन, व्यभिचार करूं लागली. एके दिवशीं शूद्र अरण्यांत गेला असतां, ह्या सुमित्रेनें मद्यपान करून, मद्याच्या धुंदींत बकरीच्या ऐवजीं एक गाईचें वासरूं मारून त्याचें मस्तक शिंक्यावर ठेविलें. सावध होऊन तिच्या लक्ष्यांत ही चूक येऊन तिनें 'शिव शिव' असें म्हणून तें गाईच्या वासराचें मस्तक फेंकून दिलें; व गाईचें वासरूं वाघानें मारिलें, असें लोकांत प्रसिद्ध केलें. नंतर ती मृत होऊन तिला दुसरा हा चांडाळाचा जन्म प्राप्त झाला. ही चांडाळजन्माला येतांच हिचे आई–बाप निवर्तले. ही उच्छिष्ट अन्नानें आपला निर्वाह करूं लागली. ही जन्मांध असल्यामुळें अडखळत अडखळत यात्रेकरूं-

बरोबर गोकर्णास आली. आज शिवरात्र असल्यामुळें हिला कोणींहि अन्न दिलें नाहीं; त्यामुळें हिला उपवास घडला. ही आज भिक्षा मागत असतां एकानें थट्टेनें हिला एक बिल्वपत्र दिलें. हिनें ही खाण्याची वस्तु नव्हे, असें समजून तें पत्र फेंकून दिलें, तें शिवलिंगावर पडलें; त्यामुळें हिचेकडून अनायासें शिवपूजन घडलें. आतां ह्या शिवपूजनानें हिचीं सर्व पापें दग्ध होऊन शंकरानें हिला शिवलोकीं नेण्याकरितां हें विमान घेऊन आम्हाला पाठविलें आहे. असें म्हणून त्या शिवदूतांनीं चांडाळणीला विमानांत घालून शिवलोकीं नेलें. कितीहि पापी पुरुष असला तरी शिवपूजेनें निष्पाप होऊन शिवलोकीं जातो. आतां तूंहि तेथें जा; म्हणजे निष्पाप होशील; असें म्हणून गौतमऋषि तेथून निघून गेले. मित्रसहराजा गौतमाच्या सांगण्याप्रमाणें गोकर्णाला जाऊन व महाबळेश्वराचें पूजन करून ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त झाला; व अंतीं शिवलोकाला गेला.

## अध्याय ४ था.

### विमर्दनराजाची कथा.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! तुम्हाला आणखी एक एक शिवमाहात्म्यासंबंधी कथा सांगतों; ऐका. शिवपूजा ही भवसागर तरून जाण्यास नौकेप्रमाणें एक साधन आहे. जर मनुष्य शिवपूजा करण्यास असमर्थ असेल तर त्यानें शिवपूजेचें अवलोकन करावें; म्हणजे सुद्धां पापापासून मुक्तता होते. पूर्वी किरातदेशांत विमर्दननांवाचा एक राजा होता; तो शिवभक्त असूनहि मांसभक्षक होता; व व्यभिचारीहि होता; परंतु तो नित्य शिवपूजन करीत असे. त्या राजाची कुमुद्वतीनांवाची एक बायको होती. तिनें राजाला प्रश्न केला कीं, आपलें आचरण आश्चर्य करण्यासारखें आहे; कारण आपण एकीकडे शिवपूजन करिता; व दुसरीकडे व्यभिचार, मांसभक्षण वगैरे दुर्वर्तनहि करितां; तरी असें कां; व आपण पूर्वजन्मीं कोण होता, तेंहि सांगा. नंतर विमर्दनराजा पत्नीला म्हणतो, प्रिये! पूर्वजन्मीं मी कुत्रा होतों. त्यावेळीं मी पंपानगरींत राहून आपलें उदरंभरण करीत असे. एकदां त्याच नगरींत असलेल्या शिवमंदिरांत मीं प्रवेश केला असतां तेथील लोकांनीं मला काठीनें खूप ताडण केलें; त्यायोगें मी गतप्राण होऊन शिवमंदिरासमोर येऊन पडलों. नंतर राजपत्नीनें राजाला स्वतःचें पूर्ववृत्त विचारिल्यावरून राजा ह्मणला; प्रिये! तूं पूर्वजन्मीं घार होतीस. तूं तोंडांत मांसपिंड धरून आकाशमार्गानें जात असतां, तो मांसपिंड मिळण्याच्या

हेतूनें एका गिधाडानें तुजवर झडप घातली. नंतर तूं आपला बचाव करण्याकरितां श्रीगिरीपर्वतावर असलेल्या एका शिवमंदिरासभोवार प्रदक्षिणा घालूं लागलीस; त्यावेळीं त्या गिधाडानें तुला मारून तो मांसपिंड तुझ्यापासून हरण केला. तुला अंतकाळीं शिवप्रदक्षिणा घडल्यामुळें ह्या जन्मीं तुला राजकुळांत जन्म प्राप्त झाला. तीच तूं सांप्रत माझी स्त्री झाली आहेस. आतां पुढील जन्मीं मी सिंधुदेशाचा राजा होईन व तूंच माझी पत्नी होशील. तिसरे जन्मीं मी सौराष्ट्रदेशाचा राजा होऊन तूं कलिंगदेशाच्या राजाची मुलगी होऊन मलाच वरिशील. चवथे जन्मीं मी गांधारराजा होईन; व तूं मागधकन्या होऊन माझी पत्नी होशील. शेवटीं मी पांड्यराजा; व तूं विदर्भराजाची कन्या होऊन माझ्याशींच विवाह लावशील. अशातऱ्हेनें जन्म घेऊन व शेवटीं पुत्राला राज्यावर बसवून आपण उभयतां शिवपूजनानें शिवलोकाला प्राप्त होऊं.

---

# अध्याय ५ वा.

## चंद्रसेनाख्यान.

सूत ह्मणतात; शौनकादि ऋषिहो ! सर्व जगाला व्यापून राहिलेले शंकरच सर्वांचे गुरु, बंधु; व जीवरूप होत. शंकरावांचून दुसरी श्रेष्ठ वस्तु नाहीं. भक्तीनें थोडें जरी शिवाला अर्पण केलें, तरी तें अनंत फल देणारें आहे. पूर्वी उज्जयिनीनगरांत एक चंद्रसेननांवाचा राजा होता. तो पराक्रमी असून शिवभक्त होता. त्या चंद्रसेनाला मणिभद्रराजानें एक मणि बक्षिस म्हणून दिला. त्या मण्यापासून नानाप्रकारचीं रत्नें उत्पन्न होत. तो मणि सतत चंद्रसेनाच्या गळ्यांत असे. इतर राजांनीं चंद्रसेनाजवळ त्या मण्याची मागणी केली; परंतु त्यानें तो मणि त्या राजांस दिला नाहीं, त्यामुळें इतर राजे चंद्रसेनाचा द्वेष करीत असत. कांहीं काळानें तो मणि घेण्याच्या इराद्यानें सर्व राजांनीं सैन्यासह एकत्र होऊन चंद्रसेनावर चाल केली, व उज्जयनीनगरीला वेढा दिला. चंद्रसेनाला ह्यांच्याबरोबर टिकाव लागेलसें न वाटल्यावरून त्यानें शिवपूजनास प्रारंभ करून शंकरच हें संकट निवारण्यास समर्थ आहे, अशा कल्पनेनें त्याची प्रार्थना केली. चंद्रसेन शिवपूजन करीत असतां तेथें अनेक मुलें ती पूजा पाहण्याकरितां जमली. त्यांत एक गवळ्याचा मुलगा ती पूजा पाहून परत घरीं आल्यावर त्यानें तशीच एका ओसाड मैदानांत शंकराची पूजा करण्यास प्रारंभ केला. शिवलिंगाचे जागीं एका दगडाची कल्पना करून; व पुष्पादि उपचारांचे जागींहि रेती,

दगड, माती, पालापातेरा ह्यांची योजना करून त्यानें पूजा केली. त्या मुलाच्या मातेनें तो प्रकार पाहून; व हा दगडामातीशीं उगाच खेळत बसला आहे, अशा कल्पनेनें त्या मुलानें केलेली शिवपूजा लाथेनें झुगारून दिली. नंतर आपल्या पूजेचा मातेनें भंग केला; म्हणून तो गवळ्याचा मुलगा फारच शोक करून मोठमोठ्यानें रडूं लागला; व भूमीवर त्यानें लोळण घेतली. पुढें तो मुलगा शंकराची स्तुति करून त्याचेजवळ पूजाभंग केल्याबद्दल क्षमा मागूं लागला असतां अकस्मात् तेथें शंकर प्रगट झाले; व जेथें तो मुलगा पूजा करीत होता, तेथें एक मोठें मंदिर तयार झालें; त्या मंदिरांत राजोपचारयुक्त असें एक भव्य लिंगहि उत्पन्न झालें. शंकर त्या मुलाला म्हणतात; मुला! तुझी भक्ति पाहून मी तुजवर प्रसन्न झालों आहें; वर माग. तेव्हां तो गवळ्याचा मुलगा शंकरास म्हणाला; देवा! मी आपल्या आईला तुमच्या दर्शनास घेऊन येतों, तिला आपण दर्शन द्यावें, असें म्हणून तो आपल्या आईला बोलावून शंकराकडे घेऊन आला. मुलाच्या आईलाहि तें पाहून फार वाईट वाटलें; व तिनेंहि शंकराची प्रार्थना करून क्षमा मागितली. इतकें होतें तोंच ही बातमी सर्व नगरांत पसरून उज्जयनींतील सर्व लोक तेथें जमले. राजाहि त्या मुलाच्या दर्शनास तेथें आला. नंतर शंकर त्या मुलास; व तेथील राजास आशीर्वाद देऊन गुप्त झालें. तितक्यांत मारुति तेथें येऊन त्या मुलाला त्यानें वर दिला कीं, तुझ्या वंशांत भगवंताचा अवतार उत्पन्न होऊन तुझ्या वंशाची दिगंत कीर्ति फाकेल. हा प्रकार पाहून; व ह्या राजाला शंकराचें साहाय्य आहे, असें समजून चंद्रसेनाचे शत्रु त्या राजाशीं सख्यत्वानें वागूं लागले; व चंद्रसेन शिवभक्ति करून त्या गवळ्याच्या मुलासह शिवलोकीं गेला.

---

## अध्याय ६ वा.

### प्रदोषमाहात्म्य.

शौनकादि ऋषींनीं सूताला प्रदोषमाहात्म्य विचारल्यावरून सूत म्हणतात; ऋषिहो! प्रदोषकाल म्हणजे सूर्यास्ताचा समय होय. प्रत्येक त्रयोदशीच्या प्रदोषकाळीं केलेल्या शिवपूजनाचें माहात्म्य विशेष आहे. सर्वदेवता ह्याच प्रदोषकाळीं कैलासपर्वतावर शंकराकडे येऊन; व नृत्यगायनादि करून शिवपूजनहि करितात; म्हणून त्याकाळीं केलेल्या शिवपूजनानें ऐहिक सुख व पारलौकिक मोक्ष प्राप्त होतो. पूर्वी विदर्भनगरांत सत्यसंधनामक एक राजा राहत असे. तो पुष्कळ वर्षें नीतीनें राज्य करीत असतांहि त्याच्यावर शत्रूंनीं चाल

करून नगराला वेढा दिला. त्या राजाचें शत्रूंबरोबर युद्ध होऊन त्यांत राजाचा पराभव झाला. त्या राजाची एक पतिव्रता स्त्री होती. शत्रू आपल्याला कदाचित् पळवून नेतील, ह्या भीतीनें तिनें अपरात्रीं एका अरण्याचा रस्ता धरला. एका निबिड अरण्यांत तिला एक सरोवर आढळलें. ती गरोदर होती; व तेथें एका झाडाखालीं ती बसली असतां तेथेंच प्रसूत झाली. नंतर ती तहानेनें व्याकुळ होऊन पाणी पिण्याकरितां सरोवरांत शिरली असतां त्या सरोवरांत असणाऱ्या एका सुसरीनें तिला पाण्यांत ओढून नेलें; व तेथें एकटांच अगदी लहान असा तो मुलगा रडत बसला. नंतर थोडक्याच वेळांत एक विधवा बाई कडेवर एक वर्षाचा मुलगा घेऊन तेथें आली. ह्या मुलाला घरीं न्यावें कीं नाहीं, ह्या विचारांत ती आहे, तोंच तेथें संन्यासवेष घेतलेल्या शंकरानें हा राजपुत्र आहे; व ह्याला घरीं घेऊन जा, असें सांगतांच ती विधवा बाई त्या मुलाला घेऊन एकचक्रनांवाच्या नगराला प्राप्त झाली. तेथें आपल्या मुलाचें व राजपुत्राचें पोषण करून राहिली असतां एकदां ती त्या दोन मुलांना घेऊन शंकराचे देवालयांत गेली. तेथें असलेल्या शांडिल्यनामक ऋषीनें त्या मुलांकडे आश्चर्यचकित दृष्टीनें पाहून म्हटलें; बाई ! हा राजपुत्र किती दैवहीन आहे पहा ! हा विदर्भराजाचा मुलगा. शत्रूंनीं ह्याच्या बापाला युद्धांत मारल्यामुळें ह्याची आई गरोदर असतां अरण्यांत निघून गेली. तेथें ही सरोवरांत पाणी पिण्याकरितां गेली असतां तिला सुसरीनें ओढून पाण्यांत नेलें; व हा राजपुत्र असतांहि ह्याला सांप्रत भिक्षा मागण्याची पाळी आली आहे. नंतर ती बाई त्या ऋषीला म्हणते; ऋषे ! ह्या पुत्राची अशी स्थिति कां व्हावी, ह्यानें पूर्वजन्मीं कोणतें पाप केलें होतें, तें सांगा. शांडिल्य ऋषि म्हणाले; बाई ! पूर्वजन्मीं ह्याचा बाप पांड्यदेशाचा राजा होता. तो शिवपूजा करीत असतां शत्रु आपणावर चाल करून आलेले पाहून पूजा समाप्त न करतां तशीच टाकून शत्रूंबरोबर युद्ध करण्याकरितां गेला; त्यामुळें शंकरानें रागावून त्याला ह्या जन्मीं अल्पायुष्य दिलें; व तो युद्धांत मारला गेला. हा राजपुत्रहि पूर्वजन्मीं पूजाभंगाच्याच दोषामुळें ह्या जन्मीं अशा दुःस्थितीला प्राप्त झाला आहे. करितां शिवपूजेचा कधींहि भंग करू नये. आतां तूं प्रदोषव्रताचें आचरण कर; म्हणजे सर्व विपत्तीपासून मुक्त होऊन; व अंतकाळीं निष्पाप होऊन शिवलोकाला प्राप्त होशील.

---

# अध्याय ७ वा.

## प्रदोषकालवर्णन.

त्या बाईनें शांडिल्य ऋषीस शिवाच्या प्रदोषपूजेचा विधि विचारल्यावरून शांडिल्य ऋषी म्हणाले; बाई! दोन्ही पक्षांतील त्रयोदशीला उपोषण करून सूर्यास्ताचे पूर्वी तीन घटका अवशिष्ट आहेत, तोंच स्नान करावें; व धौतवस्त्र परिधान करावें. नंतर शुद्धरीतीनें भूमि सारवून शिवपूजेस प्रारंभ करावा. सुगंधित द्रव्यें, सुगंधि फुलें इत्यादि पंचामृतासह षोडशोपचार विधीनें शंकराची पूजा करावी. शेवटीं परमेश्वराची प्रार्थना करावी. अशातऱ्हेनें पूजा केली असतां ऋण, दारिद्र्य इत्यादिकांचा नाश होतो. तूं ह्याप्रमाणें प्रदोषपूजा कर; म्हणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील. शांडिल्यऋषीनें त्या दोन पुत्रांना शिवमंत्राचा उपदेश केला. ती बाई आपल्या दोन पुत्रांसह घरीं येऊन ऋषीनें सांगितल्याप्रमाणें प्रदोषव्रत करती झाली. कित्येक दिवस गेल्यावर ते दोघे मुलगे वनांत गेले असतां तेथील एक दरडी ढासळून त्यांत एक सोन्याचा घट त्यांस सांपडला. तो घेऊन व मोठ्या आनंदानें ते दोघे पुत्र आपल्या आईकडे परत येऊन झालेलें सर्व वर्तमान निवेदन करते झाले. नंतर ती आई मुलांना म्हणाली; आपल्यावर गुरूचा व शिवाचा प्रसाद होऊन हें द्रव्य आपणास मिळालें आहे. त्या दिवसापासून त्यांचें सर्व दारिद्र्य नष्ट होऊन चांगल्या स्थितीला ती प्राप्त झाली. पुढें मध्यंतरीं कित्येक दिवस निघून गेल्यानंतर एका उन्हाळ्याच्या दिवसांत ते दोन पुत्र अरण्यांत क्रीडा करण्याकरितां गेले असतां कित्येक गंधर्वांच्या मुली त्याठिकाणीं प्राप्त झाल्या. राजपुत्रानें त्या मुलींना पाहून; व ब्राह्मणपुत्राला तेथेंच ठेवून त्या मुलींच्या जवळ गमन केलें. त्या मुली जवळ आलेल्या राजपुत्राला पाहून लज्जित झाल्या; व आश्चर्यानें त्याजकडे पाहूं लागल्या. त्यांपैकीं द्रविक नांवच्या गंधर्वाच्या मुलीनें इतर मुलींना फुलें आणण्याकरितां म्हणून दूर पाठवून राजपुत्राला ह्मटलें कीं, मी तुम्हाला अंतःकरणपूर्वक वरिलें आहे; असें म्हणून त्याच्या गळ्यांत तिनें एक पुष्पमाळा घातली. राजपुत्रानें आपली स्थिति तिला सांगून तिचें सर्व म्हणणें कबूल केलें. द्रविक नांवाच्या गंधर्वानेंहि त्या मुलीचा राजपुत्राबरोबर विवाह लाविला. गंधर्वाच्या साहाय्यानें राजपुत्राला पूर्वीचें राज्यहि प्राप्त झालें; व त्यायोगें त्या बाईला व ब्राह्मणालाहि ऐश्वर्य प्राप्त होऊन मोठा आनंद झाला. हा सर्व प्रदोषपूजेचा महिमा आहे. प्रदोषपूजेच्या योगानें सर्व सुखें प्राप्त होऊन अंतीं मोक्षहि प्राप्त होतो.

# अध्याय ८ वा.

## सोमवारव्रतमाहात्म्य.

सूत ह्मणतात; शौनकादि ऋषिहो ! सच्चिदानंदस्वरूप जो शंकर त्याचें पूजन केलें असतां कार्यसिद्धि होते. त्यामध्यें विशेषेंकरून सोमवारीं प्रदोषकाळीं शिवपूजन केलें असतां विशेष फल प्राप्त होतें. आर्यावर्तदेशांत चित्रवर्मा नांवाचा एक राजा होता. त्याला सीमंतिनी नांवाची एक कन्या झाली. तिचें जातक वर्तवीत असतां एका ज्योतिषानें हिला चौदावें वर्षी वैधव्य प्राप्त होईल, असें सांगितलें. पुढें कांहीं दिवसांनीं आपल्याला चौदावें वर्षी वैधव्य प्राप्त होणार, असें समजताच सीमंतिनीनें याज्ञवल्क्यऋषीच्या मैत्रेयी नांवाच्या पत्नीजवळ जाऊन वैधव्यनाशनार्थ उपाय विचारिला; तेव्हां मैत्रेयी ह्मणत्ये, कन्ये ! तूं प्रत्येक सोमवारीं प्रदोषकाळीं भक्तियुक्त अन्तःकरणानें शिवपार्वतीचें पूजन कर; व कितीहि दुर्घट संकट प्राप्त झालें, तरी तूं हें पूजनव्रत सोडूं नको; ह्मणजे तुझें सौभाग्य वाढून अक्षय्यपणाला प्राप्त होईल. सीमंतिनी त्यादिवसापासून प्रत्येक सोमवारीं दिवसा उपोषण करून प्रदोषकाळीं शिवपार्वतीपूजन करीत असे. पुढें कांहीं दिवसांनीं सीमंतिनी उपवर झाली, असें पाहून चित्रवर्म्यानें चित्रांगद नांवाच्या एका राजपुत्रास आपली सीमंतिनी मुलगी मोठ्या समारंभानें विवाहविधीनें अर्पण केली. एकेदिवशीं तो चित्रांगद नौकेंत बसून जलक्रीडा करण्याकरितां नदीवर गेला असतां तेथें पाण्यांत बुडाला, तों पाताळीं नागकन्यांनीं नेऊन तक्षकापुढें उभा केला. त्याला पाहून तक्षकाला आनंद झाला. तक्षकानें चित्रांगदाला अमृत पाजून; व त्यास अनेक अमोल्य रत्नें वगैरे देवून; व आपला मुलगा त्याचे बरोबर पाठवून त्या चित्रांगदाची परत रवानगी केली. इकडे सीमंतिनी पतीच्या विरहानें अत्यंत शोक करूं लागली; तथापि तिनें सोमवारव्रत सोडिलें नाहीं. चित्रांगदाचीं मातापितरें दुःखानें विलाप करीत असतां शत्रूंनीं त्याचें राज्यहि बळकावून घेतलें. चित्रांगद तक्षकपुत्रासह घोड्यावर बसून जेथें पूर्वी बुडाला होता, तेथूनच बाहेर पडला. त्याचदिवशीं सोमवार असल्यामुळें सीमंतिनीहि आपल्या सख्यांसह तेथें आली होती. नंतर सिमंतिनीची; व चित्रांगदाची दृष्टादृष्ट झाली; परंतु सीमंतिनीला वाटलें कीं, माझा पति पाण्यांत बुडून मृत झाला, तो परत येणें शक्य नाहीं, ह्या शंकेनें ती जरा विचारांत पडली. चित्रांगदानेंहि वैधव्यधर्मानें वागणाऱ्या सिमंतिनीला पाहून फारच दुःख केलें. नंतर चित्रांगदानें तिचें सर्व वृत्त तिच्या सखिजनाकडून

समजवून घेऊन; व सीमंतिनीचा हात धरून तिच्या कानांत सांगितलें कीं, तुझा पति लवकरच तुला भेटेल; त्याबद्दल तूं काळजी करूं नको. असें त्याचें भाषण ऐकतांच हाच माझा पती असावा; असें सीमंतिनीस वाटलें; कारण माझ्या पतीवांचून माझा हात धरण्याची कोणाची ताकत आहे; व हा माझ्या पतीसारखाच दिसतो, शंकर कृपा करून हें खरें करो; असें ह्मणून सीमंतिनी परत स्वस्थानाला गेली. नंतर चित्रांगदानें तक्षकपुत्राला आपल्या राज्यांत पाठवून शत्रूंना निरोप कळविला कीं. चित्रांगद हा पाताळांतून अमृत पिवून; व दहाहजार हत्तींचें बळ संपादन करून येथें आला आहे; आतां त्याचे-पुढें तुमचा टिकाव लागणार नाहीं, करितां तुह्मी निमूटपणें येथून निघून जा. ह्याप्र णें चित्रांगदाचा निरोप ऐकतांच शत्रूंनीं चित्रांगदाच्या बापाला तें हिरावून घेतललें राज्य परत दिलें. चित्रांगद घोड्यावर बसून सीमंतिनीच्या घरीं आल। त्याला पाहतांच सर्वांना आनंद होऊन पुनः सीमंतिनीचें व चित्रांगदाचें मोठ्या मारंभानें लग्न लागलें. चित्रांगद सीमंतिनीसह पुष्कळ वर्षें राज्य करूं लाग ला. सीमंतिनीला पुढें आठ मुलगे; व एक मुलगी झाली. सौभाग्यवर्धन होण्य स सोमवारव्रत सर्वश्रेष्ठ आहे; व ह्याच व्रताच्या प्रभावानें सीमंतिनीचें न ष्ट झालेलें सौभाग्य पुनः तिला मिळून तें उत्तरोत्तर वाढूं लागलें.

---

# अध्याय ९ वा.

## सीमंतिनीचरित्र.

शौनकादिऋषींनीं सूताला सीमंतिनीचरित्र ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून सूत म्हणतात; ऋषिहो ! पूर्वीं विदर्भदेशांत वेदमित्रनांवाचा एक ब्राह्मण होता. त्याचा एक सारस्वत नांवाचा मित्र होता. पुढें वेदमित्राला सुमेधनांवाचा मुलगा झाला. ते दोघेहि मुलगे वेदशास्त्रांत पारंगत झाले. पुढें ते दोघे बापाच्या सांगण्यावरून राजाकडे द्रव्य मिळविण्याकरिता गेले असतां राजाहि त्या दोघांची विद्या पाहून संतुष्ट झाला; व त्यांस थट्टेनें म्हणाला; ब्रह्मपुत्रहो ! माझी तुह्माला एक आज्ञा आहे, ती ही कीं, निषधदेशांत सीमंतिनी नांवाची एक राजपत्नी आहे. ती नित्य दांपत्यपूजन करीत असते; तरी तुम्हांपैकीं एकानें स्त्रीवेष घेऊन दांपत्यस्वरूपानें तुम्ही दोघांनीं तिजकडे जावें; म्हणजे सीमंतिनीहि तुजची पूजा करून तुम्हाला पुष्कळ द्रव्य देईल; व नंतर येथें आल्यावर मीहि तुम्हाला पुष्कळ द्रव्य देईन, असें राजवाक्य ऐकतांच त्या दोघां ब्राह्मणपुत्रांनीं राजाला म्हटलें कीं, आपण सांगितलेली गोष्ट फार निंद्य

असल्यामुळें आह्मी ती करण्यास कबूल नाहीं; व अशातऱ्हेनें आह्माला द्रव्य मिळविण्याची गरज नाहीं. राजानें त्या दोघांच्या असें करण्याबद्दल फारच विनवण्या करून आग्रह केल्यामुळें त्या दोघांनीं तें कबूल केलें. नंतर राजानें एकाला स्त्रीवेष देऊन दोघांना सीमंतिनीकडे पाठविलें. ते दोघें दांपत्यस्वरूपानें सीमंतिनीकडे प्राप्त झाले. सीमंतिनीनें आपल्या पुण्यप्रभावानें जरी हें दांपत्य कृत्रिम आहे, असें जाणिलें होतें. तरी सुद्धां अतिथी विन्मुख न व्हावा, ह्या बुद्धीनें त्यांची पूज्यभावनेनें; व शिवपार्वती ह्या दृष्टीनें पूजा केली; व पुष्कळ द्रव्यहि त्यांस दिलें. ते दोघे परत येण्यास निघाले असतां स्त्रीवेषधारी ब्राह्मणपुत्राचें पुरुषत्व सीमंतिनीच्या तपःप्रभावानें नष्ट होऊन वेषाला अनुरूप स्त्रीत्वच त्याला प्राप्त झालें; व वाटेंत दुसऱ्या ब्राह्मणपुत्राची म्हणजे कृत्रिम पतीची चेष्टा करण्यास स्त्रीवेषधारी ब्राह्मणानें सुरुवात केली. हें वर्तमान राजाला समजताच त्यालाहि आश्चर्य वाटलें; व त्याला पुरुषत्व पुनः प्राप्त होण्याविषयीं राजानें अनुष्ठानहि केलें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या ब्राह्मणपुत्राचा बापहि वंशक्षय झाल्यामुळें राजाला पुष्कळ दोष देऊं लागला. नंतर स्त्रीवेषधारी ब्राह्मणाचा विवाह त्याच्याच मित्राबरोबर म्हणजे सुमेधाशीं लाविला. सारस्वतालाहि मुलगा होऊन त्याचीहि वंशवृद्धि झाली. तात्पर्य; शिवभक्तांच्या हातून जो प्रकार होतो, तो बदलण्यास कोणतीहि देवता समर्थ होत नाहीं.

---

## अध्याय १० वा.

### भद्रायूचरित्र.

सूत म्हणतात;–शौनकादिक ऋषिहो! शिवभक्तांचें चरित्र व शिवाचें माहात्म्य हीं सर्व पापें समूळ नाश करण्यास समर्थ आहेत. पूर्वीं अवंतिनगरामध्यें एक विषयी ब्राह्मण होता, तो पिंगला नामक वेश्येचेठिकाणीं सतत रममाण होत असे. कित्येक दिवस ह्याप्रमाणें मध्यंतरीं निघून गेल्यावर, ऋषभनांवाचा एक योगी पिंगलेच्या घरीं प्राप्त झाला. पिंगलेनें; व त्या ब्राह्मणानें ऋषभयोग्याला आसनादि देऊन, त्याची अर्घ्यपाद्यादि उपचारांनीं पूजा केली. सायंकाळीं त्या ऋषभदेवाला आपल्या उत्तम शय्येवर निजवून, त्याची रात्रभर दोघांनीं सेवा केली. दुसरे दिवशीं तो योगी निघून गेला; परंतु सेवारूपी पुण्यप्रभावानें त्या ब्राह्मणाला एका राजकुलांत दशार्णदेशाच्या वज्रबाहु राजाच्या सुमतीनामक स्त्रीचेठिकाणीं जन्म प्राप्त झाला; आणि पिंगलावेश्येला सीमंतिनीचे पोटीं कीर्तिमालिनी नांवानें जन्म प्राप्त झाला.

सुमती गरोदर असतांच तिच्या सवतींनीं तिला विष दिल्यामुळें, तें विष सुमतीच्या व त्या पुत्राच्या अंगावर व्रणादिकाच्या योगें बाहेर उमटलें. राजानें सुमतीच्या व पुत्राच्या रोगनाशार्थ पुष्कळ उपाय केले; पण व्यर्थ. शेवटीं राजानें कंटाळून पुत्रासह सुमतीला रथांत घालून, अरण्यांत नेऊन सोडून दिलें. ती पुत्राला कडेवर घेऊन रानांतून हिंडत असतां, तिला एक मोठा रस्ता दिसला; व ती त्या रस्त्यानें पद्माकरराजाच्या एका नगराला प्राप्त झाली. ती पुत्रासह राजवाड्याजवळ येतांच राजाच्या दासिंनीं तिला वाड्यांत बोलाविलें; व राजाला सर्व हकीगत सांगितली. राजानें सुमतीला विचारपूस करून;व ही वज्रबाहूची पत्नी असल्यामुळें तिला स्वतंत्ररीतीनें निराळ्या एका महालांत ठेऊन तिची सर्व व्यवस्था; व औषधोपचारहि उत्तम प्रकारें चालविले. थोडक्याच दिवसांत सुमतीच्या पुत्राचें दुखणें फारच वाढून तो मृत झाला; व सुमती शोक करूं लागली. इतक्यांत शिवयोगी सुमतीजवळ येऊन अनेक ब्रह्मज्ञानाच्या तिला गोष्टी सांगून तिचें समाधान करू लागला. सुमतीची ती दुःखकारक स्थिति पाहून शिवयोगीला दया आली; व त्यानें शिवमंत्रानें अभिमंत्रित केलेलें भस्म सुमतीच्या पुत्राच्या अंगाला लाविलें. भस्माचा अंगाला स्पर्श होतांच तो मुलगा सावध होऊन; व नेत्र उघडून क्षुधित होत्साता रडूं लागला. त्यावेळीं सुमतीला पुत्र सजीव झाल्यामुळें अत्यानंद होऊन तिनें त्याला दूध वगैरे पाजिलें, व त्याची क्षुधा निवारण केली. शिवयोगीनें तेंच भस्म पुनः सुमतीच्या व त्या मुलाच्या अंगाला लावतांच तीं दोघें निरोगी व सुस्वरूप; व तेजस्वी अशीं झालीं; व शिवयोगीला साष्टांग नमस्कार घालून तीं त्याची स्तुति करूं लागली. शिवयोगीनें त्या मुलाचें नाव भद्रायु असें ठेविलें; व आशीर्वाद दिला कीं, तुम्ही उभयतां पुष्कळ वर्षे आनंदानें राहून निरोगिस्थितींत सतत वास्तव्य कराल. ह्या भद्रायूलाहि लवकरच राज्यप्राप्ति होईल; व हा पुत्र कीर्तिमान्, विद्वान्; व पराक्रमी होईल. तूं हा पुत्र मोठा होईपर्यंत पद्माकराचे घरींच राहा; असें सुमतीला सांगून शिवयोगी निघून गेले.

---

## अध्याय ११ वा.

---

### भद्रायूस उपदेश.

सुमती ही भद्रायूसह ज्या पद्माकरराजाकडे राहिली होती त्या राजालाहि भद्रायूएवढाच एक लहान पुत्र होता. पद्माकरानें आपला मुलगा; व भद्रायु वयानें थोडे मोठे होतांच, त्यांचें मौंजीबंधन केलें. पुढें थोडक्याच दिवसांत

ते दोघेहि वेदशास्त्रांत पारंगत होऊन, शस्त्रविद्येंतहि निपुण झाले. पुढें भद्रायु सोळा वर्षांचा झाला असतां, शिवयोगी भद्रायूजवळ प्राप्त होऊन त्याला आशीर्वाद देता झाला. सुमतीनें शिवयोगीला पाहून; व हाच आपलें संकट दूर करणारा सिद्धपुरुष होय, असें ओळखून तिनें त्याची पाद्यादिविधीनें पूजा केली. शिवयोगीनें सुमतीला कुशलप्रश्न विचारितांच; तिनें भद्रायूला शिवयोगीचे पायावर घालून म्हटलें कीं, आपल्या कृपेनें आज मी पुत्रवती झाल्ये आहे. आपले मजवर झालेले अनंत उपकार माझ्या हांतून शेंकडो जन्म घेतले तरी फिटणार नाहींत, अशातऱ्हेनें सुमतीनें शिवयोगीची पुष्कळ स्तुति केली. शिवयोगीनें सुमतीचें भाषण ऐकून मोठ्या प्रेमानें भद्रायूला अनेक आशीर्वाद दिले; व त्यास राजनीतीचा उपदेश केला. शिवयोगी भद्रायूस ह्मणतो; पुत्रा! तूं थोर कुळांत जन्माला आला आहेस;करितां स्नान,जप, गोब्राह्मणसेवा, देवपूजन; व अतिथिसत्कार करून तूं नित्य सदाचारानें वाग; त्यांतच तुझें कल्याण होईल. कामक्रोधादि शत्रूंचा तूं त्याग कर; मृगया, द्यूत; व मद्यप्राशन वगैरे दुष्कृत्यें स्वप्नांतसुद्धां आचरूं नकोस; कोणाचाहि विश्वासघात करूं नको; जर ब्राह्मण संकटांत सांपडला असेल, तर त्याचें रक्षण कर; देश, काल; व परिस्थिति वगैरे पाहून प्रत्येक कार्यांत लक्ष दे. दुष्टांचा संहार; व सज्जनांचें रक्षण करण्यांत आळस करूं नको; प्रत्येक कर्म शिवार्पण कर; अहंकारादिकांचा त्याग कर; अहोरात्र शिवचिंतनांत काळ घालीव; नित्य भस्माचा त्रिपुंड्र लावून सर्वांगाचेठिकाणीं रुद्राक्ष धारण कर; शिवषडक्षरी मंत्राचा सतत जप कर; ह्मणजे तुझें कल्याण होईल. आतां तुला संकटकाळीं रक्षण करणारें व सतत सुख देणारें असें शिवकवच सांगतों; ज्याच्या श्रवणानें; व पठणानें सर्व पातकें नाश पावतात. ह्या शिवकवचाचें पठण करून; व अंगाला भस्म लावून युद्ध करण्यास गेलें असतां पराभव होण्याची भीति उरत नाहीं.

---

## अध्याय १२ वा.

### शिवकवच.

शिवयोगी म्हणतात; भद्रायु! प्रथम शंकराला प्रणाम करून तुला शिवकवच सांगतों; ऐक. आरंभीं पवित्र अशा जागेवर उत्तम आसन घालून त्या आसनावर बसावें; व शुद्धान्तःकरणानें शिवकवचाचा पाठ करावा. पूर्वीं प्राणायामादि करून शिवाचें ध्यान करावें. नंतर ‘ ॐ नमः शिवाय ’ ह्या षडक्षरीमंत्रानें आपल्या अंगावर अंगन्यास करून शिवकवचांनीं रक्षा करावी. तें शिव-

कवच येणेप्रमाणें:—प्रभो! आपण सर्व जगाची उत्पत्त्यादि करणारे आहां; कारितां आपण संसारांत निमग्न झालेल्या माझा उद्धार करा; सर्व भयापासून माझें रक्षण करा; 'अघोर' नांवाचा शंकर माझ्या दक्षिणबाजूचें रक्षण करो; 'पंचवक्र' असा शिव माझ्या मुखाचें रक्षण करो; तसेंच 'श्रीशिव' माझ्या सर्व शरीराचें रक्षण करो; तसेंच 'श्रीसदाशिव' अपशकुन, दुर्व्यसन, दुःस्वप्न इत्यादि घातुकदोषापासून माझें रक्षण करो. हे परमेश्वरा! आपण माझ्या शत्रूंचें नाशन करून माझ्या राज्याचें, परिवाराचें, व माझ्या शरीराचें रक्षण करा; अशातऱ्हेनें प्रत्येकदिवशीं तीनदां तरी ह्या शिवकवचाचा पाठ केल्यास सर्व संकटें निरसन होऊन अत्यंत सुखाची प्राप्ति होते.

शिवयोगी म्हणतात, भद्रायु! हें शिवकवच श्रेष्ठ वर देणारें आहेत; सर्व पीडा दूर करणारें आहे; व सर्वप्रकारचीं सुखें देणारें आहे. हें शिवकवच आजपर्यंत कोठेंहि प्रगट झालेलें नाहीं; व कोणालाहि हें माहित नाहीं; तेंच तुला गुप्त असें हें कवच तुझ्या कल्याणाकरितां मी मोठ्या प्रेमानें सांगितलें आहे. जे कोणी हें सदोदित पठण करील, त्याला कोणाचेंहि व कधींहि भय उरणार नाहीं. हें कवच पठण करणारा जर अल्पायुषी असेल, तर तो दीर्घायुषी होईल; रोगी असेल, तर रोगमुक्त होईल; दरिद्री असेल, तर ऐश्वर्यवान् होईल; निपुत्रिक असेल, तर सत्पुत्रवान् होईल. जो ह्या कवचाचें पठण करील, तो देवांमध्येंहि पूज्यतेला प्राप्त होईल. ह्या कवचाचें तूं पठण केलें असतां, तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. सूत म्हणतात;—शौनकादिऋषिहो! ह्याप्रमाणें शिवयोगीनें भद्रायूला शिवकवचाचा उपदेश करून, त्यास एक शंख; व तलवारहि दिली; आणि सांगितलें कीं, ही तलवार शत्रूला दाखविलीस म्हणजे शत्रु सैन्यासह भस्म होऊन जाईल; व हा शंख शत्रूंनीं ऐकिला असतां त्यांना मूर्च्छा येईल. शिवयोगीनें अभिमंत्रित केलेलें भस्म भद्रायूच्या अंगाला लाविलें; व त्यास बारा हजार हत्तींचें बळ दिलें; आणि तुझा सतत जय होईल, असा आशीर्वाद दिला. नंतर सुमतीनें व भद्रायूनें शिवयोगीची पुनः पाद्यादि विधीनें पूजा केल्यावर ते शिवनांवाचा घोष करीत स्वस्थानीं निघून गेले.

---

## अध्याय १३ वा.

### भद्रायूविवाह.

सूत म्हणतात; ऋषिहो! भद्रायूचा पिता जो वज्रबाहू त्याला मगधदेशाचा राजा जो हेमरथ तो शत्रु उत्पन्न झाला; व उभयतांचें मोठें युद्ध सुरू झालें. त्यांत

वज्रबाहूचा पराजय होऊन; व त्या वज्रबाहूला हेमरथानें रथाशीं बांधून स्वदेशाला प्रस्थान केलें. हें वर्तमान भद्रायूला कळतांच; व पित्याला बांधून आपले शत्रू नेत आहेत, हें समजतांच त्याला फार त्वेष आला; व तो पद्मा। करपुत्राला बरोबर घेऊन; व सुमतीला नमस्कार करून घोड्यावर बसून निघाला. भद्रायूनें आपले बरोबर शिवयोगीनें दिलेला शंख; व तलवार घेतली होती. मार्गानें गुरुस्मरण करीत ते दोघे चालले असतां हेमरथाची व त्यांची नजरानजर झाली. भद्रायूनें शंखनाद करून हातांतील तलवार शत्रूंना दाखविली. तत्काळ असंख्य शत्रूंचा संहार झाल्यामुळें हेमरथाला भीति उत्पन्न झाली; व त्यानें वज्रबाहूला तेथेंच टाकून पळ काढला. भद्रायु पित्याला शत्रूकडून मुक्त करून;व शत्रूनें हिरावून घेतलेल्या सर्व वस्तु पित्यास अर्पण करून त्यास त्याच्या देशाला पोंचविता झाला. भद्रायूनें हेमरथालाहि जिंकून वज्रबाहूच्या स्वाधीन केलें. वज्रबाहूनें भद्रायूला आलिंगन देऊन त्याच्याबद्दल माहिती विचारिली असतां त्यानें पित्यास म्हटलें कीं, मी कोण ? कोणाचा? हें सर्व तुम्हाला मागा- हून समजेल, असें सांगून तो भद्रायु पद्माकरपुत्रासह पित्याला वंदन करून परत स्वगृहीं आला; व त्यानें मातेला नमस्कार करून झालेलें सर्व वर्तमान निवेदन केलें. सुमतीला व पद्माकराला त्याच्या पराक्रमी कृत्यानें मोठा आनंद झाला. एकदा शिवयोगी चित्रांगदाकडे व सीमंतिनीकडे येऊन भद्रायूचा पराक्रम वर्णन करून सांगता झाला; व म्हणाला कीं, ह्याला तुम्ही आपली कीर्तिमा- लिनीनांवाची मुलगी विवाहविधीनें अर्पण करा. असें शिवयोगीचें भाषण ऐकून चित्रांगदाला व सीमंतिनीला मोठा आनंद झाला; व त्यांनीं मोठ्या समारंभानें आपली मुलगी भद्रायूला अर्पण केली. त्या लग्नसमारंभास भद्रायूचा पिता वज्रबाहूहि परिवारासह प्राप्त झाला होता. भद्रायु हा आपला मुलगा असून ज्याला आपण लहानपणांत मातेसह वनांत सोडिलें होतें; त्याच ह्या पुत्रानें संकटकाळीं आपणाला शत्रूपासून सोडविलें; असें समजतांच शिवयोगीचे वज्र- बाहूनें मोठे उपकार स्मरण केले. सुमतीची व वज्रबाहूचीहि भेट होऊन त्यांनीं भद्रायु व कीर्तिमालिनी ह्यांस राज्यपदावर बसविलें; व आपण स्वतः वनांत पत्नीसह प्रयाण केलें; व शेवटीं शिवनामाचा जयघोष करीत वज्रबाहूनें अंती शिवलोकीं विमानांत बसून शिवगणांसह प्रस्थान केलें.

# अध्याय १४ वा.

## भद्रायूला वरप्राप्ति.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषि हो! भद्रायु व कीर्तिमालिनी हीं दोघें राज्यारूढ झाल्यावर एके दिवशीं तीं उभयतां क्रीडा करण्याकरितां अरण्यांत गेलीं असतां; व तेथें सुंदर अशी दाट सावली पाहून;' व विश्रांती घेण्याकरितां कोमलपल्लवांची शय्या तयार करून आनंदानें त्यांवर उभयतां निजलीं असतां एका एकीं एक ब्राह्मण लांबूनच आक्रोश करीत राजाकडे प्राप्त झाला. ती गडबड भद्रायूचे कानावर पडताच तो खडबडून उठून ब्राम्हणाजवळ आला. तो ब्राह्मण राजास म्हणतो; भद्रायु! तूं धर्मिष्ठ, शूर, असा राजा आहेस;करितां माझ्या स्त्रीला वाघ घेऊन जात आहे, तिला त्यापासून सोडीव; व माझी स्त्री मला अर्पण कर. नंतर भद्रायू हातांत धनुष्यबाण घेऊन वाघाचे मागें लागला. भद्रायूचे तीक्ष्ण बाण वाघाच्या अंगांत घुसले असतांहि तो त्यांना न जुमानून तसाच ब्राह्मणस्त्रीला घेऊन गेला; व अदृश्य झाला. आपली स्त्री वाघानें नेली; व हा भद्रायु राजा माझ्या स्त्रीला वाघाचे तोंडांतून सोडविण्यास असमर्थ झाला, असें समजून त्या ब्राह्मणानें भद्रायूचा धिक्कार केला; व त्याच्या पराक्रमाची निंदा केली. भद्रायूलाहि फार वाईट वाटलें; व त्यानें ब्राह्मणास तुला काय हवें तें माग? असें सांगितलें; तेव्हां ब्राह्मण राजाला म्हणतो कीं, मला माझी स्त्री आणून दे, दुसरें कांहीं नको. जर मला माझी स्त्री आणून न देशील तर मी स्त्रीकरितां तुझे समोर प्राणत्याग करून तुझी अपकीर्ति स्वर्गांत घेऊन जाईन. राजानें पुष्कळ सांगितलें; परंतु तो ब्राह्मण आपला हेका सोडीना; तेव्हां भद्रायूनें आपली कीर्तिमालिनी स्त्री ब्राह्मणाला देण्याचें कबूल केलें. ब्राह्मण कीर्तिमालिनीला घेऊन गेल्यावर भद्रायूनें चिता तयार केली; व त्यांत 'ॐ नमः शिवाय' म्हणून उडी घातली, तोंच एकाएकीं शंकर पार्वतीसह कीर्तिमालिनीला घेऊन प्रगट झाले; व अग्नि शांत झाला. नंतर शंकर 'वर माग' ह्मणताच भद्रायु म्हणतो; शंकरा! ब्राह्मणाची स्त्री वाघानें नेली ती आणून दे. तेव्हां शंकर म्हणतात; राजा! मीच ब्राह्मण होऊन वाघहि मीच झालो; व पार्वतीला घेऊन गेलो.तुझी परीक्षा पाहण्याकरितां हा तुला चमत्कार दाखविला होता, असें ह्मणून शंकरानें राजाचें स्वाधीन कीर्तिमालिनी करून त्यांस वर मागण्यास सांगितलें. त्यावेळीं कीर्तिमालिनीनें चित्रांगदास व सीमंतिनीस शिवलोकाची प्राप्ती व्हावी, असा वर मागितला; व भद्रायूनें वज्रबाहूस व सुमतीस मोक्षप्राप्ति होण्याचाहि वर मागितला. शंकरानें तसा त्यांस वर दिला; व ते अंतर्धान पावले. नंतर

भद्रायु व कीर्तिमालिनी परत स्वनगराला येऊन व पुष्कळ वर्षें राज्य करून शेवटीं शिवलोकाला गेलीं. हेंआख्यान श्रवण करणारेहि मुक्त होतात.

---

# अध्याय १५ वा.

## भस्ममाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! आतां तुम्हाला भस्ममाहात्म्य सांगतों; ऐका. एक महातपस्वी वामदेवनांवाचा योगी पृथ्वीतलावर एका अरण्यांत हिंडत असतां एक भयंकर ब्रह्मराक्षस क्षुधेनें पीडित होऊन वामदेवाला भक्षण करण्याकरितां त्याचे अंगावर धावला. आपल्या अंगावर राक्षस धावून येत आहे, असे पाहून वामदेव न भितां तेथेंच उभे राहिले. ब्रह्मराक्षस वामदेवाला घट्ट धरून खाणार; इतक्यांत वामदेवाच्या अंगाला लाविलेल्या अभिमंत्रित भस्माचा ब्रह्मराक्षसाला स्पर्श झाल्यामुळें तत्काळ त्याच्या बुद्धींत फरक पडला; व त्याची दुष्ट वासना नष्ट होऊन तो वामदेवाची प्रार्थना करूं लागला. त्यावेळीं त्याला पूर्वींच्या पंचवीस जन्माचें स्मरण झालें. वामदेवानें तूं कोण? येथें कशाला आलास? व तुला अशी दशा प्राप्त होण्याचें कारण काय? वगैरे विचारल्यावरून ब्रह्मराक्षस म्हणतो; मुने! पूर्वीं मी दुर्जय नांवाचा राक्षस होतों. त्या जन्मांत मी पुष्कळ व्यभिचारादि दुष्कृत्यें केल्यामुळें मला अंतकाळीं पुष्कळ यमयातना भोगाव्या लागल्या. मला दुसरा पिशाच जन्म प्राप्त झाला. पुढें अशातऱ्हेनें साप, लांडगा, डुकर, सरडा, कुत्रा, कोल्हा, गवा, हरिण, माकड, गिधाड, मुंगुस, कावळा, उंट, कोंबडा, गाढव, मांजर, बेडूक, कासव, मासा, उंदीर, घुबड; व हत्ती इतके जन्म घेऊन आतां ब्रह्मराक्षसाचा जन्म मला प्राप्त झाला आहे. तुझ्या अंगस्पर्शानें मला हें ज्ञान प्राप्त झालें. आतां एवढें ज्ञान मला प्राप्त होण्याचें कारण काय? व हा कशाचा प्रभाव? तें मला सांगा. असा ब्रह्मराक्षसाचा प्रश्न ऐकून वामदेव म्हणतात; राक्षसा! पूर्वीं द्रविडदेशांत एक अत्यंत पापी ब्राह्मण होता. तो मृत झाला असतां त्याचे प्रेत लोकांनीं गांवाबाहेर टाकिलें. तितक्यांत एक कुत्रा पवित्र भस्मावरून येऊन त्या प्रेताजवळ गेला; व त्या प्रेताला कुत्र्याला लागलेल्या भस्माच्या संपर्कानें तो ब्राह्मण पापी असूनहि स्वर्गलोकाला निघून गेला. हा सर्व भस्मप्रभाव आहे. माझ्या अंगाच्या भस्माचा तुला स्पर्श झाल्यामुळें तुला हें ज्ञान प्राप्त झालें आहे. असे वामदेवाचें भाषण ऐकतांच राक्षसानें वामदेवाला भस्ममहिमा व भस्मधारणविधि विचारल्यावरून वामदेव राक्षसाला भस्ममाहात्म्य; व विधि सांगतात.

---

# अध्याय १६ वा.

## भस्मधारणविधि.

वामदेव राक्षसाला म्हणतात; पूर्वी मंदराचलपर्वतावर आपल्या भूतगणांसह शंकर सिंहासनावर बसले असतां त्याठिकाणीं इंद्रादि देव प्राप्त झाले ! तसेच वरुण, वायु, यम, सूर्य, गंधर्व, ब्रह्मर्षि, देवर्षि वगैरेहि प्राप्त झाले होते. त्याठिकाणीं सनत्कुमारादि ऋषीहि येऊन; व शंकरास नमस्कार करून म्हणतात; शंकरा ! आपण मला पुष्कळ धर्म सांगितलेत खरे; परंतु ज्या योगानें थोडक्यांत मुक्ति मिळेल, असा एकादा उपाय सांगा. शंकर म्हणतात; सनत्कुमारप्रमुख मुनिजनहो ! तुम्हाला मी भस्माच्या त्रिपुंड्राचा विधि सांगतों; ज्याच्या आचरणानें तत्काळ मुक्ति प्राप्त होते. नंतर भस्मत्रिपुंड्राचीं स्थानें कोणती ? त्याची देवता कोण? शक्ति कोण ? वगैरे सांगा, असा सनत्कुमाराचा प्रश्न ऐकून, शंकर त्यास म्हणतात; ऋषे ! त्रिपुंड्रधारणाला भस्म कसें असावें ? तें सांगतों; ऐका. प्रथम गाईच्या सुखलेल्या शेणाला अग्नी लावून त्यापासून तयार झालेलें जें भस्म त्यावर पंचगव्यानें प्रोक्षण करावें; व तें भस्म त्रिपुंड्राला उपयोगांत आणावें. प्रथम "सद्योजातं प्रपद्यामि" इत्यादि पांच मंत्रांनीं भस्माला अभिमंत्रित करावें. नंतर "मानस्तोकेतन" ह्या मंत्रानें तें भस्म मस्तकाला लावावें. "त्र्यायुषं जमदग्नेः" ह्या मंत्रानें तें भस्म ललाटाला लावावें. कपाळावर हाताच्या मधल्या बोटानें व किरंगळीजवळच्या बोटानें अशा आडव्या दोन रेघा काढून आंगठ्यानें मधोमध उभी एक रेघ काढणें, ह्यासच त्रिपुंड्र म्हणतात; व अशातऱ्हेनें प्रत्येकानें आपल्या कपाळावर भस्मत्रिपुंड्र लावावा. त्रिपुंड्राच्या तीन रेघांपैकीं प्रत्येक रेघेंत नऊ नऊ देवता वास करीत असतात. महादेव, महेश्वर, शिव, ह्या तीन रेघांच्या मुख्य देवता होत. प्रथमरेखेचा प्रणव अकार, अग्नि गार्हपत्य, वेद ऋग्वेद, लोक भूर्लोक, क्रिया शक्ति, प्रातः सवन ह्याप्रमाणें प्रथमरेखेचें ऐश्वर्य होय. द्वितीयरेखेचा उकार प्रणव, दक्षिणाग्नि, यजुर्वेद, सत्त्वगुण, माध्यंदिन सवन, इच्छा शक्ति हें होय; व तृतीयरेखेचा मकार प्रणव, आहवनीयाग्नि, तमोगुण, ज्ञान शक्ति, सामवेद, तृतीयसवन हें होय. अशा तऱ्हेनें त्रिपुंड्राच्या देवता व ऐश्वर्यवस्तु सांगितल्या. वर सांगितल्याप्रमाणें भस्माचा त्रिपुंड्र लाविल्यास त्याची सर्व पातकापासून मुक्तता होतो. ललाटस्थानीं भस्मत्रिपुंड्र लाविला असतां गंगादि नद्यांत स्नान केल्याचें पुण्य लागतें; व कोट्यावधि शैवमंत्राचा जप केल्याचें फळ मिळून स्ववंशाचा उद्धार होतो. जे कोणी त्रिपुंड्र-

धारण करितात त्यांना विद्याधर, सिद्ध, गंधर्व; व इंद्रादि अनेक लोकपाल यांच्या स्थानाची प्राप्ति होऊन ते मुक्त होतात. सर्व उपनिषदांचे सारभूत असा हा त्रिपुंड्रविधी आहे. इतकें सांगून शंकर तेथेंच गुप्त झाले; व सनत्कुमारादि मुनींहि स्वस्थानाला निघून गेले. वामदेव म्हणतात; राक्षसा! तुलाहि ह्या माझ्या अंगाला लाविलेल्या त्रिपुंड्रभस्माच्या संपर्कानें शिवगति प्राप्त होईल. असें सांगून वामदेवानें ब्रह्मराक्षसाला भस्म दिलें; व त्या राक्षसानें स्वांगाला भस्म लावितांच तो शिवलोकाहून आलेल्या विमानांत बसून कैलासाला जाता झाला. ह्याप्रमाणें वामदेव ब्रह्मराक्षसाला सद्गति देऊन पृथ्वीवर भ्रमण करिते झाले.

---

# अध्याय १७ वा.

## शबराख्यान.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! कोणत्याहि पुण्य कृत्यांत श्रद्धा ही श्रेष्ठ आहे. केवळ दगडाला जरी ईश्वर समजून त्याचें पूजन केलें, तरी इच्छित फल प्राप्त होतें; व श्रद्धारहितपणानें जरी साक्षात् ईश्वराचें पूजन केलें, तरी तें पूजन निष्फळ होतें; तात्पर्य प्रत्येकानें आपलें स्वकृत्य श्रद्धायुक्त अन्तः-करणानें करावें. ह्याविषयीं तुम्हाला एक कथा सांगतों; ऐका. पूर्वी पांचाल-देशांत एक सिंहकेतुनांवाचा राजा राहत असे. त्याचा एक शबरनांवाचा सेवक होता. तो अरण्यांत मृगया करण्याकरितां गेला असतां तेथें एक मोड-कळीला आलेलें जुनें देवालय त्याच्या दृष्टीस पडलें. नंतर तो शबर त्या देवालयांत जाऊन पाहतों, तों एक शिवलिंग त्याला दिसलें; व तें घेऊन तो सिंहकेतुराजाकडे परत आला; व त्यानें तें शिवलिंग राजाला दाखविलें. शबरानें शिवलिंगाचें पूजन करण्याचा आपला मानस राजाला कळवून त्यास पूजाविधीहि विचारिला; त्यावेळीं राजा म्हणतो; शबरा! नित्य प्रातःकाळीं उठून; व शुचिर्भूतपणानें योग्य अशा आसनावर बसून शिव-पूजनाचा संकल्प करावा. नंतर स्नानादि नित्य कर्म आटोपल्यावर स्वच्छ उदक, गंधपुष्पाक्षत; आणि धूपदीप इत्यादि उपचारांनीं त्या लिंगाचें पूजन करावें. प्रथम नित्य पुण्यपुरुषाच्या प्रेताचें दहन झाल्यानंतर अवशिष्ट राहिलेलें जें भस्म तें शंकराला फारच प्रिय असल्यामुळें रोजच्या रोज नवीन आणून त्यास अर्पण करावें; त्यास योग्य नैवेद्य समर्पावा. हा शंकराचा साधारण पूजा विधि आहे; ह्या विधींत जर कां न्यून झालें, तर त्यापासून अनेक दोष प्राप्त होऊन तो पातकांचा भागिदार होतो. वर सांगितलेल्या विधीप्रमाणें जर

आपणास पूजा करण्याचें सामर्थ्य नसेल, तर आपण त्या वाटेला मुळींच जाऊं नये; हें उत्तम. ह्याप्रमाणें राजभाषण ऐकून शबराला आनंद झाला; व शिवपूजनाचा स्वतःचा दृढनिश्चय करून तो पत्नीसह राजानें सांगितल्याप्रमाणें किंचित्‌हि न्यून पडूं न देतां नित्य शिवपूजन करूं लागला. अशातऱ्हेनें शिवपूजन करून कित्येक वर्षें निघून गेल्यावर एके दिवशीं शबराला कोठेंहि चित्ताभस्म मिळेना. त्यावेळीं परत घरीं येऊन तो आपल्या पत्नीस म्हणतो; प्रिये! मी पुष्कळ शोध केला; परंतु चिताभस्म मिळत नाहीं; व त्यावांचून शिवपूजन होणार नाहीं; व जर शिवपूजन माझें हातून न घडलें तर मी आपला देह त्यागून स्वस्थ होईन. अशा स्थितींत मला जिवंत राहणें आवडत नाहीं. पति संकटांत सांपडलेला पाहून शबरस्त्री म्हणतें; नाथा! आपण ह्या आपल्या घराला अग्नी लावा; व मी त्या अग्नींत प्रवेश करितें; व नंतर तें भस्म आपण शंकराला अर्पण करून कृतार्थ व्हावें, हाच एक ह्याला श्रेष्ठ उपाय आहे. नंतर घराला अग्नी लावून शबरी पतीला नमस्कार करून; व अग्नीला नमस्कार आणि प्रदक्षिणा करून शंकराचा जयजयकार करीत अग्नींत शिरली. शबर तें भस्म घेऊन शिवपूजा करूं लागला. नैवेद्य अर्पण करण्याचे वेळीं शबराला स्त्रीचें भस्म झाल्याचें स्मरण न राहून त्यानें नित्यनियमाप्रमाणें स्त्रीला हांक मारून नैवेद्य आणण्यास सांगितलें. ईश्वरकृपेनें शबरी हांतात नैवेद्य घेऊन शबरामागें नम्रपणानें उभी राहिली. तिला पाहतांच शबराला फार विस्मय वाटला; व इश्वराचें आपणावर पुष्कळ आभार आहेत, असें त्यानें मानिलें. इतक्यांत शिवलोकाहून विमान प्राप्त झालें; व त्यांत बसून ती शबरस्त्री पतीसह शिवलोकाला गेली.

---

## अध्याय १८ वा.

### शारदाख्यान.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! आतां तुम्हाला उमामहेश्वरव्रताचा प्रभाव सांगतों; ऐका. आनर्तदेशांत एक वेदरथ नांवाचा ब्राह्मण होता. त्याची शारदा नांवाची एक मुलगी होती. वेदरथानें पद्मनाभाबरोबर आपली कन्या जी शारदा तिचा विवाह लाविला. एके दिवशीं तो पद्मनाभ श्वशुरगृहीं राहत असतां दुपारच्या वेळीं नदीचे काठीं स्नानादि करण्याकरिता गेला; परंतु येतांना सर्पदंशानें पद्मनाभाचा अंत झाला; त्यामुळें वैधव्य प्राप्त झालेली शारदा बापाचे घरीं राहती झाली. कांहीं महिनें निघून गेल्यावर नैध्रुवनांवाचा एक ऋषि वेदरथाचे घरीं प्राप्त झाला. तो नैध्रुव ऋषि अंधळा असल्यामुळें त्याचेबरोबर

शिष्यवर्गहि होते. नंतर शारदेनें शिष्यांसह नैध्रुवऋषीची मधुपर्कादि पूजा केली; व त्यांस भोजनादिक देऊन; व नैध्रुवाची प्रार्थना करून त्यास नमस्कारहि केला. ऋषि अंधळा असल्यामुळें ही नमस्कार करणारी स्त्री विधवा आहे, हें त्यास न समजून चुकीनें त्या ऋषीनें शारदेला ' सौभाग्यवती पुत्रवती भव ' असा आशीर्वाद दिला. आशीर्वाद ऐकताच शारदा आश्चर्यचकित होऊन नम्रपूर्वक नैध्रुवऋषीस म्हणते; महामुने ! आपण सत्य भाषण करणारे ऋषि असल्यामुळें; व आपण बोललेलें सर्व सिद्धीप्रत जाणारें असल्यामुळें मला आपण दिलेल्या आशीर्वादाचा विस्मय वाटत आहे; कारण मी विधवा असतां मला आपण सौभाग्यवती व पुत्रवती हो, असा आशीर्वाद दिलात, तो आशीर्वाद सफल कसा होईल ? ह्या विचारांत मी आहे, ऋषी म्हणतात; शारदे ! मी अंधळा असल्यामुळें माझ्या तोंडून हें वाक्य चुकीनें निघालें; तथापि मी जें बोललों तें खोटें होणार नाहीं, हें तूं खास समज. तूं जर उमा-महेश्वरव्रत आचरशील तर तत्काळ तुझें कल्याण होऊन तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. शारदेनें ऋषीला व्रताचें विधान विचारल्यावरून ऋषि शारदेला म्हण-तात; हे शारदे ! हें व्रत चैत्र किंवा मार्गशीर्षमहिन्याच्या शुक्लपक्षांत करावें. व्रताला प्रारंभ अष्टमी, चतुर्दशी, पूर्णिमा ह्या तिथींना करावा. सकाळीं स्नान करून नित्यविधी उरकल्यावर सर्वशोभेनें युक्त असा एक मंडप तयार करावा. त्या मंडपांत पंचरंगी एक कमळ काढून त्यावर कलशस्थापना करावी. त्यावर शिवपार्वतीची सोन्याची प्रतिमा स्थापून पंचामृतादि षोडशोप-चारानें त्यांची पूजा करावी. रुद्राची एकादशिनी करून त्या मूर्तीवर अभिषेक करावा. नंतर शंकराच्या पंचाक्षरी मंत्राचा एकशें आठ वेळा जप करावा; व हात जोडून शंकराची प्रार्थना करावी कीं, शंकरा ! जीं माझेठिकाणीं राह-णारीं पातकें आहेत, तीं सर्व ह्या पूजनानें नाश पावोंत; सौभाग्य, विजय, आरोग्य, धर्म; व ऐश्वर्य ह्या सर्वांची वाढ होऊन स्वर्ग; व मोक्ष मिळण्याकरितां मी हें तुझें पूजन करीत आहे, अशी प्रार्थना होताच अंगन्यास करून शिव-पार्वतीची स्तुति करावी. नंतर तीन अर्घ्यें देऊन नैवेद्यादि अर्पण करावें. शेवटीं दूधभाताचा एकशें आठ वेळा शिवपार्वतीच्या नांवानें होम करावा. संध्याकाळची पूजा केल्यानंतर एक वेळच रात्रीं भोजन करावें. ह्याप्रमाणें हें व्रत एक वर्षपर्यंत आचरण करावें. वर्ष पूर्ण होताच उद्यापन करावें. ह्याप्रमाणें जे व्रत करितील त्यांच्या एकवीस कुळांचा उद्धार होऊन, व ते इहलोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतील. नैध्रुव ऋषि म्हण-तात; शारदे ! हें व्रत तूं आचरिलें असतां तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी सिद्ध होऊन तूं सद्गतीलाहि प्राप्त होशील; व माझा आशीर्वादहि खरा ठरेल. इतकें

जों उभयतांचें भाषण होतें तोंच शारदेचे आईबापहि तेथें येऊन ऋषीस नमस्कार करिते झाले. शारदेच्या कल्याणाविषयीं ऋषीची प्रार्थना केली असतां शारदेनें घडलेलें सर्व वर्तमान आपल्या आईबापाला निवेदन केलें.

# अध्याय १९ वा.

## शारदाख्यान ( पुढें चालू ).

सूत म्हणतात, शौनकादि ऋषि हो! नंतर शारदेनें नैध्रुवऋषीच्या सांगण्याप्रमाणें एक वर्षपर्यंत तें व्रत करून शेवटीं उद्यापनहि केलें. प्रदोषकाळीं शारदा शिवपूजन करून शिवध्यान करीत असतां तेथें एकाएकी पार्वती प्रगट झाली. पार्वतीला पाहून शारदा; व नैध्रुव उभयतां साष्टांग नमस्कार घालून तिची स्तुति करूं लागले. देवीनें वर माग म्हणताच नैध्रुवानें शारदेला सौभाग्यादि प्राप्त होण्याबद्दल पार्वतीजवळ याचना केली. पार्वती म्हणते; ही पूर्वजन्मीं द्रविडब्राह्मणाची बायको होती. त्या ब्राह्मणाचे दुसऱ्या स्त्रीवर फार प्रेम असल्यामुळें ही अत्यंत शोकानें व्याप्त होऊन कालान्तरानें मृत झाली. त्याच जन्मामध्यें हिलाच टपून राहिलेला एक तरुण ब्राह्मण होता; ही त्याला वश झाली नाहीं; व शेवटीं हिच्याच ध्यासानें तोहि तरुण ब्राह्मण मृत झाला. तोच तरुण ब्राह्मण ह्या जन्मीं पद्मनाभ होऊन त्याच ह्या शारदेशीं पूर्वजन्मांतील इच्छा सफल करण्याकरितां लग्न लाविता झाला; व त्याच्या मृत्यूमुळें हिला सांप्रत वैधव्य प्राप्त झालें आहे. सांप्रत हिच्या पूर्वजन्मीचा पति पांड्यदेशांत राहत आहे. तो तुला रोज स्वप्नांत रतिसुख देईल; व तें सुख जागृदवस्थेपेक्षां तुला अधिक वाटेल, तुला त्यापासून एक पुत्र होईल; व तुला प्रत्यक्षहि त्याचें दर्शन होईल; त्यावेळीं तूं आपला पुत्र त्याला अर्पण कर; मात्र दुसरा रतिसुखसंबंध प्रत्यक्ष ठेऊं नको; म्हणजे तुला सद्गति मिळेल. ह्याप्रमाणें वर देऊन पार्वती निघून गेली. पुढें नैध्रुवालाहि डोळे प्राप्त झाले, व तो स्वाश्रमाला निघून गेला. रोज रात्रीं स्वप्नांत तो द्रविड ब्राह्मण शारदेला रतिभोग देत असे. कालान्तरानें शारदा गरोदर झाली. शारदा विधवा असतां तिला गर्भ कसा राहिला? अशा लोकांच्या मनांत अनेक शंका उपस्थित झाल्या; परंतु आकाशवाणीनें शारदा पवित्र आहे, असे सांगताच सर्वांच्या शंका दूर होऊन लोक शारदेची स्तुति करूं लागले. पुढें तिला एक मुलगा झाला. कांहीं दिवसांनीं त्याचें उपनयन व विद्याध्ययन पूर्ण होऊन तो दहावर्षांत सर्वशास्त्रपारंगत झाला. नंतर शारदा पुत्रासह गोकर्णक्षेत्रांत गेली असतां तेथें द्रविड-

ब्राह्मणाची व शारदेची गांठ पडली. तत्काळ आपल्या पुत्रास पतीचें स्वाधीन करून त्याचें नांव शारदेय असें ठेविलें. शारदेनें पतीला पार्वतीनें वर दिल्याबद्दलची सर्व हकीगत सांगितली; व पूर्वी केलेल्या व्रताचें अर्धें फळ पतीला दिलें. तो ब्राह्मण शारदेयाला व शारदेला बरोबर घेऊन स्वगृहीं प्राप्त झाला. शेवटीं ज्यावेळीं द्रविडब्राह्मणाचा अंत झाला, त्यावेळीं शारदेनें सहगमन केलें; व ती पतीसह शिवलोकाला प्राप्त झाली. हें आख्यान श्रवण किंवा पठण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन; व ते ऐहिक सुखें भोगून शेवटीं शिवलोकाला जातात.

---

# अध्याय २० वा.

## रुद्राक्षमाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो! आतां मी आपणाला संपूर्ण पातकांचें नाशन करणारें रुद्राक्षमाहात्म्य सांगतों; ऐका. जे शिवभक्त आपल्या अंगावर एक हजार रुद्राक्ष धारण करितात; त्यांना सर्व देव नमस्कार करितात; एवढेंच नव्हें तर साक्षात् रुद्रहि त्याला मान देतात. हजार रुद्राक्ष जर मिळाले नाहींत तर निदान दोन दंडामध्यें सोळासोळाप्रमाणें, एक शेंडींत, दोन मनगटांत बाराबाराप्रमाणें, बत्तीस गळ्यांत, चाळीस मस्तकाचे सभोवार, एकएक कानांत, वक्षःस्थळावर एकशें आठ, अशातऱ्हेनें रुद्राक्ष धारण करणारा पुरुष साक्षात् रुद्ररूप होतो. काश्मीरदेशांत भद्रसेननांवाचा एक राजा होता. त्याला सुधर्मा नांवाचा एक मुलगा होता; व त्या राजाच्या प्रधानाचा तारक नांवाचा पुत्र होता. तो तारक सुधर्माचा अत्यंत स्नेही होता. ते उभयतां मोठ्या प्रेमानें क्रीडा करीत असत. त्यांना शस्त्रविद्या व शास्त्रविद्या चांगली अवगत होती. ते नित्य रुद्राक्ष धारण करीत असत. राजानें व प्रधानानें जरी आपआपल्या मुलांना पुष्कळ अलंकार घालण्यास दिले, तरी ते त्यांचा त्याग करून भस्मरुद्राक्षांचेंच धारण करणें त्यांस विशेषेंकरून आवडत असे. हा पुत्रांचा प्रकार राजाला आवडला नाहीं. एकेदिवशीं त्या राजाकडे पराशरमुनींचें अकस्मात् आगमन घडलें. त्यांचें आदरातिथ्य करून आपला व प्रधानाचा मुलगा त्या ऋषीपुढें उभा करून ह्मटलें कीं, हे मुलगे अलङ्काराचा त्याग करून नित्य भस्मरुद्राक्षाचेंच धारण कां करितात? तें सांगा. हें त्यांचें वर्तन आम्हाला आवडत नाहीं, कारण अशा वर्तनानें ह्यांना माझ्या पश्चात् राज्याचा गाडा हाकलितां येणार कसा; तरी आपण कृपा करून ह्यांचें पूर्ववृत्त थोडक्यांत सांगून ह्यांना ताळ्यावर आणण्याचा एकादा उपाय

सांगा. राजानें प्रश्न केलेला ऐकून ऋषि म्हणतात; राजा ! पूर्वी नंदिग्रामांत महानंदानांवाची एक वेश्या राहत होती. ती नित्य शिवपूजन करीत असे. तिच्या घरीं तिनें एक वानर व दुसरा कोंबडा असें दोन प्राणी बाळगले होते. ती त्यांना त्यांच्या गळ्यांत रुद्राक्ष बांधून नृत्य करण्यास शिकवी. तिच्या घरीं एकदां एक वैश्य हातांत स्वर्णकंकण घेऊन आला. तें कंकण पाहून महानंदा मोहित झाली; व तिनें त्याच्याजवळ त्या कंकणाची याचना केली. तो वैश्य ह्मणाला कीं, मी तुला कंकण देतों; पण तूं मला ह्याच्या मोबदला काय देशील? वेश्या म्हणते कीं, मी तीन दिवस तुझी पत्निधर्मानें सेवा करीन. असें वेश्या-वचन ऐकून वैश्यानें तें कंकण तिच्या हातांत घातलें; व एक शिवलिंगहि तिचे जवळ दिलें; व सांगितलें कीं, हें लिंग मला प्राणाच्याहि पलीकडे आहे. जर ह्या लिंगाचा नाश झाला, तर मी प्राणत्याग करीन, हें तूं पक्कें समज. वेश्येनें तें शिवलिंग घेऊन मंडपाच्या एका खांबावर ठेविलें; व ती वैश्याला बरोबर घेऊन पलंगावर निजली. मध्यरात्रीचे सुमारास अकस्मात् त्या मंडपाला अग्नि लागून तो मंडप जळूं लागला. महानंदा घाबरेपणानें उठून तिनें मंडपाला बांधलेले जे दोन पशु माकड, व कोंबडा ह्यांना सोडून दिलें. नंतर वैश्यानें शिवलिंगाबद्दल महानंदेला विचारितां तें जळून गेलें असें समजतांच वैश्य शोक करूं लागला. वैश्यानें देहत्याग करण्याच्या बुद्धीनें एक चिता राचिली; व त्यांत ‘ ॐ नमः शिवाय ’ असा शिवमंत्राचा जप करून चितेंत उडी टाकिली; वेश्येनेंहि तीन दिवस मानलेल्या पतीचा पहिलेंच दिवशीं नाश झालेला पाहून स्ववाक्याला अनुसरून पत्निधर्मानें सहगमन करण्याचा विचार केला; व सर्व इष्टेट ब्राह्मणांना दान करून स्वतः चितेंत उडी घातिली, तोंच साक्षात् शंकर तेथें प्रगट होऊन त्यानें महानंदेला वरच्यावरती उचलून चितेच्या बाहेर काढिलें; व तिला म्हटलें कीं, महानंदे ! आतां तूं इच्छित वर माग. महानंदा म्हणते कीं, जितके माझ्या सान्निध्यानें राहणारे प्राणी आहेत ते सर्व शिवलोकाला जावोत; एवढाच वर मला पुरे आहे. महानंदेच्या इच्छेप्रमाणें शंकरानें सर्वांना शिवलोकाला नेलें. पराशर म्हणतात; त्यावेळचे मंडपांत बांधलेलें जें माकड तें तुझ्याठिकाणीं पुत्ररूपानें व कोंबडें हें प्रधानाचें ठिकाणीं पुत्ररूपानें जन्माला आलें आहे, असें समज. पूर्वजन्मीं रुद्राक्ष-धारणादि संस्कार झाल्यामुळें त्यांना ह्या जन्मीं रुद्राक्षधारणेची बुद्धी झाली आहे.

---

# अध्याय २१ वा.

## रुद्राध्यायमाहात्म्य.

राजा म्हणतो;-हे मुने ! तुम्ही ह्या आमच्या मुलांचें पूर्ववृत्त मला सांगितलेंत; परंतु हे आतां किती वर्षे जगणार ? व राज्यव्यवस्था कशी ठेवणार ? तें सांगा. नंतर पराशरमुनि म्हणतात; राजा ! ह्या तुझ्या मुलाला फक्त बाराच वर्षें आयुष्य आहे; व हा आजपासून सातवे दिवशीं मृत्यु पावेल. इतकें मुनिवाक्य ऐकताच राजाला मूर्च्छा येऊन तो धाडदिशीं जमिनीवर पडला. मुनि राजाला सावध करून; व भिऊं नको असें म्हणून त्याचें सांत्वन करते झाले; व म्हणाले कीं, राजा ! तूं दहा लक्ष रुद्राचीं आवर्तनें करून शंकरावर रुद्राभिषेक कर; म्हणजे तुझा पुत्र दीर्घायु होईल. राजानें पराशरमुनीला आचार्यत्व देऊन दुसरेहि हजार ब्राह्मण बोलाविले; व शंभर कलश स्थापून त्यावर शिवलिंगाची स्थापना केली. नंतर राजानें ब्राह्मणद्वारा दहा लक्ष रुद्रावर्तनानें शिवावर अभिषेक करून तें उदक राजपुत्रावर शिंपडिलें; असें हें सात दिवस अनुष्ठान सुरू असतां सातवे दिवशीं एकाएकीं राजपुत्र मूर्च्छित झाला. तो एका क्षणांत सावध होऊन तेथील मुनींना म्हाणाला कीं, हातांत पाश घेऊन यमदूत मला नेण्याकरितां आले असतां इतक्यांत शिवदूतांनीं त्यांचा पराजय केला; व मला आशीर्वचन देऊन ते निघून गेले. इतक्यांत त्या राजसभेंत नारदऋषी प्राप्त झाले. ते येताच राजानें त्यांचें स्वागत केलें. नंतर नारद ह्मणतो; राजा ! आज तुझ्या मुलाला नेण्याकरितां यमदूत आले असतां वीरभद्रानें त्यांचा पराभव केला; व तुझ्या मुलाचे प्राण वाचविले. आतां तुझ्या मुलाचें आयुष्य दहा हजार वर्षें यमाच्या व वीरभद्राच्या संमतीनें ठरलें आहे. तुझ्या मुलाचें आयुष्य वाढण्यास कारणभुत रुद्राध्याय व पराशरमुनि हे होत. राजानें कृतार्थ होऊन; व ब्राह्मणांना यथेच्छ दक्षिणा देऊन कर्म समाप्त केलें. हें आख्यान श्रवण करणारे शिवलोकाला प्राप्त होतात.

---

# अध्याय २२ वा.

## बहुलाख्यान.

सूत म्हणतात;-शौनकादि ऋषिहो ! पुराणश्रवण नित्य करावें. पुराणश्रवणानें सर्व इच्छित फलें प्राप्त होतात. पुराणें जाणणाऱ्या पुरुषाचें सतत पूजन

करावें; जे पुराणांत निपूण पुरुष असतील, त्यांची निंदा करणारे कुत्रा, गर्दभ वगैरेंच्या जन्माला जातात. जे पुराणिकाला आसनादि देतात; त्यांना स्वर्गलोकाची प्राप्ति होते. दक्षिणदेशांत एक बाष्कलनांवाचा देश आहे. त्या देशांत एक विदुरनांवाचा ब्राह्मण राहत असे. त्याची बहुला नांवाची एक धर्मपत्नी जिवंत असतांहि तो तिचा त्याग करून एका वेश्येच्या नादीं लागला होता. कांहीं काळानें विदुर ब्राह्मण मृत झाला. नंतर ती बहुला गोकर्णक्षेत्रीं येऊन पुराणकथा श्रवण करण्यास बसली असतां पुराणिकाकडून " जाराला व जारिणीला यमदूत लोखंडाच्या सुळावर चढवून खाली चाबुकाचे फटके मारतात " असें कथानक तिला समजलें. नंतर ती बहुला मोठ्या भितीनें पुराणिकाला म्हणाली; कीं, मी महापापी आहें, माझा उद्धार करा; माझा पति कोणत्या नरकांत पडला असेल, त्याचाहि उद्धार होण्याचा आपण उपाय सांगा. नंतर पुराणिक बहुलेला म्हणतो कीं, तूं नित्य कथाश्रवण करून शिवध्यान कर; म्हणजे मुक्त होशील. नंतर त्याप्रमाणें बहुलेनें आचरण करितांच ती पतीसह मुक्त झाली. ह्याप्रमाणें बहुलाख्यान श्रवण करणारे, व पठण करणारे ऐहिक सुखाचा लाभ घेऊन शेवटीं शिवलोकाला प्राप्त होतात.

ब्रह्मोत्तरखंड समाप्त ॥ ३ ॥

ब्रह्मखंड समाप्त ॥ ३ ॥

# स्कंदपुराण.

## काशीखंड ४. ( पूर्वार्ध ).

### अध्याय १ ला.

#### विन्ध्यपर्वताची वाढ.

प्रथम ग्रंथ निर्विघ्नपणें समाप्त व्हावा, ह्या इच्छेनें सर्व विघ्नांचा नाश करणारा जो गणपति त्याला वंदन करून, तसेंच त्या काशीक्षेत्राचें स्थानमाहात्म्यहि दर्शवून; व इष्ट देवता जी शंकर तिला साष्टांग प्रणिपात करून व्यास सूतांना पापनाशक अशी शिवकथा सांगण्यास प्रारंभ करतात. व्यास म्हणतात; सूता! एकदां नारदऋषि फिरत फिरत नर्मदातीरीं येऊन ॐकारेश्वराची पूजा करिते झाले. तेथून ते विंध्यपर्वतावरून चालले असतां विंध्यपर्वताला म्हणताल; हे पर्वता! तूं सर्व वस्तूंनीं व शोभांनीं युक्त आहेस; तुझी बरोबरी करणारा त्रिभुवनांत दुसरा पर्वत मिळणार नाहीं; ज्या ज्या वस्तु त्रिभुवनांत मिळत नाहींत, त्या त्या सर्व वस्तु तुझे ठिकाणीं मुबलक आढळतात. तथापि मला एकच वाईट वाटतें कीं, असें असून सुद्धां ज्योतिषचक्र मेरुपर्वताला प्रदक्षिणा घालतें, तुला घालीत नाहीं; तो सर्व त्रैलोक्याला आधारभूत अशी त्याची लोकामध्यें प्रसिद्धि आहे. असें कां व्हावें; हें मात्र मला कळत नाहीं. ह्या गोष्टीचें स्मरण झालें, म्हणजे मला तुझ्याबद्दल फार दया उत्पन्न होऊन फारच वाईट वाटतें. आज सहज तुझी गांठ पडली; म्हणून सांगितलें. ह्यामुळें तूं मेरूहूनहि श्रेष्ठ असतां लोक तुला मानीत नाहींत; करितां ज्यायोगें तुला सूर्यादि ग्रह प्रदक्षिणा घालतील, असा एकादा उपाय योजावा, हें माझ्या मतें तुझ्या लौकिकाला उत्तम साधन आहे. असें सांगून नारद निघून गेले. ह्याप्रमाणें हें नारदाचें भाषण ऐकून विंध्यपर्वताला फारच राग आला; आणि आतां आपण मेरूपेक्षां मोठें होण्यास काय उपाय केला पाहिजे! असा विचार करीत असतां त्याला एक युक्ति सुचली कीं, आपण मेरुपर्वताहून उंच वाढून सूर्यगतीला प्रतिबंध करावा; म्हणजे आपला कार्यभाग होईल. असें म्हणून विंध्यपर्वत अत्यंत वाढून सूर्योदयाची वाट पाहत बसला.

# अध्याय २ रा.

## सत्यलोकवर्णन.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सूर्योदय होताच विंध्यपर्वत उंच वाढल्यामुळें त्या सूर्यगतीचा निरोध झालेला पाहून पृथ्वीवरील सर्व लोकांचीं नित्यकर्मे राहून गेलीं. होमहवनादि कर्माच्या अभावामुळें इंद्रादि देवांना हविर्भाग मिळत नाहींसे झाले. हा प्रकार पाहून त्या देवांना मोठी काळजी उत्पन्न झाली; व ते सत्यलोकीं जाऊन; व अभीष्टदनांवाचें स्तोत्र म्हणून त्यांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली. त्या स्तोत्राचे योगें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन देवांना म्हणाले कीं, देवहो! मी तुमच्या स्तुतीनें प्रसन्न झालों आहें. तुम्ही येथें कशाकरितां आलां आहां? तुम्हाला सत्यलोकीं येण्याचें कारण काय? वगैरे विचारलें असतां देवांनीं ब्रह्मदेवाला विंध्याचलाचें वर्तन व सूर्यगतीचा निरोध इत्यादि प्रकार सांगितला. तेव्हां ब्रह्मदेव देवांना म्हणतात कीं, सत्यलोकांत मूर्तिमंत चार वेद, यज्ञ, सत्य, धर्म, तप, दम, ब्रह्मचर्य, श्रुति, स्मृति, इतिहास वगैरे सुखदायक अनंत वस्तु आहेत. ह्या सत्यलोकांत येणारे लोक क्रोधरहित, मत्सररहित, लोभरहित, निष्काम, अशा तऱ्हेचे असतात. ह्या ठिकाणीं सर्व स्त्रिया पतिव्रताधर्मानें वागणाऱ्या आहेत. येथें वास्तव्य करणारे पुरुषहि स्वधर्मरत असतात. जे लोक माघमासांत प्रयाग क्षेत्रांत स्नानादि करतात, जे काशीक्षेत्रांत पंचनद तीर्थांत स्नान करतात; जे मणिकर्णिका तीर्थांत स्नान करून द्रव्यदानानें ब्राह्मणांना संतुष्ट करतात, ते लोक कल्पपर्यंत ह्या माझ्या सत्यलोकांत राहतात. ह्या सत्य लोकाच्या वरतीं वैकुंठ लोक आहे, त्याच्याहि वर शिवलोक आहे; व त्या शिवलोकाचेहि वरच्या प्रदेशांत गोलोक आहे. त्या गोलोकांत सुशीलादि गोमाता मोठ्या आनंदानें राहतात. त्या गोलोकांत दुधाच्या नद्या व खिरीचा चिखल आहे. त्या लोकांत राहणारांना जरावस्था प्राप्त होत नाहीं. श्रुति, स्मृति; व पुराण जाणणारे तेच खरे ब्राह्मण होत; बाकीचे नामधारी ब्राह्मण होत. जो धर्म श्रुतिस्मृतींत सांगितला आहे, तोच पुराणांमध्यें सांगितला आहे. ज्यांना सत्यलोकांत राहण्याची इच्छा असेल त्यांनीं गंगातटाकी राहून पुराणश्रवण करावें. चौदा विद्यांमध्यें पुराण श्रेष्ठ आहे. तुम्ही ह्या सत्यलोकीं आल्यामुळें तुम्हाला आतां भिण्याचें कारण नाहीं. तुम्ही ज्या हेतूनें येथें आलां आहां, तोच तुमचा हेतु काशीक्षेत्रांत विश्वेश्वराजवळ गेल्यास साध्य होईल. असें सांगून ब्रह्मदेव गुप्त झाले. नंतर इंद्रादिदेव काशीक्षेत्रांत येऊन विश्वेश्वराची स्तुति करूं लागले.

# अध्याय ३ रा.

## अगस्त्याश्रमवर्णन.

देवांनीं केलेली स्तुति ऐकून विश्वेश्वर प्रसन्न होऊन देवांना वर माग असें म्हणूं लागले. नंतर देवांनीं सर्व वर्तमान विश्वेश्वराला सांगितल्यानंतर विश्वेश्वर देवांना म्हणाले,-देवहो! तुम्ही येथून जवळच असणाऱ्या अगस्तिऋषीच्या आश्रमाला जाऊन अगस्तीला सर्व दुःख निवेदन करा; म्हणजे तो तुमच्या दुःखाचा परिहार करील. असें विश्वेश्वराचें भाषण ऐकतांच इंद्रादि देव जवळच असणाऱ्या अगस्त्यऋषीच्या आश्रमाला प्राप्त झाले. त्या आश्रमामध्यें अगस्त्यऋषी आपल्या नांवानें एक शिवलिंग व कुंड स्थापून तेथें शतरुद्रीयसूक्ताचा जप करीत बसला होता. देवांनीं दुरूनच अगस्त्यऋषीला पाहून नमस्कार केला. त्या अगस्त्यऋषीचा आश्रम इतका पुण्यवान् होता कीं, त्याच्या जवळ राहणाऱ्या विरुद्धवृत्तींच्या पशूंचीहि बुद्धि सरळ व द्वेषरहित; झाली होती. त्या आश्रमासन्निध ससे व लांडगे, उंदीर व मांजर; साप व मुंगुस सिंह व हत्ती हे आपआपलें वैर सोडून एकमेकांशीं प्रेमानें क्रीडा करीत होते. त्या आश्रमासभोंवार हंस, कारंडव, चक्रवाक, कोकिला, मयूर वगैरे पक्षी मोठ्या आनंदानें शब्द करीत होते. त्याप्रमाणेंच तेथें हरिण वगैरे पशुहि सुखानें संचार करून आश्रमाला शोभा आणीत होते. त्या अगस्त्यऋषीच्या आश्रमाच्या सान्निध्यानें काशीनगरीला विशेष महत्त्व प्राप्त झालें. काशीक्षेत्रांत राहून जें सुख प्राप्त होतें, तें सुख ब्रह्मांडांत कोठेंहि मिळावयाचें नाहीं. काशीक्षेत्रांत राहणाऱ्यांना चारहि पुरुषार्थ साध्य करून घेतां येतात. काशीक्षेत्रांत राहून गंगोदकानें स्नानादि कर्मे केल्यानें; व षोडशोपचारानें भक्तिपुरःसर विश्वेश्वराची पूजा केल्यानें साक्षात् कैलासाची प्राप्ति होते. काशीक्षेत्र म्हणजे साक्षात् पृथ्वीवरील कैलास असल्यामुळें त्याची बरोबरी कोणींहि करूं शकत नाहीं. अशा पुण्यकारक काशीक्षेत्राला महत्व उत्पन्न करून देणारा असा श्रेष्ठ अगस्त्याश्रम पाहून देवांनीं पुनः पुनः त्या आश्रमाला; व अगस्त्यऋषीला साष्टांग नमस्कार केला. तत्काल अगस्त्यऋषिहि देवांना पाहून आसनांवरून उठले; व त्यांना सामोरे गेले. नंतर ऋषीनें देवांना योग्यस्थानीं बसविलें; व येण्याचें कारणहि विचारिलें. हें आख्यान श्रवण करणारे मोक्षाला जातात.

# अध्याय ४ था.

## पतिव्रताधर्म.

अगस्त्यऋषीच्या प्रश्नाला मान देऊन, इंद्राच्या आज्ञेनें बृहस्पतीनें सर्व हकीकत ऋषीला सांगण्यास सुरवात केली. बृहस्पति म्हणाले,—हे मुने! ज्या आपणाला लोपामुद्रेसारखी पतिव्रता स्त्री मिळाली, त्या आपला प्रभाव किती वर्णन करावा? आपली स्त्री जी लोपामुद्रा तिचें पातिव्रत्य असामान्य आहे. अरुंधती, सावित्री, अनसूया, शांडिली, सत्या, लक्ष्मी, शतरूपा. मेना, सुनीति, संज्ञा, स्वाहा, ह्या पतिव्रता स्त्रियांमध्येंहि लोपामुद्रा ही श्रेष्ठ आहे. लोपामुद्रा ही आपल्या भोजनादि क्रिया झाल्यानंतर स्वतः भोजनादि करिते, आपण लोपामुद्रेला कितीहि त्रास दिला तरी ती दुःखी होत नाहीं. खरोखर पतिव्रतेनें पतीसह भोजनादि विधि केले पाहिजेत. लोपामुद्रा ज्या पतिव्रताधर्मांचें आचरण करिते, ते धर्म आपणाला सांगतों. हळद, कुंकु, शेंदूर, काजळ, चोळी, तांबूल, अलंकार, वेणी वगैरे घालणें, कानांत भूषणें घालणें, हे सर्व प्रकार पतीचें आयुष्य वाढविणारे आहेत; करितां पतिव्रता स्त्रीनें ह्यांचा त्याग करूं नये. पतिद्वेष करणाऱ्या स्त्रीबरोबर भाषण सुद्धां करूं नये. पतिव्रता स्त्रीनें उखळ, मुसळ, सारवण, पाटा, वरवंटा, जातें, उंबरठा, ह्यांवर बसूं नये. पति हा शंकर व विष्णु इत्यादि देवतांहून श्रेष्ठ आहे, असें समजावें. बाप, आई, भाऊ व मुलगा जें देऊं शकत नाहींत, अशी अपरिमित वस्तूंचा लाभ पति करून देतो. पति हा स्त्रियांचा गुरु आहे. जशी झाडाला सोडून सावली दूर होत नाहीं, तशी पतिव्रता पतीला सोडून कधींहि दूर राहत नाहीं. पतिव्रता स्त्रीला पाहून यम थरथरा कांपूं लागतो; सूर्य आपले किरण तिच्यावर सौम्यरूपानें सोडतो. ज्याप्रमाणें गंगास्नानानें शरीर पवित्र होतें, त्याप्रमाणें पतिव्रतेच्या दर्शनानें जगत् पवित्र होतें. पति मृत झाला असतां पतिव्रतेनें सहगमन करावें, न केल्यास विधवाधर्मानें वागावें; म्हणजे ती स्त्री पतीसह स्वर्गांत जाऊन आनंदानें राहते. अशातऱ्हेनें पतिव्रताधर्मानें वागणाऱ्या लोपामुद्रेला कोण वंदन करणार नाहीं? मुने! आतां आपणास विधवा स्त्रियांचे धर्माचार सांगतों.

पती मृत झाला असतां विधवा स्त्रीनें सती नच गेल्यास स्वतः क्षौर करवून मस्तकावरील केश व सौभाग्यलंकार जें मणिमंगळसूत्र तें पतिबरोबर, सहगमनादाखल अर्पण करावें. विधवा स्त्रीनें एक वेळ भोजन करावें; अंगाला तैलमर्दन करून उष्णोदकानें स्नान करूं नये; पतीच्या नांवानें नित्य तर्पण करावें; पतिरूपाने सतत विष्णूचें चिंतन करावें. अनेक प्रकारचीं सुखास्पद

मधुर पदार्थांचीं पेयद्रव्यें पिऊं नयेत; तिनें वैशाखांत उदकुंभ ब्राह्मणाला द्यावा. कार्तिकांत देवापुढें तुपाचा दिवा लावावा; माघांत तिलदान करावें; सूर्योदयीं माघस्नान करावें; अशा तऱ्हेनें विधवाधर्माच्या आचारानें वागणाऱ्या स्त्रिया पतीसह सद्गतीला प्राप्त होऊन आनंदानें राहतात. ह्याप्रमाणें पतिव्रताधर्मानें वागणारी आपली स्त्री साहाय्यभूत असतां; व आपण ब्रह्मरूप असतां कोणती गोष्ट आपले हातून होण्यास अशक्य आहे? आतां आम्ही कशाकरतां आलों, तें ऐक. कोणी विंध्य नांवाचा पर्वत अतिशय उंच वाढल्यामुळें सूर्यगतीचा निरोध होऊन स्नानसंध्यादि कर्मांचा सर्वत्र लोप झाला आहे; व त्यामुळें ह्या देवांना हविर्भाग मिळत नाहींसे होऊन ते दीनावस्थेला प्राप्त झाले आहेत; करितां आपण विंध्याचलाला पूर्ववत् करून ज्यायोगें सर्व व्यवहार उत्तमरीतीनें चालतील असें करा; व हें आपण करण्यास समर्थ आहां, असें विश्वेश्वरानें सांगितल्यामुळें आम्ही व हे इंद्रादि देव येथें आपणाकडे आलों आहों. असें बृहस्पतीचें भाषण ऐकतांच अगस्त्यऋषि बृहस्पतीला म्हणतात, गुरो! आपल्या आगमनानें आम्ही संतुष्ट झालों आहों; व आपलें कार्य आम्हीं खुशीनें पार पाडतों; आपण निर्भयपणें स्वस्थानीं गमन करावें. नंतर सर्व देव स्वस्थानीं निघून गेले. व्यास म्हणतात; सूता! जे कोणी हें पतिव्रता-ख्यान श्रवण किंवा पठण करतील ते स्वर्गलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ५ वा.

### अगस्त्यप्रस्थान.

व्यास म्हणतात;–सूता! नंतर अगस्त्यऋषि देवांची प्रार्थना श्रवण करून आपली पतिव्रता स्त्री जी लोपामुद्रा तिला प्रश्न करिते झाले कीं, हे साध्वी स्त्रिये! आतां आपण देवांच्या पीडा दूर करण्यास काय उपाय योजावा? तसेंच विंध्य पर्वत कोणत्या उपायानें पूर्ववत् स्थिर राहील? विंध्यपर्वत पूर्वी-प्रमाणें करणें म्हणजे मला काशीनगरीचा त्याग करावा लागेल; व तो तर होणें कठीण आहे; कारण काशीक्षेत्रासारखें पवित्र क्षेत्र त्रिभुवनांत कोठेंहि नाहीं. जे लोक काशीक्षेत्राचा त्याग करतात, ते महामूर्ख होत. काशीक्षेत्रांत राहणारे लोक निष्पाप होऊन शिवलोकाला प्राप्त होतात. मी त्रिकाल गंगास्नान करून श्रीविश्वेश्वराचें पूजन करीत आजपर्यंत आनंदांत काळ घालवीत असतां ह्या माझ्या नित्यक्रमांत हें कोठून विघ्न उत्पन्न झालें? मीं पूर्वी कोणतें दुष्कृत केलें होतें कीं, ज्यामुळें मला आज काशीक्षेत्राचा त्याग करण्याचा दुर्घट प्रसंग

प्राप्त झाला आहे ! अशातऱ्हेनें अत्यंत शोक करून मोठ्या कष्टानें अगस्त्य ऋषि लोपामुद्रेसह विंध्यपर्वताकडे जाण्यास निघाले. विंध्यपर्वत हा अगस्त्याचा शिष्य असल्यामुळें अगस्त्यऋषि येतांच त्याला विंध्यपर्वतानें साष्टांग नमस्कार घातला. आपला शिष्य विंध्यपर्वत आपणाला शरण येऊन वंदन करीत आहे, असें पाहून अगस्त्यऋषि विंध्यपर्वताला म्हणतात; हे विंध्याचला ! तुझें कल्याण असो. मी दाक्षिणदिशेला जात आहें, तेथून परत ह्या ठिकाणी येईपर्यंत तूं असाच लहान होऊन रहा; अशी विंध्यपर्वताला त्यांनीं आज्ञा केली. नंतर अगस्त्यऋषि दाक्षिण दिशेकडे निघून गेल्यावर विंध्य पर्वताला फार वाईट वाटलें; तो विंध्यपर्वत अजून अगस्त्याची वाट पाहत बसला आहे; परंतु अगस्त्यऋषि परत येत येत नाहींत; व हा पर्वतहि अजून जशाचा तसाच स्वस्थानीं लहान होऊन राहिला आहे. अशातऱ्हेनें युक्तिप्रयुक्तीनें अगस्त्यऋषीनें विंध्यपर्वताला लहान करून देवांना सुखी केलें. इकडे अगस्यऋषि गोदावरी नदीच्या कांठीं असणाऱ्या अरण्यांत फिरत असतां काशीक्षेत्राचा त्याग केल्याबद्दलचें त्याचें दुःख दूर न होतां तें अधिकाधिक वाढून त्यास पीडा देऊं लागलें. एके दिवशीं अगस्त्यऋषीला प्रत्यक्ष लक्ष्मीचें दर्शन घडलें. तिला पाहून अगस्त्यऋषीला व लोपामुद्रेला फारच आनंद झाला; आणि त्यांनीं लक्ष्मीची स्तुति केली. स्तुतीनें प्रसन्न होऊन, लक्ष्मीनें अगस्त्यऋषीला वर मागण्यास सांगितलें. नंतर अगस्त्यऋषि म्हणाले,—हे माते लक्ष्मी ! जर आपण मजवर प्रसन्न झालां असाल, तर काशीक्षेत्राचा मला वियोग होणार नाहीं असें करा. नंतर लक्ष्मी अगस्त्याला म्हणते कीं, तुह्मी माझी जी स्तुति केली, त्या स्तुतीचें जो पठण व पाठण करील, तो काशीक्षेत्रांतील विश्वेश्वर-पूजनाचें फल मिळवून मोक्षाला जाईल. आतां तूं स्त्रीसह कार्तिकस्वामीकडे जाऊन काशीक्षेत्राचें माहात्म्य श्रवण कर; म्हणजे एकोणतिसाव्या महायुगाच्या द्वापरयुगांत तूं व्यासावतार घेऊन काशीक्षेत्रांत जाऊन राहशील.

---

## अध्याय ६ वा.

### काशीक्षेत्रमाहात्म्य.

व्यास म्हणतात;—सूता ! लोपामुद्रा विनयानें आपला पति जो अगस्त्यऋषि त्याला म्हणाली कीं, हा श्रीशैलपर्वत आपल्या सन्निध असतां आपण काशीक्षेत्रांत जाण्याची इच्छा कां करितां ? असें पत्नीचें भाषण ऐकून अगस्त्यऋषि

म्हणतात; प्रिये! तूं प्रश्न विचारलास तो फारच उत्तम आहे. प्रथम सर्व तीर्थांत प्रयागतीर्थ श्रेष्ठ असल्यामुळें त्याला तीर्थराज म्हणतात. तसेंच नैमिष, कुरुक्षेत्र, गंगाद्वार, उज्जयिनी, अयोध्या, मथुरा, द्वारका, अमरावती, सरस्वती, सिंधुसंगम, गंगेचा व समुद्राचा संगम झालेलें स्थान, कांची, त्र्यंबक, सप्त-गोदावरी, कालंजर, प्रभास, बदरिकाश्रम, महालय, ओंकारक्षेत्र, गोकर्ण, भृगु-कच्छ, भृगुतुंग, पुष्कर, श्रीपर्वततीर्थ, धारातीर्थ, मानसतीर्थ हीं सर्व तीर्थें व गयातीर्थ काशीक्षेत्राची प्राप्ति करून देणारें आहे. हीं वरील तीर्थें काशी-क्षेत्राची प्राप्ति करून देणारीं असल्यामुळें इतर तीर्थांहूनहि ह्या काशीचें महत्त्व विशेष आहे; म्हणून मी काशीक्षेत्रांत राहण्याची इच्छा करितों.

---

## अध्याय ७ वा.

### सप्तपुरीवर्णन.

अगस्त्यऋषि म्हणतात;–प्रिये! आतां तुला सप्तपुरीचें माहात्म्य सांगतों; ऐक. काशी, कांची, माया, अयोध्या, द्वारका, मथुरा; व उज्जयिनी ह्या सात क्षेत्रांना सप्तपुरी हें नांव आहे. ह्या सप्तपुरीमध्यें काशीक्षेत्र सर्वश्रेष्ठ आहे. ह्याविषयीं अशी एक कथा आहे कीं, मथुरेमध्यें भूदेव नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याला शिवशर्मा नांवाचा एक पुत्र झाला. तो शिवशर्मा चौदा विद्या व चौसष्ट कला ह्यांत निष्णात होता. तो वृद्ध झाल्यावर मिळविलेलें द्रव्य आपल्या पुत्रांना वाटून देऊन; स्वतः तीर्थयात्रा करण्याकरितां निघाला. तो प्रथम प्रयागास आला; तेथें एक महिना राहून तीर्थविधि केल्यावर शिव-शर्मा काशीनगरीला जाता झाला. तेथें जातांच प्रथम देहलीविनायकाला शेंदूर लावून; व त्याची पूजा करून त्याला मोदकांचा नैवेद्य त्यानें दाखविला. नंतर तो शिवशर्मा मणिकर्णिका कुंडांत स्नान करून देव, ऋषि व पितर ह्यांना तर्पणविधीनें तृप्त केल्यावर श्रीविश्वेश्वराचें पूजन करिता झाला. ती काशीक्षेत्राचीं अवर्णनीय शोभा पाहून शिवशर्मा अगदीं विस्मित झाला. शिवशर्म्याच्या मनांत इतरहि कांच्यादिक्षेत्रांचें दर्शन घ्यावें, असें आल्यावरून तो प्रथम उज्जयिनी क्षेत्रांत महाकाळेश्वराच्या दर्शनाकरितां प्राप्त झाला. महाकाळेश्वराचें पूजन व स्तोत्रपठण केल्यावर तो शिवशर्मा कांचीनगरीला गेला. तेथें सात दिवस राहून तो द्वारकेला प्राप्त झाला. त्या ठिकाणीं तीर्थविधी करून तो मायापुरीला आला. तेथें स्नानादि करून दुसरे दिवशीं पारणा विधि झाल्यावर ग्रामांतर करणार, इतक्यांत त्याला शीतज्वराची बाधा

होऊन तो मरणोन्मुख झाला. सात दिवस तो शिवशर्मा ब्राह्मण भूतलाचे ठिकाणीं अशा स्थितींत असतां अंतकाळीं सप्तपुरीच्या यात्राप्रभावानें विष्णुदूत त्याला वैकुंठांत नेण्याकरितां विमान घेऊन त्याजवळ प्राप्त झाले.

## अध्याय ८ वा.

### यमलोकवर्णन.

अगस्त्यऋषि ह्मणतात;–प्रिये! नंतर तो शिवशर्मा वैकुंठ लोकांत विमानांत बसून जात असतां पुण्यशील व सुशील नामक विष्णुगणांना वाटेंत लागणाऱ्या यमलोक, पिशाचलोक वगैरे लोकांची माहिती विचारिता झाला. त्या वेळीं ते गण म्हणतात; हे शिवशर्मन्! हा पिशाचलोक पहा. ह्या ठिकाणीं मांसभक्षक असे राक्षस वास करितात. जे कोणी दुसऱ्यांना पीडा देतात, अशुद्ध अंतःकरणानें शंकराची आराधना करितात, ते ह्या पिशाचलोकाला प्राप्त होतात. नंतर यक्षलोक, गंधर्वलोक ह्यांचीहि त्या शिवशर्म्याला विष्णुगणांनीं माहिती दिली. नंतर यमलोकाकडे अवलोकन करून विष्णुगण यमलोकाचें वर्णन करीत शिवशर्म्याला त्याची माहिती देते झाले. जे लोक दुष्कर्में करतात, त्यांना यमलोकांत आपल्या पापकर्माचीं दुःखें भोगावीं लागतात. जे देवाकरितां, अतिथीकरितां; किंवा तीर्थाकरितां अन्न शिजवीत नाहींत, ते कुंभीपाक नरकांत जाऊन आपल्या पापाचें फळ भोगितात. ब्रह्महत्त्या करणारे अंधतामिस्त्र नरकांत पडतात. सुवर्णचोरी करणारे कालसूत्र नरकाला जातात. विष देणारे लोक कालकूट नरकांत पडतात. गर्भहत्या करणारे आमपाकांत जातात; जे राजे प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन करितात ते अंतकाळीं यमलोकीं यमाचें सभेंत सभासद ह्या नात्यानें विराजमान होतात. याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्वधर्माचरण करीत असल्यास ते यमपुरीमध्यें यमाकडून आदरानें पूजित होऊन यमसभेंत राहतात. उशीनर, सुधन्वा, वृषपर्वा, जयद्रथ, मांधाता, दंतवक्र, नाभाग वगैरे राजेहि यमाच्या सुधर्मानामक सभेंत आनंदानें राहतात. ज्यांना यमलोकाचा तिटकारा आलेला आहे, त्यांनीं "**गोविंद माधव मुकुंद हरे मुरारे**" येथपासून "**स्थाणो त्रिलोचन पिनाकधर स्मरारे**" येथपर्यंतच्या दहा श्लोकांचें स्तोत्र पठण करावें; म्हणजे ते जन्ममरणापासून मुक्त होऊन आनंदानें विमानांतून बसून शिवलोकाला प्राप्त होतील.

# अध्याय ९ वा.

## सूर्यलोकवर्णन.

अगस्त्य म्हणतात,–प्रिये! नंतर शिवशर्म्यानें अप्सरोलोकांचें व सूर्यलोकांचें वर्णन विचारल्यावरून विष्णुगण सांगतात; हे शिवशर्मन्, हा अप्सरांचा लोक आहे. ह्या लोकांत वारांगना ( वेश्या ) राहत असतात. ह्या वारांगनांना कामशास्त्राचें, अलंकारशास्त्राचें वगैरेहि ज्ञान अप्रतिम असतें. उर्वशी, मेनका, रंभा, चंद्रलेखा, तिलोत्तमा, अलंबुषा, स्थूलकेशी, कलावती, गुणवती, कलानिधि, गुणनिधि, कर्पूरतिलका, उर्वरा, अनंगतिलका, मदनमोहिनी, चकोराक्षी, चंद्रकला, ऋतुशुक्ला वगैरे एक हजार साठ इतक्या वारांगना मुख्यत्वानें ह्या लोकांत वास करितात; ह्याशिवाय इतर वारांगना आहेत त्या निराळ्याच. जे लोक परोपकार करतात; किंवा युद्धांत देहत्याग करितात ते अप्सरोलोकांत जाऊन अनेक विलासभोगांचा उपभोग घेतात; अशातऱ्हेनें हें अप्सरोलोकवर्णन झाल्यानंतर सूर्यलोकवर्णन ऐकण्याची इच्छा शिवशर्म्यानें प्रदर्शित केल्यामळें विष्णुगण म्हणतात; बा शिवशर्मन्! आपणाला आतां सूर्यलोकाची माहिती सांगतों; ऐका. सूर्यलोकाची प्रधान देवता सूर्य. हाच विराट्पुरुषाचा एक अंश होय. सूर्य हा ज्ञानरूपी आहे. त्रैलोक्याला सूर्याचा आधार आहे. सूर्याला प्रिय असणारा गायत्रीमंत्र सर्व शास्त्रांत मुख्य आहे. “ हंसो भानुः सहस्रांशुः ” वगैरे सत्तर नांवांनीं सूर्योपासना करणारा शिवलोकीं जातो. त्रिकाल संध्याकर्मांत सूर्याला तीनतीन अर्घ्यें द्यावीं; व एकशें आठ वेळां गायत्रीमंत्र म्हणून सूर्यस्तुति करावी. सूर्योपासना करणाराला व्याधि वगैरे होत नाहीं. अंतकाली प्रथम सर्व सृष्टीचा लय सूर्यलोकांत होऊन नंतर सूर्यासह ती सृष्टि महापुरुषांत लीन होते.

# अध्याय १० वा.

## इंद्राग्निलोकवर्णन.

विष्णुगण म्हणतात;–शिवशर्मन्! ही अमरावती नगरी पहा:–ह्या इंद्रलोकांत दिवसाहि चांदणें पडत असतें. ह्या इंद्रलोकांत मोठमोठीं अमृताचीं सरोवरें आहेत. ह्या ठिकाणीं चार शुंडांचे हत्ती राहत असून कल्पवृक्षहि वास्तव्य

करीत आहेत. ह्या इंद्रलोकांत तेहतीस कोटी देव वास करितात. स्वर्गांत इंद्रलोकाएवढें महत्त्वाचें दुसरें स्थानच नाहीं. हें स्थान हजार अश्वमेध यज्ञ केल्यानें प्राप्त होतें. भूर्भुवादि सात लोकांमध्यें राहणारे प्राणी व लोकपाल इंद्राचीच उपासना करण्याकरितां इंद्रलोकांत येण्याची इच्छा करितात. इंद्र-लोकाचें आधिपत्य मिळविण्याकरितां संगरादि राजांनीं शंभर यज्ञ करण्याच्या इच्छेनें पुष्कळ प्रयत्न केले; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ज्योतिष्टोमादि यज्ञ किंवा तुलापुरुषदानादि पुण्यकृत्यें करणारालाच ह्या लोकाची प्राप्ति होते. अशातऱ्हेनें हे इंद्रलोकाचें माहात्म्य तुला थोडक्यांत वर्णन करून सांगितलें; आतां अग्निलोकाचें माहात्म्य सांगतों; ऐक. जे अग्निभक्त आहेत; व जे अग्नीमध्येंच आपला देह अंतकाळीं समर्पित करितात. ते अग्निलोकाला प्राप्त होतात. पंचाग्निसाधनानें तप करणारे लोकहि अग्निलोकाला प्राप्त होतात. ह्याबद्दल कथा सांगतों; पूर्वीं नर्मदातीरीं विश्वानर नांवाचा एक ऋषी होता. त्याची शुचिष्मती नांवाची एक पत्नी होती. एकदां तिनें शंकरासारखा पुत्र व्हावा; म्हणून पतीची प्रार्थना केली. नंतर विश्वानर मुनि काशीनगरींतील विश्वेश्वरप्रमुख लिंगांचें पूजन करून व अनेक कुंडांत स्नान करून चंद्रकूपजलांतही स्नान करता झाला. अशा तऱ्हेनें तो मुनि शिवाराधना करीत असतां तेरा महिने निघून गेले. शेवटीं गंगेंत स्नान करून पाहतों तों एक शिवलिंग व त्या लिंगाच्या मधोमध एक आठ वर्षांचा बाल त्या मुनीच्या दृष्टीस पडला. नंतर त्यानें त्या बालाची स्तुति केली. त्या स्तुतीनें प्रसन्न होऊन तो बाल मुनीला म्हणाला, मुने! तूं कांहीं काळजी करूं नको. तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. मी तुझे पत्नीचे ठिकाणीं पुत्ररूपानें अवतीर्ण होईन. ह्याप्रमाणें बालवचन ऐकतांच मुनि आनंदानें स्वगृहीं परत गेला.

---

## अध्याय ११ वा.

### अग्नीश्वरमाहात्म्य.

अगस्त्यऋषि म्हणतात; हे प्रिये! विष्णुगणांनीं शिवशर्म्याला जें सांगितलें तेंच मी तुला सांगतों; श्रवण कर. नंतर ते गण शिवशर्म्याला सांगतात कीं, त्या बालानें सांगितल्याप्रमाणें विश्वानर मुनीची पत्नी शुचिष्मती गरोदर झाली. दशमास पूर्ण होतांच तिला शुभवेळीं मुलगा झाला. त्यावेळीं जिकडे तिकडे आनंदी आनंद व सर्वत्र शांतता झाली. तिलोत्तमा, अप्सरा, मरीचिप्रमुख ऋषि, महेन्द्रादि पर्वत, नद्या व समुद्र त्या ठिकाणी

बालजन्म पाहण्याकरितां आले. बारावे दिवशीं त्या बाळाचें नांव गृहपति असें ठेविलें. नंतर अन्नप्राशन, चौल व उपनयन हेहि संस्कार त्या बालाचे योग्यकाळीं झाले. उपनयनसंस्कार झाल्यानंतर तीन वर्षांतच त्या बाळस्वरूपी गृहपतीनें सांग वेदाध्ययनहि केलें. हा सर्व प्रकार गृहपतीच्या नवव्या वर्षापर्यंत होऊन तो बालक नववे वर्षी पितृशुश्रूषा करण्यास तत्पर झाला. नंतर विश्वानराचे घरीं नारदऋषि येऊन त्यास म्हणतात; विश्वानरा! तुमचा मुलगा गृहपति फारच सुस्वभावी व विद्वान् आहे मात्र हा बारावे वर्षीं मृत्युमुखीं पडेल. हें नारदभाषण ऐकतांच विश्वानर व शुचिष्मती ह्यांना फारच वाईट वाटलें; व ते अत्यंत शोक करूं लागले. त्यावेळीं गृहपति आपल्या मातापितरांचा शोक दूर करून म्हणाला कीं, मी मृत्युंजय जो शंकर त्याची आराधना करून दीर्घायुष्य मिळवीन, तुम्ही काळजी करूं नका; असें सांगून तो गृहपति मातापितरांच्या आज्ञेनें काशीनगरीला जाऊन; व मणिकर्णिकेंत स्नान करून विश्वेश्वराची हात जोडुन प्रार्थना करिता झाला. नंतर त्या ठिकाणीं धूम्रपान, वायुभक्षण वगैरे घोर कृत्यांनीं मृत्युंजय महामंत्राचा जप करून तो विश्वेश्वराची आराधना करिता झाला. ह्याप्रमाणें दोन वर्षे आराधना करतांच शंकर इंद्ररूपानें तेथें प्रगट होऊन गृहपतीला म्हणतात; हे गृहपते! तुला दीर्घायुष्य प्राप्त झालें आहे. तूंच अग्नि ह्या नांवानें प्रसिद्ध होशील; असें सांगून शंकर अंतर्धान पावले. नंतर गृहपति जो अग्नि त्यानें त्या ठिकाणीं अग्नीश्वर नांवानें एक शिवलिंग स्थापित केलें. जे काशीनगरींत जाऊन अग्नीश्वराचें पूजन करितील, ते अंतकाळीं अग्निलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय १२ वा.

### वरुणेशलिंगस्थापन.

विष्णुगण म्हणतात: शिवशर्मन्! आतां ही निर्ऋतांची संयमिनी नांवाची नगरी पहा! ह्या नगरीमध्यें राक्षस आहेत. हे राक्षस नसून जातीनें मात्र राक्षस आहेत. हे राक्षस स्वभावानें सद्वर्तन करणारे आहेत. जे लोक काशीनगरींत राहून सत्कृत्यांचें आचरण करितात; ते म्लेच्छ असले तरी ह्या पुण्यप्रभावानें निर्ऋतिलोकाला प्राप्त होतात. पूर्वी विध्यारण्यांत पिंगाक्ष नांवाचा एक शबरपति राहत होता. तो नित्य मृगया करून आपली उपजीविका करीत असे. तो अतिथिसत्कार व अनाथांचें पालन करीत असल्यामळें त्या अरण्यांत पिंगाक्षाच्या आश्रयाखालीं एक मोठा गांव तयार झाला. हें पिंगाक्षाचें वर्तन त्याचा चुलता

ताराक्ष ह्यास न आवडून त्यानें पिंगाक्षाच्या गांवावर झडप घातली. त्यावेळीं पिंगाक्षाच्या आश्रितांनीं ताराक्षाला पाहून मोठा आक्रोश केला. ही गडबड पिंगाक्षाला समजतांच त्यानें लोकांना आश्वासन देऊन ताराक्षाशीं युद्ध केलें. त्यांत पिंगाक्षाचा परोपकारार्थ अंत झाला. तोच हा पिंगाक्ष अंतीं निर्ऋति लोकाचा अधपति झाला. जे कोणी गोरस ब्राह्मणाला अर्पण करितात; किंवा जलदान देतात, ते वरुणलोकाला प्राप्त होतात. आतां त्या वरुणलोकाचें महत्त्व वर्णन करतों. पूर्वीं कर्दमप्रजापतीचा शुचिष्मान् नांवाचा एक पुत्र होता. तो कांहीं मुलांना बरोबर घेऊन अच्छोद सरोवरामध्यें स्नान करण्याकरितां गेला. त्या सरोवरांत मुलांना मारणारा असा एक शिशुमार नांवाचा प्राणी होता. शिशुमार ह्या मुलांना हरण करून नेई. एके दिवशीं शुचिष्मान् अच्छोद सरोवरांत क्रीडा करीत असतां त्यालाही त्या शिशुमार नांवाच्या प्राण्यानें आंत ओढून नेलें. नंतर इतर मुलांकडून हें वर्तमान कर्दमप्रजापतीला समजतांच तो शिवध्यानांत अत्यंत निमग्न होऊन चतुर्दश भुवनांत पर्यटण करूं लागला. त्या वेळीं कर्दमानें पाहिलें कीं, आपल्या पुत्राला शिशुमार नांवाच्या प्राण्यानें जलदेवतेच्या स्वाधीन केलें आहे. नंतर कर्दम समुद्राकडे जाऊन म्हणाला कीं, तुझ्या आश्रयानें राहणाऱ्या जलदेवतांनीं माझा मुलगा नेला आहे. मी शिवभक्त असतां माझ्या मुलाला पाण्यांत नेण्याचें कारण काय? तुम्ही निमूटपणें त्याला माझे हवालीं करा; नाहीं तर मी तुमचा नाश करीन. असें सांगतांच समुद्राला भीति वाटून त्यानें कर्दमाच्या मुलाला त्याच्या हवालीं केलें. कर्दमप्रजापती शिवध्यानांतून मुक्त होऊन; व नेत्र उघडून पाहतो; तों आपला मुलगा आपल्यापुढें उभा आहे. नंतर त्यानें कर्दमाला नमस्कार केला; व त्याच्याच आज्ञेनें तो तप करण्याकरितां काशीनगरीला प्राप्त झाला. तेथें त्या कर्दमपुत्र शुचिष्मानानें शिवलिंग स्थापून; व त्याची पूजा करून पांचहजार वर्षं तप केलें. त्याच्या तपानें शंकर प्रसन्न होऊन त्यास 'वर माग' असे म्हणूं लागले. त्यावेळीं शुचिष्मान् म्हणतो; शंकरा! जर आपण प्रसन्न झालां असाल तर मला सर्व जलांवर व जलचरांवर माझा अधिकार, चालेल, असा वर द्या. नंतर शंकरानें त्याला तें आधिपत्य देऊन वरुण नांवानें त्याची स्थापना केली; व पश्चिमदिशेचें आधिपत्यहि त्यास दिलें. शुचिष्मानानें स्थापिलेल्या लिंगाला वरुणेश हें नांव प्राप्त झालें. तो वरुण आपल्या लोकांत सुखानें राहून प्रेमपुरःसर शिवभक्ति करिता झाला.

---

# अध्याय १३ वा.

## कुबेरेश्वरमाहात्म्य.

विष्णुदूत शिवशर्म्याला म्हणतात;-ही वायूची गंधवती नगरी पहा. ह्या नगरीचा प्रभंजन नामक वायु अधिपति आहे. त्यानें शिवाराधना करून दिक्पालत्व संपादिलें. पूर्वी कश्यपाचा पूतात्मा नांवाचा एक पुत्र होता, तो काशीमध्यें जाऊन, व तप करून दहाहजार वर्षे शिवपूजन करिता झाला. त्याच्या तपानें प्रसन्न होऊन शंकरानें वर मागण्यास सांगितलें. पूतात्मा शंकरास म्हणाला; देवा! मला दुसरा कोणताहि वर नको, फक्त माझी तुझे ठिकाणीं अचल भक्ति असावी, एवढाच वर द्या. शंकर त्याप्रमाणें वर देऊन त्यास दिग्पालत्वहि देता झाला. त्यानें स्थापिलेल्या लिंगास शंकरानें पावमानेश्वर हें नांव दिलें. जे कोणी ह्या पावमानेश्वर लिंगाची पूजा करितात, त्यांचे आत्मे पूत म्हणजे पवित्र होतात. हें लिंग ज्येष्ठेश लिंगाच्या पश्चिमबाजूला आहे. ह्या गंधवती नगरीच्या पूर्वेस कुबेराची अलका नांवाची नगरी आहे. ह्या कुबेरानें शंकराजवळ सख्य करून महापद्मादि निधींचें आधिपत्य व उत्तरदिशेचें दिग्पालत्व संपादिलें. पूर्वी सोमवंशांत यज्ञदत्त नांवाचा एक यज्ञकर्मांत कुशल असा ब्राह्मण होता. त्याला गुणनिधि नांवाचा एक पुत्र झाला. तो पूर्वी जुगार वगैरे दुष्कर्मांनीं युक्त होता; परंतु मातेच्या व पत्नीच्या सांगण्यावरून पश्चात्ताप झाल्यामुळें तो शिवध्यानांत निमग्न असता झाला. नंतर त्याला अंतकाळीं यमदूतांनीं यमलोकीं नेऊन त्याच्या दुष्कृत्याचीं फळें त्यास दिलीं; व शेवटीं पश्चात्तापानें हा शिवध्यान करीत असल्यामुळें त्याला राजकुळांत दुर्दम नांवानें दुसरा जन्म प्राप्त झाला. तो नित्य शिवालयांत जाऊन; व देवासन्निध दिवे लावून देवालय प्रकाशित करीत असे; व त्यानें आपल्या राज्यांत राहणाऱ्या सर्वांना हुकूम सोडला कीं, जर कोणी देवालयांत जाऊन दिवे लाविले नाहींत, तर तुम्हाला शिक्षा करीन. त्याच्या सर्व राज्यांत जिकडे तिकडे शिवपूजन व दिपोज्ज्वलन चालत असे; त्यायोगें शंकरानें प्रसन्न होऊन त्या राजाला उत्तरदिशेचें आधिपत्य दिलें; व त्याचें नांव कुबेर असें ठेविलें. नंतर त्यानें एक शिवलिंग स्थापून यक्षांचें आधिपत्य मिळविलें; व त्या लिंगाचें नांव कुबेरेश्वर असें ठेविलें. जे कोणी ह्या कुबेरेशाचें पूजन करितात, ते पापरहित व सुखयुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

# अध्याय १४ वा.

## चंद्रेश्वरमाहात्म्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! अलकानगरीच्या पूर्वेस ऐशानी नांवाची नगरी आहे. शिवाची उपासना करणारे शिवभक्त त्या नगरींत वास करितात. पूर्वी अहिर्बुन्ध्य वगैरे एकादश रुद्रांनीं काशीनगरींत तप करून ईशानेश नांवाचें लिंग स्थापित केलें; व त्या पुण्यप्रभावानें ते अहिर्बुन्ध्यादि शिवस्वरूपें धारण करून व ईशान दिशेचें आधिपत्य मिळवून ऐशानी नगरीला प्राप्त झाले. जे कोणी अष्टमीला व चतुर्दशीला ईशानेशाचें पूजन करितात ते शिवलोकाला प्राप्त होतात. नंतर विष्णुदूत चंद्रलोकाकडे दृष्टि देऊन शिवशर्म्यांस चंद्रलोकाचें माहात्म्य सांगतात; हे शिवशर्मन् हा चंद्रलोक पहा ! या चंद्राच्या किरणांपासून अमृत निघून तें सर्व जगाला तृप्त करितें. पूर्वी ब्रह्मदेव अनुत्तर नांवाचें तप तीन हजार वर्षेपर्यंत करून शेवटीं आपलें रेत त्यानें धरतीं फेंकलें, ते सोमपणाला प्राप्त झालें. नंतर तें सोमपणाला प्राप्त झालेलें रेत दाहीं दिशांकडे दहा प्रकारांनीं पडलें; तें दहा देवींनीं प्राशन केल्यामुळें त्यांस गर्भधारणा झाली. त्या दाही जणींनीं तें गर्भतेज सहन न होऊन टाकून दिलें; व तें एकरूप होऊन सोमनांवानें प्रसिद्ध झालें. ब्रह्मदेवानें त्या सोमाला रथांत घालून त्रैलोक्यांत हिंडविलें; व त्यापासून उत्पन्न झालेल्या सोमरूप अमृतापासून सर्वत्र वनस्पति उत्पन्न झाल्या. नंतर सोम हा काशीमध्यें येऊन शंभर पद्म इतकीं वर्षें तप करिता झाला. त्या ठिकाणीं चंद्रेश नांवाचें लिंग स्थापून तो त्याचें नित्य पूजन करीत असे. शंकर सोमावर संतुष्ट होऊन त्याला आपल्या भालप्रदेशीं धारण करिते झाले. पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर सोमानें दहा हजार राजसूय यज्ञ केले. यज्ञांत उमेसह शंकराची आराधना केल्यामुळें त्यास सोम हें नांव प्राप्त झालें. चंद्रेश्वरासन्निध केलेल्या राजसूय यज्ञाचे योगें त्याला चद्रलोकाचें आधिपत्य मिळालें. शंकर सोमाला म्हणतात; सोमा ! मी ह्या चन्द्रेश्वरासन्निध प्रत्येक पौर्णिमेला राहून भक्तांचे मनोरथ पूर्ण करीन. तसेंच सोमवारीं अमावास्या आली असतां किंवा सोमवारीं त्रयोदशी असतां उपोषण व दानधर्म करून जे माझें पूजन करितील ते निष्पाप होत्साते चंद्रलोकाला प्राप्त होऊन; व तेथें अनेक सुखें भोगून शिवलोकाला प्राप्त होतील. चंद्रेश्वरानजीक असणाऱ्या चंद्रोदकुंडासन्निद्ध जे श्राद्धादि करितील त्यांचीं बेचाळीस कुळें उद्धरून शिवलोकाला प्राप्त होतील. हे सोमा ! तूं स्थापित केलेल्या चंद्रेश्वराचें दर्शन दुर्वर्तनी व दुष्ट लोकांना

व्हावयाचें नाहीं. ह्याप्रमाणें सोमाला वर देऊन शंकर अंतर्धान पावते झाले. हें आख्यान श्रवण करणारेहि शिवलोकाला; व चंद्रलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय १५ वा.

### बुधेश्वरमाहात्म्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! पूर्वीं सृष्टीची उत्पत्ति करण्याकरितां ब्रह्मदेव प्रवृत्त झाले असतां त्याच्या पायाच्या आंगठ्यापासून दक्षप्रजापति उत्पन्न झाला. त्या दक्षाला साठ मुली होत्या. त्यांनीं काशीनगरीला जाऊन शंकराची आराधना केली. शंकराला प्रसन्न करून त्या मुलींनीं तुझ्यासारखा आम्हाला योग्य पति मिळावा, अशी त्यांचीं प्रार्थना केली. शंकरानें त्यांस तसा वर दिला. त्या मुलींनीं एक शिवलिंग स्थापून त्याला नक्षत्रेश्वर हें नांव दिलें. शंकरानें त्या मुलींना नक्षत्रलोकांत राहण्यास सांगून म्हटलें कीं, जे कोणी ह्या नक्षत्रेश्वराचें पूजन करतील ते सर्व पीडारहित होऊन नक्षत्रलोकाला प्राप्त होतील. नंतर विष्णुदूतांनीं बुधलोकाकडे दृष्टि करून त्याचें वर्णन करण्यास सुरुवात केली. विष्णुदूत म्हणतात, पूर्वीं चंद्रानें बृहस्पतीची स्त्री जी तारा तिचे ठिकाणीं व्यभिचारधर्मानें बुध नांवाचा एक पुत्र उत्पन्न केला. नंतर बुध सोमाची आज्ञा घेऊन तप करण्याकरितां निघाला, तो काशीनगरीला जाऊन; व तेथें शिवलिंग स्थापून तप करूं लागला. शंकर प्रसन्न होऊन वर माग म्हणताच बुधानें शंकराची स्तुति करून वर मागितला कीं, माझी भक्ति सदोदित तुझे चरणकमलाचे ठिकाणीं राहून मला सद्गति प्राप्त व्हावी. नंतर शंकर बुधाला इच्छित वर देऊन म्हणतात; बुधा ! तूं स्थापिलेलें हें लिंग बुधेश्वर नांवानें प्रसिद्ध होईल. तूं ह्या लिंगाचें पूजन केल्यामुळें नक्षत्रलोकाच्या वर असणाऱ्या लोकांत तुला राहण्यास स्थान मिळून तो लोक तुझें नांवानें प्रसिद्ध होईल. नवग्रहांमध्यें सर्व लोक तुझी पूजा करितील, असें म्हणून शंकर अंतर्धान पावले. जे कोणी बुधेश्वराचें पूजन करितील ते बुधलोकीं जातील.

## अध्याय १६ वा.

### शुक्रेश्वरमाहात्म्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! पूर्वीं अंधकासुर व शंकर ह्यांचें युद्ध सुरू असतां गिरिव्यूह, वज्रव्यूह वगैरे अनेक सैन्यांचे अभेद्य असे व्यूह तयार केले;

व युद्धांस प्रारंभ झाला. शंकराकडून पराजय पावलेला अधंकासुर शुक्राजवळ येऊन म्हणतो; गुरो! आपण आमचें रक्षण करा. सर्व सैन्य शंकरानें मारून टाकिलें आहे. आपल्या आश्रयानें आह्मी त्रैलोक्याला कस्पटाप्रमाणें मानतों. आपण आमच्यावर कृपा करून आमचें सैन्य जिवंत करा. असें अंधकाचें भाषण ऐकून शुक्राचार्य म्हणतात; अंधका! मी तुमचें रक्षण करून तुमच्या सैन्याला आपल्या संजीविनीविद्येच्या सामर्थ्यानें जिवंत करितों. तूं आतां काळजी न करितां युद्धाला जा. अंधक पुनः युद्ध करण्यास गेला असतां शुक्राचार्यानें अंधकाच्या सर्व सैन्याला जिवंत केलें, हें वर्तमान गणपतीकडून शंकराला समजतांच शंकरानें मी त्याचा बंदोबस्त करितों; म्हणून सांगितलें. नंतर गणपति युद्धभूमीवर युद्ध करूं लागला. नंदीश्वराचें व अंधकाचें युद्ध सुरु होऊन त्यांत नंदीश्वराची त्रेधा उडाली. पुढें गणपतीनें आपल्या मुखापासून अग्नि उत्पन्न करून असुरसैन्याला जिवंत करणाऱ्या शुक्राच्या अंगावर फेंकला अग्नीला भीऊन शंकराला शुक्राचार्य शरण गेला असतां शंकरानें त्या शुक्राचार्याला गिळून टाकिलें; त्यावेळीं दैत्यांना फार वाईट वाटलें. पुढें अंधकाचा पराजय झाला. शुक्राचार्य शंकराच्या उदरांतून लिंगद्वारा शुक्ररूपानें म्हणजे वीर्यरूपानें बाहेर पडले; म्हणून त्यांना शुक्र हें नांव प्राप्त झालें. त्यापूर्वी त्यांना भृगुपुत्र म्हणून भार्गव हें नांव प्राप्त झालें होतें. नंतर शुक्ररूपानें शिवलिंगांतून बाहेर पडलेले शुक्राचार्य काशीनगरींत जाऊन; व शिवलिंगाची स्थापना करून त्याचें त्यानें पूजन केलें; व घोर तपहि केलें. त्याच्या तपानें शंकर प्रगट होऊन शुक्राचार्यास वर मागण्याविषयीं ह्मणूं लागले. त्यावेळीं शुक्राचार्य शंकराची स्तुती करून म्हणतात कीं, माझी तुझेठिकाणीं अचल भक्ति कायम राहावी; एवढी माझी इच्छा आपण पूर्ण करा. ह्याप्रमाणें शुक्रानें केलेली स्तुती; व मागणी ऐकून शंकर प्रसन्न झाले; व त्यास म्हणतात; शुक्रा! तुझ्या आराधनेनें मी प्रसन्न झालों आहे. तुला पूर्वीप्रमाणें संजीविनीविद्या फल देण्यास समर्थ होईल. ह्याठिकाणीं शुक्रेश्वरनांवानें हें लिंग प्रसिद्ध होईल, व तुला शुक्रलोकाचें आधिपत्य मिळून तुझी नवग्रहांमध्यें गणना होईल. जे शुक्रेश्वराचें पूजन करितील त्यांस पुष्कळ पुत्र होऊन, मोक्षहि मिळेल.

## अध्याय १७ वा.

### मंगलेश्वरादिमाहात्म्य.

विष्णुगण म्हणतात; शिवशर्मन्! हा मंगळाचा लोक पाहा. ह्या लोकाची तुम्हाला उत्पत्ति सांगतो; ऐका. पूर्वी सतीच्या वियोगानें शंकर तप करीत

असतां त्याच्या मस्तकांतून घामाचा एक बिंदु जमिनविर पडला. त्या घामाच्या बिंदूपासून एक मुलगा उत्पन्न झाला; त्याचेंच नांव मंगळ होय. त्या मंगळानें शंकराच्या आज्ञेनें काशीगरींत जाऊन अनुष्ठान आरंभिलें; व त्याठिकाणीं मंगलेश्वर नांवाचें एक शिवलिंग स्थापित केलें. संकष्टिचतुर्थी मंगळवारी आली असतां जे मंगलेश्वराचें पूजन करितात त्यांना मंगळापासून पीडा होत नाहीं. शंकरानें प्रसन्न होऊन तप करणाऱ्या मंगळाला नवग्रहामध्यें स्थापित केलें; व त्याला मंगळलोकाचें आधिपत्य दिलें; व शंकर अंतर्धान पावले. ह्याप्रमाणें मंगळलोकाची उत्पत्ति शिवशर्म्याला सांगून नंतर बृहस्पतीश्वरलिंगाचें माहात्म्य सांगतात. पूर्वी ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करण्यास तयार झाला असतां त्यानें मरीच्यादि ऋषि उत्पन्न केले. त्यापैकीं अंगिरस ऋषीच्या पुत्रानें म्हणजे बृहस्पतीनें शिवाराधना करून काशीनगरींत बृहस्पतीश्वरलिंगाची स्थापना केली. ह्या बृहस्पतीश्वरलिंगाची आराधना करणारे शिवलोकाला प्राप्त होतात. ह्या बृहस्पतीनें बृहत् म्हणजे मोठें तप केलें; म्हणून त्याला बृहस्पती हें नांव प्राप्त झालें. त्याप्रमाणें सूर्य, शनि व यम ह्यांनीं आपआपल्या नांवानें काशीनगरींत एक एक लिंग स्थापून त्याच्याच प्रसादानें स्वाधिकार संपादिले; व त्यांनीं सर्वांकडून सन्मान मिळविला. सूर्येश्वर, शनैश्चरेश्वर; व यमेश्वर ह्यालिंगांची पूजा करणारेहि निष्पाप होऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय १८ वा.

### सप्तर्षिलोकवर्णन.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! हा सप्तर्षिलोक पाहा ! ह्याठिकाणीं मरीचि, अत्रि, पुलह, पुलस्त्य, क्रतु, अंगिरा, वसिष्ठ ह्या सात ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांची वसती असते. संभूति, अनसूया, क्षमा, प्रीति, सन्नति, स्मृति, ऊर्जा ह्या क्रमानें सप्तर्षीच्या सात स्त्रिया होत. त्या सप्तर्षींना ब्रह्मदेवानें प्रजोत्पादनाची आज्ञा केली असतां ते पित्राज्ञापालन करण्याच्या उद्देशानें कार्यसिद्धी होण्याकरितां काशीनगरींत येऊन; व भिन्नभिन्न सात लिंगांची स्थापना करून शिवाराधना करूं लागले. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन; व त्यांना प्रजापति ही संज्ञा देऊन त्यानें प्रजोत्पादनाचें सामर्थ्यहि दिलें. सप्तर्षींनीं स्थापिलेलीं लिंगें अनुक्रमें; अत्रीश्वर, पुलहेश्वर, पुलस्त्येश्वर, क्रत्वीश्वर, आंगिरेश्वर, वशिष्ठेश्वर, मरीचीश्वर हीं सात लिंगें होत. ह्या आराधनांच्याच योगानें सप्तर्षींना स्वलोकाची प्राप्ति झाली. ह्या सात ऋषींनीं स्थापिलेल्या शिवलिंगाची पूजा केली असतां प्रजोत्पादन; व वंशवर्धन होऊन अंतकाळी शिवलोकप्राप्तीहि होते.

# अध्याय १९ वा.

## ध्रुवचरित्र.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन्! आतां तुम्हाला ध्रुवलोकाचें महत्त्व सांगतों; ऐका. पूर्वी ब्रह्मदेवापासून स्वायंभुव मनु नांवाचा एक पुत्र झाला. त्या स्वायंभुवाला प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन मुलगे झाले. उत्तानपादाला सुरुचि व सुनीति या नांवाच्या दोन बायका होत्या. सुरुचि ही उत्तानपादाची आवडती बायको होती; व सुनीति ही नावडती होती. सुरुचीला उत्तम नांवाचा पुत्र झाला व सुनीतीला ध्रुवनांवाचा एक पुत्र झाला. सुनीति नावडती असल्यामुळें तिला राहण्यास लहानसें एक खोपट बांधून दिलें होतें; व ती त्यांत ध्रुवासह राहत असे. एके दिवशीं उत्तानपाद राजा सभेंत बसला असतां; व सुरुचि तेथें उभी असतां ध्रुव उत्तानपादाजवळ येऊन त्याच्या मांडीवर बसला. हें सुरुचीला न आवडून ती ध्रुवाला म्हणते; ध्रुवा! तूं जरी उत्तानपादराजाचा पुत्र असलास, तरी नावडत्या अशा सुनीतीपासून उत्पन्न झाल्यामुळें ह्या मांडीवर बसण्यास योग्य नाहींस; जर तुला ह्या राजाच्या मांडीवर बसावयाचें असेल तर तप करून तूं माझे उदरीं जन्म घे; म्हणजेच ह्या राजाचे मांडीवर बसण्यास योग्य होशील, असें म्हणून सुरुचीनें ध्रुवाला सिंहासनावरून खालीं ओढिलें; त्यावेळीं राजा स्त्रैण असल्यामुळें तिला कांहींहि दोष न देतां स्वस्थ बसला. ध्रुवाला ह्या सावत्र आईच्या दुष्टाचरणानें; व सभेंत झालेल्या अपमानानें मरणाच्याहि पलीकडचें दुःख झालें; व तो रडत रडत सुनीतीजवळ म्हणजे आपल्या आईजवळ प्राप्त झाला. ध्रुवानें मातेला झालेलें सर्व वर्तमान निवेदन करून तपाला जाण्याचा निश्चय केला. मातेनें ध्रुवाचें पुष्कळप्रकारें सांत्वन करून तूं लहान आहेस, तुझें हातून तपादि कष्टकारक कर्मे होणार नाहींत, करितां तूं हा आपला हट्ट सोडून दे; म्हणून पुष्कळप्रकारें त्याचें समाधान करून सांगितलें; परंतु ध्रुवानें आपला हेका सोडिला नाहीं. ध्रुवाचा दृढ निश्चय जाणून मातेनें त्याला पुष्कल आशीर्वाद देऊन तपाला जाण्याची परवानगी दिली. ध्रुव मातेला नमस्कार करून वनाला जाण्यास निघाल असतां अर्ध्या मार्गांत ध्रुवाला सप्तर्षींची भेट झाली. सप्तर्षींना पाहून ध्रुव त्यांची स्तुति करून तपाला जाण्याची इच्छा त्यांस प्रदर्शित करिता झाला. सप्तर्षींनीं मोठ्या आनंदानें भगवंताच्या स्वरूपाचें तत्त्व ध्रुवाला समजावून देऊन; व त्यास '**ॐनमो भगवते वासुदेवाय**' ह्या द्वादशाक्षरी मंत्राचा उपदेश करून तपाला जाण्यास सांगितलें; व सप्तर्षि स्वस्थानाला

निघून गेले. नंतर ध्रुवहि सप्तर्षींनीं उपदिष्ट केलेल्या मंत्राचा जप करीत; व भगवद्ध्यान करीत तप करण्याकरितां अरण्यामध्यें जावूं लागला.

---

## अध्याय २० वा.

### ध्रुवचरित्र ( पुढें चालू )

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! ध्रुव जों तेथून निघाला तों थेट मधुवनांत जाऊन; व यमुनानदीचे काठीं बसून सप्तर्षींनीं उपदेशिलेल्या " ॐनमो भगवते वासुदेवाय " ह्या द्वादशाक्षरी भगवन्मंत्राचा जप करीत घोर तप करूं लागला. त्याच्या त्या तपानें त्रैलोक्य भयभीत झालें. ध्रुवाला भीति दाखविण्याकरितां इंद्रादिदेवांनीं व्याघ्रादिकांचीं रूपें घेतलीं; व ते ध्रुवाजवळ मोठमोठ्या गर्जना करीत प्राप्त झाले; परंतु ध्रुव सर्व प्राण्यांना ईश्वररूपानेंच पाहत असल्यामुळें त्यांच्या दटावण्याला बिलकूल भ्याला नाहीं; व उलट त्याची तपःशक्ति दिवसेंदिवस वाढूं लागली. देवांनीं ध्रुवाच्या तपांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां अनेक दुसरे उपाय योजिले; पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं सर्व देव ब्रह्मदेवाला शरण जाऊन ध्रुवाच्या तपश्चर्येबद्दल गाऱ्हाणी सांगते झाले. नंतर ब्रह्मदेव देवांना म्हणतात; देवहो ! ध्रुव ध्रुवपदाची इच्छा मनांत धरून तप करीत आहे; त्यामुळें तुम्हाला भिण्याचें कारण नाहीं. त्याच्या तपानें तुमच्या पदाला बिलकुल धक्का बसावायाचा नाहीं. आतां तुम्ही सुखानें स्वस्थानीं जा; मी त्याची व्यवस्था करितों. इतकें सांगून देवांची रवानगी केल्यानंतर ब्रह्मदेव विष्णूकडे जाऊन ध्रुवावर प्रसन्न होण्याविषयीं त्यास सांगते झाले. विष्णुहि ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें ध्रुवावर अनुग्रह करण्याकरितां मधुवनांत प्राप्त झाले; व ध्रुवाला ' वर माग ' असें म्हणूं लागले. नंतर ध्रुव नेत्र उघडून विष्णूकडे मोठ्या आनंदानें पाहूं लागला; व म्हणतो कीं, विष्णो ! मी लहान असल्यामुळें आपली स्तुति करण्याचें मला ज्ञान नाहीं. माझ्या मनांतून आपलें गुण वर्णन करावें, असें आहे. ह्याप्रमाणें ध्रुवभाषण ऐकतांच त्याला ज्ञानप्राप्ति करून देण्याच्या इच्छेनें भगवान् विष्णु ध्रुवाला हस्तस्पर्शानें उभा करून; व त्याच्या गालाला आपल्या शंखाचा स्पर्श करून त्यास ज्ञानदृष्टि देते झाले. भगवंताच्या कृपेनें ध्रुवाला ज्ञानप्राप्ति होऊन तो भगवत्स्तुति करूं लागला.

---

# अध्याय १९ वा.

## ध्रुवचरित्र.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! आतां तुम्हाला ध्रुवलोकाचें महत्त्व सांगतों; ऐका. पूर्वी ब्रह्मदेवापासून स्वायंभुव मनु नांवाचा एक पुत्र झाला. त्या स्वायंभुवाला प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन मुलगे झाले. उत्तानपादाला सुरुचि व सुनीति या नांवाच्या दोन बायका होत्या. सुरुचि ही उत्तानपादाची आवडती बायको होती; व सुनीति ही नावडती होती. सुरुचीला उत्तम नांवाचा पुत्र झाला व सुनीतीला ध्रुवनांवाचा एक पुत्र झाला. सुनीति नावडती असल्यामुळें तिला राहण्यास लहानसें एक खोपट बांधून दिलें होतें; व ती त्यांत ध्रुवासह राहत असे. एके दिवशीं उत्तानपाद राजा सभेंत बसला असतां; व सुरुचि तेथें उभी असतां ध्रुव उत्तानपादाजवळ येऊन त्याच्या मांडीवर बसला. हें सुरुचीला न आवडून ती ध्रुवाला म्हणते; ध्रुवा ! तूं जरी उत्तानपादराजाचा पुत्र असलास, तरी नावडत्या अशा सुनीतीपासून उत्पन्न झाल्यामुळें ह्या मांडीवर बसण्यास योग्य नाहींस; जर तुला ह्या राजाच्या मांडीवर बसावयाचें असेल तर तप करून तूं माझे उदरीं जन्म घे; म्हणजेच ह्या राजाचे मांडीवर बसण्यास योग्य होशील, असें म्हणून सुरुचीनें ध्रुवाला सिंहासनावरून खालीं ओढिलें; त्यावेळीं राजा स्त्रैण असल्यामुळें तिला कांहींहि दोष न देतां स्वस्थ बसला. ध्रुवाला ह्या सावत्र आईच्या दुष्टाचरणानें; व सभेंत झालेल्या अपमानानें मरणाच्याहि पलीकडचें दुःख झालें; व तो रडत रडत सुनीतीजवळ म्हणजे आपल्या आईजवळ प्राप्त झाला. ध्रुवानें मातेला झालेलें सर्व वर्तमान निवेदन करून तपाला जाण्याचा निश्चय केला. मातेनें ध्रुवाचें पुष्कळप्रकारें सांत्वन करून तूं लहान आहेस, तुझें हातून तपादि कष्टकारक कर्मे होणार नाहींत, करितां तूं हा आपला हट्ट सोडून दे; म्हणून पुष्कळप्रकारें त्याचें समाधान करून सांगितलें; परंतु ध्रुवानें आपला हेका सोडिला नाहीं. ध्रुवाचा दृढ निश्चय जाणून मातेनें त्याला पुष्कल आशीर्वाद देऊन तपाला जाण्याची परवानगी दिली. ध्रुव मातेला नमस्कार करून वनाला जाण्यास निघाल असतां अर्ध्या मार्गांत ध्रुवाला सप्तर्षींची भेट झाली. सप्तर्षींना पाहून ध्रुव त्यांची स्तुति करून तपाला जाण्याची इच्छा त्यांस प्रदर्शित करिता झाला. सप्तर्षींनीं मोठ्या आनंदानें भगवंताच्या स्वरूपाचें तत्त्व ध्रुवाला समजावून देऊन; व त्यास '**ॐनमो भगवते वासुदेवाय**' ह्या द्वादशाक्षरी मंत्राचा उपदेश करून तपाला जाण्यास सांगितलें; व सप्तर्षि स्वस्थानाला

आहे. ह्या जंबुद्वीपांत एकंदर नऊ खंडे आहेत; पैकीं भरतखंड सर्वश्रेष्ठ आहे. त्या भरतखंडांत कुरुक्षेत्र श्रेष्ठ; त्याहून नैमिषारण्य; त्याहून प्रयाग; व त्याहून अविमुक्तक्षेत्र हीं उत्तरोत्तर श्रेष्ठ होत. अविमुक्तक्षेत्र म्हणजेच काशीक्षेत्र. ह्या काशीक्षेत्रा इतकें श्रेष्ठ स्थान चतुर्दशभुवनांत दुसरें मिळावयाचें नाहीं. काशीक्षेत्रांत जर पाप केलें तर त्या पापाची निष्कृति सहस्त्रावधि कल्पपर्यंत जरी पुण्यकृत्यें करीत बसलों तरी होणार नाहीं, हें पक्कें समजावें. ह्या काशीक्षेत्रांत विश्वेश्वरासंनिध इंद्रादि देव, मरीच्यादि ऋषि; व इतर पुण्यपुरुष प्राप्त होऊन त्याची आराधना करितात; असा ह्या क्षेत्राचा महिमा आहे. पूर्वीचें कांहीं तरी पुण्य अवशिष्ट असल्या शिवाय काशीक्षेत्रांत जाण्याची बुद्धि होणें अशक्य आहे.केवल काशीक्षेत्राच्या नामस्मरणानेंहि शिवलोक मिळतो.

---

# अध्याय २३ वा.

## शिव व विष्णु ह्यांचें ऐक्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! आतां प्रथम तुला सर्व लोकांचा रचनाक्रम सांगून शिव व विष्णु हे एकरूप असून ह्यांचें परस्पराशीं साम्य आहें; हेंहि वर्णन करून सांगतों; ऐका. पृथ्वीची लांबीरुंदी दाहा लक्ष योजनें आहे. एक योजन म्हणजे चार कोस ह्याप्रमाणानें अदमास करावा. ह्याच्या वरती दाहा लक्ष कोस उंचावर सूर्यलोक आहे. सूर्यलोकाच्या वर एक लक्ष योजनें चंद्रलोक आहे. चंद्रलोकाच्या वरती एक लक्ष योजनें नक्षत्रमंडललोक आहे. त्याहून दोन लोक्ष उंचीवर बुधलोक आहे. त्यावर दोन लक्ष अंतरावर शुक्र लोक, तितक्याच अंतरावर मंगळलोक आहे. मंगळलोकाच्यावर वीस लक्ष अंतरावर बृहस्पतिलोक आहे. त्याहून दोन लक्ष अंतरावर शनिलोक आहे. शनिलोकाचे वर दाहा लक्ष योजने अंतरावर सप्तर्षींचा लोक आहे. सप्तर्षि लोकाच्या वर शंभर कोटी योजने उंच ध्रुवलोक आहे. त्या नंतर महर्लोक जनलोक; व सत्यलोक हें प्रत्येकीं दोन लक्ष योजनें अंतरावर आहेत. ह्या सर्व लोकांचे वर्णन करण्यास साक्षात् ईश्वरहि समर्थ होणार नाहीं. आतां शिव व विष्णु ह्यांचें ऐक्य किती महत्त्वाचें आहे, पाहा. शिव व विष्णु हे एकच आहेत. "**शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः**" असें प्रमाणवाक्य आहे. प्रत्यक्ष शंकरानें ब्रह्मदेवाला सांगितलें आहे कीं, शिव व विष्णु ह्यांत अभेद मानल्यानें मी त्याच्यावर संतुष्ट होतों. मी विष्णूचें पूजन करीत असल्यामुळें विष्णु व मी एकच आहों; असें म्हणून शंकरानें विष्णूच्या

## अध्याय २१ वा.

### ध्रुवेश्वरमाहात्म्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! भगवंताच्या प्रसादानें ज्ञानी झालेला ध्रुव भगवंताचें गुणानुवाद ज्यांत वर्णिलें आहेत, असें स्तोत्र पठण करून भगवंताला आळविता झाला. ध्रुव म्हणतो; हे विष्णो ! आपण ब्रह्मस्वरूप असून त्रैलोक्याची उत्पत्त्यादि कर्मे करणारे आहां, त्या आपणाला नमस्कार असो. आपण त्रिगुणस्वरूपी; व दशावतार धारण करणारे असून विश्वरक्षण करणारे आहां; अशा आपणाला मी नमस्कार करितों. अशातऱ्हेनें स्तुती केल्यानंतर भगवान् संतुष्ट होऊन ध्रुवाला इच्छित वर देते झाले. नंतर ध्रुवाला गरुडावर बसवून; व स्वतःहि बसून भगवान् विष्णु काशीनगरींत जाऊन ध्रुवाला काशीक्षेत्राचे व विश्वेश्वराचें माहत्म्य सांगून म्हणतात कीं, ध्रुवा ! तूंहि ह्या काशीनगरींत एक शिवलिंग स्थापन करून त्याचें पूजन कर; म्हणजे तुझें कल्याण होईल, असें सांगून श्रीविष्णु गरुडासह अंतर्धान पावले. नंतर ध्रुव त्याठिकाणीं ध्रुवेश्वर नांवानें एक शिंवलिंग स्थापून व त्याचें पूजन करून ध्रुवलोकाला प्राप्त होता झाला. जे कोणी ध्रुवेश्वरपूजन करितील ते ध्रुवलोकाला जातील.

## अध्याय २२ वा.

### काशीमहत्त्व.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! ह्या स्वर्गलोकाच्याहि वर असणारा महर्लोक पाहा. ज्यांनीं आपल्या भयंकर तपानें ईश्वराला संतुष्ट करून निष्पापत्व संपादिलें, तेच लोक ह्या लोकांत कल्पपर्यंत राहतात. अशातऱ्हेनें विष्णुदूतांनीं महर्लोकाचें वर्णन केल्यावर शिवशर्म्याला जनलोक, तपोलोक व सत्यलोक ह्याचेंहि माहात्म्य वर्णन करून सांगितलें. नंतर विष्णुदूत पुनः शिवशर्म्याला म्हणतात; शिवशर्मन् ! ज्याप्रमाणें हे सत्यलोकापर्यंतचे सर्व लोक मोठमोठीं सुखकारक फळें देणारे आहेत; त्याहूनहि अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल; व पातल ह्या सात लोकांचें माहात्म्य विशेष आहे. त्या सात पातळांहूनहि मेरुपर्वताला वेष्टून राहणाऱ्या इलावृतखंडाचें माहात्म्य अधीक आहे. त्या इलावृताहून सुद्धां जंबुद्वीपाचें माहत्म्य मोठें

आहे. ह्या जंबुद्वीपांत एकंदर नऊ खंडे आहेत; पैकीं भरतखंड सर्वश्रेष्ठ आहे. त्या भरतखंडांत कुरुक्षेत्र श्रेष्ठ; त्याहून नैमिषारण्य; त्याहून प्रयाग; व त्याहून अविमुक्तक्षेत्र हीं उत्तरोत्तर श्रेष्ठ होत. अविमुक्तक्षेत्र म्हणजेच काशीक्षेत्र. ह्या काशीक्षेत्रा इतकें श्रेष्ठ स्थान चतुर्दशभुवनांत दुसरें मिळावयाचें नाहीं. काशीक्षेत्रांत जर पाप केलें तर त्या पापाची निष्कृति सहस्रावधि कल्पपर्यंत जरी पुण्यकृत्यें करीत बसलों तरी होणार नाहीं, हें पक्कें समजावें. ह्या काशीक्षेत्रांत विश्वेश्वरासंनिध इंद्रादि देव, मरीच्यादि ऋषि; व इतर पुण्यपुरुष प्राप्त होऊन त्याची आराधना करितात; असा ह्या क्षेत्राचा महिमा आहे. पूर्वीचें कांहीं तरी पुण्य अवशिष्ट असल्या शिवाय काशीक्षेत्रांत जाण्याची बुद्धि होणें अशक्य आहे.केवल काशीक्षेत्राच्या नामस्मरणानेंहि शिवलोक मिळतो.

---

# अध्याय २३ वा.

## शिव व विष्णु ह्यांचें ऐक्य.

विष्णुदूत म्हणतात; शिवशर्मन् ! आतां प्रथम तुला सर्व लोकांचा रचनाक्रम सांगून शिव व विष्णु हे एकरूप असून ह्यांचें परस्पराशीं साम्य आहे; हेंहि वर्णन करून सांगतों; ऐका. पृथ्वीची लांबीरुंदी दाहा लक्ष योजनें आहे. एक योजन म्हणजे चार कोस ह्याप्रमाणानें अदमास करावा. ह्याच्या वरती दाहा लक्ष कोस उंचावर सूर्यलोक आहे. सूर्यलोकाच्या वर एक लक्ष योजनें चंद्रलोक आहे. चंद्रलोकाच्या वरती एक लक्ष योजनें नक्षत्रमंडललोक आहे. त्याहून दोन लक्ष उंचीवर बुधलोक आहे. त्यावर दोन लक्ष अंतरावर शुक्र लोक, तितक्याच अंतरावर मंगळलोक आहे. मंगळलोकाच्यावर वीस लक्ष अंतरावर बृहस्पतिलोक आहे. त्याहून दोन लक्ष अंतरावर शनिलोक आहे. शनिलोकाचे वर दाहा लक्ष योजने अंतरावर सप्तर्षीचा लोक आहे. सप्तर्षि लोकाच्या वर शंभर कोटी योजने उंच ध्रुवलोक आहे. त्या नंतर महर्लोक जनलोक; व सत्यलोक हें प्रत्येकीं दोन लक्ष योजनें अंतरावर आहेत. ह्या सर्व लोकांचे वर्णन करण्यास साक्षात् ईश्वरहि समर्थ होणार नाहीं. आतां शिव व विष्णु ह्यांचें ऐक्य किती महत्त्वाचें आहे, पाहा. शिव व विष्णु हे एकच आहेत. "**शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः**" असें प्रमाणवाक्य आहे. प्रत्यक्ष शंकरानें ब्रह्मदेवाला सांगितलें आहे कीं, शिव व विष्णु ह्यांत अभेद मानल्यानें मी त्याच्यावर संतुष्ट होतों. मी विष्णूचें पूजन करीत असल्यामुळें विष्णु व मी एकच आहों; असें म्हणून शंकरानें विष्णूच्या

नांवानें जयजयकार केला; व विष्णूला उद्देशून म्हटलें कीं, जे तुला पूजितील ते माझ्या लोकाला प्राप्त होतील. माझा उजवा हात विष्णु व डावा हात ब्रह्मदेव, असें माझें स्वरूप असल्यामुळें विष्णु; व मी एकच आहे. हें मी वर्णन केलेलें विष्णूचें; व माझें ऐक्य जे कोणी श्रवण करितील त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन; व इहलोकीं सुख भोगून अंतकाळीं ते माझ्या लोकाला प्राप्त होतील.

## अध्याय २४ वा.

### शिवशर्म्याला मोक्षप्राप्ति.

विष्णुदूत म्हणतात,-' शिवशर्मन् । आतां तूं ह्या सत्यलोकांत राहून अप्सरांसह क्रीडा कर. नंतर तुला नंदिवर्धन नांवानें राजकुळांत जन्म प्राप्त होईल. तूं त्या जन्मामध्यें अनेक सुखांचा उपभोग घेशील. तुला तीनशे मुलगे होतील. नंतर तूं पुत्राला राज्यावर बसवून; व काशीनगरांत राहून विश्वेश्वराचें पूजनानें ज्ञान मिळविशील. काशीविश्वेश्वराचें तुझ्या हृदयांत सतत वास्तव्य होऊन तूं शेवटीं मोक्षाला जाशील. अशातऱ्हेनें विष्णुदूतांनीं शिवशर्म्याला सांगितल्यानंतर शिवशर्मा शिवलोकाला जाता झाला.

## अध्याय २५ वा.

### अगस्त्याचें स्कंदवनांत प्रयाण.

व्यास म्हणतात; सूता ! नंतर अगस्त्यऋषि लोपामुद्रेसह श्रीशैलपर्वताला प्रदक्षिणा घालून स्कंदवनांत प्रयाण करिते झाले. तें वन अनेक वृक्षांनीं व वेलींनीं सुशोभित असें होतें. त्या वनांत लोहितनांवाचा एक पर्वत आहे. तो पर्वत मेरुपर्वताप्रमाणें शोभत होता. त्या पर्वताचें अवलोकन करणारास असा भास होत असें कीं, हा पर्वत जणुं काय कैलासपर्वताचें एक शिखरच आहे. अशा सुंदर पर्वतावर असणाऱ्या स्कंदाला म्हणजे कार्तिकस्वामीला अवलोकन करून अगस्त्यऋषि त्यांची स्तुति करण्यास प्रवृत्त झाले. अगस्त्य-ऋषीची स्तुति ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! आपण केलेल्या स्तुतीनें मी प्रसन्न झालों आहे. तुमचें कल्याण होवो. आपण येथें काशीक्षेत्र सोडून कशाकरितां आला, हें मला समजले आहे; काशीक्षेत्र हे

पुण्यक्षेत्र असतां लोकोपकारार्थ; व विंध्याचलाची वाढ नाहींशी करण्याकरितां इकडे आला, हें अपणासारख्याला योग्यच आहे. पूर्वी शंकरांनीं पार्वतीला मक्तिप्राप्तीचे तीन उपाय सांगितले होते, त्यांपैकीं काशीक्षेत्रांत नित्य वास असणें हा एक उपाय होय. नंतर अगस्त्यानें कार्तिकस्वामीला काशीक्षेत्रमाहात्म्य विचारल्यावरून ते म्हणतात; मुने! हें माहात्म्य सहस्रमुखाच्या शेषाला सुद्धां वर्णन करितां यावयाचें नाहीं, तें मी आपणाला साहा मुखानें किती वर्णन करून सांगणार? तथापि मी आपणाला आतां काशीक्षेत्रमाहात्म्य सांगतों.

---

# अध्याय २६ वा.

## मणिकर्णिकामाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! काशीक्षेत्रमाहात्म्य सर्वप्रकारची सिद्धि देणारें आहे; करितां तें आपण एकाग्र अन्तःकरणानें श्रवण करावें. काशीक्षेत्राची गणना भूलोकांतील क्षेत्रांत नसून अन्तरिक्षलोकांतील क्षेत्रांत आहे. जे योगी आहेत, तेच ह्या क्षेत्रांत राहतात. काशीक्षेत्रांत राहून जरी दिवसांतून तीनदां भोजन केलें, तरी वायुभक्षण करून राहिल्याचें पुण्य लागतें. काशीमध्यें प्रत्यक्ष शंकराचें राहणें असल्यामुळें त्याला कैलासाचें बरोबरीनें महत्त्व प्राप्त झालें आहे. काशीमाहात्म्य अभक्ताला सांगूं नये. एके दिवशीं विष्णु चक्रपुष्करिणीचे तीरावर शिवाराधना करीत असतां तेथें शंकर पार्वतीसह प्रगट झाले; व विष्णूच्या तपानें संतुष्ट होऊन त्यास वर देण्यास तयार झाले. नंतर विष्णु म्हणतात; देवा! आपण जर माझ्यावर प्रसन्न झाला असाल तर आपण पार्वतीसह येथें कायमचें राहावें, असें मी इच्छितों; तरी एवढा आम्हाला आपण वर द्यावा. शंकर म्हणतात कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें मी येथें राहतों. आजपासून ह्या चक्रपुष्करिणीतीर्थाला मणिकर्णिका हें नांव प्राप्त झालें आहे. काशींमध्यें असणाऱ्या मणिकर्णिकातीर्थासन्निध राहणाऱ्या लोकांस कालादिकांची बाधा होत नाहीं, व कधींहि त्यांस अशुभप्राप्ती होत नाहीं. शंकर म्हणतात; विष्णो! पांच कोश लांब रुंद असा जो काशींतील शुभप्रदेश, त्याठिकाणीं मृत झालेल्यांना शिवलोकगति प्राप्त होते. जोंपर्यंत आपल्याला सामर्थ्य आहे, जोंपर्यंत आपलीं इंद्रियें शिथिल झालीं नाहींत, जोंपर्यंत आपल्याला व्रतोपवासादि विधि अनुष्ठित करण्याचें सामर्थ्य आहे, तोंपर्यंत काशीमध्यें मणिकर्णिकातीर्थांत व्रतोपवासादि विधी करून कृतार्थ व्हावें. काशीक्षेत्रांत जर मृत्यु प्राप्त झाला तर त्यास पुन जन्ममरणादि संसृतीची भीति उरत नाहीं. हें मणिकर्णिकातीर्थमाहाम्य श्रवण करणारे शिवलोकीं जातात.

---

## अध्याय २७ वा.

### गंगामाहात्म्य.

शंकर विष्णूला म्हणतात; विष्णो! आतां अविमुक्तक्षेत्राला वाराणसी हें नांव कां प्राप्त झालें, तें सांगतों. सगरराजानें पूर्वी अश्वमेधयज्ञाला प्रारंभ करून घोडा सोडिला असतां; व त्या घोड्याचें रक्षणार्थ आपले पुत्र योजित केले असतां इंद्रानें तो घोडा सगरपुत्रांच्या नकळत कपिलमुनीच्या आश्रमांत बांधला; व तो तेथून निघून गेला. सगरपुत्रांनीं आपला घोडा कपिलमुनीच्या आश्रमांत पाहून; व हा ह्या मुनीनेंच चोरून आणला असावा; अशा बुद्धीनें मुनीला दोष दिला. कपिलमुनीनें सगरपुत्रांच्या दुर्भाषणानें क्रुद्ध होऊन त्यांस भस्म केलें. नंतर भगीरथानें सगरपुत्रांच्या उद्धारार्थ पृथ्वीतलावर गंगा आणण्याकरितां शंकराची आराधना केली; व पृथ्वीवर गंगा आणून सगरपुत्रांचा उद्धार केला. अशा ह्या पवित्र गंगेचा प्रवाह काशीक्षेत्रांत असल्यामुळें काशीक्षेत्राला म्हणजे अविमुक्तक्षेत्राला वाराणसी हें नांव प्राप्त झालें आहे. गंगानाथाच्या जपानेंहि मुक्ति मिळते; मग प्रत्यक्ष स्नानादि केल्यास मुक्ति मिळेल, हें सांगावयास नकोच. गंगास्नानानें जें फल मिळतें तें कोणतेंहि ठिकाणीं प्राप्त होत नाहीं. प्रत्येक महिन्याला गंगेचे काठीं स्नान व उपवास करून गंगास्तुति करणारा शिवसायुज्याला प्राप्त होतो! तसेंच गंगेचें दशहरास्तोत्र पठण केल्यासहि सर्व पापांची निष्कृति होऊन शिवसांनिध्य प्राप्त होतें.

---

## अध्याय २८ वा.

### वाहीकाख्यान.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! गंगामाहात्म्याला उद्देशून एक कथानक सांगतो; ऐका. पूर्वी एक वाहीकनांवाचा ब्राह्मण होता. तो मीठ विकून आपला निर्वाह करीत असे. त्यानें वेदादिकांचें अध्ययन केलें नसून तो कर्मभ्रष्ट होता. त्या वाहीकानें आपले घरीं एका कोष्ट्याची विधवा स्त्री बायको म्हणून ठेविली होती. देशांत दुष्काळ पडल्यामुळें तो तिच्यासह देशांतराला गेला असतां तेथें एका वाघानें वाहीकाचा प्राण घेतला. नंतर त्याठिकाणीं गिधाड येऊन; व त्या वाहीकाच्या शरीराचें मांस तोंडांत घेऊन निघाला असतां वाटेंत दुसरे गिधाड आलें, व तें मांसप्राप्तीकरितां युद्ध करूं लागलें. त्या

युद्धामुळें पडिल्या गिधाडाच्या तोंडांत जो मांसगोळा होता, तो एकाएकी खालीं गंगेंत पडला; व त्यामुळें तत्काळ वाहिकाला मुक्ति प्राप्त झाली. वाहीक हा इतका पापी असतां त्याचें मांस गंगेंत पतन पावल्यामुळें गंगोदकाच्या केवळ स्पर्शानेंच तो पापमुक्त होऊन शिवलोकीं विमानांत बसून गेला, हा गंगोदकाचा प्रभाव होय. गंगेच्या स्पर्शानें जर इतकें फळ मिळतें, तर गंगोदकांत स्नान केल्यानें किंवा गंगतटाकीं सतत वास केल्यानें फळ किती प्राप्त होईल, ह्याची संख्याच करिता यावयाची नाहीं. सर्व तीर्थांत गंगातीर्थ उत्तम होय. सर्व नद्यांमध्यें गंगानदी श्रेष्ठ आहे. ही गंगा सर्व प्राणिमात्रांना स्वर्गदेणारी असून आत्यंतिक श्रेय देणारी; व मोक्ष देणारी आहे.

---

## अध्याय २९ वा.

### गंगासहस्रनाममाहात्म्य.

जे कोणीं अत्यंत दूर देशांत राहणारे आहेत, किंवा ज्यांना गंगास्नान करण्याचें सामर्थ्य नाहीं, अशा पापी लोकांनीं काय करावें ? त्यांना गंगास्नानाचें फल कसें मिळेल ? असा अगस्त्यांनीं प्रश्न केल्यावरून कार्तिकस्वामी अगस्त्यांना सांगतात; मुने ! जरी पृथ्वीतलावर तीर्थें व क्षेत्रें असंख्य आहेत. तथापि गंगेची बरोबरी करणारें असें एकहि क्षेत्र किंवा तीर्थ नाहीं. आतां ज्यांना प्रत्यक्ष गंगास्नान करण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांनीं गंगेच्या हजार नामांचा सतत पाठ करावा; म्हणजे त्यांस गंगास्नानाचें फळ मिळून स्वर्गहि मिळेल. गंगासहस्रनामाच्या पठणानें गंगा प्रसन्न होऊन इच्छित वस्तु प्राप्त करून देते. तें सहस्रनाम " ॐकाररूपिण्यजराऽतुलाऽनंताऽमृतस्रवा " येथपासून तों " क्षेमदा क्षालिताघौघा क्षुद्रविद्राविणी क्षमा " येथपर्यंत एकशें पन्नास श्लोकांत ग्रथित केलें आहे. ह्या गंगेच्या हजार नांवांनीं गंगेचें माहात्म्य वर्णन करणारे जे आहेत, त्यांना गंगास्नानाचें फळ मिळेल. हजारों जन्मामध्यें जें पातक केलें असेल तें सर्व गंगासहस्रनामाच्या पाठानें नष्ट होतें. जितकीं स्तोत्रें भूतलावर आहेत, त्यां सर्वांहून ह्या स्तोत्राचें माहात्म्य श्रेष्ठ आहे. ज्याचे घरीं हें गंगासहस्रनाम लिहिलेलें आहे, त्याच्या घराइतकें पवित्र असें दुसरें घरच नाहीं. हें स्तोत्र प्रथम शंकरानें विष्णूला सांगितलें; नंतर हें मी शंकरापासून श्रवण केलें. तेंच हें तुम्हाला सांगितलें आहे. हें गंगासहस्रनामाचें माहात्म्य पठण करणारे शिवलोकाला प्राप्त होतात.

---

# अध्याय ३० वा.

## वाराणसीमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुनें ! भगीरथराजानें मणिकर्णिकेसन्निध गंगेला आणून त्रैलोक्य पावन केलें. जे मणिकर्णिकाकुंडांत स्नान करून काशीनामाचा जप करितात ते मुक्त होतात; तसेच ह्या क्षेत्रांत मृत झालेले पुरुषहि शिवलोकाला प्राप्त होतात; पूर्वी दक्षिणसमुद्राचे कांठीं सेतूजवळ राहणारा असा धनंजय नांवाचा एक वैश्य होता. त्याची माता पतीची आज्ञा अमान्य करणारी होती. पतीची आज्ञा मोडणें ह्यासारखें स्त्रियांनां दुसरें मोठें पातकच नाहीं. अशा मातेचा नाश होताच धनंजय मातृभक्त असल्यामुळें त्यानें मातेच्या अस्थि गोळा करून एका भाड्यांत घातल्या; व तें बरोबर घेऊन काशीला जाण्याचा निश्चय केला. अर्ध्या वाटेंत त्यांनीं अस्थिपात्र नेण्याकरितां एका शबराला बरोबर घेतलें होतें. पुढें काशीनगरींत आल्यानंतर धनंजय कांहीं सामानसुमान खरेदी करण्याकरितां गेला असतां शबरानें ह्या पात्रांत द्रव्य असेल ह्या बुद्धीनें तें पात्र लांबविलें. शबर एका रानांत येऊन; तें पात्र आच्छादनमुक्त करून पाहतों तों त्यांत द्रव्य नसून अस्थि आहेत. नंतर त्या शबराला फार वाईट वाटलें; व तें त्यानें तेथेंच टाकून घरीं प्रयाण केलें. इकडे धनंजय बाजारांतून परत येतो, तों पूर्वस्थळावर शबरहि नाहीं; व अस्थिपात्रहि नाहीं. त्यामुळें धनंजयाला फार वाईट वाटलें; व धनंजय शबराचे घरीं प्राप्त झाला. धनंजय तेथें असणाऱ्या शबरस्त्रीला म्हणतो कीं, मी तुला पुष्कळ द्रव्य देईन; परंतु तुझ्या पतीनें माझें एक अस्थिपात्र लांबविलें आहे, तें मला दे. ह्याप्रमाणें धनंजयाचें भाषण ऐकून शबरस्त्री धनंजयाला म्हणत कीं, माझ्या पतीनें तें पात्र येथें आणलेलें नाहीं; परंतु ज्या अरण्यांत त्यांनीं टाकून दिलें, तेथें ह्याला घेऊन जा; व तें मागून घ्या. नंतर धनंजय व शबर शबरस्त्रीच्या सांगण्याप्रमाणें त्या रानांत जाऊन अस्थिपात्र पाहूं लागले; परंतु तें त्यांस सांपडलें नाहीं; त्यामुळें धनंजयाला फारच वाईट वाटलें; व तो निराश होऊन स्वदेशाला परत निघून गेला. तात्पर्य; ज्याचे नशीबीं गंगास्नानाचा किंवा गंगोदकस्पर्शाचा लाभ होण्याचें नाहीं; त्यानें कितीहि त्याकरितां खटपट केली, तरी ती निष्फळच होणार. धनंजयाची माता अत्यंत पापी असल्यामुळें, व तिच्या नशीबीं गंगोदकस्पर्शाचा लाभ होण्याचें नसल्यामुळें जरी तिच्या पुत्रानें म्हणजे धनंजयानें मातेच्या अस्थि गंगेंत टाकण्याच्या इच्छेनें काशीक्षेत्रांत आणिल्या होत्या, तरी सुद्धां त्याचा योगायोग गंगोदकांत पडण्याचा

नसून एका अरण्यांतच पडण्याचा होता; हें खास समजावें. तेव्हां गंगाजलाचा संबंध घडण्यास पूर्वपुण्याईची विशेष आवश्यकता आहे. काशीक्षेत्राला वाराणसी हें नांव पडण्याचें कारण म्हटलें तर त्याठिकाणीं वाहणाऱ्या वारणा; व असि ह्या दोन नद्या होत. वाराणसीचें माहात्म्य फारच मोठें आहे. प्राकृत प्रलय व दैनंदिन प्रलय जरी झाले, तरी वाराणसीक्षेत्राचा कधींहि नाश होत नाहीं. वाराणसी, काशी, रुद्रावास, महाश्मशान, आनंदकानन हीं काशी-क्षेत्राचीं मुख्य नावें आहेत. ह्यांच्या पुण्यानें शिवलोकाची प्राप्ति होते.

## अध्याय ३१ वा.

### कालभैरवोत्पत्ति.

अगस्त्यऋषीनें कालभैरवाची उत्पत्ति विचारल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! पूर्वीं एकदां ब्रह्मदेवाला मेरुपर्वतावर असणाऱ्या ऋषींनीं श्रेष्ठ कोण? अशा बद्दल प्रश्न केला असतां ब्रह्मदेव म्हणतात; ऋषिहो! मी सर्वा-पेक्षां श्रेष्ठ आहें; माझ्या आज्ञेनेंच सर्व सृष्टीचे व्यवहार चालतात. अशातऱ्हेनें अभिमानानें ब्रह्मदेव आपलीच प्रौढी वर्णन करीत असतां नारायणाच्या अंशा-पासून उत्पन्न झालेला क्रतुनामक ऋषि ब्रह्मदेवाला तुच्छ मानून आपली प्रौढी वर्णन करूं लागला. उभयतांचा वाद सुरू असतां ऋग्वेदादि श्रुतींनीं त्यांच्या शंकांचें निरसन करून सांगितलें; ऋषिहो! वास्तविक विचार केला असतां ब्रह्मदेव व विष्णु हेहि ज्याच्या आज्ञांचें पालन करितात, असा शंकर सर्व-श्रेष्ठ आहे. शंकरापेक्षां मोठा व ज्ञानी दुसरा कोणींहि नाहीं. इतकें जें त्यांचें भाषण होतें तोंच एक तेज त्याठिकाणीं प्रगट झालें; व त्या तेजानें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तुटून गेलें; व तेथें एक तेजोरूपी पुरुष दिसूं लागला; तोच कालभैरव होय. त्याला पाहून ब्रह्मदेवाला भीति उत्पन्न झाली; व त्यानें कालभैरवाची स्तुति केली. कालभैरवानें ब्रह्मदेवाला व क्रतुप्रमुखऋषींना आश्वासन दिलें. नंतर कालभैरवाला ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडल्यामुळें ब्रह्महत्येचें पातक लागलें होतें, तें वाराणसीक्षेत्रांत प्रयाण केल्यामुळें त्याचें पाप नष्ट झालें. नंतर भैरवानें कायमचें राहणें काशीक्षेत्रांत केल्यामुळें तेथें भैरवनांवाचें एक लिंग प्रसिद्ध झालें; व जेथें कालभैरवानें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक म्हणजे कपाल टाकिलें तेथें कपालमोचननांवाचें एक तीर्थहि निर्माण झालें. मार्गशीर्ष कृष्ण आष्टमीला कपालमोचनतीर्थांत स्नान करून; व उपोषणजागरणादि करून कालभैरवलिंगाचें पूजन केल्यास सर्व पापांची निवृत्ति होते. हा अध्याय श्रवण करणारांचे ब्रह्महत्यादि अनेक दोष नष्ट होतात; व त्यांस मोक्ष मिळतो.

## अध्याय ३२ वा.

### दंडपाणीची उत्पत्ति.

पूर्वी गंधमादनपर्वतावर रत्नभद्र नांवाचा एक यक्ष होता. त्याला पूर्णभद्र-नांवाचा एक मुलगा झाला. पूर्णभद्राला सर्व ऐहिक सुखें जरी प्राप्त झालीं होतीं, तरी पुत्रसुखाच्या आभावामुळें तीं त्यास तुच्छ वाटत असत. नंतर पत्नीच्या सांगण्याप्रमाणें पूर्णभद्राला शिवाराधना करून शिवप्रसादानें हरिकेश नांवाचा एक मुलगा झाला. पुढें कांहीं काळ निघून गेल्यावर हातांत एक दंड घेऊन हरिकेश वाराणसीनगरीला जाऊन; व तेथें शिवाराधना करून घोरतर तपश्चर्येनें शंकराला प्रसन्न करून घेता झाला. नंतर त्याठिकाणीं शंकर पार्वतीसह प्रगट होऊन हरिकेशाला 'वर माग' असें म्हणूं लागले असतां हरिकेश शंकराला म्हणतो; देवा ! माझी तुझे ठिकाणीं सतत भक्ति राहून तुझें सान्निध्य मज-जवळ असावें, एवढाच वर द्या; असें हरिकेशाचें वाक्य ऐकून शंकर म्हणतात कीं, तुला ह्या स्थानाचें स्वामित्व देत आहें. ह्याठिकाणीं माझें सतत वास्तव्य राहील. तूं हातांत दंड धारण करून येथें राहिल्यामुळें ह्या स्थानाला दंडपाणी हें नांव प्राप्त होईल; असें सांगून शंकर पार्वतीसह अंतर्धान पावले. हें दंड-पाणीचें आख्यान जे श्रवण करितील, त्यांना जन्मांतरीं शिवगति मिळेल.

## अध्याय ३३ वा.

### ज्ञानवापीमाहात्म्य.

एकदां ईशाननांवाचा एक संन्याशी काशीक्षेत्रांत येऊन विश्वेश्वराची आराधना करूं लागला. त्यायोगें विश्वेश्वर प्रसन्न होऊन ईशानास म्हणतात कीं,तुझी भक्ति पाहून मी प्रसन्न झालों आहें. आपण ज्याठिकाणीं तप केलें त्या स्थानाला ज्ञानवापी हें नांव प्राप्त होईल; व जे ह्या ज्ञानवापीमध्यें स्नानादि करितील त्यांना माझ्या स्वरूपाचें ज्ञान होऊन ते निष्पाप होत्साते माझ्या स्थानाला प्राप्त होतील. असें सांगून शंकर अंतर्धान पावले. नंतर ज्ञानवापीचें माहात्म्य वर्णन करण्याकरितां एक कथानक कार्तिकस्वामी अगस्त्यऋषीस सांगण्यास प्रारंभ करितात. कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! पूर्वी हरिस्वामीनांवाचा एक ब्राह्मण काशीक्षेत्रांत राहत असे. त्याला सर्वगुणसंपन्न व रूपसंपन्न सुलोचनानांवाची

एक मुलगी होती. ती नित्य ज्ञानवापीमध्यें स्नान करण्यास जात असे. एके दिवशीं ती सुलोचना स्नान करण्याकरितां ज्ञानवापीतीर्थावर गेली असतां कोणी एका गंधर्वानें तिला पळवून आकाशमार्गानें आपल्या लोकाला नेलें. नंतर विद्युन्मालीराक्षसानें त्या मुलीच्या प्राप्तीकरितां गंधर्वाबरोबर युद्ध केलें. त्यांत राक्षस मृत झाला; व गंधर्वहि राक्षसाच्या त्रिशूलानें छिन्नविच्छिन्न होऊन; व सुलोचनेचें स्मरण करून मृत झाला. गंधर्वाच्या नाशामुळें सुलोचना शोक करूं लागली; कारण पुष्कळ दिवस त्याच्याशीं संबंध ठेवल्यामुळें हाच आपला पति, अशी तिची कल्पना झालेली होती. पुढें शोकाकुळ होऊन सुलोचनेनेंहि प्राणत्याग केला. नंतर गंधर्वाला मलयकेतूच्या वंशांत माल्यकेतुनांवानें जन्म प्राप्त झाला; व सुलोचनेला कर्णाटराजाच्या कुळांत कलावतीनांवानें जन्म प्राप्त झाला. पुढें माल्यकेतु व कलावती ह्या उभयतांचा विवाह झाला. कलावतीला तीन मुलगे झाले. एकेदिवशीं काशीक्षेत्रांत राहणाऱ्या एका गृहस्थानें एक चित्रपट आणून माल्यकेतूचे जवळ दिला. त्यानें तो आपली पत्नी जी कलावती तिला दिला.त्या पटावर सर्व काशीक्षेत्रांतील तीर्थें,लिंगें,क्षेत्रें; व इतर मुख्य स्थानें ह्यांचीं चित्रें काढिलेलीं होतीं तीं पाहून कलावतीला मोठा आनंद झाला; व त्यांत ज्ञानवापीचें चित्र पाहून तर तिला पूर्वजन्मीचें स्मरणहि झालें; व तिनें मोठ्या आनंदानें तो चित्रपट पाहण्यास प्रारंभ केला. त्यांपैकीं गंगा, मणिकर्णिका, व कर्णधारादि तीर्थें, कपालमोचन तीर्थ, ॐकारेश, कामेश्वर, स्कंदेश्वर, विनायकेश्वर, चतुर्दशेश्वर, धर्मशास्त्रेश्वर, सर्वतीर्थेश्वर, शैवेश्वर, मंत्रेश्वर, त्रिपुरेश्वर, वैरोचनेश्वर, बिंदुमाधव वगैरे स्थानें पाहूनहि तिला फारच आनंद झाला; व ती चित्रपटाच्या अवलोकनानें कृतार्थ झाली.

---

## अध्याय ३४ वा.

### ज्ञानवापीमाहात्म्य ( पुढें चालू. )

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! नंतर कलावतीनें तो चित्रपट घेऊन काशीक्षेत्रांतील तीर्थें पाहण्यास पुनः सुरुवात केली. प्रथम मणिकर्णिका पाहून नंतर ज्ञानवापीचें अवलोकन केलें; व तिचें माहात्म्य आपल्या पतीला सांगून पूर्वजन्मीचा स्ववृत्तान्तहि सांगितला. माल्यकेतूला त्या माहात्म्याच्या श्रवणानें काशीक्षेत्रांत जाऊन ज्ञानवापींत स्नान करण्याची इच्छा प्राप्त झाली; व पुत्राला राज्यावर बसून त्यानें स्वतः काशीक्षेत्राला पत्नीसह प्रयाण केलें. प्रथम माल्यकेतु पत्नीसह काशीक्षेत्रीं मणिकर्णिकेंत स्नान करून; व

मुक्तिमंडपाला प्रदक्षिणा घालून तीर्थविधीहि करिता झाला. तो एके दिवशीं ज्ञानवापींत स्नान करून बाहेर येतो तों एक संन्यासी तेथें येऊन त्याला भस्म देता झाला. त्यानें पत्नीसह तें भस्म आंगाला लावतांच तत्काळ तेथें शिवविमान आलें; व तीं उभयतां त्यांत बसून शिवलोकाला निघून गेलीं. त्या दिवसापासून ज्ञानवापीचें माहात्म्य विशेष वृद्धिंगत झाले. सर्व तीर्थांपेक्षां ज्ञानवापीतीर्थ हें ज्ञान देणारें आहे. ह्याच्या सेवनानें मोक्ष प्राप्त होतो.

## अध्याय ३५ वा.

### सदाचारवर्णन.

काशीक्षेत्रांत गेल्यानंतर स्वतःचें आचरण कसें असावें ? कारण सदाचाराशिवाय क्षेत्रयात्रेचें फळ मिळणें अशक्य होय; करितां आपण सदाचाराचें निरूपण करा, असा अगस्त्यऋषींचा प्रश्न ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! सर्व धर्मांचें व आचाराचें सार म्हटलें म्हणजे यम; व नियम हें होय. खरें बोलणें, दया करणें, लोकांची प्रतिष्ठा ठेवणें, ईश्वरध्यान करणें, कोणाचीहि हिंसा न करणें, शांतस्वभाव धारण करणें, इंद्रियनिग्रह करणें, शरण आलेल्याचें रक्षण करणें, वाणीमध्यें माधुर्य असणें, कोमलता धारण करणें ह्या दाहा कर्मांना यम ही संज्ञा आहे; व शुद्धता, स्नान, तपश्चर्या, दानधर्म, मौन धारण करणें, होमहवनादि करणें, वेदशास्त्राध्ययन करणें, व्रतवैकल्यादि करणें, उपोषण करणें, परस्त्रीशीं मातृभाव ठेवणें ह्या दाहा कर्मांना नियम ही संज्ञा आहे. ह्या यमनियमांचें आचरण करणाऱ्यांना सदाचारसंपन्न म्हणतात. रात्रीचा जो शेवटचा प्रहर त्याला ब्राह्म मुहूर्त म्हणतात. त्यावेळीं उठून; व तीर्थे, क्षेत्रें, देवता ह्यांचें स्मरण करून शौचविधि करण्यास गांवाच्या बाहेर जावें; व जमिनीवर गवत हांतरून त्यावर शौचविधी करावा. नंतर डाव्या हातांत शिस्न धरून उठावें; व शुद्धस्थानांतील मृत्तिका घेऊन गुदप्रक्षालन; व हस्तपादप्रक्षालन करून घरीं परत यावें. घरीं येऊन शास्त्रोक्त काष्ठांनीं मुखशोधन करावें. नंतर शुद्धोदकानें गंगादितीर्थांत किंवा त्यांचें स्मरण करून प्रातःस्नान करावें. स्नान झाल्यानंतर प्रातःसंध्यादि कर्में आचरावीं. स्तोत्रपाठ, पुरुषसूक्त, सौरसूक्त वगैरे सूक्तांचा पाठ करावा. शंकराची षोडशोपचारांनीं पूजा करावी. नंतर पंचमहायज्ञ करावा. अतिथीला बरोबर घेऊन भोजन करावें. भोजनोत्तर मुखशुद्धि करून; व मार्जनादि करून पुराणांचें श्रवण करावें. ह्याप्रमाणें सदाचारानें वागणारा पुरुष लोकमान्य होऊन शिवलोकींहि पूज्य होतो.

# अध्याय ३६ वा.

## चातुर्वर्ण्य-आचार.

कार्तिकस्वामी म्हणतातः मुने! आतां तुम्हाला चातुर्वर्ण्याचे आचार सांगतों; ऐका. एकंदर वर्ण चार. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र. पैकीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तिघांस द्विज संज्ञा आहे. ब्राह्मणादि त्रिवर्णांचा जन्म दोनदां कल्पिला जात असल्यामुळें त्यांस द्विज ही संज्ञा प्राप्त झाली आहे; पैकीं पहिला जन्म मातेच्या गर्भस्थानांतून योनिद्वारा होणें; व दुसरा उपनयनकाळीं स्वधर्मत्व प्राप्त झाल्यामुळें होणारा जन्म, हे द्विजांचे दोन जन्म होत. ब्राह्मणादि त्रिवर्णांच्या गर्भाधानादि क्रिया वैदिक कर्मांनें होतात. त्या अनुक्रमें गर्भाधान १, पुंसवन २, अनवलोभन ३. सीमंतोन्नयन ४, विष्णुबली ५, जातकर्म ६, नामकरण ७, निष्क्रमण ८, अन्नप्राशन ९, चौल १०, उपनयन ११ गोदानादि चार संस्कार १२, १३, १४, १५; व विवाह ह्या सोळा क्रिया (संस्कार) होत. हे सोळा संस्कार ज्याचे योग्य वेळीं झाले, त्याला द्विज अशी संज्ञा आहे. गर्भाचें चलन होण्यापूर्वी पुंसवनादि चार संस्कार करावे. प्रसूतकाळीं जातकर्म संस्कार करावा. मुलाचे अकरावे दिवशीं नामकरण करावें; चवथे महिन्यांत निष्क्रमण प्रयोग करावा; सहाव्या महिन्यांत अन्नप्राशन; दोन वर्षांचे आंत चौल; सातवे किंवा आठवे वर्षीं उपनयन संस्कार करावा. उपनयन होतांच ब्रह्मचर्यव्रतानें राहून विद्याध्ययन करावें. ब्रह्मचर्यव्रत कमींतकमी बारा वर्षें तरी आचरावें. नंतर गुरूच्या आज्ञेनें कुलीन व योग्य स्त्रीशीं विवाह लावावा; गार्हस्थ्यधर्मानें वागून व ऋणत्रयापासून मुक्त होऊन शिवनामाचा घोष करीत ऐहिक सुखें अनुभविल्यावर शेवटीं शिवलोकाला प्रयाण करावें.

---

# अध्याय ३७ वा.

## स्त्रीलक्षणवर्णन.

गृहस्थाश्रमी पुरुषाला जर चांगल्या लक्षणाची स्त्री मिळेल, तर त्याचा आश्रम उत्तम तऱ्हेनें पार पाडतो. ज्या स्त्रीची सासष्ट अवयवें लक्षणसंपन्न आहेत, ती स्त्री साक्षात् लक्ष्मीच होय. तीं लक्षणें येणेंप्रमाणें:-स्त्रियांचे पाय कोमल व तुळतुळीत असावे; फारच रुंद, शुष्क, खरखरीत असूं नयेत. जिच्या पायावर रेघा आहेत ती राजपत्नी होते. हातापायाचीं बोटेंहि मृदु

असावींत. ज्या स्त्रीचीं बोटें लांब असून कठोर असतील, ती विधवा होते. जिच्या मांडीला तुळतुळीतपणा आहे; व जिच्या मांड्या वाटोळ्या गोलाकार आहेत ती स्त्री ऐश्वर्याचा उपभोग घेणारी होते. जिचें जननेंद्रिय कासवाच्या पाठीसारखें बळकट असून हत्तीच्या गंडस्थलाप्रमाणें उंच असतें, ती स्त्री भाग्यवती होय. जिच्या कुशी स्थूल आहेत, तिला पुष्कळ पुत्र होतील. जिचें उदर विशाल आहे, तिला वंध्यात्व प्राप्त होतें. जिचें वक्षःस्थल अठरा बोटें रुंद आहे, तिच्या संसर्गानें सुख प्राप्त होतें; व जर वक्षःस्थलावर केस उत्पन्न झाले असतील, तर ती दुःख देणारी होते. जर स्तन मोठे, पुष्ट, वाटोळे, मजबूद व सारखे असतील, तर ते सुखावह होत. जिच्या तळहातावर मत्स्याकार रेखा आहेत, किंवा स्वस्तिकाकार रेखा आहे, ती राजपत्नी होईल. जर हातावर गाड्याच्या आकाराची रेघ असेल, तर ती स्त्री एका शेतकऱ्याची पत्नी होईल. जिचें नाक सरळ, मोठें व वाटोळें आहे, ती भाग्यवती स्त्री होय. जिचे दांत पिवळे, मोठे व लांब आहेत ती स्त्री दुःख देणारी; व जिचे पांढरे दुधासारखे, लहान, व आंखुड दांत आहेत ती सुख देणारी होय. अशातऱ्हेनें प्रत्येक अवयवाचीं लक्षणें अवलोकन करून शुभलक्षणी स्त्रीशीं विवाह लावावा; म्हणजे तो पुरुष कृतार्थ होतो; व त्याचा आश्रम सुखकर होतो.

---

## अध्याय ३८ वा.

### गृहस्थाश्रमधर्म.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! विवाह आठ प्रकारचा आहे. ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस, पैशाच हे आठ प्रकार होत. वराला बोलावून आदरपूर्वक जें कन्यादान करणें हा ब्राह्मविवाह होय. यज्ञ करणाऱ्या ऋत्विजाला कन्या अर्पण करणें हा दैवविवाह होय. वरापासून दोन बैल कन्येचें मूल्य म्हणून घेऊन कन्या अर्पण करणें हा आर्ष विवाह होय. तुम्ही उभयतां गृहस्थधर्मानें वागा; म्हणून सांगून एकाद्या वराला कन्या देणें हा प्राजापत्य विवाह होय. यथास्थित मूल्य घेऊन कन्याविक्रय ज्यांत केला जातो, तो असुरविवाह होय. वधूवरांचें एकमेकांवर प्रेम जडल्यामुळें एकांतांत जें पाणिग्रहण करणें त्याला गांधर्वविवाह म्हणतात. कन्या कबूल नसतां तिच्यावर बलात्कार करून वरानें मैथुनादि व्यवहार करणें, हा राक्षसविवाह होय; व कन्या निजली असतां, किंवा मद्याच्या गुंगींत असतां जो वराचा संगम होणें ह्यास पैशाचविवाह म्हणतात. ब्राह्मविधीनें विवाह करून

झालेली प्रजा एकवीस कुळांचा उद्धार करिते. दैवविवाहजन्य प्रजा चौदा कुळांचा उद्धार करिते. आर्ष व प्राजापत्यविधीनें विवाह करून जी प्रजा उत्पन्न होते, ती सहा कुळांचा उद्धार करिते. धर्मशास्त्राला हे पहिले विवाहाचे चार प्रकार मान्य आहेत; व इतर अमान्य म्हणजे निंद्य गणले आहेत. ऋतुकाळीं स्त्रीसमागम करणें उत्तम. व्यापार, राजसेवा, वेदाध्ययन न करणें, निंद्यविधीनें स्त्रीचें पाणिग्रहण करणें, कर्मभ्रष्ट होणें हे सर्व प्रकार कुळाला अधोगतीला नेणारे आहेत. गृहस्थाश्रमी पुरुषानें पंचमहायज्ञादि आवश्यक कर्मे केलींच पाहिजेत. वेदशास्त्रांवर विश्वास ठेवून तदुक्त कर्मे श्रद्धेनें केलें असतां गृहस्थाश्रमी पुरुष सर्व पापापासून मुक्त होऊन सद्गतीला जातो.

## अध्याय ३९ वा.

### अविमुक्तेशमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! आतां तुम्हाला अविमुक्तेशाचें माहात्म्य सांगतों. पूर्वी पद्मकल्पामध्यें स्वायंभुवमनूच्या कारकीर्दींत पाऊस न पडल्यामुळें दुष्काळ पडला होता. त्यामुळें सर्व प्राणिमात्राला पीडा उत्पन्न झाली. नंतर रिपुंजयनामक राजा काशीक्षेत्रांत जाऊन सुबत्ता होण्याकरितां विश्वेश्वराची आराधना करूं लागला. त्या तपानें ब्रह्मदेव व शंकर संतुष्ट होऊन दिवोदासनांवानें त्यास राज्य करण्यास सांगितलें; व तुझ्या राज्यांत कधींहि दुर्भिक्ष होणार नाहीं, असेंहि सांगितलें. नंतर ब्रह्मदेव शंकरासह पुष्कळ दिवस तप करीत बसलेल्या मंदरपर्वताजवळ प्राप्त झाले; व वर मागण्याविषयीं त्यास म्हणूं लागले. नंतर मंदरपर्वत म्हणतो; शंकरा ! आपण ह्या स्थानाला अविमुक्त हें नांव देऊन पार्वतीसह ह्या स्थानासन्निध रहावें; एवढाच वर द्या. नंतर शंकरानें आपलें लिंग अविमुक्तेश नांवानें स्थापित करून गुप्तरूपानें पार्वतीसह वास केला. अविमुक्तेशाचें पूजन केल्याशिवाय काशीक्षेत्राच्या यात्रेचें पूर्ण फळ मिळत नाहीं. अविमुक्तेशाचें त्रिकाळ स्मरण करणारे लोक जरी दूर राहत असले, तरी त्यांस काशीयात्रेचें पूर्ण फळ मिळून शिवलोकाची प्राप्ति होते.

## अध्याय ४० वा.

### निषिद्धाचरणफळ.

काशीक्षेत्राला जाऊनहि अविमुक्तेश्वरलिंगाचें पूजन कशानें घडेल ? तें सांगा, असा अगस्त्यमुनींचा प्रश्न ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! सदा-

चरणादि पुण्यकर्मानें अविमुक्तेश्वरलिंगाचें पूजन करण्याचा प्रसंग येतो. श्रेष्ठ लिंगाच्या पूजनाचा लाभ होणें हेंच सदाचरणाचें फळ होय. जर सदाचरण न करितां दुराचरण केलें, तर त्याला विरुद्ध फळ मिळतें; म्हणजे दुःखरूप फळ मिळतें. आतां दुराचरणें म्हणजे निषिद्धाचरणें कोणतीं ? तें सांगतों. कांदा, गांवडुकर, लसूण, गाजर, भोंकर, गाईचे सोहरांतील दूध, अळबें ( रानांत झाडावर किंवा झाडाखालीं पावसाळ्यांत छत्रीसारखें पांढरें उगवतें तें; ह्याची भाजी खेडेगांवांतील शूद्रलोक करितात. ) हे पदार्थ भक्षण करणें निषिद्धाचरण होय. शय्या, आसन, कांबळें, स्त्रीमुख, दर्भ, यज्ञपात्रें; व विद्वान् हे कोणत्याहि दोषानें दूषित होत नाहींत; तर सदोदित पवित्रच असतात. दूध काढते वेळीं वासराचें मुख पवित्रच होय. फळें पाडण्याचे वेळीं पक्षी पवित्र होत. स्त्रिया रतिसुखप्रसंगीं शुद्ध होत. मेंढी; व घोडा यांचें मुख पवित्र; गाईची पाठ पवित्र; व ब्राह्मणाचे पाय पवित्र होत. ब्राह्मणाला 'कुशल आहे ना ?' म्हणून विचारावें; क्षत्रियाला 'निरोगी आहेसना ?' म्हणून विचारावें; वैश्याला,' सुखी आहेसना ? म्हणून विचारावें; व शुद्राला संतुष्ट आहेसना ?' म्हणून विचारावें. ह्या सर्वांला सदाचरण म्हणतात. ह्याविरुद्ध जें आचरण तें निषिद्धाचरण होय. चहाडी करणें, परस्त्रीचा अभिलाष करणें, कलह करणें, खोटें बोलणें, दुर्भाषण करणें; व कपट करणें, हीं कर्मे स्वर्गाला अडथळा आणणारीं निषिद्धाचरणें होत. निषिद्धाचरणांचा त्याग करून सदाचरणाचें आकलन करणाऱ्या पुरुषाला अविमुक्तेश्वराचें पूजन घडून अंतीं शिवलोकप्राप्तीहि होते.

---

## अध्याय ४१ वा.

### योगनिरूपण.

ह्याप्रमाणें गृहस्थाश्रम संपवून आयुष्याच्या तिसऱ्या भागांत वानप्रस्थाश्रम स्वीकारावा. वानप्रस्थाश्रमांत राहणाऱ्या पुरुषांनीं गांवाच्या बाहेर झोंपडीं बांधून रहावें. नित्य सकाळीं स्वकर्माचरण झाल्यावर गांवांत येऊन मधुकरीवृत्तीनें पांच घरीं भिक्षा मागून नियमानें आठच घांस भक्षण करून रहावें. कोणालाहि पीडा देऊं नये. अशातऱ्हेनें वानप्रस्थाश्रम पुरा होतांच आयुष्याच्या चवथ्या भागांत सर्वसंगपरित्याग करून संन्यास घ्यावा. संन्यासाश्रमामध्यें जितेंद्रियपणा विशेषेंकरून बाळगिला पाहिजे आत्मज्ञानावांचून मोक्ष नाहीं; व योगावांचुन आत्मज्ञान नाहीं; करितां मोक्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें योगाभ्यास करणें आवश्यक आहे. केवळ पद्मासन घालून बसलें

असतां किंवा नासाग्रदृष्टि लाविली असतां योग साध्य होत नाहीं; तर त्याचा क्रमाक्रमानें अभ्यासच केला पाहिजे तरच योग साध्य होईल. सर्व इंद्रियें अंतर्मुख एकाकार करून ईश्वराकडे संयुक्त करणें ह्यासच योग म्हणतात. मुख्य योग आठ प्रकारचे आहेत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि ' ते आठ प्रकार होत. यम म्हणजे इन्द्रियनिग्रह; नियम म्हणजे वेळचे वेळीं नित्यनैमित्तिक कर्माचरण करणें; आसन म्हणजे पद्मासनादि आसनें; प्राणायाम म्हणजे पांचहि प्राण भ्रूमध्यापर्यंत श्वासबलानें नेऊन स्तब्ध करणें, प्रत्याहार म्हणजे योगांची पूर्वस्थिति कायम राखणें; ध्यान म्हणजे ईश्वरस्वरूपाचें प्रत्यक्ष चिंतन; धारणा म्हणजे ईश्वरस्वरूप अंतःकरणांतून नाहींसें न करणें; व समाधि म्हणजे ईश्वररूप होणें; ईश्वर व मी एकच आहे, असें पाहणें ह्या कृत्याला योग म्हणतात. जालंधरबंध, उड्डीयानबंध वगैरे हट्टयोगाच्या अनुष्ठानानेंहि स्वकार्यसिद्धि होते. आतां ह्या योगाभ्यास करणें ज्यांस अशक्य आहे, अशा मुमुक्षूंनीं मोक्षप्राप्तीकरितां अंतकाळ समीप आला असतां काशीक्षेत्राला जावें. काशीक्षेत्रांत ज्याचा अंत झाला, तो कितीहि पापी असला तरी योगाभ्यासाशिवाय मोक्षाला जातो. हा काशीक्षेत्राचा महिमा श्रवण करणारासहि मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय ४२ वा.

### मृत्युकाळचीं लक्षणें.

कार्तिकस्वामी म्हणतात,–मुने ! आतां अंतकाळचीं लक्षणें सांगतों; ऐका ज्याच्या डाव्या नाकपुडींतून अहोरात्र वारा वाहतो, तो तीन वर्षांनीं मरणार असें समजावें. ज्याची उजवी नाकपुडी दोन दोन दिवस किंवा तीन तीन दिवस सतत वाहते, त्याचें आयुष्य एक वर्षपर्यंत असें समजावें. ज्याच्या दोन्ही नाकपुड्या सतत वाहतात, तो दहा दिवसांनीं परलोकीं जाणार असें समजावें. जो एकाच काळीं वीर्य, मल व मूत्र ह्याचा उत्सर्ग करितो, त्याचें आयुष्य एक वर्ष आहे, असें समजावें. ज्याची सांवली कंपायमान होते, तो चार महिन्यांनीं नाश पावेल. स्नान करतांच ज्याच्या शरीराला पाण्याचा बिंदूहि राहत नाहीं, व तत्काळ सुकून जातो, तो एक महिन्यानें नाश पावेल. जो दिवसा नक्षत्रें पाहतो व जिकडे तिकडे आकाशांत इंद्रधनुष्य पाहतो, तो पांच दिवस जिवंत राहतो. रात्रीं दोन चंद्र व दिवसा दोन सूर्य पाहणारा, व आकाशांत आपलें मस्तक न पाहतां फक्त धडच पाहणारा एक महिना

जिवंत राहतो. अल्पायुषी मनुष्याला कोणीहि हिताच्या गोष्टी सांगितलेल्या आवडत नाहींत. अशातऱ्हेचीं मृत्युकाळचीं लक्षणें भासूं लागलीं असतां आपल्या कल्याणार्थ काशीक्षेत्रांत येऊन तेथील तीर्थांत स्नान करून व विश्वेश्वरादि लिंगाचें पूजन करून कृतकृत्य व्हावें; व अंतीं शिवलोकीं जावें.

## अध्याय ४३ वा.

### दिवोदासप्रतापवर्णन.

दिवोदास राजा मंदराचलाहून काशीक्षेत्राला येऊन शिवाराधना कशी करता झाला ? हें आख्यान आम्हाला सांगा, असें अगस्त्यमुनीचें भाषण ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! एकदां मंदराचलाच्या तपश्चर्येनें संतुष्ट झालेले ब्रह्मदेव व शंकर मंदराचलावर जाते झाले. ब्रह्मदेव, व शंकर इंद्रादि देवांसह मंदराचलावर गेले असतां काशीक्षेत्राचा राजा दिवोदास तेथील प्रजांचें उत्तम-तऱ्हेनें पालन करीत असे. दिवोदासाची परीक्षा पाहण्याकरितां इंद्राच्या आज्ञेनें आपलें तेज काशीक्षेत्रांतून अग्नीनें नष्ट केलें. अग्नीच्या अभावामुळें दिवो-दासाच्या राज्यांत अन्नपचनादि क्रिया बंद पडून प्रजांना उपोषणें करण्याचा प्रसंग प्राप्त झाला. हा प्रकार दिवोदासाला समजतांच दिवोदासानें प्रजेला संतोषपूर्वक सामोपचाराच्या चार गोष्टी सांगून म्हटलें कीं, तुम्ही कांहींएक काळजी करूं नका. माझी परीक्षा पाहण्याकरितां इंद्रानें हा प्रकार घडवून आणिला आहे; आतां मी तुम्हाला आपला तपःप्रभाव दाखवितों; व पर्जन्य, अग्नि वगैरे सर्व स्वरूपें स्वतः धारण करून तुमचें रक्षण करितों. असें म्हणून दिवोदासानें प्रजारक्षणार्थ स्वतः अग्निस्वरूप धारण करून लोकांचा निर्वाह चालू ठेविला; तसेंच त्यानें जिकडे तिकडे पर्जन्य पाडून पाण्याची पूर्तता केली. हा दिवोदासाचा प्रताप पाहून इंद्रादि देव अभिमानरहित झाले.

## अध्याय ४४ वा.

### काशीवर्णन.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! काशीक्षेत्राचें वर्णन करणें मोठमोठ्या योग्यांना सुद्धां अशक्य आहे. काशीक्षेत्र म्हणजे साक्षात् भूकैलास होय.

काशीक्षेत्र पातकाच्या समुदायांचा नाश करणारें आहे. ज्या काशीक्षेत्रांत शंकर स्वतः अष्टमूर्तीसह वास करितात, त्या काशीचें वर्णन किती करावें ! प्रलयकाळीं जरी सर्व जग जलमय झालें, तरी शंकर हातांत त्रिशूळ घेऊन काशीचें रक्षण करीत असल्यामुळें तिचा केव्हांहि नाश होत नाहीं. काशीक्षेत्रांत राहणाराला कलिकालाचें भय उरत नाहीं. पार्वतीनें एके दिवशीं शपथपूर्वक शंकराला सांगितलें कीं, माझ्या मतें काशीक्षेत्रांतील पाऊलभर जमिनीची योग्यता इतर सर्व क्षेत्रांच्याहिपेक्षां अधिक आहे; म्हणून मला काशीक्षेत्राहून दुसरें कोणतेंहि प्रिय नाहीं. अशातऱ्हेनें मंदरपर्वतावर असलेल्या पार्वतीनें शंकराला काशीक्षेत्राला जाण्याची इच्छा दर्शविली असतां शंकर म्हणतात; जोंपर्यंत काशीक्षेत्रांत दिवोदास आहे, तोंपर्यंत मी तेथें येणार नाहीं; करितां दिवोदासाला तेथून घालवून देण्याकरितां योगिनीगणाला पुढें पाठवितों; व तो तेथून गेल्यानंतर आपण काशीमध्यें जाऊं; असें म्हणून दिवोदासाला काशींतून जाण्यास सांगण्याकरितां योगिनीगणाला बोलावून शंकरानें काशीक्षेत्रांत पाठवून दिलें त्या आनंदानें काशीला गेल्या.

---

## अध्याय ४६ वा.

### योगिनीनामवर्णन.

शंकराच्या आज्ञेनें योगिनी निघाल्या, त्या थेट काशीक्षेत्रांत येऊन दाखल झाल्या. काशीची शोभा पाहून त्या योगिनी तल्लीन झाल्या; व मोहित होऊन शंकराच्या आज्ञेला विसरून गेल्या. नंतर योगिनी त्या ठिकाणीं ईश्वराराधना करून अनेक व्रतोपवासादिकांचें आचरण करित्या झाल्या. आतां त्या योगिनींचीं नांवें सांगतों; ऐका. गजानना, सिंहमुखी, गृध्रास्या, काकतुंडिका, उष्ट्रग्रीवा, हयग्रीवा; वाराही, शरभानना, उलूकिका, शिवारावा, मयूरी, विकटानना, अष्टवक्रा, कोटराक्षी, कुब्जा, विकटलोचना, शुष्कोदरी, ललज्जिव्हा, श्वदंष्ट्रा, वानरानना, ऋक्षाक्षी, केकराक्षी, बृहत्तुंडा, सुराप्रिया, कपालहस्ता, रक्ताक्षी, शुकी, श्येनी, कपोतिका पाशहस्ता, दंडहस्ता, प्रचंडा, चंडा, चंडविक्रमा, शिशुघ्नी, पापहंत्री, काली, रुधिरपापिनी, अट्टाट्टहाशा, कामाक्षी, मृगाक्षी; व विद्युत्प्रभा ह्या सर्व योगिनी काशीक्षेत्रांत वास करूं लागल्या. ह्या योगिनींच्या नांवानें श्रवण; व पठण करणाऱ्यांना डाकिनी, शाकिनी, कुष्मांड, राक्षस, भूतें; व प्रेतें इत्यादिकांचें भय मुळींच प्राप्त होत नाहीं. काशीक्षेत्रांत असणाऱ्या योगिनीपीठाची सेवा

करणारांना; व तेथें बसून योगिनींच्या नामाचा उच्चार करणारांना सर्व सिद्धि प्राप्त होतात. काशीक्षेत्रांतील सांवत्सरिक यात्रा करणारे सर्व दोषांपासून मुक्त होऊन शिवसायुज्याला प्राप्त होतात.

## अध्याय ४६ वा.

### लोलार्कमाहात्म्य.

पुष्कळ काळपर्यंत योगिनींकडील कांहींच वर्तमान न समजल्यामुळें शंकरानें तो वृत्तांत समजून घेण्याकरितां काशीक्षेत्रांत सूर्याला पाठविलें. सूर्य काशीला येऊन दिवोदासाची परीक्षा पाहण्याकरितां अतिथिस्वरूपानें त्याच्याजवळ प्राप्त झाला, व दुर्लभ वस्तूंची त्यानें याचना केली; तथापि त्या राजानें त्या वस्तु सूर्यास दिल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. दिवोदासाचें सत्त्व पाहण्याकरितां व त्याला सत्त्वभ्रष्ट करण्याकरितां सूर्यानें पुष्कळ प्रयत्न केले; पण व्यर्थ. शेवटीं सूर्य मनांत विचार करूं लागला कीं, जर मी शंकराचें कार्य पूर्ण न करितां तसाच परत त्याच्याकडे गेलों, तर तो मला रागावेल. असा विचार करून सूर्य काशीक्षेत्रांतच बारा स्वरूपानें राहता झाला. तीं सूर्याचीं स्वरूपें क्रमानें लोलार्क, उत्तरार्क, सांबादित्य, द्रुपदादित्य, मयूखादित्य, अरुणादित्य, वृद्धादित्य, केशवादित्य, विमलादित्य, गंगादित्य, यमादित्य, व खखोल्कादित्य, ह्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. ह्यांना द्वादशादित्य ह्मणतात. ह्यांपैकीं पहिला जो लोलार्क त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका. रथसप्तमीच्या दिवशीं लोलार्काचें पूजन करावें; म्हणजे सात जन्मांचें पाप नष्ट होतें. प्रत्येक रविवारीं लोलार्काचें दर्शन घेणारा दुःखरहित होऊन सूर्यलोकाला जातो. हें आख्यान श्रवण करणारा सांसारिक दुःखापासून मुक्त होऊन निष्पाप होतो.

## अध्याय ४७ वा.

### उत्तरार्कमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; आतां उत्तरार्कमाहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वीं चंद्रवंशांत एक प्रियव्रत नांवाचा ब्राह्मण होता. त्याला मूळनक्षत्रावर एक कन्या झाली. पुढें ती कन्या उपवर झाली असतां तिच्या विवाहाच्या काळजींतच तिचा बाप प्रियव्रत स्वर्गस्थ झाला. प्रियव्रताच्या विरहानें त्याची पत्नी

म्हणजे त्या कन्येची माताहि मृत झाली. मग आईबापांच्या मरणानें दुःखित झालेली ती अनाथ अशी कन्या शोक करीत दिवस कंठूं लागली. पांच सहा महिन्यांनंतर ती कन्या उत्तरार्कासन्निध येऊन तप करूं लागली. एकदां पार्वतीसह शंकर त्या कन्येजवळ येऊन तिला वर मागण्याबद्दल सांगूं लागले. तेव्हां ती आपल्यासमोर उभ्या असलेल्या दीन मेंढीला उद्धरण्याविषयीं शंकराची प्रार्थना करूं लागली. नंतर शंकर म्हणाले, कन्ये ! तुझ्या इच्छेप्रमाणें मी हिला दिवोदासाचे पोटीं जन्म देत आहें; तेथें ही जन्माला येऊन नंतर माझ्या लोकाला प्राप्त होईल. नंतर आपणास ऐहिक सांसारिक सुख; व अंतीं परलोक प्राप्त होण्याविषयीं शंकराची याचना केली असतां त्यांनीं तिला सर्व इष्ट वर देऊन संतुष्ट केलें. ज्याठिकाणीं वरील बर्करीनांवाचे मेंढीला वर मिळाला तेथें, बर्करीकुंड नांवाचें एक तीर्थ निर्माण झालें. बर्करीकुंडांत स्नान करून उत्तरार्काचें पूजन करणारे व्याधिरहित होऊन मुक्त होतात.

## अध्याय ४८ वा.

### सांबादित्यमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां भगवंतांनीं द्वापराच्या अंतीं कृष्णावतार घेतला होता, हें तुम्हांस माहित आहेच. त्यावेळीं कृष्णाला एकंदर सोळा हजार एकशें आठ बायका; व ऐशीं लक्ष पुत्र झाले होते. ते सर्व कृष्णपुत्र सुशील, विद्वान्; व सर्वगुणसंपन्न होते. एके दिवशीं द्वारकेची शोभा पाहण्याकरितां नारद ऋषि प्राप्त झाले असतां सर्व कृष्णपुत्रांनीं नारदाला वंदन केलें. मात्र सांब नांवाच्या कृष्णपुत्रानें त्याला नमस्कार केला नाहीं. हा प्रकार नारदाच्या ध्यानीं येऊनहि तो कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें कृष्णाच्या मंदिरांत गेला. कृष्णानें नारदाचें मधुपर्कादिविधीनें पूजन केलें. नंतर नारदानें कृष्णाला सांबाच्या उद्धत वर्तनाची हकीकत सांगितली. परंतु कृष्णानें त्याचें सांत्वन करून त्यास निरोप दिला. मध्यंतरीं कांहीं काळ गेल्यानंतर नारद पुनः द्वारकेंत येऊन आपण आल्याबद्दल कृष्णाला वर्दी देण्याकरितां सांबाला सांगता झाला. नंतर सांबानें स्त्रियांसह क्रीडा करीत बसलेल्या कृष्णाला नारद आल्याची बातमी सांगितली. सांब हा स्वरूपानें मदनाप्रमाणें सुंदर असल्यामुळें त्याला पाहून त्या स्त्रियांचीं मनें क्षुभित होऊन त्यांचें रजःस्खलनहि झालें. हा प्रकार पाहून; व पूर्वीं नारदाचा अपमान केल्याबद्दलच्या उद्धत वर्तनाचाहि प्रकार पाहून कृष्णाला क्रोध आला; व त्यानें

सांबाला तूं कुष्ठरोगी होशील म्हणून शाप दिला. तो शाप ऐकून सांबाला फार वाईट वाटलें; परंतु कृष्णाच्याच आज्ञेनें तो काशीक्षेत्रांत जाऊन विश्वेश्वराच्या सन्निध सूर्याराधना करूं लागला. त्यायोगें सूर्य प्रसन्न होऊन सांबाला शापमुक्त करिता झाला. ज्या ठिकाणीं सांबानें देवताराधना केली, त्या देवतेला सांबादित्य हें नांव प्राप्त झालें; व ज्या कुंडांत सांबानें स्नान केलें, त्याला सांबकुंड हें नांव प्राप्त झालें. जे कोणी सांबकुंडांत स्नान करून सांबादित्याचें पूजन करितात, ते कुष्ठादि महाव्याधींपासून मुक्त होऊन शिवलोकाला जातात.

---

## अध्याय ४९ वा.

### द्रौपदादित्यादिमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात, मुने! शंकर एकदां स्वतः धर्मराजादि पांच प्रकारचीं स्वरूपें धारण करून; व पार्वतीला द्रौपदी नांवानें उत्पन्न करून पृथ्वीचा भार दूर करते झाले, हें सर्वप्रसिद्ध आहे. कांहीं कारणामुळें त्या धर्मादि पांडवांना वनवास भोगणें भाग पडलें. वनवासस्थितींत दुःखें भोगणाऱ्या पतींना पाहून द्रौपदीला फार वाईट वाटलें; व पतींच्या दुःखनाशार्थ एकादें अनुष्ठान करावें ह्या उद्देशानें तिनें पतीसह काशीक्षेत्राला प्रयाण करून सूर्याराधना केली. सूर्यानें प्रसन्न होऊन तिला एक स्थाली दिली. त्या स्थालींतून नियमित वेळीं अन्नादि पदार्थ विपुल उत्पन्न होत असत. ज्या ठिकाणीं द्रौपदीनें सूर्यदेवतेचें आराधन केलें, त्याला द्रौपदादित्य म्हणतात. द्रौपदादित्याचें पूजन केलें असतां सर्व दुःखें नष्ट होऊन ते सूर्यलोकीं जातात.

कार्तिकस्वामी म्हणतात; आतां तुम्हाला मयूखादित्याचें माहात्म्य सांगतों. पूर्वीं सूर्यानें मयूखेश्वर नांवानें एक लिंग स्थापून एक लक्ष वर्षें त्याची आराधना केली. त्या आराधनेनें त्रैलोक्याला भीति वाटून सर्व ईश्वराची स्तुति करूं लागले. तेव्हां शंकरानें प्रसन्न होऊन; सूर्याला तपापासून निवृत्त करून त्यास इच्छित वरहि दिले;व सांगितलें कीं,ह्या लिंगाला लोक मयूखादित्य म्हणतील. ह्या लिंगाच्या पूजनानें दारिद्र्यादि बाधा नष्ट होऊन सद्गतिहि प्राप्त होईल; असें सांगून शंकर गुप्त झाले. या आख्यानश्रवणानेंहि मोक्षप्राप्ति होते.

---

# अध्याय ५० वा.

## खखोल्कादित्यादिमाहात्म्य.

कद्रू व विनता ह्या दोन दक्षकन्या कश्यपाला दिल्या होत्या. एकदां कद्रू विनतेला म्हणाली कीं, हा उच्चैःश्रवा घोडा कोणत्या वर्णाचा आहे; म्हणजे काळा आहे; किंवा पांढरा आहे? त्यावेळीं विनता म्हणाली कीं, हा घोडा पांढरा आहे. कद्रू म्हणाली, काळा आहे. तेव्हां उभयतांनीं पण केला कीं, ह्यांपैकीं ज्याचें खोटें ठरेल त्यानें दुसऱ्याचें दास्यत्व पत्करावें. शेवटीं कद्रूनें कपट करून घोडा काळा आहे, हें ठरवून विनतेला दास्यत्व करण्यास लाविलें. नंतर कद्रूपुत्र सर्पांनीं विनतापुत्र गरुडाला सांगितलें कीं, तूं जर आम्हाला अमृत आणून देशील तर आम्ही तुझी आई जी विनता तिला दास्यत्वापासून मुक्त करूं. ह्याप्रमाणें सर्पांचें भाषण ऐकून मातेला दास्यत्वापासून मुक्त करण्याकरितां गरुड वैकुंठाला जाऊन; व विष्णूबरोबर युद्ध करून अमृत आणता झाला. गरुडानें तें आणून गवतावर ठेविलें; व सर्पांना स्नान करून येण्यास सांगितलें. सर्प स्नानाला निघून गेल्यावर विष्णुदूतांनीं अमृतघट तेथून पसार केला. सर्प परत तेथें येऊन पाहतात तों तेथें घट नसून थोडेंसें अमृत गवतावर सांडलें आहे, असें त्यांस दिसलें; व मोठ्या त्वरेनें त्यांनीं गवतावर सांडलेलें अमृतच जिभेनें चाटण्यास सुरुवात केली. गवतांच्या पानांना तीक्ष्ण धारा असल्यामुळें सर्पांच्या जिभा मधोमध चिरल्या गेल्या; व त्यामुळें त्यांस 'द्विजिह्व' हें नांव प्राप्त झालें. नंतर गरुड विनतेला दास्यत्वापासून मुक्त करून म्हणाला कीं, माते! आपण उभयतां काशीक्षेत्रांत जाऊन ईश्वराराधना करावी, असा माझा मानस आहे. हें गरुडाचें भाषण विनतेला आवडून ती काशीक्षेत्राला गेली; व तेथें एक लिंगस्थापना करून त्याची आराधना करिती झाली. गरुडानेंहि गरुडेशाचें आराधन करून तो कृतार्थ झाला; विनता खखोल्कादित्य नांवानें लिंग स्थापून व त्याची अर्चा करून कृतार्थ झाली. जे कोणी खखोल्कादित्याचें व गरुडेशाचें पूजन करितील ते कृतार्थ होत्साते शिवलोकाला प्राप्त होतील.

काशीखंड (पूर्वार्ध) समाप्त. ४

# काशीखंड ४ ( उत्तरार्ध. )

## अध्याय ५१ वा.

### अरुणादित्यादिमाहात्म्य.

दक्षाची मुलगी जी विनता ती कोणत्या कारणानें कद्रूची दासी झाली तें सांगा, असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! प्रथम कश्यपापासून कद्रूला शंभर मुलगे झाले; व विनतेनें पुत्रमुखदर्शनाच्या लालसेनें अंड परिपक्कदशेला येण्याचे पूर्वीच तें फोडिलें;त्या वेळीं आंत असलेला अरुण अंगांच्या अपूर्णत्वानें क्रोधाविष्ट होऊन विनतेला शाप देता झाला कीं, तूं आपल्या सवतीचें कांहीं दिवस दास्यत्व करिशील; व ह्या दुसऱ्या अंडांत असणारा तुझा पुत्र तुला दास्यापासून मुक्त करील. असें सांगून अरुण काशीक्षेत्रामध्यें विश्वेश्वरासन्निध येऊन तप करूं लागला. त्याच्या तपानें. सूर्यनारायण प्रसन्न झाले; व त्याला आपलें सारथ्यकर्म करण्यास सांगून तेथें अरुणादित्य नांवानें आपण स्वतः अंशरूपानें राहिले. ह्या अरुणादित्याचें पूजन करणारे दुःखदारिद्र्यापासून मुक्त होऊन सूर्यलोकाला प्राप्त होतात. आतां वृद्धादित्याचें माहात्म्य सांगतों. पूर्वीं हारित नांवाचा एक वृद्ध मुनि काशीक्षेत्रांत सूर्याची आराधना करूं लागला. सूर्य प्रसन्न होतांच हारीतानें आपल्याला यौवन प्राप्त होण्याबद्दल वर मागितला. नंतर हारित यौवनाप्रत मिळवून घोर तप करिता झाला. त्या हारितानें वृद्धावस्थेंत तप करून आदित्याची स्थापना केली; म्हणून त्याला वृद्धादित्य हें नांव प्राप्त झालें. जे वृद्धादित्याचें पूजन करितील त्यांना सर्व सिद्धि प्राप्त होतील. त्याप्रमाणें केशवांनीं सूर्याराधना करून स्थापिलेल्या केशवादित्याच्या दर्शनानें व पूजनानेंहि सर्व इष्ट वस्तु प्राप्त होतील; व त्यांस ज्ञानप्राप्ति होऊन मोक्षप्राप्तिहि होईल; आतां विमलादित्य माहात्म्य सांगतों. पूर्वीं एक विमल नांवाचा क्षत्रिय होता. त्याला कुष्ठरोग जडल्यामुळें त्यानें स्त्री, धन, गृह वगैरेचा त्याग करून काशीक्षेत्राला प्रयाण केलें. तेथें विमलानें सूर्याची उपासना केली. सूर्यानें प्रसन्न होऊन; व विमलाचें कुष्ठ नष्ट करून त्या स्थानीं विमलादित्य नांवानें वास केला. जे या

विमलादित्याचें पूजन करितील ते पापमुक्त होऊन व आधिव्याधिरहित होऊन मोक्षाला जातील. तसेंच यमानें स्थापिलेल्या यमादित्याचें पूजन व यमतीर्थांत स्नान करणारेहि दोषमुक्त होऊन शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ५२ वा.

### दशाश्वमेधवर्णन.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! एकदां ब्रह्मदेव वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन रिपुंजय राजाकडे येऊन म्हणाला कीं, मजजवळ पुष्कळ द्रव्य आहे; व माझे मनांतून यज्ञ करावयाचा आहे; परंतु तुझ्या साहाय्यावांचून तो तडीस जाणें अशक्य असल्यामुळें मी तुजजवळ आलों आहें. मी आपली कीर्ति जाणत आहें; व आपण माझा अव्हेर करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. नंतर रिपुंजयानें साहाय्य करण्याबद्दल वचन दिल्यावरून त्या वृद्धब्राह्मणरूपी ब्रह्मदेवानें काशीक्षेत्रांत दहा अश्वमेध यज्ञ केले. त्या यज्ञप्रसंगीं धुरानें आकाशाला प्राप्त झालेला जो काळिमा तो अद्यापि काशीक्षेत्रांत राहणाऱ्यांना स्पष्ट दिसतो. ज्या ठिकाणीं यज्ञ केला, त्या ठिकाणीं त्या तीर्थाला दशाश्वमेधतीर्थ म्हणतात. त्या दशाश्वमेधतीर्थाचे काठीं कोणतेंहि कृत्य केलें तरी तें अक्षय्य फल देणारें आहे. ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदेला ह्यांत स्नान केलें असतां सर्व पातकें नाश पावतात. ज्येष्ठशुद्ध द्वितीयेला स्नान केल्यास दोन जन्मांचें पाप नाहींसें होतें. दशाहारामध्यें दशाश्वमेधतीर्थांत स्नान करणारे सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ५३ वा.

### शंकुकर्णेश्वरादिलिंगमाहात्म्य.

एकदां शंकराचे शंकुकर्णादि दूत काशीक्षेत्रांत येऊन तेथील अनेकप्रकारची शोभा पाहून तल्लीन झाले; व आपआपल्या नांवानें एक एक शिवलिंग स्थापिते झाले. तीं लिंगें शंकुकर्णेश्वर, घंटाकर्णेश्वर, महोदरेश्वर, सोमनंदीश्वर कालेश्वर, पिंगलेश्वर, कुक्कुटेश्वर ह्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. काशीक्षेत्रांत जाऊन ह्या लिंगांचें पूजन करणारे सर्व पापांपासून मुक्त होऊन; व ऐहिक

विषयसुखांचा उपभोग घेऊन अंतीं शिवलोकाला प्राप्त होतात. त्याचप्रमाणें कुंडोदरेश्वर, मयूरेश्वर, बाणेश्वर, गोकर्णेश्वर ह्यांचें जरी केवळ दर्शन घेतलें तरीसुद्धां मोठमोठे दोष नाश पावतात. शंकराच्या एका कपर्दी नांवाच्या गणानें विमलोदक नांवाचें एक कुंड जमीन खणून निर्माण केलें; व त्या ठिकाणीं कपर्दीश नांवाचें एक शिवलिंग स्थापित केलें; पूर्वी वाल्मीकिमुनिहि ह्या कपर्दीशाच्या पूजनानेंच सर्वज्ञत्वाला प्राप्त होऊन सद्गतीला गेले. मार्गशीर्ष शुक्ल चतुर्दशीला कपर्दीशाचें पूजन करावें; म्हणजे दुर्योनींत जन्म प्राप्त होत नाहीं. हें आख्यान पठण करणाराहि निर्भय असा होत्साता शिवपुराला प्राप्त होतो.

---

## अध्याय ५४ वा.

### पिशाचमोचनमाहात्म्य.

पूर्वी काशीक्षेत्रामध्यें वाल्मीकि नांवाचा मुनि विमलोदक तीर्थांत स्नान करून. व अंगाला भस्म वगैरे लावून नित्यानुष्ठान करीत बसला असतां त्या ठिकाणीं एक पिशाचरूपी राक्षस प्राप्त झाला. त्या पिशाचाला पाहून वाल्मीकिमुनि त्यास म्हणाले; तूं कोठून व कशाकरितां येथें आला आहेस ? तुझ्यावर अनुग्रह करावा, ह्या बुद्धीनें मी विचारीत आहें. तरी तें ऋषिवाक्य ऐकून पिशाचरूपी राक्षस म्हणतो; मुने ! मी पूर्वी पैठण-नामक नगरामध्यें राहणारा ब्राह्मण होतों. मी तीर्थाचे ठिकाणीं जाऊन दुष्ट प्रतिग्रह घेतल्यामुळें त्या पापाच्या योगें मी आतां पिशाच झालों आहें. आपण माझा उद्धार करा. नंतर वाल्मीकि पिशाचाला म्हणतात; पिशाचा ! तूं ह्या विमलोदकतीर्थांत स्नान कर; म्हणजे दोषमुक्त होशील. नंतर तें पिशाच त्या तीर्थांत स्नान करून वाल्मीकिमुनीच्या प्रसादानें मुक्त झालें. या तिर्थाला पिशाचमोचनतीर्थ म्हणतात. ह्या पिशाचमोचनतीर्थांत मार्गशीर्ष शुक्ल चतुर्दशीला स्नान करणारे सर्व पापांपासून मुक्त होतात. त्या दिवसापासून पिशाचमोचनतीर्थ काशीनगरामध्यें प्रसिद्धीस आलें. ह्या पिशाचमोचनतीर्थांत स्नान करून जे शिवभक्ताचें पूजन करितात, त्यांना कोटि ब्राह्मणांस भोजन घातल्याचें पुण्य लागून ते अंतीं शिवसायुज्याला प्राप्त होतात. हें आख्यान श्रवण करणारांनाहि बालग्रहादि पीडा न होऊन सर्वप्रकारच्या शांतीनें युक्त असे शिवलोक त्यांस प्राप्त होतात.

---

## अध्याय ५५ वा.

### पिंगलेश्वरादिमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! आतां तुम्हाला काशीमध्यें शिवगणांनीं स्थापिलेलीं लिंगें सांगतों; ऐका. कपर्दीशाच्या उत्तरेस पिंगल नामक शिवगणानें स्थापिलेलें एक पिंगलेश्वर नांवाचें लिंग आहे. तसेंच वीरभद्रानें स्थापिलेलें वीरभद्रेश्वर नांवाचेंहि एक लिंग अविमुक्तेश्वराच्या पश्चिमेस आहे. किरातगणस्थापित किरातेश्वर, चतुर्मुखनामक गणानें स्थापिलेलें चतुर्मुखेश्वर, निकुंभस्थापित निकुंभेश, कुबेरस्थापित कुबेरेश्वर हीं सर्व लिंगें शुभफल देणारीं आहेत. पंचाक्षेश्वर, भारभूतेश्वर, त्र्यक्षेश्वर, लांगलीश्वर वगैरे लिंगांच्या पूजनानेंहि शिवलोकप्राप्ति होते. विराधेश्वर, सुमुखेश्वर, आषाढीश्वर हीं सर्व लिंगें शिवगणांनीं शिवाज्ञेनें शिवकार्यासाठीं काशीक्षेत्रांत प्रयाण केलें असतांहि तें कार्य न करितां काशीक्षेत्रमाहात्म्याच्या प्रभावेंकरून शिवाराधनापूर्वक आपआपल्या नांवांनीं स्थापित केलीं. तें शिवकार्य म्हणजे दिवोदासाच्या स्वकर्मांत विघ्न उपस्थित करून त्याला काशींतून घालवून देणें; हें होय. इतर कोणत्याहि गणाकडून हें कार्य होत नाहीं, असें समजतांच शंकरानें गणपतीला काशीक्षेत्रांत पाठवून सांगितलें कीं, तूं दिवोदासाला कर्मभ्रष्ट करून काशीक्षेत्रांतून घालवून दे. अशी शिवाज्ञा ऐकून गणपति काशीक्षेत्राला जाण्यास निघाला.

## अध्याय ५६ वा.

### गणेशमायावर्णन.

कार्तिक स्वामी म्हणतात; मुने! शंकराच्या आज्ञेनें गणपती काशीक्षेत्रांत येऊन तेथील लोकांस आपल्या मायेनें रात्रीं स्वप्न दाखविता झाला; आणि दुसरे दिवशीं स्वतः भिक्षुवेष घेऊन;व घरोघर हिंडून लोकांना रात्रीं पडलेल्या स्वप्नाचें फल कथन करिता झाला. भिक्षुवेषधारी गणपती म्हणाला कीं, शनि, शुक्र, मंगळ हे ग्रह एकाच राशीचे ठिकाणीं असल्यामुळें हा धूमकेतु राजनाशार्थ पश्चिमदिशेकडे जात आहे. अशातऱ्हेनें त्या गणपतीनें अनिष्ट फलें लोकांना सांगून आपल्या मायाप्रभावानें त्यांना मोहित केलें. नंतर गणपती राजाच्या अंतःपुरांत जाऊन व तेथील स्त्रियांनाहि अनेकप्रकारच्या अनिष्ट गोष्टी सांगून

नंतर दिवोदासाकडे गेला. दिवोदासानें गणपतीचें आदरातिथ्य केलें. नंतर गणपती राजाला म्हणाला कीं, राजन् ! आजपासून अठरावे दिवशीं एक ब्राह्मण येऊन तुला उपदेश करील; व त्याच्या उपदेशाप्रमाणें तूं आपलें वर्तन ठेव; म्हणजे त्यांतच तुझें कल्याण होईल. असें सांगून बटुवेषधारी गणपती राजाची आज्ञा घेऊन स्वाश्रमाला निघून गेला. ह्याप्रमाणें गणपतीनें आपल्या मायेनें सर्व काशीनगरी आपलीशी करून घेतली. नंतर दिवोदासाला विष्णूनें ब्राह्मणरूपानें येऊन उपदेश केल्याप्रमाणें तो काशी क्षेत्रांतून निघून गेल्यामुळें गणपतीला कृतकृत्यता वाटून त्यानें अनेक रूपानें त्या क्षेत्रांत वास्तव्य केलें.

---

## अध्याय ५७ वा.

### ढुंढिविनायकमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! शिवाज्ञेनें गणपतीनें आपली माया दिवोदासास दर्शवून त्यास काशीक्षेत्रांतून घालवून लाविल्यानंतर शंकर आपल्या सर्व गणासह काशीक्षेत्रांत येऊन राहते झाले. जें कार्य इतर कोणाचेहि हातून झालें नाहीं, तें कार्य गणपतीनें केलें; म्हणून त्याचे पुष्कळ आभार मानून शंकरानें गणपतीची स्तुति केली; व सांगितलें कीं, हे गणेशा ! तुला आजपासून लोक ढुंढिविनायक ह्या नांवानें पूजितील; कारण ढुंढि—धातु अन्वेषण म्हणजे धुंडणें ह्या अर्थाचा आहे; व आपण कृपाप्रसादानें सर्वांचे पुरुषार्थ धुंडून आणून देतां; म्हणजे आपल्या आशीर्वादानें लोक चारहि पुरुषार्थांना मिळवितात; याकरितां आपलें नांव ढुंढिविनायक असें मीं ठेविलें आहे. ही शंकरकृत ढुंढिविनायकाची स्तुति जे पठण करितील तेहि धर्मादिपुरुषार्थांना मिळवून शिवलोकीं जातील; असें शंकरानें स्वमुखानें सांगितलें आहे. आतां ह्या काशीक्षेत्राच्या रक्षणार्थ ढुंढिविनायकानें अन्य स्वरूपें घेऊन तेथें ज्या नांवानें वास्तव्य केलें, तीं नांवें सांगतों; ऐका. काशीक्षेत्रांत गंगा; व असि ह्या दोन नद्यांचा जेथें संगम आहे, तेथें अर्कविनायक, दुर्गाविनायक, भीमचंडविनायक, काशीक्षेत्राच्या नैर्ऋत्येस देहलीविनायक, काशीक्षेत्राच्या वायव्येस उद्दंडविनायक, पाशपाणिविनायक, गंगा व वारणा ह्यांच्या संगमावर खर्वविनायक, अशा विनायकाच्या आठ मूर्ति आठ दिशांला स्थापित आहेत. ह्या विनायकांचें पूजन करणारे निष्पाप होत्साते शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ५८ वा.

### दिवोदासास मोक्षप्राप्ति.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! दिवोदास काशीक्षेत्रांतून जो निघाला तों यात्रा करीत पुण्यप्रदेशांतून हिंडूं लागला. शंकराला दिवोदास काशीक्षेत्रांतून निघून गेल्याचें समजतांच तो पार्वतीसह काशीक्षेत्रांत येण्याकरितां निघाला. काशीक्षेत्राजवळ शंकर येतात तोंच लक्ष्मीसह विष्णुहि त्या ठिकाणीं प्राप्त झाले. नंतर शंकरानें विष्णूचा आदरसत्कार करून अनेक पुण्यमूर्तींची तेथें स्थापना केली; व त्याला आदिकेशव हें नांव दिलें. शंकर काशीक्षेत्रांत राहून कांहीं काळ गेल्यावर दिवोदासाच्या पुण्यप्रभावानें शंकराला पश्चात्ताप होऊन दिवोदासाला बोलावून आणण्याविषयीं तो विष्णूला सांगता झाला. दिवोदास कोठें आहे, हें विष्णूला माहित नसल्यामुळें त्यानें गरुडाला आज्ञा दिली कीं, तूं भूमंडळांत फिरून दिवोदासाचा शोध करून त्यास घेऊन ये. इकडे दिवोदास अनेक तीर्थें हिंडत व साधूंचे सदुपदेश श्रवण करीत मोठ्या आनंदानें फिरत असतां गरुडानें त्याला पाहून विष्णूच्या सांगण्याप्रमाणें काशीक्षेत्रांत परत आणिलें. त्यावेळीं शंकर व विष्णु दिवोदासाला आलिंगन देऊन स्वतःला धन्य मानते झाले. नंतर दिवोदासानें शंकराच्या आज्ञेनें आपल्या पुत्राला काशीक्षेत्राच्या राज्यासनावर बसवून; व स्वतः त्यानें विमानांत बसून शिवलोकीं प्रयाण केलें.

## अध्याय ५९ वा.

### पंचनदप्रादुर्भाव.

अगस्त्यानें पंचनदतीर्थमाहात्म्य विचारिल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! पूर्वीं वेदशिरा नांवाचा एक ऋषि होता. तो तपश्चर्या करीत असतां त्याच्या तपांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां एक शुचि नांवाची अप्सरा त्यासमोर उभी राहून नृत्य करूं लागली. त्या अप्सरेला पाहून वेदशिरा ऋषी मोहित होऊन त्याचें रेत स्खलित झालें. मुनि रागावेल ह्या भीतीनें शुचीनें वेदशिराची स्तुति केली. नंतर वेदशिरा म्हणतो कीं, हें रेत तूं प्राशन करून आपल्या उदरांत साठवून ठेव; म्हणजे तुला एक कन्या होईल. नंतर शुचीनें तें रेत प्राशन केल्यावर कांहीं काळानें तिला मुलगी झाली. तिनें त्या मुलीला

वेदशिरामुनीचे ताब्यांत दिलें; व ती स्वस्थानाला निघून गेली. त्या मुलीचें सौंदर्य पाहून यमधर्म ब्राह्मणाचा वेष घेऊन तिच्याशीं गांधर्वविधीनें विवाह लावण्याकरिता आला. त्याला पाहून वेदशिरामुनींच्या मुलीनें त्या ब्राह्मणास नद होऊन पडून रहा म्हणून शाप दिला. तो यमधर्म तत्काळ काशीक्षेत्रांत धर्मनद ह्या नावानें प्रगट झाला. ह्याच ठिकाणीं गंगा; यमुना, सरस्वती, धूत-पापा; व किरणा ह्या पांच नद्या एकत्र मिळतात. म्हणून त्या स्थानास पंचनद हें नांव प्राप्त झालें आहे. ह्या पंचनदतीर्थाचें माहात्म्य वर्णन करणें मोठमोठ्या पुण्यपुरुषांना सुद्धां अशक्य आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजें हें पंचनद-तीर्थ अनंत फल देणारें आहे; व शेवटीं मुक्ति देणारें आहे.

---

## अध्याय ६० वा.

### बिंदुमाधवमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! काशीक्षेत्रांतील प्रत्येक तिर्थाचें व स्थानाचें माहात्म्य अवर्णनीय आहे, असें पाहून त्याबद्दल विष्णु विचार करीत असतां त्याठिकाणीं एक अग्निबिंदु नांवाचा ऋषि प्राप्त झाला. त्या ऋषीनें विष्णूची पुष्कळप्रकारें स्तुति केल्यावर त्याला चिंताग्रस्त होण्याचें कारण विचारिलें. नंतर विष्णु म्हणतात; हे अग्निबिन्दो ! हें काशीक्षेत्र सोडून अन्यत्र जाण्याची माझी इच्छा नाहीं. माझे मनांतून येथेंच राहावयाचें आहे; व त्याबद्दल मी विचार करीत आहे. नंतर अग्निबिंदु म्हणतो कीं, विष्णो ! आपली इच्छा लो-कांवर उपकार करावा, अशी आहे. परंतु माझीहि एक आपल्या चरणाशीं प्रार्थना आहे; ती ही कीं, माझ्या अर्ध्या नांवानें युक्त असें जें आपलें नांव तें ह्या स्थानाला असावें, एवढेंच माझें मागणें आहे. नंतर विष्णु म्हणजे माधव व अग्निबिंदुमुनी ह्या उभयतांनीं एक तीर्थ निर्माण करून व शिवलिंग स्थापन त्यास बिंदुमाधव हें नांव दिलें. हें बिंदुमाधवतीर्थ पंचनदतीर्थाजवळ आहे. ह्या तीर्थाचें माहात्म्य माधवानें अग्निबिंदूला सांगितलें आहे. आनंदकानन, पांचनदतीर्थ, बिंदुमाधव वगैरे तीर्थें त्रैलोक्याहूनहि अधीक फळ देणारीं आहेत. ह्या बिंदुमाधवतीर्थांत स्नान करण्याकरितां प्रत्यक्ष ब्रह्मदेव, चारहि वेद, सर्वप्रकारचे यज्ञ, ब्राह्मीप्रमुख मातृगण, सात समुद्र, सर्व नद्या कार्तिक-महिन्यांत येतात, असा ह्या तीर्थाचा महिमा अगाध आहे.

---

## अध्याय ६१ वा.

### वैष्णवतीर्थमाहात्म्य.

नंतर माधवानें अग्निबिंदुमुनीला काशीक्षेत्रांत असणारीं जीं पादोदकादि तीर्थें व पुण्यस्थानें त्यांचीं माहात्म्यें सांगण्यास प्रारंभ करून त्यास म्हटलें कीं, मुने! आतां एकंदर तीर्थें किती आहेत, तें सांगतों, श्रवण करा. प्रथम विष्णुपादोदकतीर्थ, तसेंच आदिकेशव, संगमेश, द्वीपतीर्थ, ज्ञानकेशव, तार्क्ष्यकेशव, नारदकेशव, प्रह्लादतीर्थ, अंबरीषतीर्थ, आदित्यकेशव, आदिगदाधर, भार्गवतीर्थ, वामनतीर्थ, नरनारायणतीर्थ, यज्ञवराहतीर्थ, नरसिंहतीर्थ गोपिगोविंदतीर्थ, लक्ष्मीनृसिंहतीर्थ, शेषमाधव, शंखमाधव, हयग्रीवतीर्थ, भीष्मकेशव, निर्वाणकेशव, श्वेतमाधव, प्रयागमाधव, हरिश्चंद्रतीर्थ, सीमाविनायक, कंबलाश्वतरतीर्थ, ढुंढितीर्थ, मार्कण्डेयेश्वर, वशिष्ठतीर्थ, त्रिसंध्यतीर्थ, अनुयोगिनीतीर्थ, अगस्त्यतीर्थ, गंगाकेशव, वीरमाधव, कालमाधव, ह्याप्रमाणें काशीक्षेत्रांत मुख्यतीर्थें; व पुण्यस्थानें आहेत. एकंदर नारायणांश अशीं पांचशें स्थानें आहेत; मत्स्याकार वीस तीर्थें आहेत; एकशें आठ गोपालतीर्थें आहेत; परशुरामतीर्थें तीस आहेत. रामतीर्थें एकशें एक आहेत; अशाप्रमाणें काशीक्षेत्रांत प्रसिद्ध असणाऱ्या वैष्णवतीर्थांचे जे सेवन करून त्या त्या ठिकाणीं स्थापिलेल्या देवतांचें पूजन करितात, ते विष्णुलोकाला प्राप्त होतात. कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! हा माधवाचा व अग्निबिंदुमुनीचा संवाद जे श्रवण करितील ते निष्पाप होऊन; व इहलोकीं सुख भोगून अंतीं वैकुंठाला जातील.

## अध्याय ६२ वा.

### शंकरसमागम.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! ज्यावेळीं गरुड दिवोदासाचा शोध लावून परत काशीक्षेत्रीं आला, त्यावेळीं शंकरानें गरुडाला बक्षिस देऊन खुष केलें. आपलें वाहन जें गरुड, त्याचा शंकरानें सत्कार केल्याबद्दल विष्णूला आनंद झाला; व त्यानें शंकराची रुद्रसूक्तानें स्तुति केली. त्याठिकाणीं ब्रह्मादि देवहि प्राप्त झाले; व त्यांनींहि शंकराची स्तुति केली. नंतर शंकर म्हणतात; विष्णुप्रमुख देवहो! जितकीं तीर्थें त्रैलोक्यांत राहतात तितकीं सर्व ह्या काशीक्षेत्रांत वास करितात. आतां त्यांपैकीं थोडीं तीर्थमाहात्म्यें सांगतों, ऐका.

मधुस्रवा ह्या नांवाचें एक तीर्थ आहे, तसेंच कपिलाधरतीर्थ, शिवगयातीर्थ, पैतामहतीर्थ, गदाधरतीर्थ, पितृतीर्थ, सुधसनितीर्थ, ह्या तीर्थांत स्नान केलें, असतां अश्वमेधयज्ञ केल्याचें पुण्य लागून पितृतृप्ति व मोक्षप्राप्तीहि होते. ह्या तीर्थांच्या केवळ नामग्रहणानें सर्वसिद्धि प्राप्त होतात. जे अंतकालीं वृषभध्वजतीर्थांत स्नान करून देहविसर्जन करतात त्यांना शिवलोकाची प्राप्ति होते. वगैरे शंकरानें तीर्थमाहात्म्य सांगितल्यावर ब्रह्मादिदेव, व विष्णु आपआपल्या वाहनावर बसून स्वस्थानाला निघून गेले; व शंकरहि पार्वतीसह गुप्त झाले. ह्या शंकराचा व विष्णूचा संवाद व हें तीर्थमाहात्म्य जे श्रवण करितील; अथवा पठण करितील ते बेचाळीस कुळांसह सुखानें स्वर्गाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ६३ वा.

### ज्येष्ठेशाख्यान.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! एकदां जैगीषव्य नांवाचा एक ऋषि शिवदर्शनावांचून तोंडांत पाणीसुद्धां घालणार नाहीं, असा हट्ट धरून बसला होता. हा प्रकार शंकराला समजल्यावरून पार्वतीसह शंकर त्या ठिकाणीं प्राप्त झाले; व त्यांच्याकडून एक शिवलिंग स्थापवून त्यांनीं त्याच्या सर्व इच्छा पूर्णहि केल्या. त्यादिवशीं ज्येष्ठ कृष्ण अष्टमी असल्यामुळें त्या लिंगाचें नांव ज्येष्ठेश असें ठेविलें. प्रत्येक वर्षी ज्येष्ठ महिन्यांत ह्याठिकाणीं उत्सव होत असतो. ज्येष्ठ शुक्ल चतुर्दशीला सोमवार व अनुराधानक्षत्र असतां ज्येष्ठेशाचें पूजन, उपोषण व जागरण इत्यादि विधीनें व्रत करावें; म्हणजे त्याचें फळ विशेष आहे. ह्या जेष्ठेश्वरासंन्निध शिवभक्तांना भोजन घालावें; म्हणजे त्यानें अनंत ब्राह्मणांना भोजन घातल्याचें फळ मिळतें. हें ज्येष्ठेशलिंगाचें माहात्म्य कलियुगांत पापी लोकांना सांगूं नये. ह्या लिंगाचें पूजन केलें असतां योगिलोकांना प्राप्त होणारी सिद्धि मिळते. मोठमोठीं पातकें नाश पावून पुण्यप्राप्ति होते. हें स्थान भीतीचा नाश करणारें असून भक्ति वाढविणारें आहे. ज्येष्ठेशाचे सन्निध पार्वती; व शंकर उभयतां वास करीत असल्यामुळें दशहरामध्येंहि ह्याचें पूजन करावें. ज्येष्ठेश स्थान साक्षात् विश्वेश्वराचें बरोबरीचें असल्यामुळें अवर्णनीय आहे. ज्येष्ठेशमाहात्म्य श्रवण केलें असतां मोक्ष मिळतो.

---

## अध्याय ६४ वा.

### क्षेत्ररहस्य.

कार्तिकस्वामी म्हणतात;–मुने ! एके दिवशीं मंदरपर्वतावर येऊन सर्व देवांनीं मिळून एक खळगा खणला; व त्या खळग्याला दंडखाततीर्थ हें नांव दिलें. नंतर देवांनीं तेथें तपश्चर्या करून शिवदर्शनाकरितां विश्वेश्वरासन्निध प्रयाण केलें. देव विश्वेश्वराजवळ जातात तोंच शिवभक्तहि तेथें प्राप्त झाले. त्याप्रमाणें दुसऱ्याहि अनेक तीर्थांपासून शिवदर्शनाकरितां असंख्य मुनि तेथें आले. नंतर सर्वांनीं मिळून काशीक्षेत्राचें रहस्य सांगण्याबद्दल शंकराजवळ आग्रह धरल्यामुळें शंकर म्हणतात; देवहो ! मी तुम्हाला काशीक्षेत्राचें रहस्य सांगतों; ऐका. काशीक्षेत्राच्या नांवाचा त्रिवार जप केल्यास प्रत्यक्ष विश्वेश्वराचें दर्शन घेतल्याचें पुण्य लागतें. चौदा लोकांत राहणाऱ्या प्राण्यांना माझ्या स्वरूपाचें खरें दर्शन होत नाहीं; परंतु काशीक्षेत्रांत राहणाऱ्या प्रत्येक प्राण्याला; मग तो महापापी असो, अभागी असो, किंवा कसाहि असो त्याला माझें दर्शन नित्य होतें, हा काशीक्षेत्राचा महिमा आहे. एक प्राणी माझ्या लिंगाचें पूजन करीत आहे; व दुसरा प्राणी मोठमोठ्या घोर तपश्चर्या करीत आहे, तर लिंगपूजन करणारा प्राणी तपश्चर्या करणाऱ्या प्राण्यापेक्षां मला अधिक प्रिय आहे. अन्यठिकाणीं कोटि ब्राह्मणास भोजन दिल्याचें फळ काशीक्षेत्रांत एका ब्राह्मणाला भोजन दिल्यानें मिळतें. हें रहस्य श्रवण करणारांना काशीक्षेत्रांत वास केल्याचें फळ मिळून मोक्षप्राप्तिहि होते.

---

## अध्याय ६५ वा.

### पराशरेश्वरादिलिंगमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! ज्येष्ठेशाच्या उत्तरेस एक पराशरेश्वरनांवाचें लिंग आहे; त्याच्या पूजनानें ज्ञानप्राप्ति होते. पराशरेश्वरासन्निध मांडव्येश्वर, शंकरेश्वर, जाबालीश्वर, भीषणभैरवी, भारद्वाजेश्वर, माद्रीश्वर, अरुणीश्वर, कण्वेश्वर, नामदेवेश्वर, औतथ्येश्वर, हरीतेश्वर, वैगालेश्वर कौसुमेश्वर, अग्निवर्णेश्वर, नैध्रुवेश्वर, वत्सेश्वर, पर्णादेश्वर, सक्तुप्रस्थेश्वर, कणादेश्वर, बाभ्रवेयेश्वर, शिलावृत्तीश्वर, च्यवनेश्वर, कायनकेश्वर, कालिंदमेश्वर, अक्रोधनेश्वर, कपोतवृत्तीश्वर, कंकेश्वर, कुंतलेश्वर, कंठेश्वर, होलेश्वर, मतंगेश्वर, मरुत्तेश्वर,

मगधेयेश्वर, जातूकर्णेश्वर, जंबूकेश्वर, जारुधीश्वर, जाल्मेश्वर, जालकेश्वर, ह्याप्रमाणें असंख्य लिंगें आहेत; त्या सर्वांच्या पूजनानें जन्ममरणरूपी चक्रापासून मुक्तता होते. एकेदिवशीं पार्वती कंदुकानें म्हणजे चेंडूनें खेळत असतां तिला धरण्याकरितां दोन दैत्य मायास्वरूपें घेऊन तिजकडे येऊं लागले. हा प्रकार जाणून पार्वतीनें त्याच चेंडूचा दैत्यांवर प्रहार केला; व त्यांस ठार केलें. नंतर तो चेंडू म्हणजे कंदुक शिवालिंगरूपानें जमिनीवर पडला; म्हणून तेथें त्यास कंदुकेश्वर हें नांव प्राप्त झालें. कंदुकेश्वराच्या पूजनानें शत्रुनाश, व मोक्षप्राप्ति होते. पूर्वीं दुंदुभिनांवाचा एक दैत्य व्याघ्ररूप घेऊन एका शिवभक्ताच्या अंगावर धांवला. शंकराला त्या भक्ताची दया येऊन त्यानें व्याघ्रस्वरूपी दैत्याला ठार मारिलें, व तेथें व्याघ्रेश नांवानें एक लिंग स्थापिलें. ह्या लिंगाचें पूजन करणारांना चोरादिकांची; व व्याघ्रादिकांची भीति उरत नाहीं. हें पराशरेश्वरादिलिंगांचें माहात्म्यश्रवण करणारे निष्पाप होऊन मोक्षाला जातात.

---

## अध्याय ६६ वा.

---

### शैलेशादिलिंगमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात,—मुने! ज्येष्ठेशाच्या सभोंवार जीं कांहीं लिंगें आहेत, तीं आपणास सांगतों; ऐका. प्रथम शैलेश नंतर अप्सरसेश्वर, कुक्कुटेश्वर, पितामहेश्वर, गदाधरेश्वर, वासुकीश्वर, तक्षकेश्वर, कपालीभैरव, गंधर्वेश्वर, कर्कोटकेश्वर, धुंधुमारीश्वर, पुरूररेश्वर, सुप्रतीकेश्वर, विजयभैरवी, हुंडनेश्वर, मुंडनेश्वर, ह्याप्रमाणें शैलेशादि पुष्कळ शिवलिंगें ज्येष्ठेशादिकांच्या सभोंवार स्थापिलीं आहेत. हिमवान् पर्वताला स्वतःच्या ऐश्वर्याचा अभिमान होऊन, तो पूर्वीं शंकराची निर्भर्त्सना करीत होता. नंतर त्याला एका शिवभक्तानें उपदेश केल्यामुळें तो पश्चात्तापानें काशीक्षेत्रांत जाऊन, शैलेशाचें पूजन करिता झाला. त्याच्या त्या पूजनानें शंकर प्रसन्न होऊन; व पर्वताला ज्ञान देऊन त्यानें त्याच्या बुद्धीला प्रज्वलित केलें. शंकराच्या दर्शनानें हिमवान् आनंदित होऊन; व शिवनामाचा घोष करून परत स्वस्थानीं गेला. जे कोणीं शैलेशादिलिंगांचें पूजन करून त्या ठिकाणीं पितृश्राद्धादि कर्मे आचरितात; ते पितरांसह शिवलोकाला प्राप्त होतात. जे कोणीं काशीक्षेत्रांत येऊन शैलेशादिलिंगांचें दर्शन घेतात, ते निष्पाप होत्साते शिवसायुज्यतेला प्राप्त होतात.

---

# अध्याय ६७ वा.

## रत्नेश्वरमाहात्म्य.

अगस्त्यमुनीनें रत्नेश्वरलिंगाचें माहात्म्य विचारल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! हिमालयपर्वतानें जगतांत जितकीं रत्नें आहेत तीं सर्व एकत्र करून हें लिंग तयार केलें; म्हणून यास रत्नेश्वर म्हणतात. पूर्वी एकदां एक रत्नावली नांवाची कन्या ह्या रत्नेश्वरलिंगापुढें शिवरात्रीच्या दिवशीं येऊन नृत्य करूं लागली. त्या नृत्यानें प्रसन्न होऊन शंकरानें तिला वर दिला कीं, आज रात्रीं जो तुला स्वप्नांत भोग देईल तो तुझा पति होईल; असें सांगून शंकर गुप्त झाले. नंतर तिला त्याच रात्रीं स्वप्नांत एक पुरुष येऊन;व भोग देऊन निघून गेला. दुसरे दिवशीं ती आपल्या सखीला म्हणाली कीं, कालरात्रीं ज्यानें मला भोग दिला, त्या पुरुषाला मजजवळ घेऊन ये. नंतर त्या सखीनें चित्रें लिहून रत्नचूडाचें चित्र काढितांच रत्नावली खालीं मान घालून लज्जित झाली; व हाच माझा पति असें सखीला सांगूं लागली. नंतर सखी पाताळीं नागराजाकडे जाऊन रत्नचूडाला घेऊन येती झाली. पुढें रत्नावलीच्या बापाला हें वर्तमान समजतांच त्यानें रत्नावलीचें रत्नचूडाबरोबर रत्नेश्वराच्या कृपाप्रसादानें लग्न लावून दिलें. हा सर्व रत्नेश्वराच्या उपासनेचा प्रभाव आहे. रत्नेश्वराच्या पूजनानें अनेक रत्नांची प्राप्ति होते. एकदा रत्नेश्वराला नमस्कार केल्यावर मग जरी त्याचा अंत इतरठिकाणीं झाला. तरी तेवढ्या पुण्यानें त्याला कोट्यावधी वर्षें स्वर्गांत राहावयास मिळून शेवटीं शिवलोकाची प्राप्तिहि होते. हें रत्नेश्वरमाहात्म्य श्रवण करणारे मुक्त होतात.

---

# अध्याय ६८ वा.

## कृत्तिवासोत्पत्तिवर्णन.

कार्तिकस्वामी म्हणतात, मुने ! एकदां महिषासुराचा पुत्र गजासुर आपली सेना बरोबर घेऊन शंकराला जिंकण्याच्या इच्छेनें चालला असतां वाटेंत प्रमथादि शिवगणांना त्यानें पळवून लाविलें. त्यावेळीं जिकडे तिकडे हाहाःकार होऊन मोठी गडबड उडाली. हा प्रकार शंकराला समजताच शंकरानें कृत्तिवासनांवानें अवतार घेऊन गजासुराचा नाश केला. नंतर शंकरानें काशीक्षेत्रांत आपल्या कृत्तिवासस्वरूपाची लिंगरूपानें स्थापना केली. हजारों

जन्मांनी सुद्धा जो मोक्ष मिळण्यास दुर्लभ तोच मोक्ष एका जन्मांत ह्या कृत्तिवासेश्वराच्या पूजनानें मिळतो; व सातकोटि रुद्रजाप्याचें पुण्य लागतें. माघ कृष्ण चतुर्दशीला कृत्तिवासेश्वराचें पूजन करून रात्रीं जागरण करावें; म्हणजे मोक्षप्राप्ति होईल. चैत्री पौर्णिमेला कृत्तिवासेश्वरालिंगाचें पूजन केल्यास पुनः जन्ममरणाची पीडा होत नाहीं. एकदां चैत्री पौर्णिमेला कृत्तिवासेश्वराचा उत्सव सुरू असतां अन्नराशीहि शिजविल्या होत्या. तें अन्न पाहून तेथें कावळे येऊन अपसाअपसांत भांडूं लागले; व त्यांतील कांहीं कावळे भांडता-भांडतां कृत्तिवासेश्वरासन्निध असणाऱ्या कुंडांत पडले; व तत्काळ ते कावळे हंसस्वरूपी झाले. त्या दिवसापासून त्या तीर्थाला हंसतीर्थ हें नांव प्राप्त झालें. हंसतीर्थाच्या सभोंवार लोमेश, मालतीश, अंतकेश्वर, जनकेश, असितांगभैरव, अग्निजिह्ववेताळ ह्याप्रमाणें लिंगें आहेत. अग्निजिह्ववेताळानजिक एक वेताळ-कुंड आहे, त्यांत स्नान केलें असतां इष्ट सिद्धि प्राप्त होतात. कृत्तिवासे-श्वराच्या उत्तरेस मणिप्रदीप गांवाचा एक नाग आहे; व मणिकुंड आहे. ह्या मणिकुंडांत स्नान करून मणिप्रदीपाची पूजा करणारास सुखप्राप्ति होते.

---

## अध्याय ६९ वा.

### काशीक्षेत्रलिंगवर्णन.

कार्तिकस्वामी म्हणतात;—मुने! काशीक्षेत्रांत स्थाणुनामक एक मोठें शिवलिंग आहे, त्याच्या पूजनानें मोक्षप्राप्ति होते. तसेच देवदेवलिंग, महाबल-लिंग, शशिभूषणलिंग, प्रणवलिंग, महाकाललिंग, अयोगंधेश्वर, महानादेश्वर, महोत्कटेश्वर, विमलेश्वर स्कंदेश्वर, महादेवलिंग पितामहेश्वर, धर्मेश्वर, शूल-टंकेश्वर महायोगेश्वर, पार्वतीश्वर, चंडीश्वर, नीलकंठेश्वर, मंडलेश्वर, कपर्दीश, आम्रातकेश्वर, सूक्ष्मेश्वर, जयंतेश्वर, कुक्कुटेश्वर, हरिश्चन्द्रेश्वर, सहस्राक्षेश्वर, रुद्रेश्वर, ईशानेश्वर, दंडीश्वर उद्दंडगणपति, कपालीश, नकुलीश्वर, भूतेश्वर, भीमेश, भूर्भुवेश्वर, हाटकेश्वर ह्याप्रमाणें क्रमाक्रमानें त्या त्या ठिकाणी अस-णाऱ्या कुंडांत स्नान करून लिंगाचें पूजन करावें; त्या योगें सर्व सिद्धी प्राप्त होऊन स्वतःला शिवस्वरूपाची प्राप्ति होते. हें वरील तीर्थलिंगमाहात्म्य शंक-रानें नंदीला सांगितलें आहे. ह्या क्षेत्रामध्यें जगतांतील सर्व क्षेत्रें तीर्थें व लिंगें येऊन राहिलीं आहेत. एक काशीक्षेत्राची यात्रा केली असतां सर्व क्षेत्रें, तीर्थें व पुण्यस्थानें हिंडल्याचें श्रेय प्राप्त होतें. ह्या अध्यायांत सांगित-लेल्या लिंगाचीं माहात्म्यें जे श्रवण करितील ते शिवसायुज्यतेला प्राप्त होतील. ह्या अध्यायांच्या पठणाच्या योगें शिवसायुज्यमुक्ति व शिवभक्ति प्राप्त होते.

---

# अध्याय ७० वा.

## काशीरक्षणार्थ देवतास्थापन.

काशीक्षेत्राच्या रक्षणार्थ ज्या देवतांची स्थापना केली, त्यांचें माहात्म्य सांगा. असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून कार्तिकस्वामी म्हणतात,-मुने ! काशीक्षेत्रामध्यें विशालाक्षी नांवाची एक देवता विशालतीर्थासन्निध आहे. ह्या देवतेचें पूजन केलें असतां, काशीक्षेत्रांत वास केल्याचें पुण्य लागतें. दुसरी ललितानामक देवी ललितातीर्थासन्निध आहे. त्या ललितेच्या पूजनानें काशीयात्रेंत कोणतेंहि विघ्न येत नाहीं. आश्विन कृष्ण द्वितीयेला ललितापूजन करावें; म्हणजे सर्व इच्छित वस्तूंची प्राप्ति होते. तिसरी विश्वभुजा नांवाची देवी आहे; तिचें नवरात्रांत पूजन केलें असतां, सर्व इच्छा पूर्ण होतात. चवथी वाराही देवता होय; तिच्या पूजनानें सर्व आपत्तींचें निरसन होतें. त्याचप्रमाणें शिवदूती, वज्रहस्ता, ऐंद्री, कौमारी, माहेश्वरी, ब्राह्मी, नारायणी, विरूपाक्षी, शैलेश्वरी, चित्रघंटा, चित्रग्रीवा, भद्रकाली, हरसिद्धि; महासिद्धि, निगडभंजनी, घनटंककरा, अमृतेश्वरी, त्रिलोकसुंदरी, महालक्ष्मी, कौर्मीशक्ति, भीमचंडी, छागवक्त्रेश्वरी, तालजंघेश्वरी, चर्ममुंडा, महारुंडा, चामुंडा, स्वप्नेश्वरी ह्या सर्व देवता काशीक्षेत्राच्या रक्षणाकरितां जागोजागीं नियंत्रित केल्या आहेत. जे कोणी ह्या सर्व देवतांचें पूजन करितात, ते निर्विघ्नपणें काशीक्षेत्राच्या यात्रा करून; व कृतार्थ होऊन शिवलोकाला जातात. हें देवतामाहात्म्य श्रवण करणारांना काशीवासाचें फळ मिळतें.

---

# अध्याय ७१ वा.

## दुर्गाप्रभाव.

देवीला दुर्गा हें नांव कां प्राप्त झालें ? असा अगस्त्यमुनीनें प्रश्न केला असतां कार्तिकस्वामी म्हणतात, मुने ! पूर्वी एकदा रुरुनांवाच्या दैत्याला दुर्गनांवाचा एक पुत्र होता. त्या दुर्गानें आपल्या पराक्रमानें त्रैलोक्य पादाक्रांत केलें. त्यानें देवस्त्रिया आपल्या बंदिखान्यांत ठेऊन देवांना रानांत पळवून लाविलें. शेवटीं सर्व इंद्रादि देव शंकराला शरण गेले. शंकरानें दुर्गदैत्याचा नाश करण्याकरितां पार्वतीला पाठवून दिली. नंतर पार्वतीनें कालरात्रीला दुर्गदैत्याकडे पाठवून

युद्धास बोलाविलें. तो दुर्गदैत्य क्रोधाविष्ट होत्साता सैन्यासह पार्वतीजवळ युद्ध करण्यास तयार झाला. दैत्य आलेला पाहून पार्वतीनें स्वतः मोठें रूप धारण करून आपल्या शरीरापासून असंख्य शक्ति निर्माण केल्या. तत्काल दुर्गदैत्य व पार्वती ह्यांचें युद्ध सुरू झालें. दुर्गदैत्यानें तलवार, चक्र, त्रिशूल, भाला, गदा, मुद्गर, वगैरे अनेक आयुधानें देवीबरोबर युद्ध सुरू केलें; परंतु पार्वतीनें तीं सर्व आयुधें निरुपयोगी करून सोडिलीं. शेवटीं पार्वतीनें आपल्या शक्तीच्या प्रहारानें दुर्गदैत्याचा नाश केला. त्यादिवसापासून तिला दुर्गा हें नांव प्राप्त झालें. नंतर दुर्गेनें इतर दैत्यसैन्याचाहि फडशा पाडला. हा दुर्गेचा अतुल पराक्रम पाहून इंद्रादि देवांना मोठा आनंद झाला; व त्यांनीं दुर्गादेवीवर पुष्पवृष्टि केली. हा दुर्गाप्रभाव शत्रुसंहार करणारा आहे.

---

## अध्याय ७२ वा.

### शक्तिमाहात्म्य.

कार्तिक स्वामी म्हणतात; मुने ! पार्वतीच्या शरीरापासून ज्या शक्ती उत्पन्न झाल्या, त्यांची स्थापना काशीक्षेत्रांमध्यें केली आहे. त्यांचीं नांवें अनुक्रमें त्रैलोक्यविजया, तारा, क्षमा, त्रैलोक्यसुंदरी, त्रिपुरा, त्रिजगन्माता भीमा, त्रिपुरभैरवी, कामाख्या, कमलाक्षी, धृति, त्रिपुरतापिनी, जया, जयंती, विजया, जलेशी, अपराजिता. शंखिनी, गजवक्त्रा, महिषघ्नी, रणप्रिया, शुभानंदा, कोटराक्षी, विद्युज्जिह्वा, शिवारवा, त्रिवक्त्रा, त्रिपदा, सर्वमंगला, हुंकारहेती, तालेशी, सर्पास्या, सर्वसुंदरी, सिद्धि, स्वधा, बुद्धि, स्वाहा, महानिद्रा शरासना, पाशपाणि, खरमुखी, वज्रतारा, षडानना, मयूरवदना, काकी, शुकी, भासी, गरुत्मती, पद्मावती, पद्मकेशी, पद्मास्या, पद्मवासिनी, अक्षरा, त्र्यक्षरा, पद्मकेशी, स्वरात्मिका, त्रिवर्गा, गर्वरहिता, अजपाजपहारिणी, जपसिद्धि, तपःसिद्धि, योगसिद्धि मित्रनेत्रा, रक्षोघ्नी, दैत्यतापिनी, स्तंभिनी, मोहिनी, माया, बहुमाया, बलोत्कटा, उच्चाटनी, महोल्कास्या, दनुजेन्द्रक्षयंकरी, सिद्धिकरी, छिन्नमस्ता, बला वगैरे होत. दुर्गादेवीनें स्वतःहि लोककल्याणार्थ काशीनगरीमध्यें वास केला आहे. ह्या सर्व देवतांचें व दुर्गादेवीचें पूजन करणारांना शत्रूंपासून पिडा होणार नाही. हें शक्तिनाममाहात्म्य व दुर्गापराक्रममाहात्म्य जे पठण किंवा श्रवण करतील ते उच्च पदाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ७३ वा.

### ॐकारेश्वरमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! काशीक्षेत्रांमध्यें मुख्य लिंगें चौदा आहेत. तीं अनुक्रमें ॐकारेश्वर, त्रिलोचनेश्वर, महादेवेश्वर, कृत्तिवासेश्वर, रत्नेश्वर, चन्द्रेश्वर, केदारेश्वर, धर्मेश्वर, वीरेश्वर, कामेश्वर, विश्वकर्मेश्वर, मणिकर्णिकेश्वर, अविमुक्तेश्वर, विश्वेश्वर ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. बाकीचीहि काशीक्षेत्रांत सामान्य शिवलिंगें आहेत, तीं अनुक्रमें मोक्षद्वारेश्वर, स्वर्गद्वारेश्वर, ब्रह्मेश्वर, लांगलेश्वर, वृद्धकालेश्वर, वृद्धेश्वर, चंडीश्वर, ऐंद्रिकेश्वर, महेश्वर, ज्योतीरूपेश्वर हीं चौदा लिंगें मुक्ति देणारीं आहेत. शैलेश्वर, संगमेश्वर, मध्यमेश्वर, स्वर्लीनेश्वर, हिरण्यगर्भेश्वर, ईशानेश्वर, गोभक्षेश्वर, वृषभध्वजेश्वर, निवासेश्वर. शुक्रेश्वर, व्याघ्रेश्वर, जंबुकेश्वर, ज्येष्ठेश्वर, उपशांतेश्वर हीं चौदा लिंगें, शिवपूजकाला सर्व सिद्धी प्राप्त करून देतात. आतां ह्या सर्वांमध्यें ॐकारेश्वरलिंगाचें माहात्म्य विशेष आहे. ॐकारामध्यें अकार, उकार, व मकार अशीं तीन अक्षरें आहेत. अकार म्हणजे विष्णु, उकार म्हणजे ब्रह्मदेव; व मकार म्हणजे शंकर अशा ह्या तीन अक्षरांच्या देवता होत. ॐकारामध्यें तीन अक्षरें असल्यामुळें तदंगभूत ज्या देवता त्याहि ॐकारामध्येंच वास करितात. ॐकार म्हणजे ब्रह्मा, विष्णू; व शंकर होत. ॐकारांत त्रैलोक्य सांठविलेलें असल्यामुळें ॐकारेश्वराच्या पूजनानें सर्व देवतांच्या पूजनाचें फळ प्राप्त होतें. ॐकारेशाचें पूजन केलें असतां कधींहि विपत्ति प्राप्त होत नाहीं; व सर्व सुखें मिळून मोक्षहि मिळतो. ह्या ॐकारेश्वराचें पूजन ब्रह्मदेवानें केल्यामुळें त्यास ब्रह्मलोकाचें आधिपत्य प्राप्त झालें. हें ॐकारमाहात्म्य श्रवण केल्यानेंहि सुखप्राप्ति होते.

---

## अध्याय ७४ वा.

### ॐकारेश्वरमाहात्म्य ( पुढें चालू ).

कार्तिकस्वामी म्हणतात,–मुने! भारद्वाजाला दमननांवाचा एक पुत्र झाला होता. तो दमन मौंजीबंधन झाल्यावर उपरति झाल्यामुळें यात्रा करण्याकरितां बाहेर पडला, तों अनेक वनें उपवनें हिंडत हिंडत नर्मदानदीचे काठीं अमरकंटकासन्निध प्राप्त झाला. त्याठिकाणीं दमनाला गर्गमुनीची गांठ पडली; व

दमनाच्या प्रार्थनेवरून गर्गमुनीनें त्यास काशीक्षेत्राचें माहात्म्य सांगितलें; व त्याठिकाणीं असणाऱ्या ॐकारेश्वराचेंहि माहात्म्य सांगितलें. ॐकारेश्वर हा निर्विकार, निरंजन, निर्मल, निरहंकार वगैरे गुणांनीं युक्त आहे. ॐकारेश्वरा-सन्निध श्रीमुखीनांवाची एक गुहा आहे. जे कोणी ह्या गुहेंत पांच दिवस राहून यथाविधीनें व्रताचरण करितात ते सर्व दुःखापासून मुक्त होऊन आनंदांत राहतात. श्रीमुखीगुहेच्या उत्तरेस रसोदक कूप आहे, त्या ठिकाणीं साहा महिनें राहून वेदांतविषयाची चर्चा करावी; म्हणजे ब्रम्हलोकाची प्राप्ति होते. त्याच्या सन्निध एक नादेश्वर नांवाचें शिवलिंग आहे, त्याच्या पूजनानें वेदाध्ययनांचें फळ मिळतें. त्याच ठिकाणीं असणाऱ्या मत्स्योदरीतीर्थांत स्नान करणारा शोकमुक्त होऊन सद्गतीला प्राप्त होतो. ॐकारेश्वराच्या दर्शनानें व पूजनानें असंख्य लोक मुक्त झाले आहेत. अशातऱ्हेनें गर्गमुनीनें सांगितलेलें ॐकारे-श्वराचें व त्याचे आसपास असणाऱ्या लिंगाचें माहात्म्य श्रवण करून दमना-लाहि काशीक्षेत्रात जाण्याची इच्छा प्राप्त झाली; व तो जों तेथून निघाला तों थेट काशीक्षेत्रांत जावून ॐकारेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करिता झाला, तो दमन कृतार्थ होऊन; व ऐहिक सुखाचा अनुभव घेऊन शेवटीं मुक्त झाला. ह्या अध्यायाचें पठण करणारे सर्व सुखाचा लाभ घेऊन सद्गतीला प्राप्त होतात.

---

## अध्याय ७५ वा.

---

### त्रिलोचनेश्वरमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात,–'मुने ! सरस्वती, यमुना; व नर्मदा ह्या तीन नद्या त्रिविष्टपेश्वराचें पूजन करतात. सरस्वतीनें त्रिविष्टपेश्वराचें पूजन करून त्याच्याच कृपेनें त्रिविष्टपेश्वराच्या उत्तरेस एक सरस्वतीश्वर नांवानें लिंग स्थापिलें. तसेंच यमुनेनें यमुनेशनांवाचें एक लिंग स्थापिलें; व नर्मदेनें नर्मदेश-नांवाचें एक शिवलिंग स्थापिलें. जे कोणी त्रिलोचनेश्वराचें पूजन करितात ते सात जन्मांत केलेल्या पापापासून मुक्त होतात. पृथ्वीमध्यें जितकीं लिंगें आहेत तितकीं सर्व ह्या त्रिलोचनेश्वर लिंगाचे ठिकाणीं वास्तव्य करितात. अन्यठि-काणीं केलेलीं कितीहि मोठमोठीं पातकें असलीं तरी काशीक्षेत्रांत राहिल्यानें नाश पावतात; परंतु काशीक्षेत्रांत केलेलें थोडें पाप असलें तरी त्याचा नाश कधींहि व कोठेंहि गेलें तरी होत नाहीं, करितां काशीक्षेत्रांत पापकर्म कधींहि करूं नये, तर सतत शुभकर्म करीत असावें. ज्याप्रमाणें तेजस्वी वस्तुमध्यें

सूर्य हा श्रेष्ठ आहे, तसेंच सर्व लिंगामध्यें त्रिलोचनेश्वर लिंग श्रेष्ठ आहे. त्रिलोचनेश्वराच्या पूजनानें सर्वप्रकारचीं सौख्यें मिळून श्रेष्ठपदाची प्राप्तिहि होते. त्रिलोचनेश्वराच्या पूजनानें जें फळ प्राप्त होतें तें फळ अन्यालिंगांचे शेंकडों जन्म जरी पूजन केलें तरी प्राप्त व्हावयाचें नाहीं.

---

## अध्याय ७६ वा.

### पारावताख्यान.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! पूर्वीं राथंतर कल्पामध्यें त्रिलोचनेश्वर देवाच्या मंदिरावर दोन पारवे राहत असत. त्या पारव्यांना पाहून श्येनपक्षी त्यांना पकडण्याकरितां प्राप्त झाला. ते पारवे उंच मंदिराच्या ढोलींत राहत असल्यामुळें श्येनाचे कांहींच चालले नाहीं. श्येन रोजच्या रोज खेपा घालून त्या पारव्यांना खाण्यास टपला होता. नंतर श्येन पारव्याला म्हणतो कीं, तूं माझ्या बरोबर युद्धास तयार हो; तूं जर मला जिंकिलेस तर तुझा निर्वाह चालूं राहील; व तूं सुखी होशील, नाहीं तर व्यर्थ भुकेनें मरशील. नंतर पारव्यांचें; व श्येनाचें युद्ध सुरू झालें. शेवटीं श्येनानें एका पारव्याला आपल्या पायांत धरिलें; व दुसऱ्याला चोंचींत धरिलें; व तो श्येन त्यांना घेऊन आकाशमार्गानें गेला. पुढें वाटेनें जात असतां ज्या पारव्याला पायांत धरिलें होतें त्यानें त्या पायाला दंश केला; व तत्काळ श्येनाला वेदना झाल्यामुळें ते दोनहि पारवे श्येनापासून मुक्त झाले. कांहीं दिवसांनीं ते दोन पारवे दुसऱ्या जन्मीं त्रिलोचनेश्वराच्या सान्निध्यानें गंधर्वांच्या जन्माला व नागराजाच्या पोटीं जन्माला प्राप्त झाले. पुढें त्याच उभयतांचा त्या जन्मांत संबंध घडून तीं आनंदांत राहतीं झालीं. पुढील जन्म ह्याच पारव्यांपैकीं एकाला चारायणाच्या पोटीं जन्म प्राप्त झाला; व दुसऱ्याला आमुष्यायणाचा पुत्र नारायण ह्या नांवानें जन्म प्राप्त झाला; व ह्या जन्मांत हीं उभयतां त्रिलोचनेश्वराच्या पूजनानें व पूर्वसंबंधांत घडलेल्या ईशकृपेनें सर्व पापापासून मुक्त होऊन दुर्लभ अशा मोक्षाला प्राप्त झालीं. हें पारावताख्यान पठण करणारे श्रेष्ठ गतीला प्राप्त होतील.

---

## अध्याय ७७ वा.

### केदारमाहात्म्य.

पार्वतीनें केदारेश्वराचें माहात्म्य विचारल्यावरून शंकर म्हणतात; पार्वती ! हें केदारमाहात्म्य श्रवण केलें असतां सर्व पापांची निवृत्ति होते. केदारेश्वराच्या दर्शनानें सात जन्माचीं पातकें नाश पावतात. जे कोणी हरपापनांवाचें कुंडांत स्नान करून; व केदारेश्वराचें पूजन करून श्राद्धादि करितात, त्यांचे पितर पापरहित होऊन मुक्त होतात. कोणी एक ब्रह्मचारी ब्राह्मण काशीक्षेत्रांत येऊन पाशुपतव्रताचें आचरण करूं लागला. तो वशिष्ठाला घेऊन एकदां केदारेश्वरयात्रा करण्यास गेला असतां त्याच्या भक्तीला वश होऊन मी त्यास वर मागण्यास सांगितलें, त्या वेळीं तो ब्राह्मण म्हणतो कीं, जेवढे माझे बंधु आहेत ते सर्व आपल्या दर्शनानें कृतार्थ होऊन मुक्त व्हावेत. नंतर मी त्याला त्याप्रमाणें वर देऊन त्यासह सर्वांचा उद्धार केला. हा सर्व केदारेश्वराच्या दर्शनाचा प्रभाव होय. हें हरपापतीर्थ सांत जन्माचें पातक नाश करणारें आहे. कोणत्याहि जातींत उत्पन्न झालेले कितीहि पापी प्राणी असोत, त्याला केदारेश्वराचें पूजन केल्याशिवाय मोक्ष मिळावयाचा नाहीं. जे कोणी केदारतीर्थांत स्नान करून श्राद्धविधि करितात त्यांचीं एकशें एक कुळें उद्धरून जातात. मंगळवारीं अमावस्या असतां जर येथें स्नान केलें तर त्यास गयाश्राद्धाचें पुण्य लागतें. केदारेश्वराचें दर्शन घेणारा माझा गण होऊन माझी भक्ति करितो. जे कोणीं हें माहात्म्य श्रवण करितात ते निष्पाप होऊन शिवलोकीं जातात.

## अध्याय ७८ वा.

### धर्मेशमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! ह्या काशीक्षेत्रामध्यें धर्मेश नांवाचें एक शिवलिंग आहे, त्याच्या दर्शनानें; व पूजनानें मनुष्य सर्व पातकापासून मुक्त होतो. पूर्वीं एकदा सूर्याचा पुत्र जो यमधर्म तो ह्याठिकाणी घोर तपश्चर्या करिता झाला. त्याच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन मी तुझ्या सह त्याठिकाणीं प्रगट झालों; व त्यास म्हणालों कीं, तुझ्या तपश्चर्येनें आम्ही संतुष्ट झालों आहों, वर माग. ह्याप्रमाणें आमचें भाषण ऐकून यमधर्म म्हणतो; शंकरा ! आपण सर्व जगताची उत्पत्ति. स्थिति; व लय करण्यास समर्थ असून अनादि आहां.

आपलीं अनंतरूपें असून आपल्या अनंत शक्ति आहेत, त्या आपणाला नमस्कार असो. अशातऱ्हेनें यमधर्मांनें आमची स्तुति केली. नंतर मी त्याला वर दिला कीं, तूं धर्मराज ह्या नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध होशील. तूं ह्याठिकाणीं एक शिवलिंग स्थापन कर, म्हणजे मी पार्वतीसह त्या लिंगाचे ठिकाणीं वास्तव्य करीन, असें सांगून मी स्वस्थानीं निघून गेलों. नंतर यमधर्मांनें त्याठिकाणीं धर्मेश नावानें एक शिवलिंग स्थापिलें. ह्या धर्मेशाचें पूजन केल्यास सर्व पातकापासून निवृत्ति होते. जे कोणीं कार्तिक शुक्ल अष्टमीला धर्मेशाचें दर्शन घेतात ते सर्व पातकापासून परावृत्त होऊन मोक्षाला जातात.

---

## अध्याय ७९ वा.

### धर्मेशाख्यान.

कार्तिकस्वामी म्हणतात;-मुने ! कोणे एकेदिवशीं व्यास यात्रा करीत करीत काशीक्षेत्रामध्यें येऊन धर्मेशाचें पूजन करिते झाले. धर्मेशाचा प्रभाव जाणून व्यासाला मोठें आश्चर्य वाटलें; व तेथें असणाऱ्या याज्ञवल्क्य मुनीला धर्मेशाख्यान विचारिते झाले. नंतर याज्ञवल्क्य म्हणतात, धर्मेशाचा प्रभाव अगाध आहे. ह्या धर्मेशाच्या पुण्यप्रभावानेंच आज काशीक्षेत्राला महत्त्व प्राप्त झालें आहे. धर्मेशलिंगाचे ठिकाणीं साक्षात् शंकर व पार्वती ह्यांचें वास्तव्य असतें. ह्याची योग्यता विश्वेश्वराबरोबर आहे. निर्वाणमंडपामध्यें जर षडक्षराचा जप केला तर कोटिरुद्र जपल्याचें पुण्य प्राप्त होतें. ह्या धर्मेशाचे पूर्वेस ज्ञानमंडप आहे, त्या ठिकाणीं भगवद्ध्यान करणारांना ज्ञानप्राप्ति होते. चक्रपुष्करिणीतीर्थामध्यें नित्यनियमानें स्नान केल्यास संपूर्ण पातकांचा नाश होतो. नित्य सायंकाळीं पशुपतीश्वरासान्निध बसून पाशुपतसंध्येचें अनुष्ठान करावें; अंगाला भस्मत्रिपुंड्र लावून शिवध्यान करावें, म्हणजे पापमुक्तता होऊन मोक्ष प्राप्त होतो. सकाळीं ॐकारेश्वरासन्निध नित्यकर्माचें अनुष्ठान करावें; म्हणजे सर्व इच्छा तृप्त होतात. विरजस्कनांवाचें जें एक स्थान आहे, त्या ठिकाणीं राहून विरजादेवीचें पूजन केल्यास मनुष्य रजोगुणापासून निवृत्त होतो. वृषभध्वजस्थानाची उपासना केली असतां पितर तृप्त होऊन मोक्षाला जातात.

---

# अध्याय ८० वा.

## पुलोमजाख्यान.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! पूर्वी एक पुलोमनांवाचा दैत्य होता. त्याला पुलोमजानांवाची एक मुलगी झाली. त्या मुलीनें शंकराची अनन्यभावनेनें पूजा केली; व जागरणादिहि केलें. तिच्या त्या पूजादि विधीनें; व भक्तीनें शंकर प्रसन्न होऊन वर मागण्याविषयीं तिला सांगूं लागले. नंतर पुलोमजेनें शंकराची पुष्कळप्रकारें स्तुति करून वर मागितला कीं, माझ्या इच्छेप्रमाणें सुखानें आयुष्य, पति वगैरे यथेच्छ मिळावें; व कोणतेंहि न्यून पडूं नये, एवढाच मला वर द्या. अशातऱ्हेनें पुलमजेचें भाषण ऐकून शंकर म्हणतात कीं; मी तुला एक व्रत सांगतो, तें आचरण कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. तूं चैत्र शुक्ल तृतीयेच्या दिवशीं पहांटेस स्नान करून पार्वतीची व गणपतीची पूजा कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होऊन आयुर्वृद्धि व सौभाग्यवृद्धिहि होईल, असें म्हणून शंकर गुप्त झाले. नंतर तिनें शंकराच्या सांगण्याप्रमाणें तें व्रत आचरिलें; व त्या व्रताच्याच प्रभावानें तिला इंद्राणी, शची अशीं नांवें प्राप्त होऊन; व ती स्वर्गाचा अधिपति जो इंद्र त्याची अर्धांगी होऊन; व सर्वसुखांचा अनुभव घेऊन आनंदांत राहती झाली. जिला सुखाची, आयुष्याची; व सौभाग्याची इच्छा असेल तिनें हें व्रत आचरावें; व तेथेंच स्थापिलेल्या इंद्राणीश्वराचें पूजन करावें; म्हणजे सर्व सुखें प्राप्त होतात. हें पुलोमजाख्यान श्रवण करणारे इंद्रलोकाला प्राप्त होऊन शिवलोकीं जातात.

# अध्याय ८१ वा.

## धर्मतीर्थमाहात्म्य.

अगस्त्यानें धर्मतीर्थमाहात्म्य श्रवण करणाची इच्छा प्रदर्शित केल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! इंद्रानें वृत्रासुराला मारल्यामुळें त्यास ब्रह्महत्त्या लागली. शेवटीं इंद्र खिन्न होऊन बृहस्पतीला शरण गेला; व त्यास ब्रह्महत्त्येच्या नाशाचा उपाय विचारूं लागला. तेव्हां बृहस्पति इंद्राला म्हणतात कीं, पूर्वी भैरवानें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडल्यामुळें त्यास ब्रह्महत्त्या लागली असतां तो धर्मतीर्थांत स्नान करून ब्रह्महत्त्येच्या दोषापासून मुक्त झाला; तेव्हां

त्या ठिकाणीं जाऊन तप कर; म्हणजे दोषमुक्त होशील. असें बृहस्पतीचे भाषण ऐकून इंद्र धर्मतीर्थामध्यें जाऊन तप करिता झाला; व त्यायोगें शंकरानें प्रसन्न होऊन इंद्राला दोषमुक्त केलें. जे कोणी धर्मतीर्थांत स्नान करून त्या तीर्थाचे कांठीं पितृश्राद्धादि करितात; व धर्मेशाचें पूजन करितात, ते पितरांसह अंतकाळीं शिवलोकाला जातात. इंद्रानें व इंद्राणीनेंहि त्या ठिकाणीं स्वतःच्या नांवानें शिवलिंग स्थापिलें, त्या इंद्रेश्वर व इंद्राणीश्वराचें जे कोणी पूजन करितात ते ऐहिक सुखाचा अनुभव घेऊन अंतीं मोक्षालाहि जातात. दुर्दम नांवाच्या राजालाहि ह्या धर्मतीर्थाच्या स्नानानें पश्चात्ताप होऊन तो दुर्वर्तनापासून परावृत्त झाला; व शेवटीं मुक्त झाला.

---

# अध्याय ८२ वा.

## अमित्रजित्प्रभाव.

पार्वतीनें वीरेश्वराची उत्पत्ति विचारल्यावरून शंकर सांगतात; पार्वती, एक अमित्रजित् नांवाचा राजा होता. त्याच्या राज्यांत प्रत्येक ठिकाणीं मोठमोठीं अनेक शिवमंदिरें होतीं. आणि राज्यांतील प्रत्येक मनुष्य शिवनामाचा गजर करून, लहान मुलांसुद्धां उपोषणादि करीत असे. त्याच्या राज्यांत स्त्रीशूद्रादि; व दुष्ट लोकसुद्धां शिवधर्मानें वागत असत. अशा प्रकारें सर्वत्र सदाचाराचा प्रसार पाहून नारदऋषीला मोठा आनंद झाला व तो राजाजवळ येऊन म्हणाला कीं, राजन्! चंपकावती नगरांत मलयगंधिनी नांवाची एक गंधर्वाची कन्या आहे. तिला कंकालकेतु नांवाचा एक राक्षस पळवून नेत आहे. त्या कन्येचा असा निश्चय झाला आहे कीं, जो मला ह्या राक्षसापासून सोडवील, त्याला मी वरीन. म्हणून माझी आपणाला एवढीच आज्ञा आहे कीं, ती कन्या सुस्वरूप आहे; व आपणाला योग्य आहे; करितां आपण तिला राक्षपासून मुक्त करून आश्रय द्यावा. नंतर अमित्रजित् राजा नारदाच्या सांगण्याप्रमाणें सैन्यासह कंकालकेतु राक्षसाजवळ येऊन तुमुल युद्ध करूं लागला. त्या युद्धांत कंकालकेतूचा नाश होऊन तो मलयगंधिनीसह आपल्या राजधानींत परत येता झाला.

---

## अध्याय ८३ वा.

### वीरेश्वरप्रादुर्भाव.

अमित्रजितानें राक्षसाचा नाश करून, मलयगंधिनीला सोडवून आणिल्यावर तिनें पुत्रप्राप्तीकरितां अभीष्टतृतीया नांवाचें एक व्रत आरंभिलें. त्या व्रताच्या प्रभावानें तिला वीर नांवाचा एक पराक्रमी पुत्र झाला. तो वीरेश्वर मोठा होतांच त्यानें काशीक्षेत्रांत प्रयाण करून एक शिवलिंग स्थापिलें; व घोर तपश्चर्या केली. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन; व वीराला इच्छित वर देऊन त्यानें स्थापिलेल्या लिंगाला वीरेश्वर हें नांव दिलें. ह्या लिंगाचें पूजन करणारांना सर्व सिद्धि प्राप्त होतात. त्याचप्रमाणें कोकावाराहतीर्थांत स्नान करून, कोकावाराहाचें पूजन करणारांना पुनः जन्मप्राप्ति होत नाहीं. तसेंच सप्तसागरतीर्थ, महोदधितीर्थ, चौरतीर्थ, दिलीपतीर्थ, सगरतीर्थ, हंसतीर्थ, त्रिभुवनकेशवतीर्थ, गोव्याघ्रेश्वरतीर्थ, वीरतीर्थ, मुचुकुंदतीर्थ, पृथुतीर्थ, परशुरामतीर्थ, कृष्णाग्रजतीर्थ, दिवोदासतीर्थ, महातीर्थ, भागीरथीतीर्थ, दशाश्वमेधतीर्थ, बंदीतीर्थ, प्रयागमाधवतीर्थ, क्षोणीवराहतीर्थ, कालेश्वरतीर्थ, अशोकतीर्थ, शुक्रतीर्थ, प्रभासतीर्थ, गरुडतीर्थ, ब्रह्मतीर्थ, वृद्धार्कतीर्थ, नृसिंहतीर्थ, धर्मतीर्थ, विशालतीर्थ, जरासंधेशतीर्थ, ललितातीर्थ, गौमतीर्थ, गंगाकेशवतीर्थ, अगस्त्यतीर्थ, योगिनीतीर्थ, नर्मदातीर्थ, अरुंधतीतीर्थ, वसिष्ठतीर्थ, मार्कण्डेयतीर्थ हीं सर्व तीर्थें, स्नानदानादि करणारास उत्तरोत्तर अधिक फल देणारीं आहेत. ह्यांचें माहात्म्य मोक्षप्राप्ति करून देणारें आहे.

---

## अध्याय ८४ वा.

### काशीतीर्थनाममाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात, मुने! आतां काशीमध्यें कोणकोणतीं तीर्थें विशेष फल देणारीं आहेत, व कोणत्या तीर्थाचें नाममाहात्म्य महत्त्वाचें आहे, तें सांगतों, ऐका. प्रथम विष्णूनें स्थापिलेलें विष्णुपादोदकतीर्थ फार महत्त्वाचें आहे. तसेंच क्षीराब्धितीर्थ, चक्रतीर्थ, गदातीर्थ, पद्मतीर्थ, महालक्ष्मीतीर्थ, मरुत्मत्तीर्थ, नारदतीर्थ, प्रल्हादतीर्थ, अंबरीषतीर्थ, आदित्यकेशवतीर्थ, दत्तात्रेयतीर्थ, भार्गवतीर्थ, वामनतीर्थ, नरनारायणतीर्थ, यज्ञवाराहतीर्थ, विदारनारसिंहतीर्थ, गोपीगोविंदतीर्थ, लक्ष्मीनृसिंहतीर्थ, शंखमाधवतीर्थ, नीलग्रीव-

तीर्थ, उद्दालकतीर्थ, सांख्यतीर्थ, महिषासुरतीर्थ, बाणतीर्थ, गोप्रतारेश्वरतीर्थ, हिरण्यगर्भतीर्थ, प्रणवतीर्थ, पिशंगिलातीर्थ, पिलपिलातीर्थ, नागेश्वरतीर्थ, भैरवतीर्थ, खर्वनृसिंहतीर्थ, मृकंडतीर्थ, पंचनदतीर्थ, ज्ञानहृदतीर्थ, मंगलतीर्थ, रवितीर्थ, मखतीर्थ, बिंदुतीर्थ, पिप्पलादतीर्थ, ताम्रवराहतीर्थ, इंद्रद्युम्नतीर्थ, रामतीर्थ, इक्ष्वाकुतीर्थ, मरुत्तीर्थ, मैत्रावरुणतीर्थ, अग्नितीर्थ, अंगारकतीर्थ, वैकलितीर्थ, चंद्रतीर्थ, वीरतीर्थ, विघ्नेशतीर्थ, हरिश्चंद्रतीर्थ, पर्वततीर्थ, कंबलाश्वतरतीर्थ, सारस्वततीर्थ, उमातीर्थ, मणिकर्णिकातीर्थ, चक्रपुष्करिणीतीर्थ, तारकतीर्थ, स्कंदतीर्थ, ढुंढितीर्थ, ज्ञानतीर्थ, नंदितीर्थ, विष्णुतीर्थ, पितामहतीर्थ, नाभितीर्थ, भागिरथीतीर्थ, असिसंभेदतीर्थ, दशाश्वमेधतीर्थ ह्या सर्व तीर्थांत स्नानादि करणारा; व ह्या सर्व तीर्थांचीं सतत नांवें वर्णन करणारा मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. हें काशीतीर्थनाममाहात्म्य श्रवण, व पठण करणारे इहलोकीं सुख भोगून अंतीं मोक्षाला जातात.

---

## अध्याय ८६ वा.

### दुर्वासवरप्रदान.

कार्तिकस्वामी म्हणतात,-मुने ! एकदां दुर्वासऋषि अनेक तीर्थें, वनें, उपवनें; व गिरिकंदरें ओलांडून आणि सर्वत्र हिंडून शेवटीं काशीक्षेत्राला प्राप्त झाला. काशीक्षेत्राची रचना, तेथील तीर्थें; व शिवलिंगें पाहून दुर्वासाला समाधान झालें. तो दुर्वास काशीक्षेत्रांत कित्येक दिवस राहून व नित्य गंगादितीर्थांत स्नान करून, तेथील शिवलिंगाचें पूजन करीत असे. तेथें राहणाऱ्या ब्राह्मणादिकांच्या संतुष्ट वृत्ति पाहून आणि तेथील प्रत्येक प्राणिमात्राची समबुद्धि पाहून दुर्वासाला आश्चर्य वाटलें; व तो आनंदानें तेथें बरेच दिवस राहूं लागला. पुढें दुर्वासानें तेथें राहून शंकराची आराधना केली. पुष्कळ आराधना करूनहि शंकर प्रसन्न होत नाहीं, हें पाहून दुर्वासाला राग आला; व तो शंकराला शाप देण्यास उद्युक्त झाला. तो शाप देणार, इतक्यांत शंकर तेथें प्रगट होऊन व दुर्वासाला हांसून म्हणाले,-मुने ! तूं व मी एकच असतां तूं मला शाप देण्यास तयार झालास, ह्याचें मला कौतुक वाटतें. आतां तुला काय इच्छा असेल तो वर माग. नंतर दुर्वास म्हणाले,-शंकरा ! माझी तुझे ठिकाणीं अत्यंत भक्ति व्हावी; व हें लिंग माझे नांवानें प्रसिद्ध व्हावें. असा वर मागतांच शंकर त्यास वर देऊन गुप्त झाले.

---

# अध्याय ८६ वा.

## विश्वकर्मेशोत्पत्ति.

पार्वतीनें शंकराला विश्वकर्मेशाची उत्पत्ति विचारल्यावरून शंकर म्हणतात,— हे पार्वती, पूर्वी ब्रह्मदेवाचा पुत्र जो त्वष्टा त्यापासून विश्वकर्म्याची उत्पत्ति झाली. तो विश्वकर्मा मौंजीबंधन होतांच गुरूजवळ राहून; व भिक्षान्नावर निर्वाह करून विद्याध्ययन करिता झाला. एकदां पावसाळ्याचे दिवस सन्निध आले असतां गुरूनें विश्वकर्म्याला बोलावून एक आश्रम तयार करण्यास सांगितला. तो असा कीं, ज्याचा कधींहि नाश होऊं नये. गुरुपुत्रानें विश्वकर्म्याला आज्ञा केली कीं, मला अशा पादुका घेऊन ये कीं, ज्याच्यायोगें मला मार्गांत कोणतीहि पीडा होऊं नये. गुरुकन्येनें विश्वकर्म्यास सोन्याचीं कुंडलें व योग्य अशीं खेळणीं घेऊन या; असें सांगितलें. तसेंच घरांतील स्वयंपाकाचीं अशीं भांडीं आणा कीं, जीं घांसलीं नसतांहि नित्य स्वच्छ रहावींत; व हाताला उष्णतेची बाधा न होतां आपोआप स्वयंपाक व्हावा. त्याप्रमाणें विश्वकर्म्याचे जे सहाध्यायी होते, त्यांनींहि आपआपल्या इच्छेप्रमाणें उपयोगाच्या वस्तु विश्वकर्म्याजवळ मागितल्या. नंतर विश्वकर्मा गुरूच्या आज्ञेनें जो निघाला, तो थेट एका अरण्यांत गेला; व इतकीं साहित्यें मी कोठून संपादित करूं ! अशी काळजी करीत तो तेथें बसला. कांहीं काळानें त्या ठिकाणीं एक संन्यासी प्राप्त झाला. नंतर विश्वकर्म्यानें त्याची प्रार्थना करून स्वतःची इच्छा त्यास दर्शविली असतां तो संन्यासी म्हणाला कीं, तूं काशीक्षेत्रांत जाऊन विश्वेश्वराची आराधना कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा तृप्त होतील. ह्याप्रमाणें संन्याशाचें भाषण ऐकून विश्वकर्मा संन्याशासह काशीक्षेत्रांत येऊन विश्वेश्वरासंनिध एक शिवलिंग स्थापिता झाला. त्यानें त्या लिंगाची आराधना करून तपश्चर्या केली असतां तत्काल त्या ठिकाणीं शंकर प्रसन्न झाले. नंतर विश्वकर्म्यानें शंकराची स्तुति करून; व त्याच्या कृपेनें सर्व वस्तु मिळवून तो गुरूला व इतर मंडळींना संतुष्ट ठेविता झाला. विश्वकर्म्यानें जें लिंग स्थापिलें त्यासच विश्वकर्मेश म्हणतात. त्या विश्वकर्मेशाच्या पूजनानें सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात.

# अध्याय ८७ वा.

## दक्षयज्ञ.

अगस्त्यानें दक्षेश्वरादि लिंगांचें माहात्म्य विचारल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! एकदां दक्षप्रजापति पुरश्चरण करण्याच्या इच्छेनें काशी-क्षेत्राला प्राप्त झाला असतां तेथील लोकांनीं दक्षाची निंदा करून त्याचा धिक्कार केला. तो अपमान सहन न होऊन तो कैलासाला जाण्यास निघाला. दक्ष आलेला पाहून शंकरानेंही त्याचा उत्थानादिकानेंसुद्धां सत्कार केला नाहीं. हा प्रकार पाहून, व शंकरानेंहि आपला अपमान केला हें पाहून दक्षाला अति-शयच क्रोध आला; व त्यानें शंकराची पुष्कळ निंदा केली; आणि मनांत म्हटलें कीं, मी ह्याचा एकदां तरी सूड उगवून गर्वपरिहार करीन. असें म्हणून तो स्वस्थानीं निघून गेला. नंतर दक्षानें यज्ञाला प्रारंभ केला. त्या यज्ञामध्यें शंकरावांचून सर्व देवता प्राप्त झाल्या होत्या. विष्णुप्रमुख देवांनीं दक्षाला पुष्कळ प्रकारें समजावून सांगितलें कीं, जर तुझा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडावा, अशी इच्छा असेल, तर अवश्य मोठ्या आदरानें तूं शंकराला ह्या यज्ञांत आमंत्रण करावेंस, हें चांगलें; परंतु तें देवांचें भाषण दक्षास न आवडून त्यानें शंकराला मुद्दाम आमंत्रण केलें नाहीं. ईश्वराला आमंत्रण न दिल्या-मुळें दधीचि मुनि तेथून रागानें निघून स्वाश्रमाला जाता झाला. दधीचि मुनि जातांच उत्तंक, उपमन्यु, ऋचीक, उद्दालक, मांडव्य, वामदेव, गालव, गर्ग, गौतम; व दुसरे जे शिवाभिमानी मुनि होते, तेहि सर्व त्या यज्ञमंडपांतून निघून आपआपल्या स्थानाला जाते झाले. दधीचिप्रमुख मुनि जाताच दक्षाला आनंद झाला; व त्यानें यज्ञाला मोठ्या उत्सुकतेनें प्रारंभ केला. मोठमोठे ऋषि यज्ञमंडपांतून गेल्यामुळें अग्नीला वाईट वाटलें; व तो निरुत्सुक-तेनें मंद मंद प्रज्वलित होऊं लागला. स्वाहाकारानें; व वषट्कारानें देवांचीं पोटें फुगून ते व्याकुळ होते झाले. दक्षपक्षाकडील मंडळींना हा समारंभ पाहून मोठा आनंद झाला. नंतर हें दक्षयज्ञाचें वर्तमान नारदास समजताच तो कैलास पर्वतावर जाऊन शंकराला हा प्रकार सांगता झाला.

## अध्याय ८८ वा.

### सतीदेहनाश.

कार्तिकस्वामी म्हणतात,–मुने! दक्ष यज्ञ करीत आहे, हें शंकराची पत्नी व दक्षाची कन्या जी सती तिच्या श्रवणीं पडतांच, तिला दक्षयज्ञ पाहण्याची उत्कंठा प्राप्त झाली व तिनें शंकराजवळ प्रार्थनापूर्वक परवानगी मागण्याचा विचार केला; आणि आपली इच्छा शंकराला कळविली. शंकरानें सतीला सांगितलें, तूं दक्षयज्ञ पाहण्यास जाऊं नको; कारण तुझा तेथें अपमान होईल; व तो अपमान तुला सहन झाला नाहीं; म्हणजे तूं विनाकारण रागानें आपला देह व्यर्थ फुकट घालविशील; तेव्हां तूं तेथें न जाणें माझ्या मतानें योग्य आहे. अशा तऱ्हेनें शंकरानें सतीला जाण्याविषयीं निषेध केला असतांही तिनें तें शिववाक्य न जुमानून क्रोधानें रथांत बसून दक्षाकडे प्रयाण केलें. देवी सती एकटीच निघालेली पाहून शिवगणहि आपआपल्या विमानांत बसून सतीबरोबर चालले. सती दक्षयज्ञाच्या मंडपांत शिरली असतां कोणीहि उत्थापनादि करीनात; व कोणी या, बसा वगैरेहि म्हणेनात. हा प्रकार पाहून सतीला मोठें आश्चर्य वाटलें; व ती दक्षाला म्हणाली,–बाबा! आपण एवढा समारंभ मांडिला असतां, मला आमंत्रणहि दिलें नाहीं; व मी येथें आलें असतां माझा सत्कारहि कोणीं केला नाहीं; हा प्रकार काय आहे? एवढें आपण कृपा करून सांगा. नंतर दक्ष म्हणाला;–मुली! ह्यांत तुझ्याकडे मुळींच दोष नाहीं, तर तुला मीं शंकराला दिलें हीच माझी मोठी चूक झाली आहे. शंकराच्या सांनिध्यानें तुझ्या ठिकाणीं वृथा दोषारोप आहे, असें सांगून दक्षानें सतीच्या समक्ष शंकराची पुष्कळ निंदा केली. ही निंदा श्रवण करितांच सतीला फारच दुःख झालें; व तिनें दक्षाची निर्भर्त्सना करून क्रोधानें जठराग्नि प्रदीप्त केला; व त्या अग्नीमध्यें आपल्या देहाचें विसर्जन केलें. त्यावेळीं त्या यज्ञमंडपांत अनेक अपशकुन होऊं लागले.

---

## अध्याय ८९ वा.

### दक्षेश्वरोत्पत्ति.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! सतीच्या नाशानंतर नारदमुखानें हें वर्तमान शंकराला समजतांच त्याला अत्यंत क्रोध आला; व त्या क्रोधापासून

एक वीरभद्र नांवाचा पुरुष निर्माण झाला. वीरभद्रानें शंकराला काय आज्ञा आहे? असें विचारितांच शंकर म्हणाले; वीरभद्रा। तूं आमच्या शिवगणासह दक्षाकडे जाऊन दक्षयज्ञाचा ध्वंस कर, अशी माझी तुला आज्ञा आहे. नंतर वीरभद्र बरें आहे, म्हणून शिवगणासह शंकराला प्रदक्षिणा घालून; व शिवाची आज्ञा घेऊन निघाला, तो थेट दक्षयज्ञाच्या मंडपाकडे आला. कोणी वृक्ष उपटून यज्ञमंडपांत टाकूं लागले. कोणीं अन्नराशींचा नाश केला, कोणीं यज्ञपात्रांचा नाश केला. कोणीं अग्नि विझवून टाकिला. कोणीं भगदेवाचे डोळे फोडले. कोणीं पूषाचे दांत पाडिले, कित्येकांनीं गाडे मोडिले, कित्येकांनीं पशुनाश केला, अशातऱ्हेनें सर्व दक्षयज्ञाचा वीरभद्रानें नाश केला. हा प्रकार पाहून तेथील ऋषि, देव वगैरे पशुपक्ष्यांचीं रूपें घेऊन पळन गेले. इंद्र हा मोराचें रूप घेऊन; व एका उंच पर्वतावर बसून तेथून दक्षयज्ञाच्या नाशाचा सर्व प्रकार पाहत होता. वीरभद्र दक्षाचा शोध करीत यज्ञमंडपांत फिरत असतां विष्णूनें दक्षाला पाठीशीं लपवून टेविलें आहे, असें वीरभद्राच्या लक्षांत आलें; तेव्हां तो विष्णुला म्हणाला कीं, सुदर्शनाच्या जोरावर ह्याचें रक्षण करीत असलास, तरी त्या सुदर्शनचक्राचा माझ्या पुढें कांहीं उपयोग होणार नाहीं; कारण तें चक्र शंकरानेंच तुला दिलें आहे. करितां तूं दक्षाला माझे स्वाधीन कर. तथापि विष्णूनें दक्षाला स्वाधीन न केल्यामुळें, वीरभद्राचें व विष्णूचें मोठें युद्ध झालें; व त्यांत विष्णूचा पराभव झाला. नंतर वीरभद्रानें दक्षाला आपले स्वाधीन करून घेऊन दक्षाचें मस्तक तोडिलें; व अग्निकुंडांत दग्ध केलें. नंतर देवांच्या प्रार्थनेवरून दक्षाला शंकरानें बोकडाचें शिर लावून सजीव केलें. तत्काल दक्ष सर्वांची आज्ञा घेऊन, पश्चात्तापानें काशीक्षेत्रांत जाऊन व दक्षेश्वर नांवाच्या लिंगाचें पूजन करून कृतार्थ झाला.

---

## अध्याय ९० वा.

### पार्वतीशमाहात्म्य.

एकदां हिमाचलाची पत्नी जी मेनका ती आपल्या कन्येला म्हणजे पार्वतीला म्हणाली कीं, तुझा पति जो शंकर त्याचें निवासस्थान कोणतें ? त्याचें स्वरूप कशातऱ्हेचें आहे; वगैरे सांग. असा मेनकेचा प्रश्न ऐकून पार्वती म्हणाली, कीं, माते ! मीं पूर्वी असाच शंकराला प्रश्न केला असतां शंकर मला म्हणाले, हे पार्वती ! मी सर्वांच्या हृदयामध्यें वास्तव्य करतों. सर्व जगत् हें माझें स्वरूप आहे, मी अनादि, निर्गुण, व सर्वाहंकारादिरहित आहें. माझ्या स्वरू-

पाचें जर तुला ज्ञान हवें असेल, तर तूं काशीक्षेत्रांत जाऊन एक शिवलिंग स्थापित कर; व तपश्चर्येनें माझी आराधना कर; म्हणजे माझें खरें स्वरूप तुला समजेल. नंतर मीं शंकराच्या आज्ञेप्रमाणें काशीक्षेत्रामध्यें जाऊन तेथें एक शिवलिंग स्थापिलें. त्या लिंगाच्या आराधनेनें मला शिवस्वरूपाचें ज्ञान झालें. शंकर प्रसन्न होऊन, व मीं स्थापिलेल्या लिंगाला पार्वतीश हें नांव देऊन त्याची योग्यता काशीविश्वेश्वराच्या लिंगाबरोबर नियुक्त केली. हें ऐकून तांच मेनकेला फार आनंद झाला; व ती पार्वतीबरोबर काशीक्षेत्रात येऊन पार्वतीशाच्या पूजनानें कृतार्थ झाली. जे कोणी ह्या काशी क्षेत्रांत पार्वतीनें स्थापिलेल्या पार्वतीशाचें पूजन करितात, ते पुनर्जन्मापासून मुक्त होऊन; व सर्व प्रकारचीं सुखें भोगून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ९१ वा.

### गंगेश्वरमाहात्म्य.

ज्यावेळीं चक्रपुष्करिणी तीर्थाजवळ गंगा प्राप्त झाली; त्यावेळीं काशीक्षेत्राचा प्रभाव जाणून गंगेला येथें एक शिवलिंग स्थापण्याची बुद्धि झाली. तत्काळ गंगेनें काशीविश्वेश्वराच्या पूर्वेस एक शिवलिंग स्थापून, त्याचें नांव गंगेश असें ठेविलें. काशीक्षेत्रांत येऊन ज्यानें गंगेशाचें दर्शन घेतलें नाहीं, त्याची काशीयात्रा निष्फळ होय. जे कोणी दशहरामध्यें गंगेशाचें पूजन करितात, त्याच्या हजार जन्मांचें पातक नष्ट होतें. कलियुगांत गंगेश्वरलिंग कोणालाहि दिसणार नाहीं. एकादा पुण्यपुरुष कोणी असेल, तरच त्यास गंगेश्वराचें दर्शन घडेल, इतरांस होणार नाहीं. ज्यानें गंगेश्वराचें दर्शन घेतलें, त्याला साक्षात् गंगादर्शनाचें फळ प्राप्त होईल. हें गंगेश्वराचें माहात्म्य श्रवण करणारा मुक्त होतो.

---

## अध्याय ९२ वा.

### नर्मदेश्वरमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात,–मुने! आतां तुम्हाला नर्मदेश्वराचें माहात्म्य सांगतों. ह्या त्रैलोक्यांत गंगा, यमुना, नर्मदा, व सरस्वती ह्या चारच नद्या श्रेष्ठ आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व अथर्ववेद, हीं चार नद्यांचीं अनुक्रमें स्वरूपें होत. नर्मदेनें काशीक्षेत्राचें माहात्म्य ब्रह्मदेवाच्या मुखानें

श्रवण करून, त्रिविष्टपेश्वरासन्निध पिलिपिलातीर्थाचे कांठीं एक शिवलिंग स्थापिलें. नर्मदेनें त्या लिंगाचें पूजन करून शिवाराधना करितांच, शंकर प्रसन्न होऊन नर्मदेला वर देते झाले कीं, तूं स्थापिलेलें लिंग नर्मदेश्वर ह्या नांवानें प्रसिद्ध होईल; व तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. पुनः शंकर नर्मदेला म्हणतात कीं, गंगा ही तत्काल पाप हरणारी जशी आहे, तशीच तूंहि सर्व पापें हरण करणारी होशील. जे कोणी नर्मदेशाचें पूजन करितील, ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला जातील. असें सांगून शंकर गुप्त झाले. हें नर्मदेशमाहात्म्य जे श्रवण किंवा पठण करितील त्यांना नर्मदादर्शनाचें पुण्य प्राप्त होईल.

## अध्याय ९३ वा.

### सतीश्वरोत्पत्ति.

अगस्त्यानें सतीश्वरमाहात्म्य विचारिल्यावरून कार्तिकस्वामी म्हणतात, मुने, पूर्वी एकदां ब्रह्मदेवानें शंकराची आराधना करून शंकराला प्रसन्न करून घेतलें; व वर मागितला कीं, तूं माझा पुत्र व्हावास; व तुझी पत्नी दक्षाची कन्या व्हावी. नंतर शंकर प्रसन्न होऊन पुत्ररूपानें ब्रह्मदेवाच्या मस्तकापासून उत्पन्न झाले. शंकर उत्पन्न होतांच बाललीलेला अनुसरून क्रीडा करूं लागले म्हणून त्याचें नांव रुद्र असें ठेविलें. नंतर शिवपत्नी दक्षापासून उत्पन्न झाली. दक्षानें आपल्या कन्येचें नांव सती असें ठेविलें. सतीनें आपणाला शंकर पती व्हावा, ह्याकरितां काशी क्षेत्रांत जाऊन; व सतीश्वर नांवानें एक शिवलिंग स्थापून त्याची आराधना केली. त्यायोगें शंकर प्रसन्न झाले व सतीच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं तिचें पाणिग्रहण केलें. शंकर म्हणाले; देवि, तूं स्थापिलेल्या ह्या सतीश्वर लिंगाचें ज्या कुमारिका पूजन करितील, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन त्यांना माझ्यासारखे पराक्रमी पति मिळतील. हें जें काशीक्षेत्रांत स्थापिलेलें लिंग आहे, त्याच्या पूजनानें सत्त्वगुणाची प्राप्ति होऊन शिवलोकाचें सान्निध्य प्राप्त होतें. आख्यानाच्या श्रवणानेंहि मोक्ष मिळतो.

## अध्याय ९४ वा.

### अमृतेश्वरादिमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! एक सनारु नांवाचा मुनि होता. तो नित्य स्वकर्म करून अतिथिसत्कारहि करीत असे. त्याला उपजंघनि नांवाचा

एक पुत्र झाला. तो उपजंघानि अरण्यांत गेला असतां त्याला सर्पदंश झाला. त्याच्या मित्रांनीं उपजंघनीला उचलून आपल्या आश्रमाला आणिलें; व झालेलें सर्व वर्तमान सनारूला निवेदन केलें. नंतर तो सनारु उपजंघानि नामक पुत्राला घेऊन स्वर्गद्वारानजीक असणाऱ्या लिंगाचें पूजन करितांच तो पुत्र सर्पदंशाच्या बाधेपासून निवृत्त झाला. तत्काल शंकर प्रसन्न होऊन त्या लिंगाला अमृतेश्वर हें नांव स्थापित करिते झाले. अमृतेश्वराच्या पूजनानें मृत प्राणीसुद्धां जिवंत होतात. त्या अमृतेश्वरासन्निध करुणेश्वर नांवाचें लिंग आहे. जे कोणी सोमवारीं करुणेश्वराचें पूजन करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. मोक्षद्वारेश्वर; व स्वर्गद्वारेश्वर ह्यांचें पूजन केलें असतां स्वर्ग व मोक्ष प्राप्त होतो. त्याचप्रमाणें ज्योतिरूपेश्वर हेंहि पूजकास सुखप्राप्ति करून देणारें आहे. जे प्राणी जन्माला येऊन काशीक्षेत्राची यात्रा करीत नाहींत, ते खरोखर मंदभाग्यच होत. ज्या काशीक्षेत्रांत मुक्ति देणारें विश्वेशाचें स्थान आहे, व ज्या क्षेत्रांत उत्तरवाहिनी गंगा आहे, त्या काशीक्षेत्राचें माहात्म्य किती वर्णावें, हें माहात्म्य श्रवण करणारांना काशीवासाचें फल मिळतें.

---

## अध्याय ९५ वा.

### व्यासेश्वरमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! व्यासांनीं लोककल्याणार्थ शाखाभेदानें चारहि वेदांचा विभाग करून पैलादि मुनींना शिकविलें; व त्या चारहि वेदांचा अर्थ अज्ञानी जनांस समजावा म्हणून त्यांचें पुराणरूपानें विवरण केलें. तीं अठरा महापुराणें निर्माण करून सूतादि ऋषींना सांगितलीं; व व्यासांनीं सर्वार्थसारभूत असा महाभारत नांवाचा एक ऐतिहासिक ग्रंथ निर्माण केला. नंतर एके दिवशीं व्यास तीर्थयात्रा करीत करीत नैमिषारण्यांत आले असतां तेथें पुराणश्रवण करणाऱ्या ऐशीं हजार शौनकादि ऋषींना पाहून मोठ्या आनंदानें म्हणतात; ऋषिहो! तुमचें हें कर्म पाहून आम्हाला अत्यानंद झाला आहे. काशीसारखें क्षेत्र नाहीं; व शंकरासारखें दैवत नाहीं. विष्णु व शंकर एकच आहेत. अशा तऱ्हेचें व्यासभाषण ऐकून ऋषींनीं व्यासाची पुष्कळ प्रकारें स्तुति केली. नंतर व्यास तेथून जे निघाले, ते थेट काशीक्षेत्रांत येऊन, व शिवलिंग स्थापून त्याची पूजा करिते झाले. त्या पूजनानें शंकर प्रसन्न होतांच शंकराची व्यासानें पुष्कळ प्रकारें स्तुति केली. व्यासाला शंकरानें इच्छित

वर देऊन सांगितलें कीं, जे कोणी व्यासेश्वराचें पूजन करितील, त्यांना ज्ञानप्राप्ति होऊन ते माझ्या लोकाला प्राप्त होतील; असें सांगून शंकर गुप्त झाले. हें व्यासेश्वरमाहात्म्य श्रवण केल्यास सर्व अज्ञानाची निवृत्ति होते.

## अध्याय ९६ वा.

### व्यास शापविमोक्षण.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने! व्यास काशी क्षेत्रांत राहून स्वकर्मानुष्ठान व लोकांना हितोपदेश करीत काळ घालवीत असतां, शंकरानें पार्वतीला एके दिवशीं सांगितलें कीं, आज आपल्या घरीं व्यास भिक्षा मागण्याकरितां येतील त्यांना तूं भिक्षा घालूं नको. अशी शंकराची आज्ञा होतांच नित्य नियमाप्रमाणें व्यास भिक्षा मागण्याकरितां आले असतां पार्वतीनें त्यांस भिक्षा घातली नाहीं. नंतर व्यास दीन होऊन आणखी चार घरीं भिक्षा मागून ते स्वाश्रमाला निघून गेले. ह्याप्रमाणें व्यासांना दोन तीन दिवस भिक्षा मिळाली नाहीं. शेवटीं व्यास क्षुभित होऊन काशी क्षेत्राला शाप देणार, इतक्यांत पार्वती त्या ठिकाणीं येऊन व्यासांना म्हणाली; मुने! आपली इच्छा काय आहे? व आपण इतके रागावलां कां? तें सांगा. नंतर व्यास म्हणतात; आज तीन दिवस मला ह्या क्षेत्रांत बरोबर रीतीनें भिक्षा मिळत नाहीं. माझी एक लक्ष शिष्य मंडळी आहेत, त्यांचा निर्वाह व्हावा कसा? नंतर पार्वती म्हणाली कीं, तुझ्या शिष्यांना येथें पाठवून दे, मी त्यांना भोजनादि देऊन त्यांची व्यवस्था करतें. नंतर व्यासानें सर्व शिष्यांना तिजकडे पाठवून दिलें; व पार्वतीनें त्या सर्वांना भोजनादि अनेक उपचारानीं तृप्त केलें. त्यायोगें व्यासाला आनंद होऊन त्यानें पार्वतीची स्तुति केली. व्यास काशीक्षेत्राला शाप देण्यास तयार झाले होते, हें वर्तमान शंकरांस समजताच शंकरांनीं व्यासांना शिष्यांसह नगरांतून हांकलून दिलें.

## अध्याय ९७ वा.

### क्षेत्रतीर्थं.

कार्तिकस्वामी म्हणतात,–मुने! महादेवतीर्थाच्या पूर्वेस गोप्रेक्षालिंग आहे. त्याचे दक्षिण दिशेस दधीचीश्वर, अत्रीश्वर, वेदेश्वर, आदिकेशव वगैरे लिंगें

आहेत. तशींच पूर्वदिशेस प्रयागेश्वर. कुंतीश्वर, आनुसूयेश्वर, हिरण्येश्वर, मुंडासुरेश्वर, वृषभेश्वर, स्कंदेश्वर, नंदीश्वर, अट्टहासेश्वर वगैरे लिंगें आहेत. तशींच अन्य ठिकाणीं प्रह्लादेश्वर, वैरोचनेश्वर, बलीश्वर, बाणेश्वर, चंद्रेश्वर, विद्येश्वर, वालीश्वर, सुग्रीवेश्वर, हनुमदीश्वर, भद्रेश्वर, नारदेश्वर, अभारकेश्वर, ॐकारेश्वर, नादेश्वर, उद्दालकेश्वर, शंकुकर्णेश्वर, अघोरेश्वर, गर्गेश्वर, दमनेश्वर, नलकूबरेश्वर, सनत्कुमारेश्वर, गायत्रीश्वर, सत्यवतीश्वर, उग्रेश्वर, इंद्रेश्वर, आग्नेयेश्वर, दक्षेश्वर, अंतकेश्वर, हस्तिपालेश्वर, ऐरावतेश्वर, बंदीश्वर, धन्वंतरीश्वर, तुंगेश्वर, वैद्येश्वर, शिवेश्वर, जमदग्नीश्वर, शौनकेश्वर, आपस्तंबेश्वर, पशुपतीश्वर, सूर्येश्वर, रेवतेश्वर, संवर्तेश्वर, चित्रगुप्तेश्वर, कलशेश्वर, उतथ्य वामदेवेश्वर, अलर्केश, ध्रुवेश्वर, हरिकेशेश्वर, प्रियव्रतेश्वर, मुचुकुंदेश्वर, ब्रह्मेश्वर, पर्जन्येश्वर, महासिद्धीश्वर, ह्याप्रमाणें काशीक्षेत्रांत असंख्य शिवलिंगें मोक्ष देणारीं आहेत. ह्या क्षेत्रांत राहून तेथील शिवलिंगांचें दर्शन घेणारांचीं सर्व लहान मोठीं पातकें दग्ध होतात. ह्या क्षेत्रतीर्थांचें वर्णन श्रवण करणारासहि गंगास्नानाचें फल प्राप्त होतें.

---

## अध्याय ९८ वा.

### मुक्तिमंडपमाहात्म्य.

कार्तिकस्वामी म्हणतात; मुने ! शंकरानें कार्तिक शुक्ल प्रतिपदेला बुधवारीं काशी नगरींत प्रवेश केला, हें पूर्वी सांगितलेंच आहे. शंकाराच्या प्रवेशकाळीं जिकडे तिकडे आनंदी आनंद झालेला होता; मोठमोठीं वाद्यें वाजत होतीं. प्रथम शंकराचा प्रवेश मुक्तिमंडपांत झाला असतां तेथें ब्रह्मदेवानें शंकराला अभिषेक घातला. त्यावेळीं सर्व देवांनीं शंकराची स्तुति करण्यास सुरुवात केली. नंतर शंकर प्रसन्न होऊन विष्णुप्रमुख देवांस म्हणाले; देवहो ! एक महानंद नांवाचा ब्राह्मण होता. तो वर्तनानें सच्छील होता, परंतु शिवभक्तांचा अभिमानी; व विष्णुभक्तांचा द्वेष करणारा असा होता. त्या ब्राह्मणाला दोन मुलगे होते. एकदां एक चांडाल गंगेंत स्नान करून सर्व ब्राह्मणांस म्हणूं लागला कीं, मी चांडाल असून द्रव्यदान करणार आहें, ज्याची हें दान घेण्याची इच्छा असेल त्यानें पुढें येऊन तें घ्यावें. हें चांडालवाक्य ऐकतांच महानंद ब्राह्मणानें तें दान घेतलें. त्यामुळें लोकांनीं त्याचा द्वेष करून त्याला काशींतून हांकलून दिलें. पुढें त्याच्या दुर्दैवानें जें कांहीं द्रव्य त्याला मिळालें होतें, तेंहि नष्ट झालें. नंतर त्या महानंद

ब्राह्मणाला पश्चात्तापामुळें एका ऋषिसंघाची गांठ पडली; व त्यांनीं त्यास मुक्तिमंडपाचें माहात्म्य कथन केलें; व सांगितलें कीं, ह्या माहात्म्यश्रवणानें तूं निष्पाप झाला आहेस; आतां तूं काशीक्षेत्रांत राहून मुक्तिमंडपाचें सतत पूजन; व गंगास्नान कर; म्हणजे सर्व अवशिष्ट राहिलेल्या दोषांपासून मुक्त होऊन सद्गतीला जाशील.

## अध्याय ९९ वा.

### विश्वेश्वरमाहात्म्य.

मुक्तिमंडपांतून शंकर जे निघाले, ते थेट शृंगारमंडपाला प्राप्त झाले. नंतर ब्रह्मदेव; व विष्णु ह्या सर्वांच्या प्रार्थनेवरून शंकरानें तेथें आपलें एक शिवलिंग स्थापित केलें; व त्याला विश्वेश्वर हें नांव दिलें. ह्या लिंगाच्या पूजनानें चारहि पुरुषार्थ सिद्ध होतात. गंगेचें उदक वस्त्रानें गाळून त्या उदकानें विश्वेश्वराचें पूजन; व अभिषेकादि केल्यास लक्षसंख्याक अश्वमेधयज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. विश्वेश्वरापुढें कापूर लाविला असता सुखानें पुष्कळ काळपर्यंत काशी-क्षेत्रांत रहावयास मिळून, शिवलोकालाहि अनंतकाळपर्यंत रहावयास मिळतें. ज्यानें विश्वेश्वराचें दर्शन घेतलें नाहीं, त्यास यमदूतांचें दर्शन झाल्यावांचून राहणार नाहीं. विश्वेश्वराची बरोबरी करणारें लिंग त्रैलोक्यांत मिळावयाचें नाहीं. व्यास म्हणतात; सूता, ह्याप्रमाणें कार्तिकस्वामी अगस्त्याला काशी-क्षेत्राचें; व विश्वेश्वराचें माहात्म्य सांगून ते उभयतां शिवमाहात्म्यानें तल्लीन होत्साते वारंवार शंकर-पार्वतीला नमस्कार करून त्यांचे गुणानुवाद वर्णन करूं लागले. अगस्त्यमुनीला तर काशीक्षेत्रमाहात्म्य श्रवण करून जो आनंद झाला, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. कार्तिकस्वामीनें अगस्त्याला जें काशीक्षेत्रमाहात्म्य सांगितलें, तेंच मी तुम्हाला इत्थंभूत वर्णन करून सांगि-तलें आहे; त्याचे श्रवणानें सर्व पातकांचा नाश होतो.

## अध्याय १०० वा.

### काशीखंडानुक्रमणिका.

व्यास म्हणतात; सूता ! आतां कोणकोणत्या अध्यायांत कोणकोणत्या कथा वर्णन केल्या आहेत, त्याची अनुक्रमणिका थोडक्यांत सांगतों; श्रवण

करा. पहिल्या अध्यायांत विंध्य; व नारद ह्यांचा संवाद सांगून दुसऱ्या अध्यायांत देवांचें अगस्तिऋषीच्या घरीं आगमन झालेलें कथन केलें आहे. पुढें तिसऱ्या अध्यायापासून पतिव्रताधर्म व अगस्तींचें प्रस्थान वर्णन केलें आहे. नंतर तीर्थमाहात्म्यें सांगून संयमिनीनगरीचें वर्णन केलें आहे. पुढें सूर्यलोक, इंद्रलोक, अग्निलोक, वरुणलोक वगैरे अनेक लोकांचें वर्णन केलें असून पुढें ध्रुवाख्यान वर्णन करून गंगामाहात्म्य, गंगासहस्रनामहि वर्णित केलें आहे. पुढें दंडपाणी, ज्ञानवाणी वगैरे तीर्थांचीं माहात्म्यें सांगितल्यानंतर चार वर्ण, व आश्रम ह्यांचें वर्णन करून स्त्रीलक्षणेंहि सांगितलीं आहेत. नंतर सांबादित्य, दशाश्वमेधिक, पिशाचमोचन, ह्या तीर्थांचेंहि वर्णन केलें आहे. द्वादश आदित्य; व अनेक विनायक ह्यांचींहि माहात्म्यें क्रमाक्रमानें वर्णन केलीं आहेत. अशा तऱ्हेनें शंभर अध्यायांत असंख्य शिवचरित्रें वर्णन केलीं आहेत. क्रमाक्रमानें यथाविधीनें काशीयात्रा करणारे प्राणी शिवस्वरूप होऊन निष्पाप होत्साते शिवलोकीं जातात. ह्या काशीखंडाच्या पुस्तकाच्या दानानें अनंत फलें प्राप्त होऊन शिवसायुज्यता लाभते. शिवनामच सर्वांचें शिव म्हणजे कल्याण करणारें असल्यामुळें, तें आपल्या भक्तास नित्य आनंदानें वागवितें; व त्यास शेवटीं मुक्त करितें.

काशीखंड (उत्तरार्ध) समाप्त. ४.

# स्कंदपुराण.

## अवंतिखंड ५.

## अवंतिक्षेत्रमाहात्म्य १.

### अध्याय १ ला.

### महाकालवर्णन.

एकदां पार्वतीनें पृथ्वीमध्यें पुण्यकारक तीर्थें व नद्या किती आहेत ? असा शंकराला प्रश्न केला असतां शंकर सांगतात; हे पार्वती ! ह्या लोकामध्यें गंगा, सूर्याची मुलगी यमुना, चंद्रभागा, अमरकंटक प्रदेशांत वितस्ता ह्या नद्या; व कुरुक्षेत्र, गया, प्रभास, नैमिष, केदार, पुष्कर, कायावरोहण व महाकालवन हीं स्थानें पुण्यकारक होत; त्यांपैकीं महाकालवन हें स्थान सर्वांत श्रेष्ठ आहे. मेरुपर्वताजवळ एक रत्नादिकांनीं व वृक्षादिकांनीं सुशोभित असें ब्रह्मदेवाचें वैराज नांवाचें स्थान आहे, तेथें शंकराची आराधना करणाऱ्या बृहस्पति, सनत्कुमार, नारद इत्यादि ऋषींना अवलोकन करून व नमस्कार करून व्यास प्रश्न करतात; हे ऋषिहो ! आम्हाला महाकालवनाचें माहात्म्य सांगा. नंतर सनत्कुमार म्हणतात; जेथें गेलें असतां पातकांचा नाश होतो, त्याला क्षेत्र म्हणतात. महाकालवन, अविमुक्ति, एकाम्रक, भद्रकाल, करवीरवन, कोलागिरी, काशी, प्रयाग, अमरेश्वर, भरतकेदार हीं क्षेत्रें शंकराला फार प्रिय आहेत. ह्या सर्व क्षेत्रांमध्यें शंकर सतत राहतात; व क्रीडा करितात. सर्व तीर्थांमध्यें नैमिषतीर्थ व पुष्करतीर्थ श्रेष्ठ आहे. त्रैलोक्यामध्यें कुरुक्षेत्र श्रेष्ठ आहे. काशीक्षेत्राचें माहात्म्य कुरुक्षेत्राचे दसपट आहे. काशीक्षेत्राच्या दसपटीनें महाकालवनक्षेत्राचें माहात्म्य आहे. श्मशान, ऊषर, क्षेत्र, पीठ; व वन हीं पांच महाकालाशिवाय दुसऱ्या कोणत्याही क्षेत्रांत मिळावयाचीं नाहींत. करितां महाकालवन हें सर्वांहून श्रेष्ठ आहे.

# अध्याय २ रा.

## ब्रह्मदेवाचा शिरश्छेद.

पूर्वी एकदां ज्या वेळीं सर्व सृष्टि जलमय होऊन पंचमहाभूतें, नक्षत्रादि ज्योतिषचक्र, देवदैत्य व स्थावरजंगमात्मक प्राणी नष्ट झाले, तेव्हां एकटा महाकाल नांवाचा ईश्वर लोकांवर उपकार करण्याकरितां अवशिष्ट राहिला. नंतर मध्यंतरीं पुष्कळ काळ लोटल्यावर त्या महाकालानें पुनः सृष्टि उत्पन्न करण्याकरितां एक सोन्याचें अंडें निर्माण केलें. त्याचीं दोन शकलें झालीं. पैकीं अंडाचा पूर्वभाग पृथ्वी; व उत्तरभाग स्वर्ग असे उत्पन्न झाले. ह्या वरील दोन शकलांच्या मध्यभागीं पांच तोंडांचा व चतुर्भुज असा ब्रह्मदेव निर्माण झाला. तपःसामर्थ्यानें षडंगवेदाचें ज्ञान करून घेतल्यावर ब्रह्मदेवानें शंकराची स्तुति करण्यास सुरुवात केली. ब्रह्मदेवाच्या स्तुतीनें संतुष्ट झालेला शंकर आकाशवाणीनें ' वर माग ' असें त्यास म्हणता झाला. नंतर ' तूंच माझा मानसपुत्र हो ' असा वर ब्रह्मदेवानें मागितल्यामुळें, शंकरानें क्रोधानें त्यास म्हटलें कीं, ज्यापेक्षां तूं भलताच वर मागितलास, त्यापेक्षां मी रुद्ररूपानें अवतीर्ण होऊन तुझें पांचवें मस्तक कापून टाकीन. असा शाप व वर त्यानें दोनहि दिले. नंतर ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्यास आरंभ केला. कांहीं कालानें त्या ब्रह्मदेवाच्या पुढें पंचमुखांचा दहा हातांचा व त्रिनेत्र असा शिवरूपी एक बालक हातांत शस्त्र घेऊन उभा राहिला. त्यास पाहून ब्रह्मदेवाला मोठा आनंद झाला; व त्याचें नांव त्यानें नीललोहित ठेविलें. नंतर ब्रह्मदेवानें देव, ऋषी, स्थावर-जंगमात्मक सर्व प्राणी उत्पन्न केले. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र जो नीललोहित तो त्यास म्हणाला, ज्यापेक्षां सृष्टि निर्माण करण्याचे आरंभीं तूं माझें पूजन केलें नाहींस, त्यापेक्षां लवकरच तुझें पांचवें मस्तक तुटून पडेल; असें सांगून तो शंकराकडे निघून गेला. कांहीं काळानंतर देवांचें सर्व तेज ब्रह्मदेवाच्या पांचव्या मुखानें आकर्षून घेतल्यामुळें निस्तेज झालेले देव शंकराला शरण गेले; व त्यास सर्व हकीकत सांगून देवांनीं त्याची पुष्कळ स्तुति केल्यावर शंकर जेथें ब्रह्मदेव बसले होते तेथें आले. ब्रह्मदेवानें गर्विष्ठ होऊन शंकरास नमस्कारहि केला नाहीं. त्यामुळें त्यास राग आला; व त्यानें सहज ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडून टाकिलें; व नृत्य करण्यास आरंभ केला. देवांना मोठा आनंद होऊन त्यांनीं शंकराची स्तुति केली; व ज्यापेक्षां तूं ब्रह्मदेवाचें शिर तोडून तें कपाल हातांत धारण केलें आहेस, त्यापेक्षां आजपासून आम्ही व इतर सर्व लोक तुम्हास कपाली ह्या नांवानें हांक मारूं असें म्हटलें. देवांनीं केलेल्या स्तुतीनें प्रसन्न झालेले शंकर त्याच ठिकाणीं गुप्त झाले.

# अध्याय ३ रा.

## शंकराला मारण्याचा प्रयत्न.

शंकरानें आपलें पांचवें मस्तक तोडलें, हें पाहून ब्रह्मदेवाला राग आला, व त्यानें आपल्या चार मस्तकांना आलेला सर्व घाम काढून जोरानें खालीं जमिनीवर आदळिला; त्याबरोबर धनुष्यबाण हातांत घेतलेला एक शूर पुरुष निर्माण झाला; व ब्रह्मदेवानें त्यास शंकराकडे त्याचा नाश करण्याकरितां पाठविलें. शंकर त्यास पाहून; व हा विष्णूचा मित्र होणार असल्यामुळें मारण्यास अयोग्य आहे, असें समजून त्या धनुर्धारी पुरुषास घेऊन शंकर विष्णूकडे गेले. तेथें परमेश्वराची ( विष्णूची ) मूर्ति पाहून शंकरानें आपल्या हातांतील भिक्षापात्र पुढें करून विष्णूजवळ भिक्षा मागितली. हा शंकर आहे, असें ओळखून त्याच्या भिक्षापात्रांत विष्णूनें आपला डावा हात तोडून घातला; तत्काल त्याच्या हातांतून एकसारखें एकहजार वर्षेपर्यंत त्या पात्रांत रक्त सांडत होतें. शेवटीं तें भिक्षापात्र पूर्ण भरल्यावर शंकरानें त्या रक्ताचें मंथन केलें; नंतर आपल्याबरोबर आणलेल्या त्या धनुर्धारी पुरुषास त्यानें विष्णूच्या हवालीं करून सांगितलें कीं, पुढें नरनारायण ह्या नांवानें तुमचा अवतार होईल. नंतर नरानें नारायणाची पुष्कळ स्तुति केली. शंकर निघून गेल्यावर, शंकराला मारण्यासाठीं केलेल्या प्रयत्नाबद्दल प्रायश्चित्त देण्याकरितां विष्णु ब्रह्मदेवाकडे गेले; व त्यांस हजारवर्षेपर्यंत दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय ह्या तीन अग्नींची सेवा करण्यास सांगितलें. विष्णूच्या सांगण्याप्रमाणें सर्व कांहीं करून; व शंकराजवळ केलेल्या अपराधांची क्षमा मागून ब्रह्मदेव पापमुक्त झाले.

# अध्याय ४ था.

## अग्नीची उत्पत्ति.

पूर्वीं नर या नांवाचा पुरुष ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाला; व ब्रह्मदेवानें शंकराला मारण्याकरितां पाठविलेला तो पुरुष तेथेच कसा रममाण झाला; आणि ब्रह्मदेवाला पांचवें मुख कां प्राप्त झालें ? वगैरे व्यासांनीं प्रश्न केल्यावरून सनत्कुमार सांगतात,-हे व्यास ! ब्रह्मदेवाचें मस्तक शंकरानें तोडल्यावर त्या पांचव्या मुखापासून अग्नि उत्पन्न झाला, व तो शंकरानें आपल्या मस्तकावर तृतीय नेत्ररूपानें धारण केला. तो अग्नि कसा उत्पन्न झाला, तें सांगतों, ऐक; पूर्वीं एक

सोन्याचें अंडें निर्माण झालें; व त्या अंडामधून सुवर्णकांतीनें युक्त ब्रह्मदेव उत्पन्न झाला. नंतर ब्रह्मदेवानें " भूर्भुवः स्वः " ह्या वेदमंत्रानें एक हजार वर्षे तपश्चर्या केली. त्यायोगें मनापासून एक अग्नि उत्पन्न झाला; व तोच मानसाग्नि होय. नंतर अग्नीला फार भूक लागल्यामुळें, त्यास ब्रह्मदेवानें आपल्या अंगावरील केस खावयास दिले; तेवढ्यानेंहि त्याची तृप्ति होईना, म्हणून त्यानें त्यास त्वचा, मांस, अस्थि व शेवटीं आपला सर्व देह खावयास दिला; तरीहि त्याची तृप्ति झाली नाहीं. असें पाहून ब्रह्मदेवाला राग येऊन त्यानें त्याचे तीन भाग केले. पैकीं अकाराग्नि हा मानसाग्नि होय, त्यास होमहवनामध्यें मिळणाऱ्या पदार्थांवर देहधारणा करावयास सांगितलें. इकाराग्नीला प्रत्येकाच्या पोटांत राहून प्राणिमात्रांनीं सेवन केलेल्या अन्नाचा पाक करण्याकरितां जठराग्नि-रूपानें रहावयास सांगितलें; व उकाराग्नीला पाण्यामध्यें राहून वडवाग्निरूपानें उदरंभरण करण्याची परवानगी दिली. अशी ब्रह्मदेवानें व्यवस्था लाविल्यावर सूर्याचेठिकाणीं असणारें जें तेज तें तुझेंच पूर्णतेज होय; असें अकाराग्नीस सांगून सर्वांचें समाधान केलें. नंतर ते तीनहि अग्नि पेटवून ब्रह्मदेवानें पुष्कळ-प्रकारें त्यांची स्तुति केली. अग्नीनें प्रसन्न होऊन ब्रह्मदेवास दिव्य दृष्टि देऊन आपलें विराट्-स्वरूप दाखविलें; व पूर्वीं जशी सृष्टि निर्माण झाली होती, तशीच पुनः उत्पन्न कर; अशी आज्ञा केली. ब्रह्मदेवानें अश्वत्थ, शमी, ह्या मध्यें अग्नीची स्थापना करून त्या अग्नीपासून भृगुऋषि, व अंगिराऋषी यांची उत्पत्ति केली. पूर्वीं जो नर उत्पन्न झाला होता तोच पूर्वकल्पीं व्यास उत्पन्न झाला; व हल्लीं तोच ब्रह्मदेवाचें पांचवें मुख झालें आहे. व तें कपाल म्हणून शंकरानें हातांत धारण केलें आहे; हें आख्यान श्रवण करणारे दोष मुक्त होतात.

---

## अध्याय ५ वा.

### कपालमोक्षवर्णन.

सनत्कुमार म्हणतात; हे व्यास, विष्णूनें सांगितल्याप्रमाणें ब्रह्मदेवानें अग्नि-होत्रविधीनें अग्नीची पूजा करून ब्रह्महत्येपासून आपली मुक्तता करून घेतली. नर व नारायण हे दोघे सर्वलक्षणसंपन्न अशा बदरिकाश्रमामध्यें तपश्चर्या कर-ण्याकरितां गेले. त्याठिकाणीं नरनारायणांच्या दर्शनाकरितां शंकर गेले असतां वनदेवतांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली; त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन वनदेवतांच्या प्रार्थनेवरून त्याच अरण्यांत कायमचे राहिले. एक हजार वर्षें राहिल्यावर शंकरानें आपल्या हातांतील कपाल जमिनीवर सोडलें; त्या योगें सर्व पृथ्वी कांपूं लागली; व पृथ्वी जलमय होते कीं काय! असें भासूं लागलें. ब्रह्मदेवानें हें शंकराचें कृत्य जाणून लोकरक्षणाकरितां शंकराची पुष्कळ प्रार्थना केली.

---

## अध्याय ६ वा.

### महाकालवन.

ब्रह्मादिकांची प्रार्थना श्रवण करून प्रसन्न झालेले शंकर म्हणतात कीं, ब्रह्मन् ! मी हें जें कपाल जमिनीवर सोडलें, तें तुमच्या सर्वांच्या हिताकरितांच होय. कारण पाताळांत मोठमोठे दैत्य इंद्रादिदेवांचा नाश करण्याकरितां प्रयत्न करीत आहेत; तेव्हां त्या दैत्यांचा नाश व्हावा; ह्याकरितां मी हें कपाल जमिनीवर टाकलें आहे. त्यायोगें पृथ्वीला कंप सुटून सर्व दैत्यांचा नाश झाला आहे. आजपासून ह्या वनाला महाकालवन हें नांव प्राप्त होईल. नंतर त्या वनाचें सर्व माहात्म्य सांगून कृतयुगामध्यें महाकालवनांतील भूमि सुवर्णाप्रमाणें व रत्नानें भूषित अशी होती. त्रेतायुगामध्यें तीच भूमि श्वेतवर्ण असून तेथें मोठमोठे तपस्वी राहत असत. तशाचतऱ्हेनें ही भूमि द्वापरयुगामध्यें कृष्णवर्ण असून तेथें ज्ञानी लोक भगवद्गुणाचें गायन करितात; व कलियुगांत हल्लीं ज्ञानी पुरुष त्याठिकाणीं गुप्तरूपानें वास करून शूल धारण केलेल्या शंकराचें प्रत्यक्ष दर्शन घेतात. अशातऱ्हेनें हें महाकालवनाचें माहात्म्य श्रवण करणारे शिवलोकाला जातात.

---

## अध्याय ७ वा.

### भक्तिवर्णन.

व्यासांच्या प्रश्नावरून सनत्कुमार सांगतात कीं, भक्ति ही तीनप्रकारची आहे. एक मानसीक भक्ति, दुसरी कायिक भक्ति व तिसरी वाचिक भक्ति. मानसीक भक्ति भगवद्गुणांचें स्मरण केल्यानें साध्य होतें; व अग्निहोत्र, वेदाध्यन इत्यादिकानें वाचिक भक्ति साध्य होते; शंकराला उद्देशून वेदमंत्राच्या योगें जें भजन केलें जातें त्यास वैदिकी भक्ति म्हणतात. आध्यात्मिका भक्ति दोनप्रकारची आहे. त्यापैकीं एक सांख्या व दुसरी यौगिकी, चोवीस तत्त्वें, पंचविसावा पुरुष; व सव्विसावा रुद्र, अशातऱ्हेनें विभाग पाडून जी भक्ति करणें तिला सांख्या भक्ति म्हणतात. ईश्वराचें सगुणस्वरूपानें ध्यान करणें ह्यास यौगिकी भक्ति म्हणतात. आतां वर सांगितल्याप्रमाणें सद्भक्तीनें जे कोणी महाकालवनांत जाऊन यज्ञादि कृत्यें करितील ते अंतकाळीं आपल्या पितरांसह शिवलोकाला जातील. तसेच जे महाकालवनामध्यें राहून ब्रह्मचर्याश्रमानें वागतील ते शिवसायुज्याला

प्राप्त होतील. जे कोणी आपला देह ज्ञानाग्नीनें भस्म करितील ते शिवगणासह शिवलोकाला जातील. जे महाकालवनामध्यें सांख्या–भक्तीनें शिवाचें स्तवन करितील ते विमानांत बसून नंदि, भृंगि इत्यादि गणांसह शिवलोकीं सतत राहतील.

---

# अध्याय ८ वा.

## अप्सराकुंडाचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात ; हे व्यास ! ह्या महाकालवनामध्यें स्त्रिया, मुसलमान. मूर्ख पशु, पक्षी इत्यादि सामान्य प्राणीहि जरी मृत झाले, तरी त्यांस रुद्रलोकाचीच प्राप्ती होते. पूर्वी शंकरानें पार्वतीची निंदा केल्यामुळें उभयतांत जेथें मोठें भांडण जुंपलें; म्हणून त्या स्थानाला कलकलेश्वर म्हणतात;तेथें जें एक कुंड निर्माण झालें त्या कुंडांत स्नानदानादि करणारा प्राणी आपल्या दहा कुलांचा उद्धार करितो; कलकलेश्वराचे ठिकाणीं स्नान करणारास कधींहि भांडण्याचा प्रसंग येत नाहीं शंकरानेंहि आपल्याशीं भांडणाऱ्या अशा पार्वतीला जेव्हां कलकलेश्वरामध्यें स्नान घातलें तेव्हां ती त्या भांडणापसून निवृत्त झाली. ह्या तीर्थाचे दक्षिणेस मणिकर्णिकानांवाचें तीर्थ आहे; तेथें स्थित असलेल्या देवीची उपासना करून जे कोणी देवीला मेंढा म्हैस वगैरे बली अर्पण करितात. त्यास इच्छित फल प्राप्त होतें. एखादी वंध्या स्त्री ह्या कुंडांत स्नान करील; तर तीस कार्तिकस्वामीसारखा पुत्र होईल. इतके सांगितल्यावर पुनः व्यासांनीं अप्सराकुंडाचें माहात्म्य विचारल्यावरून सनत्कुमार सांगतात; पूर्वी बदरिकाश्रमामध्यें नरनारायण तपश्चर्या करीत असतां त्यांस विघ्न करण्याकरितां इंद्रानें त्यांजकडे अप्सरा पाठविल्या; नंतर त्या अप्सरांचा आपल्याकडे येण्याचा उद्देश जाणून नरनारायण म्हणतात कीं, मी आंब्याच्या मोहोराची अशी स्त्री तयार करतो कीं, जिला पाहून ह्या अप्सरा लज्जित होऊन परत इंद्राकडे निघून जातील. असा विचार करून नरानें त्याप्रमाणें केल्यावर त्या अप्सरा इंद्राकडे जाऊन त्यास सर्व वर्तमान सांगत्या झाल्या. इंद्र नरनारायणजवळ येऊन नरानें तयार केलेल्या स्त्रीला घेऊन गेला; व तिचें नांव उर्वशी ठेविलें इंद्राच्या अर्धासनावर बसणारा असा पुरूरवा नृत्य करणाऱ्या त्या उर्वशीला पाहून काममोहित झाला. नंतर पुरूरवाच्या प्रार्थनेवरून चित्रांगद गंधर्व उर्वशीला रोज रात्रीं पुरूवाच्या घरीं आणीत असें; व सूर्योदयाच्या आंत पुनः स्वर्गांत नेत असे. उर्वशीला स्वर्गांत नेताच ती फार राजाबद्दल शोक करूं लागली; त्यावेळीं इतर रंभा, मेनका इत्यादि अप्सरा तिची समजूत करू लागल्या; किं, तूं स्वर्गांत

राहणारी असतां तुला मृत्युलोकांत राहण्याची इच्छा कां होतें; तें सांग. नंतर उर्वशी म्हणते कीं, पुरूरव्यावाचून एक क्षणभरहि मी एकटी राहूं शकत नाहीं, करितां माझी इच्छा त्याच्याजवळ राहण्याची आहे. सर्व अप्सरांनीं मिळून उर्वशीचें कार्य सिद्धीस नेण्याकरीतां नारदऋषीला पुरूरव्याकडे पाठविलें. नारदऋषीनें उर्वशीचा व पुरूरवाचा वियोग होऊं नये; म्हणून पुरूरव्यास अप्सराकुण्डाचें माहात्म्य सांगितलें; आषाढ, श्रावण, व भाद्रपद ह्या महिन्यांच्या शुक्ल तृतीयेस ह्या कुण्डांत स्नान करून देवीची पूजा करणारास कधींहि प्रियपत्नीचा वियोग होत नाहीं; व त्याप्रमाणें तूं केल्यास तुलाहि ऊर्वशीचा वियोग होणार नाहीं. ह्याप्रमाणें अप्सराकुण्डमाहात्म्य श्रवण करणारास अप्सरांच्या लोकीं अनेक उपभोग भोगण्यास मिळतात. ह्या कुंडाच्या दक्षिणेस महिषकुंड आहे. येथें पूर्वी शिवगणांनीं महिषासुराचा नाश केला होता. हे कुंड मुक्ति देणारें आहे.

## अध्याय ९ वा.

### रुद्रसरकुण्डाचें माहात्म्य.

पूर्वी एकदां शंकर हातात कपाल घेऊन नृत्य करूं लागला त्यावेळीं त्याचें तें नृत्य पाहून सर्व देव मोहित झाले. देवांची नजर चुकवून शंकर भूलोकीं येऊन एका विवक्षित पुण्यभूमीचे ठिकाणीं प्राप्त झालें; व तेथें हातांतील कपालाची स्थापना केली; त्यावेळीं एक मोठा शब्द उत्पन्न झाला, तो ऐकून हालाहलनांवाचा दैत्य महिषरूप घेऊन शंकराजवळ युद्ध करण्याकरितां आला. शंकराच्या आज्ञेवरून शिवगणांनीं त्या हालाहलदैत्याचा नाश केला. स्थापित केलेल्या कपालापासून एकाएकीं शस्त्रास्त्रांसह पुष्कळ मातृदेवता उत्पन्न झाल्या. त्या वेळेपासून त्या देवतांना कपालमाता हें नांव प्राप्त झालें; व कपालाला महाकपालक्षेत्र हें नांव प्राप्त झालें. नंतर तेथें एक सरोवर निर्माण केलें; व त्यास रुद्रसर हें नांव प्राप्त झालें; तें अद्यापहि त्या क्षेत्रांत विद्यमान आहे. जे कोणी महाकालवनांत राहून अंतकाळीं रुद्रसराजवळ प्राणत्याग करितील, ते त्रैलोक्यांत धन्य समजावे; व ते शिवलोकीं जातील. स्वर्गांत राहणारे देवसुद्धा रुद्रसराजवळ राहण्याची इच्छा करितात; अर्थात् हें रुद्रसर स्वर्गापेक्षांहि श्रेष्ठ आहे. जे हें माहात्म्य श्रवण करतील ते मुक्त होतील.

## अध्याय १० वा.

### कुटुम्बिकेश्वराचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा! आतां तुम्हाला कुटुम्बिकेश्वराचें माहात्म्य सांगतो. कुटुंबिकेश्वर हें शंकराचें स्वयंभू स्थान होय. जे कोणी त्याचें दर्शन घेतील; व येथें श्राद्ध करून पौष शुद्ध प्रतिपदेला किंवा अष्टमीला उपवास करितील त्यास अश्वमेधाचें फल प्राप्त होईल; व ते शिवलोकाला जातील. अश्विन शुद्ध पौर्णिमेस जे त्याचें दर्शन घेतात; व चैत्र शुद्ध पंचमीला त्याठिकाणीं जे उपवास करितात; व देवाची षोडषोपचारें पूजा करतात ते रुद्रलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ११ वा.

### विद्याधराचें माहात्म्य.

एक विद्याधरनांवाचा स्वरूपवान् गंधर्व होता. त्यानें एक पारिजातकाच्या फुलाची माळ तयार केली; व ती घेऊन तो इंद्राकडे केला. तेथें जातांच नृत्य करणाऱ्या मेनकेला पाहून ती माळा मेनकेला दिली. ती माळा घेऊन मेनका मोहित झाल्यामुळें त्या नृत्यांत अडथळा होऊं लागला. हा प्रकार पाहून इंद्रानें विद्याधराला शाप दिला; कीं, तूं ज्यापेक्षां माझ्या नृत्यांत विघ्न आणिलेंस, त्यापेक्षां मृत्युलोकीं तुला जन्म घ्यावा लागेल. नंतर विद्याधराच्या प्रार्थनेवरून इंद्रानें उच्छाप दिला; व सांगितलें कीं, तूं भूलोकांत उज्जैनी ( अवंति ) नांवाचें क्षेत्र आहे; तेथें गांगटीनावाची एक गुहा आहे; व त्याच्या उत्तरबाजूला एक तीर्थ आहे; त्याठिकाणीं स्नान कर; म्हणजे माझ्या शापापासून मुक्त होऊन पुनः स्वर्गाला पूर्वीप्रमाणें येशील. नंतर इंद्रानें सांगितल्याप्रमाणें त्याठिकाणीं स्नानादि करून तो स्वर्गाला गेला; म्हणून त्या तीर्थाला विद्याधर-तीर्थ हें नांव प्राप्त झालें.

## अध्याय १२ व १३ वा.

### स्वर्गद्वारादिमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; स्वर्गद्वारतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून जो मनुष्य पितरांना उद्देशून श्राद्धादि पुण्य कर्में करितो; मग ती स्त्री असो वा पुरुष असो,

तो पापमुक्त होतो; किंवा येथें जे महानवमीच्या दिवशीं स्नान करून; व बोकडाचा बळी देऊन; किंवा अंबिकादेवीपुढें महिषा ( रेड्या )चाही बळी देऊन मद्याचा व मांसाचा नैवेद्य दाखवितात; व देवीच्या गळ्यांत बेलाची माळ घालतात, त्यांस लवकरच सर्व सिद्धि प्राप्त होतात; व ते पापमुक्त होऊन तत्काळ रुद्रलोकीं जातात. त्याप्रमाणेंच एक मर्कटेश्वरनावाचें तीर्थ आहे; त्या तीर्थात स्नान करणारास शंभर गोप्रदानाचें फल मिळतें; व त्या तीर्थाच्या सन्निध असणाऱ्या शीतलादेवीचें पूजन करून, एक शेर मसूराची डाळ कुष्ठादि रोग दूर होण्याकरितां व संततीची वृद्धि होण्याकरितां देवीला अर्पण करावी. जे नित्य शीतलादेवीचें दर्शन घेतात, ते दारिद्र्यापासून व पापापासून मुक्त होऊन आरोग्य व शांतता त्यांचे भागीदार होतात, व जे शीतलादेवीचें महात्म्य श्रवण करितात; स्वर्गद्वारतीर्थाचें माहात्म्य ऐकतात, त्यांस रुद्र-लोकाची प्राप्ति होते.

---

## अध्याय १४ वा.

### समुद्रमाहात्म्य.

सनत्कुमार सांगतात;व्यासा! जे लोक क्षारसमुद्र, क्षीरसमुद्र, दधिसमुद्र व इक्षुसमुद्र ह्या चार समुद्रांचे ठिकाणीं स्नान करून राजस्थलनांवाच्या क्षेत्रांतील शिवस्थानाचें अवलोकन करितील, त्यांस पुत्रसुख प्राप्त होईल. राजस्थलक्षेत्राजवळ सुद्युम्नानें हे चार समुद्र स्थापित केले आहेत; आतां ते कसे स्थापित केले, तें सांगतों, ऐका; पूर्वीच्या कल्पांत सुद्युम्ननांवाचा एक राजा होता; त्याची सुदर्शना नांवाची स्त्री होती. तिनें दाल्भ्य ऋषीला पाहून पुत्रप्राप्तीचा उपाय विचारिला. नंतर दाल्भ्य ऋषी म्हणतात, हे मुली ! पूर्वी तुला पुत्र होण्याकरितां शंकरानें चार समुद्र निर्माण केले आहेत; तेथें जर तूं स्नान करिशील तर तुला उत्तम पुत्र होतील; करितां तूं आपल्या नवऱ्याला शंकराची आराधना करावयास सांगून ते चार समुद्र इकडे आणावयास सांग नंतर दाल्भ्यानें सांगितल्याप्रमाणें आपल्या पतीला तिनें सर्व हकीगत सांगितली; सुद्युम्न शंकराची आराधना करून शंकराला वश करून घेता झाला. शंकरानें सांगितलें कीं, तुझ्याकरितां मी राजस्थलाजवळ चार समुद्र पाठवून देतों; व तेथें तुम्ही उभयतां स्नान केल्यावर तुम्हाला पुत्र होतील. असें सांगून शंकर गुप्त झाले. नंतर सुद्युम्न आपल्या बायकोला घेऊन राजस्थलाजवळ आला; व तेथें चार समुद्रहि त्यानें पाहिले; त्या समुद्रांना नमस्कार करून त्यानें प्रार्थना केली असतां समुद्र राजाला म्हणतात कीं, आम्ही प्रलयकालापर्यंत येथें राहणार आहों; तुला सर्व लक्षणांनीं युक्त असा उत्तम पुत्र

होईल; करितां तूं येथें स्नान कर. नंतर सुद्युम्नानें त्याप्रमाणें केल्यावर त्यास पुत्र झाला. याप्रमाणें सुद्युम्नानें चार समुद्रांची राजस्थलाजवळ स्थापना केली. आतां जे कोणी क्षारसमुद्राचे ठिकाणीं स्नान करून श्राद्धादि कर्में करितात; व शंकर-पार्वतीची पूजा करतात; व ब्राह्मणाला मिष्टान्न भोजन घालून मिठानें भरलेलें तांब्याचें भांडें ब्राह्मणाला देतात; व योग्य दक्षिणाहि देऊन सप्तधान्यांसह वस्त्रानें झाकलेली टोपली ब्राह्मणास दान करतात, ते सुपुत्रांचा लाभ करून घेऊन शेवटीं शिवलोकीं जातात. तसेंच क्षीरसमुद्र, दधिसमुद्र ह्या समुद्रांचे ठिकाणींहि पूर्वीप्रमाणें स्नान करून अनुक्रमें ताब्याच्या निरनिराळ्या भांड्यांत दुध, दहि व ऊसाचा रस घालून ब्राह्मणास द्यावा; व शेवटीं यात्रेची सांगता होण्याकरितां गोप्रदान द्यावें; म्हणजे त्यांस संपत्ति, पुत्र, पौत्र वगैरे प्राप्त होतील.

---

## अध्याय १५ व १६ वा.

### शंकरादित्यादिमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; पूर्वी एकदा शंकर सूर्याची आराधना करूं लागले. त्यावेळी शंकराजवळ सूर्य येऊन 'वर मागा' असें म्हणूं लागला; शंकरानें तूं स्वतः अंशरूपानें येथें राहा, असें सूर्यास सांगितलें. शंकरानें सांगितल्याप्रमाणें सूर्य त्या ठिकाणीं राहता झाला. आदित्य हें सूर्याला नांव असल्यामुळें व त्या आदित्याची स्थापना शंकरानें केली असल्यामुळें त्या स्थानास शंकरादित्य हें नांव प्राप्त झालें. ज्यावेळीं ब्रह्मादिदेवांनीं शंकराची व आदित्याची स्तुति केली, त्यावेळीं शंकर व आदित्य हे उभयतां ब्रह्मादिदेवांस शंकरादित्याचें माहात्म्य वर्णन करून सांगते झाले; तें असें कीं, जे लोक ह्याठिकाणीं स्नान करून शंकरादित्याचें पूजन करितात, त्यांस सर्व यज्ञ, दान इत्यादिकांचें फल मिळतें; व ह्या लोकीं अत्यंत सुख मिळून शेवटीं ते शिवलोकाला जातात. त्याप्रमाणें नीलगंधवती–तीर्थाचेंहि माहात्म्य अवर्णनीय आहे. पूर्वी शंकरानें ब्रह्मकपाल धुण्याकरितां गंगोदक घेतलें; व तें जेथें सांडलें, तेथें एक नदी उत्पन्न झाली; व तिला सुगंध प्राप्त झाला. त्यामुळें त्या नदीला नीलगंधवती नदी हें नांव प्राप्त झालें. त्या तीर्थाचे ठिकाणीं जे स्नान करितात; व दानादि करितात त्यांस जें फल प्राप्त होतें तें काशी, प्रयाग इत्यादि ठिकाणीं गेल्यानें सुद्धा मिळत नाहीं ह्या नीलगंधवती नदीचे कांठीं श्राद्ध केल्यास पितरांची अक्षय्य तृप्ति होते; व ह्या लोकीं सर्व सुखांचा उपभोग घेऊन ते शिवलोकीं जातात.

---

# अध्याय १७ व १८ वा.

## दशाश्वमेधादितीर्थमाहात्म्य.

सनत्कुमार ह्मणतात; दशाश्वमेधतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून शंकराचें पूजन करणाऱ्या लोकांना दहा अश्वमेध केल्याचें पुण्य प्राप्त होतें. अत्रि. भृगु व्यास, दत्तात्रेय, पुरूरवा, नहुष नल; व बाष्कली इत्यादिकांनींहि ह्याठिकाणीं स्नान केल्यामुळें त्यांस दहा अश्वमेध केल्याचें फल मिळालें; चैत्र शुद्ध अष्टमीच्या दिवशीं शंकराची पूजा करून एक घोडा ब्राह्मणास दान करावा; त्यायोगें दान केलेल्या घोड्याच्या अंगावर जितके केस असतील तितकीं हजार वर्षें अश्वदान करणारे शिवलोकीं जाऊन राहतील, ह्यांत संशय नाहीं. शेवटीं जर तो शिवलोकापासून भ्रष्ट झाला तर सार्वभौम राजा होईल. सनत्कुमार म्हणतात,-व्यासा! आतां तुम्हाला एकानंशादेवीचें माहात्म्य सांगतो. पूर्वी कृतयुगामध्यें ब्रह्मदेवानें रात्रीचें स्मरण केल्याबरोबर रात्र ब्रह्मदेवासमोर येऊन उभी राहिली. ब्रह्मदेवानें रात्रीची प्रार्थना करून सांगितलें कीं, हे रात्रि! तारकनांवाचा एक दैत्य आहे; व तो देवांना फार पीडा देतो; करितां शंकरापासून जो मुलगा होईल, तो त्या दैत्याचा नाश करील, असा त्यास शाप आहे, करितां शंकराची बायको जी सती तिनें बापांनीं केलेल्या अपमानामुळें आपला नाश करून घेतला. ती हिमालयपर्वताचें पोटीं पार्वती या नांवानें जन्मास आली आहे; व तिचा विवाह शंकराबरोबर झालेला आहे. शंकराला मुलगा केव्हां होईल; व तो तारकाचा नाश केव्हां करील, अशी देव वाट पाहत आहेत, करितां तूं तेथें जाऊन शिव व पार्वती ह्यांना साह्य कर; व शिवपुत्र ज्या वेळीं तारकासुराचा नाश करील; त्या वेळीं तूं स्वतः इतर दैत्याचा नाश करून शिवपुत्रास साह्य कर; व तसें केलेंस म्हणजे तुला लोक एकानंशादेवी अशा नांवानें संबोधितील; असें रात्रीला सांगितल्यावर तिनें ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें सर्व केलें; व त्यामुळें ती एकानंशा ह्या नांवानें प्रसिद्ध झाली; व लोक अनेकप्रकारें तिचें वर्णन करूं लागले; व तिची अवंतीक्षेत्राचे ठिकाणीं स्थापना केली; ह्याप्रमाणें जे हें आख्यान श्रवण करतील, ते शिवलोकीं जाऊन राहतील.

## अध्याय १९ व २० वा.

### चतुर्दश-तीर्थांचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात,—पूर्वी चण्ड व प्रचण्ड ह्या नांवाचे दोन दैत्य होते. त्या दोघांनीं स्वर्ग जिंकून कैलासपर्वतावर चाल केली; व नंदीचें आपल्या शूलानें विदारण केलें; त्या वेळीं त्या दैत्यांचा नाश करण्याकरितां, पार्वतीनें शंकराची प्रार्थना केली; नंतर शंकर पार्वतीला म्हणतात, हे देवी ! मी त्या दैत्यांचा नाश केला आहे; तूं माझी आज प्रार्थना केलीस, त्यामुळें तुला हरसिद्धि हें नांव प्राप्त होईल. असें म्हणून शंकरानें हरसिद्धीची महाकालवनामध्यें स्थापना केली. जे कोणी ह्या हरसिद्धीचें दर्शन घेतील, त्याचीं इच्छित फलें लवकरच सिद्ध होतील. महानवमीचे दिवशीं जे लोक हरसिद्धीस रेडा बळी देतील, ते स्वर्गाला जातील; व निष्पाप होऊन मुक्त होतील. नंतर वटयक्षिणी तीर्थाचें ठिकाणीं एक महिना स्नान करावें; त्या देवीवर सोन्याचीं फुलें वाहावीं; म्हणजे सर्व सिद्धि प्राप्त होतात. पिशाचकतीर्थाचे ठिकाणीं स्नान केलें असतां पिशाचांची बाधा होत नाहीं; व त्यास पिशाचयोनीहि प्राप्त होत नाहीं. अगस्त्येश्वरतीर्थाचे ठिकाणीं स्नान करावें; त्यायोगें स्नान करणारास यमलोकीं जाण्याचा प्रसंग येणार नाहीं. नंतर शिप्रानदीवर स्नान करून ढुंढेश्वराचें दर्शन घ्यावें; म्हणजे अश्वमेधाचें फल मिळतें. तसेंच डमरुकेश्वर, अनादिकल्पेश्वर, सिद्धेश्वर, कर्कोटकेश्वर, कपालेश्वर इत्यादि तीर्थांचेठिकाणीं स्नान करून त्या त्या देवतांचें वर सांगितल्याप्रमाणें पूजन केल्यास आरोग्य, राज्य, स्वर्ग, ऐश्वर्य इत्यादि प्राप्त होऊन अंतीं शिवलोक प्राप्त होतो, व शंभर यज्ञ केल्यानें फल त्यास मिळतें.

## अध्याय २१ वा.

### हनुमत्केश्वरमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात;—व्यासा ! रामावतारीं विष्णूनें लंकेंत रावणाचा नाश करून सीतेसह सर्व वानरादि सैन्य बरोबर घेऊन अयोध्येंत आगमन केलें; राम राज्यावर बसल्यानंतर हनुमंताला एक लिंग आणण्याकरितां रामानें लंकेंत पाठविलें. हनुमान् लंकेंत जाऊन बिभीषणानें दाखविलेल्या व पूर्वी रावणानें स्थापित केलेल्या साहा शिवलिंगांपैकीं एक लिंग रामाकडे

घेऊन आला. रामानें तें लिंग हनुमंताकडून अवन्तीनगरीमध्यें रुद्रसराचे काठीं स्थापित केलें; व त्याचें नांव हनुमत्केश्वर हें ठेविलें. जे कोणी ह्याचें पूजन करतील, तें स्वर्गसुखाचा अनुभव घेऊन शेवटीं शिवलोकाला प्राप्त होतील.

## अध्याय २२ वा.

### रुद्रसरतीर्थमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा ! तुम्हाला रुद्रसराचें माहात्म्य सांगतो; ऐका. जे रुद्रसरतीर्थाचें ठिकाणीं स्नान करून कोटेश्वराचें पूजन करतात त्यांचीं सर्व पातकें नाश पावतात; व ते रुद्रलोकाला जातात. त्याठिकाणीं जे श्राद्धविधी करतात; त्यांस दहा अश्वमेधयज्ञ व शंभर वाजपेययज्ञ केल्याचें फल मिळतें. जे कोटितीर्थाचे ठिकाणीं स्नान करतात, त्यांस हजार गोप्रदानांचें फल मिळतें; व त्यांस हजार चांद्रायण व्रताचें फल मिळून शेवटीं सायुज्यमुक्ति प्राप्त होते. जे कोणी कार्तिकांत किंवा वैशाखांत महाकालाचें पूजन करतात, ते शिवलोकीं जातात.

## अध्याय २३ वा.

### महाकालेश्वरयात्रा.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा ! तुम्हाला महाकालेश्वराची यात्रा सांगतों; प्रथम रुद्रसराचेठिकाणी स्नान करून कोटेश्वराचें पूजन करून महाकालाच्या दर्शनास जावें; महाकालाचें पूजन करून कपालमोचनाचें पूजन करावें. नंतर कपिलेश्वराला जावें; त्याचें पूजन केलें असतां ब्रह्महत्यादि दोष दूर होतात. नंतर हनुमत्केश्वराला जावें; त्याचें दर्शन घेऊन पुढें पेप्पलेश्वराचें दर्शन घ्यावें. नंतर स्वप्नेश्वर, विश्वतोमुखेश्वर, सोमेश्वर, वैश्वानरेश्वर, कल्कीश्वर, गद्याणेश्वर, महाकाल, विघ्ननाशेश्वर, प्राणीश्वर, पुष्पदन्तेश्वर, दुर्वासेश्वर, कालेश्वर, विधीश्वर इत्यादि देवांचें यथानुक्रमें पूजन केलें असतां महाकालयात्रा पूर्ण होते. ह्याप्रमाणें यात्रा संपूर्ण झाल्यावर पुनः महाकालेश्वराकडे येऊन त्याची प्रार्थना करावी; व म्हणावे कीं, हे देवा ! मी आतां तुमच्या रूपेनें ही यात्रा समाप्त केली आहे. असें म्हणून यात्रेची सांगता करावी. याप्रमाणें ही यात्रा केली असतां संपूर्ण पृथ्वीला प्रदक्षिणा केल्याचें पुण्य मिळतें. तसेंच ब्राह्मणास लक्षावधि गाई दिल्याचें पुण्य लागतें. तसेंच सासष्टशें कोटी लिंगें पूजिल्याचेंहि फल प्राप्त होतें. तसेच सात जन्माचें पातक नष्ट होऊन शिवलोकप्राप्ति होते.

# अध्याय २४ वा.

## वाल्मीकेश्वराचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; पूर्वी सुमति–नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याची कौशिकी–नांवाची एक स्त्री होती. तिला अग्निशर्मा–नांवाचा एक पुत्र झाला. त्यास त्याच्या बापानें वेदाध्ययन करण्याविषयीं पुष्कळ उपदेश केला; परंतु व्यर्थ. शेवटीं कंटाळून सुमती व कौशिकी हीं उभयतां वानप्रस्थाश्रम घेऊन अरण्यांत राहिलीं; अग्निशर्मा भिल्लांची व चोरांची संगति धरून चौर्यकर्म करूं लागला. एकदा सप्तर्षींची अग्निशर्म्याशीं गांठ पडून अग्निशर्मा म्हणतो कीं, तुमच्या जवळ जें कांहीं असेल तें सर्व येथें टाका, नाहीं तर तुम्हास ठार मारीन; नंतर अत्रि ऋषी म्हणतात; हे अग्निशर्मा ! ज्याच्याकरितां तूं हें घोर कृत्य करून द्रव्य मिळवतोस, ते ह्या तुझ्या पापाचे वाटेकरी आहेत काय ? असे विचारल्यावर अग्निशर्मा घरीं जाऊन आपल्या बायकामुलांस विचारिता झाला कीं; मी जें हें पापकर्म करून तुमचा निर्वाह चालवितो, त्या पापाचे वाटेकरी तुम्ही आहां किंवा नाहीं, ते सांगा; असें विचारल्यानतर त्याचीं बायकामुलें म्हणतात कीं, पापाचे वाटेकरी आम्ही नाहीं; तुझ्या पापाचा वाटेकरी तूंच आहेस. असे घरच्या मंडळींचें वाक्य ऐकताच अग्निशर्म्याला पश्चात्ताप झाला; व तो ऋषींजवळ येऊन म्हणतो कीं, मी केलेल्या पापांची मला क्षमा करा; तुमच्या उपदेशानें मला पश्चात्ताप झाला आहे; व मला ज्ञानहि प्राप्त झालें आहे; आजपासून तुम्ही सांगाल त्याप्रमाणें मी वागेन; माझ्यावर अनुग्रह करा; व माझा उद्धार होईल, असा कांहीं मार्ग मला दाखऊन द्या; असें म्हटल्यानंतर इतर सहा ऋषि अत्रिऋषीस म्हणतात कीं, ज्यापेक्षां आपल्या उपदेशानें ह्याला पश्चात्ताप झाला आहे; त्यापेक्षां ह्याला आपण शिष्य करून पवित्र करा; असें ऋषींचें भाषण ऐकून बरें आहे; असें अत्रिऋषीनें प्रत्युत्तर दिलें; व अग्निशर्म्याला सांगितलें कीं, तूं ह्या झाडाखालीं बसून “ राम ” नामाचा आम्ही पुनः येथें परत येईपर्यंत सारखा जप करीत राहा; असें सांगून सप्तर्षी निघून गेले. नंतर अग्निशर्मा रामनामाचा जप करीत बसला असतां त्याच्या अंगावर वारुळें वाढलीं; इतकीं वर्षें तेथें जप करण्यांत गेल्यावर पुष्कळ काळानंतर सप्तर्षी पुनः अग्निशर्मा जेथें जप करीत बसला होता, तेथें आले; व रामनामाचा निघत असलेला ध्वनि ऐकून त्यांनीं त्याच्या अंगावरचें वारूळ बाजूस केलें व अग्निशर्म्याला बाहेर काढिलें. त्यावेळीं तो त्या सप्तर्षींना नमस्कार करून म्हणतो कीं, मी आज आपल्या कृपेनें पापमुक्त होऊन ज्ञानी झालों आहे. नंतर ऋषी म्हणतात;

तूं आतां वारुळांतून बाहेर आल्यामुळें तुझा हा दुसरा जन्मच झाला आहे; व वारुळापासून म्हणजे वाल्मीकापासून तुझा जन्म झाल्यामुळें आजपासून तुला वाल्मीकि अशा नांवानें ओळखतील. नंतर तो अग्निशर्मा म्हणजे वाल्मीकि शंकराची उपासना करून रामायणनांवाचें एक काव्य तयार करिता झाला. वाल्मीकि ज्या कुशस्थलीचे ठिकाणीं शिवलिंगाची पूजा करिता झाला, त्या स्थानास वाल्मीकेश्वर असें नांव प्राप्त झालें. त्याचें पूजन करणारे मुक्त होतात.

## अध्याय २५ वा.

### शुक्रेश्वरादितीर्थांचें माहात्म्य.

प्रथम शुक्रेश्वराचें पांढऱ्या फुलांनीं पूजन करावें. नंतर क्रमाक्रमानें भीमेश्वर, गर्गेश्वर यांचें बेलाच्या पानांनीं पूजन करावें; व त्यांस अभ्यंग स्नान घालावें; व चतुर्दशीला उपवास करावा; या योगें पूजकास शिवलोक प्राप्त होतो, व हजार गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. त्यानंतर कामेश्वर, चूडामण्यश्वर व चंडीश्वर इत्यादि तीर्थांचे ठिकाणीं स्नान करून त्या त्या लिंगाचीं षोडशोपचारें पूजा केली असतां तो प्राणी संसारचक्रांतून मुक्त होतो; व शिवलोकीं जातो.

## अध्याय २६ वा.

### मंदाकिनीक्षेत्राचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; महाकालवनाच्या चारहि दिशांना चार कोस दूर असे चार दरवाजे आहेत त्यापैकीं पूर्वदरवाज्यावर पिंगलेश, दक्षिणदरवाज्यावर कायावरोहणेश्वर; पश्चिमदरवाज्यावर बिल्वेश्वर; व उत्तरदरवाज्यावर उत्तरेश्वर अशीं चार लिंगें स्थापित केलेलीं आहेत ह्या सर्व लिंगांचें पूजन करणारा सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकीं गमन करितो. पिंगलेशाच्या प्रीत्यर्थ रथ; कायवरोहणाच्या प्रीत्यर्थ हत्ती; बिल्वेश्वराला घोडा; व उत्तरेश्वराकरितां गाय हीं ब्राह्मणास अर्पण करावींत. कुशस्थलीला प्रदक्षिणा करणारास पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य लागतें, तसेंच पद्मावती, स्वर्णशृंगाटिका, अवन्तिनी, अमरावती, उज्जयिनी, विशाला ह्या देवींचें पूजन करणारा इंद्रलोकाला जाऊन नंतर शिवलोकीं गमन करितो. जो कोणी कृष्णपक्षांतील अष्टमीला अक्रूरेश्वराचें पूजन करितो, तो सर्वपापापासून मुक्त होऊन कैलासाला जाऊन पोहोंचतो. ब्रह्मदेव एकदा महाकालवनाच्या सन्निद्ध

यज्ञ करण्याकरितां बसले असतां हातांत कपाल घेऊन शंकर तेथें आले. त्यांस पाहून ब्रह्मदेव शंकरास म्हणतात; ज्यापेक्षां तूं हातांत कपाल घेऊन आला आहेस त्यापेक्षां तूं अमंगल आहेस; करितां ह्या यज्ञभूमींतून तूं निघून जा, असें सांगितल्यावर शंकरांनीं हातांतील कमाल जमिनीवर ठेवलें; व शंकर निघून गेले. नंतर तें कपाल ऋत्विजांनीं उपटण्यास आरंभ केला असतां तेथें असंख्य कपालें निर्माण झालीं. हा चमत्कार पाहून ब्रह्मदेव शंकराला शरण गेले; तेव्हां शंकर पुनः तेथें येऊन ब्रह्मदेवास 'वर माग' असें सांगूं लागले असतां ब्रह्मदेव म्हणतात कीं, माझ्या नांवानें येथें एक तीर्थ निर्माण कर, असें म्हणताच शंकरानें मंदाकिनीनांवाचें कुंड निर्माण करून ब्रह्मोत्तरनांवाचें एक स्थानहि निर्माण केलें. जे कोणी मंदाकिनीकुंडांत स्नान करून ब्रह्मोत्तराचें पूजन करितात ते ब्रह्मलोकाला जाऊन नंतर शिवलोकीं जातात. त्या ठिकाणीं स्थापित केलेल्या ब्रह्मदेवाचें दर्शन घेणारा सर्व पातकापासून मुक्त होतो.

---

## अध्याय २७ वा.

### अंकपादतीर्थाचें माहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात! व्यासा! पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां शेषशायी भगवंतानें बलराम; व कृष्ण या नांवानें यदुकुलांत अवतार घेतला. नंतर कृष्णानें कंसादिकांचा नाश केल्यावर राज्यावर उग्रसेनाची स्थापना केली. वसुदेवाच्या व उग्रसेनाच्या सांगण्यावरून कृष्ण व बलराम हे उज्जैनी नांवाच्या नगरांत राहणाऱ्या सांदिपिनी नामक एका विद्वान् ब्राह्मणाकडे विद्याध्ययनाकरितां गेले. तेथें त्या दोघांनीं थोडयाच अवधींत सांगोपांग चौदा विद्या व चौसष्ट कला यांचें अध्ययन केलें. नंतर सर्व अध्ययन परिपूर्ण झाल्यावर बलराम; व कृष्ण यांनीं गुरूजवळ गुरुदाक्षिणा मागण्याबद्दल फारच आग्रह केल्यामुळें सांदीपनीगुरूनें हे प्रत्यक्ष ईश्वर आहेत, असें जाणून गुरुदाक्षिणेप्रीत्यर्थ समुद्रांत बुडालेला आपला मुलगा आणून देण्याविषयीं सांगितलें. गुरूच्या आज्ञेवरून बलराम व कृष्ण हे उभयतां प्रथम समुद्राजवळ गेले; त्यावेळीं समुद्र त्यांस म्हणतो कीं, सांदीपनीचा पुत्र मजजवळ नसून येथें सुसरीच्या रूपानें जो पंचजन नामक राक्षस आहे, त्याचे जवळ असल्यास तपास करा; असें ऐकून तो पंचजनाकडे गेले, व त्यास ठार मारून त्याजवळ गुरुपत्र नाहीं, असें पाहून ते दोघे यमपुरींत वरुणानें दिलेल्या रथांत बसून गेले. यमपुरीची शोभा पाहून त्यांस आनंद झाला; व त्यांनीं एक शंखनाद केला. तो शब्द ऐकून यमानें

आपले दूत त्याजकडे लढाईकरितां पाठविले. नंतर उभयतांची जंगी लढाई होऊन त्यांत यमदूतांचा पराजय झाला; व ते यमाकडे जाऊन झालेली हकीकत सांगते झाले. हे उभयतां साक्षात् ईश्वर आहेत, असें जाणून यमानें सांदीपनीचा पुत्र बलराम व कृष्ण यांच्या हवाली केला. नंतर गुरुपुत्राला घेऊन ते दोघे सांदीपनीकडे आले; व पुत्राला गुरूच्या स्वाधीन करते झाले; त्यावेळीं सर्वांना आनंद होऊन त्याठिकाणीं बलराम व कृष्ण यांची अंशभूतानें स्थापना केली; व तेथें एक कुंडहि निर्माण केलें; व त्यास अंकपाद हें नांव दिलें. जे कोणी ह्या अंकपादतीर्थाचेठिकाणीं स्नान करून बलराम व कृष्ण यांची पूजा करतात, ते संसारबंधनापासून; व पातकापासून मुक्त होऊन अंतकाळीं शिवलोकीं गमन करितात, हें आख्यान श्रवण करणाराही सर्व पापपासून मुक्त होतो.

---

## अध्याय २८ वा.

### करभेश्वरादितीर्थमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा! एके काळीं देवांसह शंकर मोठ्या आनंदानें क्रीडा करीत असतां एकदम कोणास नकळत शंकरानें करभाचे ( हत्तीच्या बाळकाचें ) रूप घेतलें. त्यावेळीं सर्व देव शंकर कोठेंहि दिसत नाहींत, असें पाहून त्यांस शोधूं लागले. शेवटीं सर्वांनीं मिळून गणपतीला विचारिलें कीं, आम्ही तुला मोदक देतों; पण आम्हास शंकर कोठें आहेत, तें सांग. असें म्हटल्यानंतर गणपतीनें सांगितलें कीं, शंकर हे हत्तीच्या बालकाच्या वेषानें हल्लीं ह्याच अरण्यांत हिंडत आहेत. नंतर सर्व देव करभरूप घेतलेल्या शंकराजवळ येऊन म्हणतात कीं, हे शंकरा! आम्ही तुम्हाला ओळखिलें आहे. असें देववाक्य ऐकतांच आपणाला देवांनीं ओळखिलें, असें पाहून शंकराला मोठें आश्चर्य वाटलें; व आपलें स्वस्वरूप प्रकट केलें. नंतर करभेश्वर या नांवानें शंकरानें तेथें एक लिंग स्थापित केलें; व एक कुंडहि निर्माण केलें. जे कोणीं ह्या कुंडांत स्नान करून करभेश्वराचें पूजन करतील, त्यांस सर्व यज्ञ, दान वगैरे केल्याचें पुण्य प्राप्त होईल. ह्याशिवाय कुसुमेश्वर, जयेश्वर, मार्कंडेश्वर, व ब्रह्मसर इत्यादि तीर्थांचे ठिकाणीं स्नान करून, त्या त्या लिंगांचें पूजन करणारांचीं सर्व दुःखें नष्ट होऊन त्यास अनेकप्रकारचीं सुखें प्राप्त होतात; व शेवटीं ते शिवलोकीं जातात. पूर्वीं एकदा ब्रह्मदेवानें यज्ञ करण्याकरितां एक कुंड निर्माण केलें; त्यास यज्ञवापी, असें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी ह्या यज्ञवापींत स्नान करून, त्याजवळ स्थापिलेल्या पशुपतीचें दर्शन

घेतात; ते जन्ममरणापासून मुक्त होतात. तसेंच अनंगनांवाच्या कुंडांत स्नान करून अनंगेश्वराचें पूजन करणारा शिवलोकाला जातो. तसेंच करिकुंडामध्यें स्नान करून, विश्वरूपाचें दर्शन घेणारा; व अजागंधकुंडाचेठिकाणीं स्नान करून, ब्रह्मेश्वराचें पूजन करणारा; आणि चक्रतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून, चक्रस्वामीचें पूजन करणारा ब्रह्महत्त्यादि महापातकापासून मुक्त होऊन; व इहलोकीं सुख भोगून अंतकालीं तो शिवलोकीं गमन करितो. पूर्वी अत्रि नांवाचा एक ऋषि होता. त्यानें इतकी तपश्चर्या केली कीं, त्या तपापासून उत्पन्न झालेलें तेज कोठेंहि मावेनासें झालें. त्या वेळीं त्याच्या तपस्तेजापासून जी एक मूर्ति निर्माण झाली, तीच सोम होय. त्या सोमापासून जें पाणी उत्पन्न झालें त्या पाण्याच्या प्रवाहास शिप्रानदी हें नांव प्राप्त झालें. ती सोमापासून उत्पन्न झाल्यामुळें व सोमेश्वरासन्निध ती असल्यामुळें तिला सोमवती शिप्रा हें नांव प्राप्त झालें. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करणारे ब्रह्महत्त्या, मद्यपान, चौर्य; व परस्त्रीगमन इत्यादि पातकापासून मुक्त होतात. सोमवारीं अमावास्या आली असतां जे कोणी ह्या तीर्थावर स्नान करतील, त्यांचीं सर्व कृत्यें अक्षय्य फल देणारीं होतील; व कोटीतीर्थाचे ठिकाणीं स्नान केल्याचें त्यांस पुण्य लागेल अत्रितेजापासून पृथ्वीवर पडलेल्या सोमाला रथांत घालून ब्रह्मदेव स्वर्गांत घेऊन जाऊं लागले असतां देवानीं ब्रह्मदेवाची स्तुति केली. त्या वेळीं सोमापासून उत्पन्न झालेलें तेज खालीं पडलें; व त्यापासून औषधी निर्माण झाल्या नंतर सोमाला दक्षानें आपल्या सत्तावीस मुली अर्पण केल्या. सोमानें राजसूययज्ञ केला; व शेवटीं यज्ञाच्या प्रभावानें सोमाला अत्यंत तेज प्राप्त झालें; व सोम बृहस्पतीच्या बायकोचें हरण करिता झाला; त्या योगें इंद्राचें व सोमाचें मोठें युद्ध झालें. नंतर ब्रह्मदेवानें मध्यस्थ होऊन बृहस्पतीची बायको बृहस्पतीला परत दिली; परंतु ती गरोदर असल्यामुळें बृहस्पतीनें तिचें ग्रहण केलें नाहीं. त्यामुळें बृहस्पतीच्या बायकोनें आपला गर्भ जमिनीवर टाकला; व ती बृहस्पतीकडे आली. त्या बृहस्पतीच्या बायकोला झालेला जो मुलगा त्याचें नांव बुध असें ठेविलें; सोमानें बृहस्पतीच्या बायकोजवळ व्यभिचार केला असल्यामुळें त्या पातकाच्या क्षालनार्थ अमावास्येला सोमवारीं शिप्रानदीच्या काठीं स्नान करून सोमेश्वराचें पूजन केलें; व त्यामुळें तो दोषमुक्त झाला. ह्या सोमवती तीर्थाचें माहात्म्य इतर तीर्थांपेक्षां मोठें आहे. जे कोणी श्रावण महिन्यांत सोमवतीतीर्थाचेठिकाणीं स्नान करून सोमनाथाचें पूजन करतात, त्यांस सर्व तीर्थांचेठिकाणीं स्नान केल्याचें फल प्राप्त होऊन मोक्षप्राप्तिहि होते.

---

## अध्याय २९ वा.

### अनरकतीर्थमाहात्म्य.

व्यासांनीं नरक किती आहेत, असा सनत्कुमारास प्रश्न केला असता सनत्कुमार सांगतात; व्यासा! रौरव, सुकर, रौद्र, ताल, विनशक, सप्तकुम्भ, तप्तार्च, महाज्वाल, कुम्भीपाक, ऋकचन, देवातिदारूण, कृमिभुक्ति, रक्ताख्य, लालाभक्ष, गण्डक अधोमुख, अस्थिभंग, यंत्रपीडनक, संदंश, रुधिरांग, श्वभोज्य, कुभोजन इत्यादि पुष्कळ नरक आहेत. जेजे प्राणी जसजसे पाप करतील तसतशीं त्यांस यमलोकांत असलेल्या नरकांतील दुःखें भोगावीं लागतील. जे कोणीं बालहत्त्या, गुरुहत्त्या; व गोहत्त्या करितात, ते रौद्रनरकांत जाऊन दुःखें भोगितात; जे कोणीं खोटी साक्ष देतात, ते रौरव नरकांत जातात. मद्यप्राशन करणारे, ब्रह्महत्त्या करणारे; व सुवर्ण चोरणारे सूकरनरकांत पडून अनेकप्रकारचीं दुःखें भोगितात. जे कोणी सुनेचे ठिकाणी किंवा कन्येचे ठिकाणीं गमन करितात, ते महाज्वालनरकांत पडून अनेक दुःखें भोगितात. ह्याप्रमाणें अनेक पातकें करणारे लोक अनेकप्रकारच्या यमयातनांचा अनेक नरकामध्यें पडून उपभोग घेतात, करितां जर कोणास ह्या नरकापासून मुक्तता करून घेण्याची इच्छा असेल तर त्यांनीं अनरकतीर्थाचे ठिकाणीं कार्तिक कृष्ण चतुर्दशीस स्नान करून शिवपूजन करावें.

---

## अध्याय ३० वा.

### दीपदानमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; पूर्वीं कृतयुगामध्यें शंकर पार्वतीसह एकांतांत क्रीडा करीत असतां थट्टेनें शंकर पार्वतीला म्हणाले कीं, हे कालि! तुझें स्वरूप कितीतरी कृष्णवर्णाचें आहे; इत्यादि शंकराचें भाषण ऐकून पार्वतीला आपणास काली असे म्हटल्याबद्दल राग आला; व ती गौरवर्ण प्राप्त होण्याकरितां अर्थात् विंध्यपर्वतावर तपश्चर्या करण्याकरितां गेली. नंतर शंकर पार्वतीबद्दल फारच शोक करूं लागले. शंकराच्या शोकामुळें सर्व त्रैलोक्यहि दुःख करूं लागलें. पार्वतीला शोधण्याकरितां शंकर जिकडेतिकडे हिंडूं लागल्यामुळें शंकराचें दर्शन इंद्रादि देवांस न होऊन ते शंकराची स्तुति करूं लागले; त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, तुम्ही अनरकेश्वरापुढें दीपदान करा; म्हणजे तुम्हाला शंकराचें दर्शन होईल. नंतर शंकराच्या दर्शनाकरितां सर्व देव अनरकेश्वरापुढें येऊन दीपदान

करिते झाले; व त्यांस शंकराचें दर्शनहि झालें. इकडे पार्वतीनें विंध्याचलपर्वतावर तपश्चर्या केली असतां विष्णु प्रसन्न होऊन पार्वतीस म्हणतात कीं, तूं अनरकेश्वरापुढें दीपदान कर, म्हणजे तुझी अंगकांती गौरवर्ण होईल; असें सांगितल्यावर पार्वतीनें अनरकेश्वरतीर्थाचे ठिकाणीं स्नान केलें; व तेथील शिवलिंगापुढें दीपदान केलें, त्यायोगें तिलाहि गौरवर्ण प्राप्त झाला; व तेथेंच शंकरानें आपलें स्वरूप प्रकट करून; व पार्वतीस आलिंगन देऊन तिचें पुष्कळ-प्रकारें वर्णन केलें. जे कोणी त्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून यमाचें ध्यान करितात; व पितरांच्या उद्देशानें तिलतर्पणादि करितात ते सर्व पितरांसह मुक्त होऊन शिवलोकीं जातात. जे लोक त्या तीर्थामध्यें स्ना करून उपोषण करितात; व नृत्यादि करितात तेहि अंतकालीं पापमुक्त होत्साते शिवलोकीं गमन करितात.

---

## अध्याय ३१ वा.

### केदारेश्वरादितीर्थमाहात्म्य.

सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ असें हें केदारेश्वरतीर्थ सर्व पातकांचें क्षालन करणारें आहे. त्यामध्यें जे स्नान करून केदारेश्वराचें पूजन करितात ते इहलोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकीं गमन करितात. त्याप्रमाणें जटाशृंगतीर्थ, इंद्रतीर्थ, गोपतीर्थ, चिपिटातीर्थ, वगैरे तीर्थांचें ठिकाणीं स्नान करून जटेश्वर, चंद्रेश्वर, कुंडेश्वर, गोपेश्वर, आनंदेश्वर इत्यादि लिंगाचें पूजन करणारेहि सर्व दुःखापासून मुक्त होऊन अंतीं कैलासाला गमन करितात. तसेंच कुशस्थलीचेठिकाणीं रामचंद्रानें स्थापित केलेल्या रामेश्वराचें पूजन जे लोक करितील ते शिवसायुज्याला प्राप्त होतील. तसेंच सौभाग्यकतीर्थ; व घृततीर्थ ह्यांचेठिकाणीं स्नान करून सौभाग्येश्वराचें पूजन करणारे रुद्रलोकीं जातील. जे कोणीं पत्तनेश्वराचें षोडशोपचारानें पूजन करितील; व उपोषणादि करतील ते कायमचें शिवलोकीं गमन करून शिवस्वरूप होतील. त्याप्रमाणें भूतेश्वर, अंबालिका, घंटेश्वर, कूपोदक इत्यादि तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून त्या त्या शिवलिंगाचें पूजन करणारा कितीहि पापी असला तरी सर्व पापापासून मुक्त होऊन अंतकालीं शिवपुरीला जातो. जे कोणी कामोदकतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून कामेश्वराचें पूजन करितात ते कांतियुक्त होत्साते स्वर्गलोकांचे ठिकाणीं आनंदानें राहतात. जे कोणीं प्रयागतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून प्रयागेशाचें पूजन करितात ते सर्व लोकांचें उल्लंघन करून; व अत्युच्च अशा शिवलोकाला गमन करून मुक्त होतात.

---

# अध्याय ३२ वा.

## नरादित्यमाहात्म्य.

पूर्वी एकदां नर व नारायण हे उभयतां भूमीचा भार दूर करण्याकरितां पृथ्वीवर अवतीर्ण झाले; पैकीं नर हे कुंतीचे ठिकाणी अर्जुन या नांवानें उत्पन्न झाले; व नारायण हे देवकीचे ठिकाणीं कृष्ण या नांवानें उत्पन्न झाले. श्रीकृष्णानें कंसादिकांचा नाश केल्यानंतर अर्जुन हा अस्त्रविद्या शिकण्याकरितां स्वर्गाला गेला. इंद्राजवळ अस्त्रविद्या शिकल्यावर अर्जुनानें गुरुदक्षिणा मागण्याविषयीं इंद्राजवळ आग्रह धरिला. तेव्हां इंद्रानें अर्जुनास सांगितलें कीं, हिरण्यपुरांत राहणारे निवातकवच नांवाचे दैत्य आहेत, ते आम्हाला फार पीडा देतात, करितां त्यांचा तुम्ही नाश करा; म्हणजे ह्याच दक्षिणेनें मी संतुष्ट होईन, असें म्हटल्यावर अर्जुन इंद्राच्या रथांत बसून निवातकवचांचा वध करण्यास निघाला; व सर्व दैत्यांचा नाश करून त्यानें इंद्रादि देवांची प्रीति संपादन केली. नंतर अर्जुनानें आपलें मोठें कार्य केलें, असें इंद्रास वाटून त्यानें अर्जुनास वर मागण्याविषयीं सांगितलें. नंतर इंद्राच्या सांगण्यावरून अर्जुनानें इंद्राजवळ वर मागितला कीं, सर्व त्रैलोक्याचें रक्षण होण्याकरितां ब्रह्मदेवानें ज्या दोन मूर्तींची पूजा केली, अशा दोन मूर्ती मला द्या. नंतर इंद्रानें त्याप्रमाणें दोन प्रतिमा अर्जुनास दिल्या. अर्जुन त्या प्रतिमा घेऊन श्रीकृष्णाकडे आला; व एक श्रीकृष्णास दिली; व एक प्रतिमा अर्जुनानें स्वतः-करितां ठेविली. अर्जुनानें उत्तरदिशेला कुशस्थलीचे ठिकाणीं त्या प्रतिमेस नरादित्य नांवानें स्थापन केलें. त्यावेळीं प्रत्यक्ष सूर्याचें दर्शन अर्जुनास झालें. अर्जुनानेंहि पुष्कळप्रकारें सूर्याची स्तुती केली; अशाप्रकारें अर्जुनानें नरादित्याची स्थापना केली. अर्जुनानें स्थापिलेल्या नरादित्याचें जे पूजन करितात, व त्याची स्तुति करितात ते धनधान्यादिकानें युक्त होऊन अंतकालीं शिवलोकीं गमन करितात.

# अध्याय ३३ वा.

## केशवादित्यमाहात्म्य.

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें श्रीकृष्णाला अर्जुनानें जी एक मूर्ती दिली, तिची स्थापना केशवादित्यनांवानें श्रीकृष्णानें कुशस्थलीचेठिकाणीं केली नंतर श्रीकृष्णानें केशवादित्याची पुष्कळप्रकारें स्तुति केली; व इन, प्रभाविण,

पुण्य, पतंग, पतंगेश्वर इत्यादि सूर्याचीं एकशें आठ नामें श्रीकृष्णानें पठण केलीं. नंतर केशवादित्य प्रसन्न होऊन श्रीकृष्णास म्हणतात; हे कृष्णा ! आपण उच्चारिलेलीं हीं जीं माझीं एकशें आठ नांवें जो पठण करील, तो सर्वदा संपत्तियुक्त होऊन व धान्यादिकानें युक्त होऊन ऐश्वर्यवान् होईल; व शेवटीं सूर्यलोकीं जाऊन शिवसायुज्याला प्राप्त होईल. तसेंच केशवादित्याजवळ असणारें जें रेणुकातीर्थ, त्याचें दर्शन घेऊन स्नानादि कर्में करणारे सर्व उच्चपदाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ३४ वा.

### शक्तिभेदतीर्थमाहात्म्य.

पूर्वीं देव व दैत्य यांचें मोठें युद्ध झालें असतां, त्यामध्यें देवांचा पराजय होऊन ते दशदिशेला पळून गेले. नंतर इंद्रानें शंकराची आराधना करून, त्यास प्रसन्न करून घेतलें. शंकर प्रसन्न होऊन इंद्रास 'वर माग' असे म्हणाले असतां इंद्र म्हणतो कीं, आमच्या सैन्यांत चांगला सेनापति नसल्यामुळें आमचा पराजय झाला आहे; करितां एकादा चांगलासा सेनापति आम्हास द्या. असें इंद्राचें भाषण ऐकून शंकर म्हणतात कीं, थोड्याच दिवसांत मजला एक मुलगा होणार आहे; व त्यास सेनापति म्हणून तुझ्याकडे पाठविणार आहे, असें म्हणून शंकर स्वस्थानाला निघून गेले; व हिमालयपर्वतावर बसून पुत्रप्राप्तीबद्दल विचार करूं लागले; आणि त्यानें तपश्चर्या करण्यास प्रारंभ केला. इकडे पार्वती शंकरावाचून दुसऱ्या कोणासहि वरणार नाहीं, असा निश्चय करून तपश्चर्या करूं लागली. इंद्रादि देव सुद्धां ब्रह्मदेवाकडे आमचें रक्षण करा, असें सांगण्याकरितां आले असतां ब्रह्मदेव म्हणतो कीं, हें कार्य शंकराला मुलगा झाल्याशिवाय होणार नाहीं. असें ब्रह्मवाक्य ऐकतांच इंद्रानें कामविकार उत्पन्न करण्याकरितां मदनाला शंकराकडे पाठविलें. मदन रतीला घेऊन जेथें शंकर बसले होते तेथें आले. मदनानें शंकरावर कामबाण सोडल्यामुळें शंकराचें चित्त चलबिचल झालें; तेव्हां शंकर इकडेतिकडे पाहूं लागले असतां आंब्याच्या झाडाखालीं बसलेला मदन त्यांचे दृष्टीस पडला. तत्काळ शंकरानें आपल्या तिसऱ्या अग्निस्वरूपी डोळ्यानें त्या मदनाचें भस्म केलें. मदनाला भस्म केल्यामुळें रति शोक करूं लागली. तिचा शोक ऐकून आकाशवाणी झाली कीं, तुझा पति थोड्याच दिवसांत उत्पन्न होईल. नंतर शंकर तेथून उठून एका ब्राह्मणाचा वेष घेऊन जेथें पार्वती तपश्चर्या करीत होती, तेथें आले; व पार्वतीला म्हणतात कीं, तूं तपश्चर्येनें आपल्या शरीराला

वृथा दुःख कां देत आहेस. असें ब्राह्मणवेषधारी शंकराचें भाषण ऐकून पार्वती म्हणते कीं, शंकर पति व्हावा; एवढ्याकरितां मी तपश्चर्या करीत आहे. तें ऐकून बटुरूप घेतलेले शंकर म्हणतात; तूं पर्वताची मुलगी आहेस; व शंकर स्मशानांत राहणारा, मुंडाची माळ गळ्यांत घालणारा असा अमंगल आहे; तेव्हां हा तुझा विचार मला नापसंत आहे. अशाप्रकारची बटूनीं केलेली शंकराची निंदा ऐकून पार्वती परत आपल्या घरीं जाऊं लागली. नंतर बटुरूपधारी शंकरानें पार्वतीचा निश्चय पाहून आपलें शिवस्वरूप प्रकट केलें. शंकराला पाहून पार्वती लज्जित झाली. पुढें शंकर गुप्त झाले; व पार्वती आपल्या घरीं परत गेली. पार्वतीच्या आग्रहावरून शंकराशी हिमालयानें तिचा विवाह लाविला. पुढें कांहीं दिवसांनीं शंकर पार्वतीसह एकांतांत संभोगादि–व्यवहारांत निमग्न झाले असतां संधी साधून इंद्रादि–देवांनीं अग्नीला आंत पाठविलें. नंतर शंकरापासून उत्पन्न झालेलें वीर्य पार्वतीनें अग्नीच्या हातांत दिलें व त्यानें तें प्राशन केलें. त्या वीर्याच्या प्रभावानें अग्नीच्या शरीरांत असह्य वेदना होऊं लागल्या. त्या वेळीं तें वीर्य अग्नीनें गंगेंत टाकून दिलें. पुनः तेंच वीर्य साहा कृत्तिका गंगेवर स्नानाकरितां आल्या असतां त्यांच्या पोटांत शिरलें; व त्या गरोदर राहिल्या. नंतर आपले पति आपणास दोष देतील ह्या भीतीनें त्या साहीजणींनीं तो गर्भ त्या गंगाकाठीं टाकून दिला; व त्या आपल्या घरीं निघून गेल्या. नंतर ते साहाहि गर्भ एकवटून एक साकार मूर्ति तयार झाली. हें वर्तमान इंद्रादिदेवांस समजताच ते ब्रह्मदेवाला घेऊन त्या कुमाराजवळ प्राप्त झाले; व त्या मुलाचे ब्रह्मदेवाकडून जातकर्मादि संस्कार करविले. शंकरानें त्या आपल्या मुलास शक्ति दिली. पार्वतीनें आपल्या मुलाला बसण्याकरितां मोर दिला. वगैरे अनेक देवांनीं अनेक आयुधें दिल्यानंतर त्यास कार्तिकस्वामी हें नांव शंकरानें ठेविलें; व दुसरीहि गांगेय, गुह, स्कंद इत्यादि सोळा नांवें त्यास प्राप्त झालीं. जे कोणी कार्तिकस्वामीच्या ह्या नांवांचें स्मरण करितात त्यांस कोणतेंहि भय प्राप्त होत नाहीं. नंतर सर्व देवांनीं मिळून कार्तिकस्वामीला कुशस्थलीचे ठिकाणीं आणून; व त्यास सेनापतीच्या जागीं अभिषिक्त करून आमचें रक्षण करण्याविषयीं देवांनीं त्याची प्रार्थना केली. कातकस्वामीनें सर्व दैत्यांचा पराजय करून इंद्रास राज्य दिलें; व स्वतः कार्तिकस्वामी कुशस्थलीचे ठिकाणीं येऊन राहिले; व त्यानें आपल्या हातांतील शक्ति क्षिप्रानदीचे काठीं टाकली. ती पाताळापर्यंत जाऊन घुसली; त्या वेळीं पातालगंगा खालून वरती आली; व त्या गंगेला शक्तिभेदतीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्या तीर्थाचेठिकाणीं स्नान करणारे मुक्त होतात.

---

## अध्याय ३५ वा.

### अगस्त्येश्वरमाहात्म्य.

स्वर्णक्षुरतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून शंकराचें पूजन करणारास शंभर कपिलागायी दान दिल्याचें पुण्य लागतें. पितामहतीर्थाचे ठिकाणी स्नान करणारा ब्रह्मलोकाला जातो. विष्णुवापीचे ठिकाणीं स्नान करणारा विष्णुलोकाला जातो; अभयेश्वर देवाचें पूजन करणारा शिवलोकाला जातो. जे अगस्त्येश्वराचें दर्शन घेऊन मोठ्या भक्तीनें त्याचें पूजन करितात, ते शिवलोकीं जातात. ज्या वेळीं अगस्त्यऋषीचा उदय होतो त्यावेळीं सुवर्णाचा अगस्त्यऋषि तयार करून त्या मूर्तीचें पूजन करावें. ह्याप्रमाणें सात वर्षें हें अगस्त्यपूजन करावें. नंतर अर्घ्यादि द्यावींत. अगस्त्येश्वरापुढें अर्घ्यदान केल्यानें पुत्रप्राप्ति होऊन ऐश्वर्यहि प्राप्त होतें; व अंतकाळीं पूजनादि करणारा स्वर्गाला जातो. जे कोणी हें आख्यान श्रवण करतील ते शिवलोकीं जाऊन अखंड सुखांत राहतील.

## अध्याय ३६ वा.

### नरदीपमाहात्म्य.

पूर्वीं वर्णन केलेली कुशस्थली सात कल्पपर्यंत सतत राहून सर्व क्षेत्रांत श्रेष्ठतेला प्राप्त झाली आहे. पहिल्या कल्पांत हिला स्वर्णशृंग हें नांव प्राप्त झालें. दुसऱ्या कल्पांत कुशस्थली, तिसऱ्या कल्पांत अवन्तिका, चवथ्या कल्पांत अमरावती, पांचव्या कल्पांत चूडामणि, साहव्या कल्पांत पद्मावती; आणि सातव्या कल्पांत उज्जैनी अशीं ह्या नगरीला सात कल्पांत सात प्रकारचीं नांवें प्राप्त झालीं आहेत. हीं सात नांवें सकाळीं उठून जे पठण करतील त्यांचीं सात जन्मांचीं पातकें नष्ट होतील. पूर्वीं ह्याच उज्जैनी नगरामध्यें अन्धक नांवाचा राजा उत्तमतऱ्हेनें राज्य करीत असे. त्याला कनकदान नांवाचा एक पुत्र होता. त्यानें इंद्राबरोबर युद्ध सुरू केलें. त्यांत इंद्रानें त्याचा नाश केला. त्याचा बाप जो अंधासुर तो युद्धाला येईल ह्या भीतीनें इंद्र शंकराकडे कैलास-पर्वतावर गेला; व शंकरास नमस्कार करून ह्मणतो कीं, अंधासुर मला मारण्या-करितां येणार आहे; तरी माझें आपण रक्षण करा; असें ऐकतांच शंकरानें इंद्राला अभय देऊन भयंकर रूप धारण केलें; व तो पृथ्वीवर आला. जेथें शंकरानें आपला पहिला पाय जमिनीवर ठेविला तेथें एक सरोवर निर्माण झाले. ह्या तीर्थाला

महाकालतीर्थ हें नांव प्राप्त झालें; व ह्या तीर्थाचेठिकाणीं कोट्यावधि तीर्थें प्राप्त झालीं; म्हणून ह्यास कोटितीर्थ असेंहि नांव प्राप्त झालें. पुढें शंकराचें व अंधकाचें युद्ध झालें. त्यांत अंधकाला शंकरानें जर्जर करून सोडलें. नंतर अंधकानें आपला पराजय होणार, असा अंदाज काढून एक माया निर्माण केली; व त्यायोगें इंद्रादि देव उत्तरदिशेला पळत सुटले; व शंकरालाहि भ्रम झाल्याप्रमाणें बेसावधपणानें तो इकडे तिकडे हिंडूं लागला. अंधक देवांचा पाठलाग करीत असतां तेथें आकाशवाणी झाली; म्हणून त्या तीर्थाला वागंधक हें नांव प्राप्त झालें, जे कोणी मार्गशीर्ष शुक्ल नवमीचे दिवशीं ह्या तीर्थांत स्नान करून माहाकालेश्वराचें पूजच करितील ते शिवलोकीं जातील. अंधकानें जिकडेतिकडे उत्पन्न केलेला अंधकार नष्ट करण्याकरितां नरादित्य उत्पन्न होऊन त्यानें जिकडेतिकडे प्रकाश उत्पन्न केला. नंतर देवांना आनंद होऊन; व नरादित्याला नरदीप ह्या नांवानें संबोधून त्याची स्थापना केली. जे कोणी तेथील कुंडांत स्नान करून नरदीपाचें पूजन करतात. त्यांच्या सर्व कुलांचा उद्धार होतो. नरदीपाला प्रदक्षिणा केली असतां सर्व पृथ्वीप्रदक्षिणेचें फल मिळतें. जे कोणी सकाळीं उठूननरदीपाचें दर्शन घेऊन नंतर दक्षिण, पश्चिम; व उत्तर ह्या दिशेला क्रमाक्रमानें रथाचें चाक, रथांतील सूर्य; व रथ ह्यांचे दर्शन घेतात ते मुक्त होतात.

---

## अध्याय ३७ वा.

### अंगारकीचतुर्थीव्रतमाहात्म्य.

शंकरानें अंधकासुराचा नाश केल्यावर शंकरापासून ॐकार उत्पन्न झाला. नंतर शंकराच्या हातांतील त्रिशूळ अंधकाचा नाश करून भोगवतीकडे आला. त्या शूळाला पाहून हाटक म्हणतो कीं, तूं इकडे कशाला आलास ? नंतर शूळ म्हणतो; शंकरानें मला अंधकाला मारण्याकरितां पाठविलें आहे; व मी अंधकाला मारून इकडे आलो आहे; व आतां परत शंकराकडे जाणार. असें ऐकतांच हाटक व शूळ उभयतां शंकराकडे आले. नंतर ब्रह्मादि देवांनीं शूळाची व हाटकाचीं प्रार्थना करून शूळेश्वर व हाटकेश्वर अशा नांवानें त्यांची तेथें स्थापना केली. तसेंच त्याच्या उत्तर बाजूला धूतपापेश्वर नांवाचें तीर्थ निर्माण केलें. जे कोणी अष्टमी, चतुर्दशी व पूर्णिमा ह्या दिवशीं धूतपापेश्वराचें पूजन करतात त्यांचीं सात जन्माचीं पातकें नष्ट होतात. अंधकारानें शंकरावर जो शूळ टाकिला तो शिवशूळानें पराजय पावून पातालांत गेला; व त्या पासून असंख्य दैत्य निर्माण झाले, व ते शंकरावर धाऊन आले; परंतु शंकराच्या सिंहनादानें ते सर्व मूर्च्छित झाले. नंतर ब्रह्मदेवानें एक स्त्री निर्माण केली; व तिचें नांव चामुंडा ठेऊन तिच्या-

कडून इतर दैत्यांचा नाश करविला. पूर्वीं वडाचे झाडाखालीं स्थापिलेल्या ज्या वट-मातृका, त्यांचें पूजन करणारांस मुक्ति मिळते. ज्याठिकाणीं शंकरानें सिंहनाद केला त्याठिकाणी सिंहेश्वराची स्थापना केली. त्याच्या दर्शनानें सिंहाप्रमाणें बल प्राप्त होतें. त्याच ठिकाणीं असणाऱ्या कण्टेश्वर तीर्थांत स्नान करून कण्टेश्वराचे पूजन करणारास ग्रह, भूत पिशाच इत्यादिकांची बाधा होत नाहीं. अभयेश्वराचें पूजन करणारास अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य लागतें. ज्यावेळीं शंकरानें अंधकावर शूळ टाकिला त्या वेळीं अंधक त्या शूळाचें निवारण करीत असतां, गणपतीनें अंध-काला अडथळा केला, त्या वेळीं ब्रह्मादि देवांनीं गणपतीची वाहवा केली; व त्यास महाविनायक हें नांव ठेविलें. प्रत्येक महिन्यांतील चतुर्थीला जे कोणी ह्या महाविनायकाचें पूजन करितील, त्यांचीं सर्व विघ्नें नष्ट होतील. शंकराच्या घामाचा एक थेंब जमिनीवर पडला; व त्यापासून एक पुरुष उत्पन्न झाला; त्याचें नांव अंगारक ठेविलें. नंतर ब्रह्मदेवानें तेथें अंगारेश्वर नांवाचें एक लिंग स्थापित केलें. मंगळवारीं चतुर्थी आली असतां, एक वेळ उपोषण करून सायंकाळीं अंगारेश्वराला अर्घ्यादि अर्पण करणारा व मोदकांचा नैवेद्य अर्पण करणारा पुत्रपौत्रादि संततीनें युक्त होऊन, अंतकालीं कल्पपर्यंत स्वर्गांत राहतो.

---

## अध्याय ३८ वा.

### अंधककथा.

ज्या वेळीं ब्रह्मदेवानें चामुंडा नांवाची स्त्री उत्पन्न केली; त्या वेळीं तिला अंधकासुराचें रक्त पिण्यास सांगितलें, शेवटीं तो अंधक क्षीणबल होऊन शंकरा-शिवाय आमचें कोणीहि रक्षण करणार नाहीं, असें समजून अंधक शंकराची स्तुति करूं लागला. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन अंधकास म्हणतात कीं, तूं आजपासून निष्पाप झाला आहेस. तुला ज्ञानदृष्टि देतो; त्यामुळें तुझें शरीर पूर्वीप्रमाणें सदृढ होईल. तुला कांहीं वर मागावयाचा असल्यास माग. नंतर अंधक म्हणतो कीं, गणपतीची उपासना करण्याची परवानगी दे. नंतर शंकर म्हणतात कीं, तुझ्या सांगण्याप्रमाणें मी तुला गणपतीची उपासना देतों; व तुला आमच्या शिवगणामध्यें मुख्य स्थान देतों. ह्याप्रमाणें सांगून शंकर व अंधक हे उभयतांहि गुप्त झाले; नंतर उभयतां शिवलोकीं जाऊन राहिले. इकडे देवतांची त्या अवन्तीनगरीमध्ये आवन्त्यमातृदेवता या नांवानीं स्थापना केली. श्रावण वद्य अमावास्येच्या दिवशीं जे कोणी त्यांचें दर्शन घेतात ते सर्व पापा-पासून मुक्त होऊन हंसांनीं युक्त अशा विमानांत बसून पितृलोकाला जातात.

---

# अध्याय ३९ वा.

## महाकालवनमाहात्म्य.

महाकालवनामध्यें मुख्य तीर्थें एकंदर सहाशें साहासष्ट अब्ज इतकीं आहेत. बारीक सारीक लिंगें व तीर्थें किती आहेत, ह्याची गणतीच करितां यावयाची नाहीं. जो कोणी सकाम असो किंवा निष्काम असो महाकालवनामध्यें येऊन तीर्थाचेठिकाणीं स्नान करून लिंगाचें पूजन करितो तो शिवलोकीं जाऊन राहतो. सर्वतीर्थाहून व क्षेत्राहून महाकालतीर्थ; व महाकालेश्वर लिंग हीं सर्वश्रेष्ठ आहेत. जे कोणी महाकालवनाचें माहात्म्य श्रवण करतात, ते मुक्त होतात.

# अध्याय ४० वा.

## कनकशृंगाख्यान.

व्यास सनत्कुमारांस प्रश्न करितात कीं, अवन्तीनगरीला कनकशृंग हें नांव प्राप्त होण्याचे कारण काय? तसेच कालान्तरानें त्याच नगरीस कुशस्थली, अवंती, पद्मावती, उज्जैनी इत्यादि नांवें प्राप्त होण्याचेंहि कारण काय? असा व्यासांचा प्रश्न ऐकून सनत्कुमार म्हणतात; पूर्वी गौरकल्पामध्यें हाच प्रश्न वामदेवानें ब्रह्मदेवाला केला होता; व त्यांनीं वामदेवास जें सांगितलें तेंच मी आतां तुम्हास सांगणार आहे. तसेंच पूर्वी शंकरानेंहि ब्रह्मदेवाला असाच प्रश्न केला|असतां ब्रह्मदेव शंकराला म्हणाले, आपण सर्व जगताची उलाढाल करणारे आहां. आपणच महाकालस्वरूप घेऊन अवन्तीक्षेत्रामध्यें राहत असतां आपण मला त्याबद्दल प्रश्न विचारावा हें योग्य नाहीं; असें म्हणून ब्रह्मदेवानें शंकराची पुष्कळप्रकारानें स्तुति केली. नंतर सर्व देवांसह ब्रह्मदेव व शंकर अवन्तीनगरीमध्यें येऊन विष्णूची स्तुति करूं लागले असतां विष्णु म्हणतात कीं, आजपासून ह्या नगरीला कनकशृंगा हें नांव प्राप्त होईल. कारण ही नगरी विश्वकर्म्यानें तयार केलेली असून ह्याचीं शिखरें सोन्याचीं आहेत. आज ही नगरी तुम्हाला देतों; व तुम्ही उभयतां अवन्तीच्या दक्षिण दिशेला जावें, असें सांगून विष्णु गुप्त झाले; व शंकर त्याच ठिकाणीं राहते झाले.

## अध्याय ४१ वा.

### कुशस्थलवर्णन.

पूर्वी तत्पुरुषकल्पामध्यें ब्रह्मदेवानें सर्व सृष्टि निर्माण केली खरी; परंतु अपसा अपसांत देव, दैत्य, मनुष्य, राक्षस वगैरे भांडूं लागले. त्यावेळीं ब्रह्मदेवानें विष्णूची स्तुति करून सांगितलें कीं, हे भगवन्, तुझ्यावाचून ही सृष्टी शांत होणें अशक्य आहे; कारण हे लोक एकमेकाशीं भांडतात; तेव्हां त्या भांडणापासून लोकांना दूर करणें हें तुझें कर्तव्य आहे. नंतर विष्णु म्हणतात कीं, ब्रह्मन् ! मला असें स्थान दाखीव कीं, जेथें मी उभा राहिलो असतां सर्व जगाचें रक्षण होईल. असें विष्णूचें भाषण ऐकून ब्रह्मदेव हातांत कुश म्हणजे दर्भ घेऊन कनकशृंगापुरीचे ठिकाणीं आले; व त्यानें विष्णूस सांगितलें कीं, येथें आपण उभे राहा; म्हणजे सर्व जगाचें रक्षण होईल. असें म्हणून ब्रह्मदेवानें त्या स्थलावर कुश हंतरून विष्णूला उभें केलें; म्हणून त्या नगरीला कुशस्थली हें नांव प्राप्त झालें.

## अध्याय ४२ वा.

### अवन्तीक्षेत्राची उत्पत्ति.

पूर्वी ईशानकल्पामध्यें दैत्यांनीं देवांचा पराजय केला असतां ते देव मेरु पर्वतावर ब्रह्मदेवाकडे येऊन झालेलें सर्व वर्तमान त्यास निवेदन करिते झाले नंतर ब्रह्मदेव सर्व देवांसह शंकराकडे आले. शंकर ब्रह्मादिदेवांना घेऊन वैकुंठाला विष्णूकडे गेले. सर्व देवांनीं विष्णूची स्तुति केली असतां आकाशवाणी झाली कीं, हे देवहो ! महाकालवनामध्यें कुशस्थली नांवाची नगरी आहे. ज्याठिकाणीं अनेककल्पपर्यंत शंकराचें कायमचें वास्तव्य आहे. सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि प्रलयकालीं बीजरूपानें शंकर आपल्या हृदयामध्यें साठवून ह्या कुशस्थलीचे ठिकाणीं राहतात; त्यामुळें कुशस्थली इतके श्रेष्ठ तीर्थ दुसरें त्रैलोक्यांत सांपडावयाचें नाहीं. करितां तुम्ही सर्व त्याठिकाणीं जा, म्हणजे तुमचीं सर्व दुःखें नष्ट होतील; व तुम्ही स्वार्गाला जाऊन आनंदानें राहाल. ह्याप्रमाणें आकाशवाणी ऐकून सर्व शंकरादिदेव महाकालवनांत गेले; ज्याठिकाणीं सर्व पुरुष व स्त्रिया पुण्यकृत्यें करीत आहेत. अशी पुण्यभूमि पाहून सर्व ब्रह्मादि देव संतुष्ट होऊन म्हणतात कीं, ज्यापेक्षां ही नगरी प्रत्येक कल्पामध्यें त्रैलोक्याचें रक्षण करितें त्या पेक्षा ‘ अवंती ’ म्हणजे रक्षण करणारी हे नांव त्या कुशस्थलीला त्या दिवसापासून प्राप्त होईल. जे कोणी अवंतीक्षेत्राच्या

उत्पत्तीची कथा श्रवण करितील; व पठण करतील त्यांचीं सर्व दुःखें नाहींशीं होऊन ते शिवलोकीं गमन करतील. जे अपुत्र असतील ते जर ह्या अवंतीनगरींत येऊन महाकालेश्वराचें दर्शन घेतील तर त्यांस लवकरच पुत्रप्राप्ति होईल.

## अध्याय ४३ वा.

### उज्जैनीकथा

पूर्वी सांगितलेल्या अवंतीनगरीला उज्जैनी हें नांव कसें प्राप्त झालें, तें सांगतों; ऐका. पूर्वी त्रिपुर नांवाचा एक दैत्य होता. त्यानें ब्रह्मदेवाची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें. व देवदैत्यादिकांपासून मला मरण येऊं नये; अशाप्रकारचा वर मागितला; व त्या दिवसापासून त्रिपुर हा देवांना त्रास देऊं लागला; व यज्ञयागादिक जिकडचींतिकडचीं पुण्यकर्में त्यानें बंद केलीं. त्या योगें देव अशक्त होऊन ब्रह्मदेवास शरण गेले; ब्रह्मदेव देवांसह महाकालवनामध्यें आले. ब्रह्मदेवानें शंकराची प्रार्थना केल्यावर शंकर ब्रह्मदेवास म्हणतात; ब्रह्मादि देवहो! तुम्हाला जयप्राप्तीचा उपाय सांगतों. तुम्ही सर्व मिळून अवन्तीनगरीमध्यें येऊन तपश्चर्या करा; म्हणजे तुमचा जय होईल. नंतर शंकरानें सांगितल्याप्रमाणें सर्व देव अवन्तीनगरींत येऊन चामुंडेची आराधना करूं लागले. शेवटीं चंडिका प्रसन्न होऊन देवांस म्हणते; देवहो ! तुम्हाला जय प्राप्त होण्याकरितां हें मी पाशुपतास्त्र देतें, त्यायोगें तुम्ही विजयी व्हाल. असें सांगून देवी गुप्त झाली; व सर्वदेव पाशुपतास्त्र घेऊन शंकराकडे आले. नंतर शंकराच्या व पाशुपतास्त्राच्या साहाय्यानें ब्रह्मादि देवांनीं त्रिपुराचा नाश केला. सर्व देवांना अवन्तीनगरीमध्यें तपश्चर्या केल्यामुळें जय मिळाला; म्हणून त्या अवंतीनगरीला उज्जैनी हें नांव त्या दिवसापासून प्राप्त झालें. जे कोणी ह्या उज्जैनीमध्यें स्नानदानादि कृत्यें करितील ते निष्पाप होऊन शेवटीं शिवलोकीं जातील. जे विद्यार्थी असतील त्यांनीं शंकराची, द्रव्याची इच्छा करणाऱ्यानें कुबेराची अशाप्रमाणें जी वस्तु आपणास हवी असेल त्या वस्तूंच्या अधिपतींचें पूजन केलें असतां तीच वस्तु प्राप्त होते.

## अध्याय ४४ वा.

### पद्मावतीकथा.

एके कालीं जगांतील सर्व रत्नांचा नाश झाला असतां; व दैत्यांनीं देवांना त्रास दिला असतां देवांनीं दैत्याशीं तह करून समुद्राचें मंथन केलें; त्या वेळीं

मेरु* पर्वताची रवी, क्षीरसमुद्राचें भांडें, वासुकीची दोरी इत्यादि साहाय्यांनीं देवदैत्यांनीं समुद्राचें मंथन करून चवदा रत्नें काढलीं. प्रथम लक्ष्मी उत्पन्न करून ती कृष्णाला अर्पण केली. नंतर नारद ऋषि तेथें आले; व त्यांच्या सांगण्यावरून पुनः मंथन करण्यास सुरवात झाली. त्यावेळीं कौस्तुभ मणि, पारिजातक वृक्ष, धन्वंतरी, चंद्र, कामधेनु, ऐरावत, सात तोंडाचा घोडा, अमृत, रंभा, शार्ङ्ग धनुष्य पांचजन्य शंख, महापद्म निधि; व हालाहल विष हीं रत्नें निर्माण केलीं. तीं रत्नें घेऊन सर्व देव व दैत्य शंकराकडे गेले, व अपसाअपसांत भांडूं लागले, त्या वेळीं नारद तेथें येऊन विष्णूची आराधना करूं लागले. नंतर विष्णु मोहिनीरूप घेऊन देवदैत्यांजवळ आले. मोहिनीचें स्वरूप पाहून दैत्य मोहित झाले. मोहिनीनें देवांना अमृत व दैत्यांना मद्य पाजिलें. त्यावेळीं मोहिनीचें हें कपट जाणून राहूनांवाचा दैत्य देवांचें रूप घेऊन; व देवांच्या पंक्तींत बसून अमृत पिवूं लागला. तें मोहिनीनें जाणून राहूचें मस्तक आपल्या सुदर्शन चक्रानें तोडिलें; तथापि त्यास अमृताचा स्पर्श झाल्यामुळें तो मेला नाहीं. व राहू व केतू अशीं नांवें क्रमानें मुंडकें व धड त्यांस प्राप्त झालीं. राहूच्या शरीरापासून निघालेल्या रक्तप्रवाहाचें एक तीर्थ निर्माण झालें. त्या तिर्थांत स्नान करणारास राहूची पीडा होत नाहीं. कौस्तुभ, लक्ष्मी, शार्ङ्ग धनुष्य व पांचजन्य शंख हीं विष्णूनें घेतलीं, सूर्यानें घोडा घेतला, इंद्रानें ऐरावत घेतला. महापद्म नांवाचा निधि कुबेरानें घेतला. देवानें अमृत घेतलें. चंद्र शंकरानें घेतला, पारिजातकवृक्ष; व रंभा हीं इंद्रक्रीडारण्यांत म्हणजे महाकालवनांत ठेविलीं; हालाहल विषाचा कोणीहि स्वीकार करीना; असें पाहून तें शंकरानें प्राशन केलें. त्यामुळें त्याचा कंठ ( गळा ) नीलवर्णाचा झाला, त्या वेळेपासून त्यास नीलकंठ हें नांव प्राप्त झालें; रत्नकुंडांत स्नान करून नीलकंठाचें पूजन करणारा पापमुक्त होतो. समुद्रापासून निघालेली पद्मा ( लक्ष्मी ) महाकालवनांतील उज्जैनीमध्यें स्थापित केल्यामुळें, त्या नगरीस पद्मावती हें नांव प्राप्त झालें. त्याठिकाणीं स्नानदानादि करणारा निष्पाप होऊन अंतीं शिवसायुज्यतेला प्राप्त होतो.

---

* इतर पुराणांत मंदराचल पर्वताची रवी केली, असें आहे. मंदर हा मेरूचा भाऊ असल्यामुळें येथें मूळांत मेरूचें ग्रहण केलें असावें.

## अध्याय ४५ वा.

### कुमुद्वतीप्रभाव.

पूर्वी सांगितलेल्या पद्मावती नगरीला कुमुद्वती हें नांव कसें प्राप्त झालें, तें सांगतों; ऐका. हीच कथा पूर्वी लोमेशऋषींनीं मला सांगितली. लोमेश म्हणतात; मी एकदा तीर्थयात्रा करीत करीत कुशस्थलीला गेलों. जिच्या दर्शनानें सर्व पापें नाहींशीं होतात. ज्याठिकाणीं ऋषी यज्ञयागादि कृत्यें करितात. विष्णूचे दाहा अवतार, एकादश रुद्र, बारा सूर्य, आठ वसु, तेरा विश्वेदेव, आठ दिग्गज, चवदा मनु, इंद्रादि देव, गंधर्व, अप्सरा, सर्प, राक्षस, इत्यादि मोठमोठे लोक ज्या नगरींत आनंदानें राहतात. ज्या नगरीमध्यें राहिलें असतां शोक, दुःख वगैरे प्राप्त होत नाहीं. येथें पार्वतीसह शंकर सतत राहतात. ज्या नगरीचें दर्शन घेतलें असतां सर्व पापें नाहींशीं होतात. अशा ह्या नगरीमध्यें मोठमोठीं सरोवरें असून, त्यांत कुमुद्वती ( कमलिनी ) म्हणजे चंद्रविकासिनी कमळें सतत फुललेलीं असतात. ज्या हेतूस्तव पद्मावतीनगरींत कुमुद्वतीचीं फुलें सतत फुललेलीं असतात त्या हेतूस्तव त्या नगरीला कुमुद्वतीनगरी हें नांव प्राप्त झालें. जे लोक कुमुद्वतीनगरीमध्यें श्राद्धादि विधी करितात त्यांचे पितर उद्धरून कैलासाला जातात. त्या ठिकाणीं स्नान, दान, होमहवन, पूजन इत्यादि जें कांहीं आपण पुण्यकर्म करूं तें अक्षय्य फल देणारें होतें.

## अध्याय ४६ वा.

### अमरावतीकथा.

एकदां ब्रह्मदेवानें देवांना कुशस्थलीला अमरावती कां म्हणतात? तें वर्णन करून सांगितलें होतें, तेंच मी तुम्हाला सांगतों. पूर्वी मरीचऋषीचा मुलगा कश्यप प्रजा उत्पन्न करण्याकरितां ब्रह्मदेवानें सांगितल्यामुळें मोठी तपश्चर्या करूं लागला. हजार वर्षें तप केल्यानंतर आकाशवाणी झाली; कीं, तूं प्रजोत्पत्ति करण्याकरितां ज्यापेक्षां तप करीत आहेस त्यापेक्षां तुझी प्रजा चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत जिवंत राहील. ज्या हेतूस्तव अदितिसुद्धां तुझ्याबरोबर तप करिती झाली त्या हेतूस्तव तिला इंद्रादिदेव उत्पन्न होतील. नंतर कश्यपाला अदितीला अमर म्हणजे देव त्या कुशस्थलीमध्यें उत्पन्न होऊन तेथेंच ते मोठे झाले; व ह्याच नगरींत देवांना अमृत मिळून ते अमरत्वाला प्राप्त झाले; त्यामुळें व इंद्राच्या अमरावतीनगरींतील नंदनवनहि येथें असल्यामुळें ह्या नगरीला अमरावती हें नांव प्राप्त झालें. ह्याठिकाणीं स्नानदानादि कर्मे करणारे मुक्त होतात.

## अध्याय ४७ वा.

### विशालाकथा.

ह्याच अमरावती नगरीला हें नांव कसें प्राप्त झालें तें सांगतों; ऐका: प्रथम ह्या नगरींत एकटेच शंकर पार्वतीला घेऊन राहूं लागले. नंतर मागाहून देव, दैत्य, ऋषि वगैरे लोक येथें येऊन राहिले. त्यांना पाहून पार्वती शंकराला विचारितें कीं, तुमचा प्रसाद व्हावा; म्हणून हें सर्व मोठमोठी तपश्चर्या करीत आहेत, करितां त्यांच्या इच्छा आपण पूर्ण कराव्या. नंतर त्याठिकाणीं सर्वांना राहण्याकरितां विशाल म्हणजे विस्तीर्ण ( अफाट ) अशीं गृहें, बागा, रस्ते, वगैरे निर्माण करून शंकरानें सर्वांस तेथें राहण्यास सांगितलें. ज्या नगरीमध्यें कुबेराची अलकानांवाची नगरी आणून ठेविली आहे. तशीच वरुणाची भोगवती, यमाची संयमिनी नगरी व देवांची अमरावती वगैरे सर्व पुण्य स्थानें मूर्तिमंत जेथें राहतात, अशी अत्यंत विशाल नगरी शंकरानें निर्माण केली. ज्यामध्यें कोणी लग्न, मुंजी करीत आहेत तर कोणी देवस्थापना करीत आहेत, कोणी होमहवन करितात तर कोणी कथापुराणें वाचीत आहेत, अशी विशाल नगरी निर्माण केल्यामुळें त्या नगरीस विशाला हें नांव प्राप्त झालें. नुसतें विशाला नगरीचें नामस्मरण केल्यास शिवलोकप्राप्ति होते, असें ह्या नगरीचें माहात्म्य आहे. विशाला नगरी सर्व त्रैलोक्यांत श्रेष्ठ आहे. ह्याठिकाणीं स्नानदानादि पुण्य कर्मे करणारे सर्व पापापासून मुक्त होऊन अंतकाळीं शिवलोकीं जातात.

---

## अध्याय ४८ वा.

### कल्पवर्णन.

आतां एकंदर कल्प किती ? व त्यांची नांवें कोणकोणतीं ? हें सर्व सांगतों, ऐका. पंधरा निमेष म्हणजे एक काष्ठा. तीस काष्ठा म्हणजे एक कला. तीस कला म्हणजे मुहूर्त. तीस मुहूर्त म्हणजे अहोरात्र ( दिवस व रात्र मिळून एक दिवस ) पंधरा अहोरात्र म्हणजे पक्ष; एकंदर पक्ष दोन शुक्लपक्ष; व कृष्णपक्ष. दोन पक्ष म्हणजे एक महिना. दोन महिनें म्हणजे ऋतु. तीन ऋतु म्हणजे अयन; एक दक्षिणायन व दुसरें उत्तरायण. दोन अयन म्हणजे एक वर्ष. आपला जो महिना तो पितरांचा एक अहोरात्र दिवस. आपला जो शुक्लपक्ष तो पितरांचा दिवस; व कृष्णपक्ष ती रात्र होय. कृष्णपक्षांत पितृश्राद्ध करावें. आपले जें

वर्षे तो देवांचा एक अहरोत्र दिवस; उत्तरायण दिवस व दक्षिणाय रात्र होय. देवांचीं एक लक्ष वर्षे झालीं म्हणजे मनूचा एक अहोरात्र दिवस होतो. मनूंचे दहा दिवस म्हणजे मनूंचा पक्ष होतो. दहा पक्ष म्हणजे महिना व बारा महिने म्हणजे ऋतु होय. व साहा ऋतु म्हणजे वर्ष. अठ्ठेचाळीसशें वर्षे कृतयुगाचें प्रमाण आहे. छत्तीशें वर्षे त्रेतायुग, चोवीसशें वर्षे द्वापरयुग व बाराशें वर्षे कलियुग हें युग प्रमाण होय. कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग व कलियुग हीं चार युगें मिळून एक महायुग होतें; व अशी एकाहत्तर महायुगें झालीं म्हणजे एक मनु होतो ( मन्वंतर होतें ). त्या मन्वंतरालाच अयन हें नांव आहे. एक दक्षिणायन व दुसरें उत्तरायण. एक मनु संपल्यावर दुसरा मनु लागतो. एक अयन म्हणजे मन्वंतर. तोंच ब्रह्मदेवाचा दिवस. ब्रह्मदेवाची जी रात्र त्यासच कल्प म्हणतात. ब्रह्मदेवाची रात्र झाली कीं प्रलय होतो. एकंदर मनु चवदा आहेत. प्रलयकालीं परमेश्वर महाकालवनामध्यें येऊन राहतात. कुशस्थलीमध्यें राहणारांना प्रलयकालची भीति वाटत नाहीं. वाराहकल्प, वामनकल्प, विष्णुकल्प, पितृकल्प, पाद्मकल्प, इत्यादि एकंदर चौऱ्यांयशी कल्प आहेत. जे कोणी ही कथा ऐकतील किंवा वांचतील त्यांचीं ब्रह्महत्यादि पातकें नाहींशी होतील.

## अध्याय ४९ वा.

### शिप्रानदीमाहात्म्य.

व्यास सनत्कुमारांस प्रश्न करितात कीं, आतां आपण शिप्रानदीचें माहात्म्य सांगा; त्याप्रमाणें पिशाचमोचन तीर्थ; नीलगंगा, कर्कराजतीर्थ, पुष्करतीर्थ, गयातीर्थ, गोमतीकुण्ड, धर्मसरोवर, शनैश्वराचा जन्म;व पुरुषोत्तममाहात्म्य, हेंहि सांगा, याप्रमाणें व्यासांचा प्रश्न ऐकून सनत्कुमार म्हणतात; व्यासा ! ही नदी वैकुंठांत शिप्रा या नांवानें प्रसिद्ध आहे; त्याप्रमाणें स्वर्गांत ज्वरघ्नी, महाद्वारामध्यें पापघ्नी, पातालांत अमृतसंभवा, वाराहकल्पांत विष्णुदेहा अशीं ह्या नदीला निरनिराळीं नामें आहेत. ब्रह्मदेवाचें तोडलेलें पांचवें मस्तक हातांत घेऊन शंकर वैकुंठाला प्राप्त झाला; व विष्णूजवळ भिक्षा मागूं लागला. नंतर विष्णूनें ही भिक्षा घे, असें म्हणून अंगठ्याजवळच्या बोटानें शंकराला खोटी भिक्षा घातली, त्यामुळें शंकराला राग आला; व त्यानें आपल्या त्रिशूळानें विष्णूचें बोट तोडलें. त्यावेळीं विष्णूच्या बोटांतून रक्त वाहूं लागलें. शंकराचें पात्र रक्तानें भरून वाहूं लागलें असतां त्या रक्ताची नदी झाली; व तिलाच शिप्रा हें नांव प्राप्त झालें. आतां हिला ज्वरघ्नी कां म्हणतात; तर पूर्वी बाणासुराचें व कृष्णाचें युद्ध सुरू झाले असतां

कृष्णानें बाणासुराचे हजार हात तोडले व त्या पासून रक्ताचा प्रवाह सुरू झाला. ही बातमी शंकराला समजताच शंकराचें व कृष्णाचें युद्ध झालें. शेवटीं माहेश्वरज्वर व वैष्णवज्वर यांचें युद्ध जुपलें व त्यांत माहेश्वरज्वराचा पराजय झाला. त्यावेळीं हा सर्व प्रकार शिप्रानदीवर झाल्यामुळें हिलाच ज्वरघ्नी हें नांव प्राप्त झालें. ह्याठिकाणीं जे स्नानदानादि करितील त्यांस कोणत्याहि प्रकारचें भय व ज्वरादि पीडा कधींहि होणार नाहीं; व त्याचीं सर्व पापें नाहिंशी होऊन ते संसारबंधनापासून मुक्त होतील; व अंतकाळीं शिवलोकीं गमन करितील.

---

## अध्याय ५० वा.

### शिप्रानदीमाहात्म्य ( पुढें चालू ).

सनत्कुमार म्हणतात; ह्या शिप्रानदीला पापनाशिनी हें नांव कसें प्राप्त झालें. तें सांगतों; ऐका. पूर्वीं कृतयुगामध्यें कीकटदेशांत दमन या नांवाचा राजा होता. त्याच्यासारखा दुष्ट राजा पूर्वीं कधीं झाला नाहीं; व पुढें होणार नाहीं. तो एकदां मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां महाकालवनांत प्राप्त झाला. रात्र झाल्यामुळें त्यानें तेथें वस्ती केली. तो रात्रीं एका झाडाखालीं बसला असतां एकाएकी त्याच्या अंगावर एक साप पडला; व त्याच्या बोटाला चावला; त्यायोगें तो सर्पदंशानें मरण पावला; नंतर यमदूतांनीं त्यास यमलोकीं नेलें. त्याचें प्रेत कावळ्यांनीं ओरबाडून व आपल्या चोंचींत त्यांतील मांस धरून कावळे शिप्रानदीवरून जात असतां त्यांच्या चोचींतील थोडें मांस शिप्रानदींत पडलें. त्या दमनराजाच्या मांसाचा भाग शिप्रानदींत पडल्यामुळें तो जरी महापापी होता. तरी निष्पाप होऊन शिवदूतांनीं यमदूतांपासून सोडवून त्यास शिवलोकीं नेलें. त्यामुळें यमदूतांना फार आश्चर्य वाटून ते यमाला विचारिते झाले कीं, हा कीकटदेशाचा राजा इतका पापी असतां तो शिवलोकीं कसा गेला. नंतर यम सांगतात; दूतहो ! त्या राजाचें मांस महाकालवनांत असणाऱ्या शिप्रानदींत पडल्यामुळें तो निष्पाप होऊन शिवलोकीं गेला. वैशाख शुद्धपक्षांत जे लोक शिप्रानदीचेठिकाणीं स्नान करितात, त्यास कधींहि यमलोक प्राप्त होत नाहीं; व ते कितीही पापी असले तरी पापमुक्त होऊन शिवलोकीं शिवस्वरूप होऊन राहतात. तळीं, विहिरी ह्यांमध्यें स्नान करण्यापेक्षां नदीस्नानाचें फल विशेष आहे. तसेंच तापी, गंगा, नर्मदा, गोदावरी, ह्या नद्यांमध्यें स्नान करण्यानें जें पुण्य प्राप्त होतें, त्याच्या शतपट पुण्य शिप्रानदीच्या स्नानानें प्राप्त होतें. ह्याप्रमाणें यमाचें भाषण ऐकून यमदूत यमाला शरण गेले. ह्या दिवसापासून हिला पापनाशिनी हें नांव प्राप्त झालें आहे. येथें स्नानदानादि करणारे मुक्त होतात.

---

## अध्याय ५१ वा.

### शिप्रानदीमाहात्म्य ( पुढें चालू ).

सनत्कुमार म्हणतत; व्यासा ! शिप्रानदीला पाताळांत अमृतोद्भव हें नांव कां प्राप्त झालें तें सांगतों; ऐका. एकदां शंकरानें हातांत ब्रह्मकपाल घेऊन भिक्षा मागण्याच्या उद्देशानें पाताळांत गमन केलें; व घरोघर भिक्षा मागितली; परंतु भिक्षा मिळाली नाहीं. शेवटीं तेथें अमृताचीं एकवीस कुंडें होतीं, तीं शंकरानें रागानें पिऊन टाकिलीं. नंतर वासुकी वगैरे सर्प शंकरानें अमृत पिऊन टाकल्यामुळें विष्णूला शरण गेले. त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, तुम्ही शंकराला भिक्षा घातली नाहीं; म्हणून त्यानें अमृत पिऊन टाकिलें. करितां तुम्ही महाकाल वनामध्यें जाऊन शिप्रानदीवर स्नान करा; व महाकालेश्वराचें पूजन करा; म्हणजे शंकर प्रसन्न होऊन तुम्हाला पूर्वीप्रमाणें अमृत मिळेल. ह्याप्रमाणें आकाशवाणी ऐकून सर्व सर्प महाकालवनांत जाऊन; व शिप्रानदीमध्यें स्नान करून महाकालेश्वराचें पूजन; व शंकराची स्तुति करूं लागले. त्यावेळीं शंकर प्रसन्न होऊन सर्पांस म्हणतात कीं, मी नित्य पाताळांत येऊन घरोघर भिक्षा मागतों; परंतु आपण मजला भिक्षा न घातल्यामुळें आम्ही तुमच्या कुंडांतील अमृत पिऊन नाहींसें केलें आहे. आतां तुम्ही शिप्रानदीचें ठिकाणीं स्नान केल्यामुळें तुम्हाला पूर्वीप्रमाणें अमृत मिळेल. असें ऐकताच सर्व सर्प पाताळांत जाऊन कुण्डें पाहूं लागले, तों तीं सर्व कुंडें अमृतांनीं भरलेलीं आहेत. त्यादिवसांपासून पाताळांत उत्पन्न झालेल्या शिप्रानदीला अमृतोद्भवा हें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी मनुष्य अमृतोद्भवानांवाच्या शिप्रानदीचे काठीं स्नान करून शिवलिंगाचें पूजन करितील, त्यांना आपत्ति व दुःखें कधींहि प्राप्त होणार नाहींत; व ते सदा सुखी व निरोगी होऊन अंतकालीं शिवलोकीं जातील.

## अध्याय ५२ वा.

### शिप्रानदीमाहात्म्य ( पुढें चालू ).

सनत्कुमार म्हणतात कीं, आणखी तुम्हाला शिप्रानदीचें माहात्म्य सांगतों. जें ऐकिलें असतां अश्वमेधयज्ञ केल्याचें पुण्य लागतें. पूर्वीं हिरण्याक्ष नांवाचा एक दैत्य होता. त्यानें सर्व त्रैलोक्य जिंकून आपल्या स्वाधीन करून घेतलें होतें. नंतर सर्व देव ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेव देवांस म्हणतात कीं, हा

हिरण्याक्ष व त्याचा भाऊ हिरण्यकशिपु हे दोघे पूर्वीचे जयविजय होत. त्यांनीं सनकादि ऋषींचा अपमान केल्यामुळें ‘ तुम्हीं दैत्य व्हा ’ असा जयविजयास सनकादिकांनीं शाप दिला. नंतर हे दैत्यजन्माला प्राप्त झाले आहेत. त्यांची तीन जन्मानंतर शापमुक्ति होईल. हेच दुसऱ्या जन्मांत रावण; व कुंभकर्ण होतील; व तिसऱ्या जन्मांत शिशुपाल; व वक्रदंत ह्या नांवानें जन्मास येतील. इतके सांगितल्यावर ब्रह्मदेव म्हणतात कीं, तुम्हीं स्वस्थ असा; विष्णु वराह ( डुकराचें ) रूप घेऊन हिरण्याक्षाचा नाश करील. याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून सर्व देव स्वस्थानीं निघून गेले. नंतर थोड्याच अवधींत विष्णूनें वराहरूप घेतलें व हिरण्याक्षाचा नाश केला; त्यायोगें त्रैलोक्यांत शांतता उत्पन्न झाली. विष्णूनें हें आपलें मोठें कृत्य केलें असें पाहून इंद्रादि देवांनीं वराहरूप धारण केलेल्या विष्णूची स्तुति केली. त्यावेळीं विष्णु देवांस म्हणतात कीं, तुम्ही ह्या महाकालवनामध्यें येऊन माझ्या देहापासून उत्पन्न झालेल्या शिप्रानदीवर स्नान करा; म्हणजे तुम्हाला पुनः कधींहि संकट प्राप्त होणार नाहीं. ह्याप्रमाणें विष्णूचें भाषण ऐकून इंद्रादि देव शिप्रानदीवर स्नान करिते झाले; व त्या पुण्याच्या प्रभावानें सर्व देव स्वस्थानीं स्वर्गाला जाऊन राहिले. जे कोणी ह्या नदीचे कांठीं येऊन स्नानदानादि करितात ते पापमुक्त होऊन शिवलोकीं जातात.

---

## अध्याय ५३ वा.

### पिशाचमोचनतीर्थमाहात्म्य.

पूर्वी सर्व पृथ्वी जलमय झाली असतां त्यावेळीं मेरुपर्वत सुद्धां हलूं लागला; व त्या मेरुपर्वताचें एक शिखर महाकालवनामध्यें पडलें. त्या वेळीं तेथें एक कुंड निर्माण झालें. त्या कुडाजवळ पुराण, वेदशास्त्रें, ॐकार, वषट्कार, गायत्री इत्यादि देवतास्वरूपें मूर्तिमंत राहतीं झालीं; तसेंच गंधर्व, यक्ष, ब्रह्मादि देव, शंकर वगैरे सर्व देवताहि त्याठिकाणीं राहत्या झाल्या. हें कुंड मोरांच्या सुंदर नृत्यानें व कोकिळांच्या मधुर गायनानें सुशोभित असल्यामुळें त्यास सुंदरकुंड हें नांव प्राप्त झाले आहे. एक क्षणभर किंवा अर्धा क्षणहि त्या कुंडाजवळ राहून स्नानदानादि केल्यास शंभर कल्पपर्यंत वैकुंठलोकांत राहावयास मिळतें. पक्षी, किडे, पतंग हेंहि त्याठिकाणीं राहिले असतां शिवलोकाला जातात. आतां पिशाचमोचनतीर्थाचें माहात्म्य सांगतों; ऐका. एक देवल या नांवाचा ब्राह्मण होता. त्यानें कोणतेंहि पाप करण्याचें शिल्लक ठेविलें नव्हतें. तो एकदा चोरी करण्याच्या इच्छेनें दुसऱ्या गांवाला जाण्याकरितां निघाला असतां वाटेंत त्यानें

पुष्कळ लोक ठार मारिले; नंतर तो मगधदेशाला आला. त्या मगधदेशामध्यें एक अग्निहोत्री ब्राह्मण होता. त्याची बायको माहेरी असतां तिला आणण्याकरितां तो अग्निहोत्री ब्राह्मण सासुरवाडीला जाऊन आपल्या बायकोला गाडींत घालून परत आपल्या घरीं आणूं लागला. वाटेंत त्या देवलनांवाच्या दुष्ट ब्राह्मणानें त्या अग्निहोत्री ब्राह्मणाला ठार मारलें. त्या वेळीं त्याची बायको फारच शोक करूं लागली; व नवऱ्याबरोबर सती गेली. नंतर देवलानें अग्निहोत्री ब्राह्मणाच्या घरांत होतें नव्हतें तें सर्व हरण केलें; व परत तो आपल्या घरीं निघून गेला असतां राजदूतांनीं त्या चोरी करणाऱ्या ब्राह्मणास पकडलें; व बांधून राजाकडे घेऊन चालले; राजाच्या आज्ञेनें त्यास फाशीची शिक्षा दिली. तो दुष्ट ब्राह्मण मेला असतां त्याच्या पापकर्मामुळें यमदूतांनीं त्यास रौरवनरकांत नेलें, तेथें साठ हजार वर्षें राहिल्यावर पुढें असिपत्रवननांवाच्या नरकांत नेऊन शेंवटी त्यास एकाहत्तर युगेंपर्यंत प्रेतयोनी प्राप्त झाली. नंतर तो पिचाश झाला असतां पुष्कळ काळ लोटल्यावर महाकालवनामध्यें आला. व जेथें सुंदरकुंडाजवळ शंकराचें लिंग स्थापिलेलें आहे, त्याठिकाणी शरीररूपधारी पिशाच बसला असतां अकस्मात् एक सिंह येऊन त्या पिशाचाला मारून त्याचे मांस तोंडांत धरून तहान लागल्यामुळें पाणी पिण्याकरितां सुंदरकुंडाजवळ येऊन पाणी पिऊं लागला; त्यामुळें त्याच्या तोंडांत असलेल्या पिशाचाच्या अस्थि पाण्यांत पडल्या. त्यायोगें तो पिशाच सर्वपापापासून मुक्त होऊन; व शिवरूप होऊन शिवलोकीं जाऊन राहता झाला. त्या दिवसापासून त्या सुंदरकुंडास पिशाचमोचनतीर्थ हें नांव प्राप्त झालें; व तेथील शिवलिंगास पिशाचमोचनेश्वर हें नांव प्राप्त झालें. जोंपर्यंत प्राणी पिशाचमोचनतीर्थाचे ठिकाणीं गेला नाहीं, तोंपर्यंतच त्याचें पाप त्याच्या जवळ राहील. जे कोणी पिशाचमोचनतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून पिशाचमोचनेशाचें पूजन करितील; त्यांचीं सर्व पापें नष्ट होऊन ते सुखानें शिवलोकीं गमन करितील.

---

## अध्याय ५४ वा.

---

### नीलगंगामाहात्म्य.

स्का०नीलगंगेंत स्नान केलें असतां सर्व तीर्थांचे ठिकाणीं स्नान केल्याचें फल प्राप्त होतें, असें हें नीलगंगामाहात्म्य आहे. एके दिवशीं तीनहि लोकांना पवित्र कारणारी गंगा ब्रह्मलोकांत जाऊन ब्रह्मदेवाला म्हणते कीं, मी काय एवढें मोठें पाप केलें आहे कीं, ज्या योगें सर्व पापी लोक माझ्याठिकाणीं स्नान करून

सर्व पाप मजला अर्पण करितात. त्यायोगें हा पहा ! माझा देह निळा झाला आहे. पापाचें ओझें माझ्यावर इतकें झालें आहे कीं, मला आतां पृथ्वीवर चालत जाण्याची शक्ति उरली नाहीं. आतां मी कोणत्या तीर्थाचेठिकाणीं गेल्यें असतां किंवा कोणती तपश्चर्या केली असतां पापमुक्त होईन. नंतर ब्रह्मदेव ह्मणतात; हे गंगे, महाकालवनामध्यें अमरावती नांवाची एक नगरी आहे, तेथें शिप्रा नांवाची नदी आहे. त्यांच्या दर्शनानें सर्व पाप नाहींसें होतें. तेथें तूं जा; म्हणजे तुझें सर्व पाप नाहींसें होऊन तूं पूर्वीप्रमाणें पापमुक्त होशील. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें ती महाकालवनामध्यें जाऊन स्नानादि केल्यानंतर निळ्या वर्णाची पापी गंगा पापमुक्त होऊन शुक्लवर्णाची झाली. त्या गंगेनें जों आपला नीलवर्ण टाकिला तोंच तेथें एक प्रवाह निर्माण होऊन त्यास नीलगंगा हें नांव प्राप्त झालें. जे ह्या नीलगंगातीर्थाचें ठिकाणीं स्नान करून जवळ असणाऱ्या हनुमंताची पूजा करतात त्यास सर्व सिद्धि प्राप्त होतात. आश्विन कृष्ण अमावास्येला ह्या तीर्थाचेठिकाणीं पितरांना उद्देशून श्राद्धादि विधि करणाऱ्यांचे सर्व पितर शिवलोकीं जाऊन राहतात. नीलगंगेच्याच जवळ एक दुग्धकुंड आहे. ह्या कुंडाचे ठिकाणीं स्नान करून; व कुंडातील पाणी प्राशन करून ब्राह्मणास गोप्रदान दिलें असतां तो सर्व पापापासून मुक्त होऊन अंतकाळीं शिवलोकाला जाऊन राहतो.

---

## अध्याय ५९ वा.

### विमलोदतीर्थमाहात्म्य.

पूर्वी एकदा सर्व पृथ्वी नर्मदानदीच्या पाण्यानें जलमय झाली असतां पृथ्वीचें रक्षण होण्याकरितां सर्व देवांनीं अगस्त्यऋषीची प्रार्थना केली. त्यावेळीं अगस्ति विंध्यपर्वतावर येऊन पार्वतीची आराधना करूं लागला. पुष्कळप्रकारानें पार्वतीची स्तुति केल्यानंतर पार्वती प्रसन्न झाली; व 'वर माग' असें अगस्त्यऋषीस म्हणाली. त्यावेळीं अगस्त्य म्हणतात; हे देवी ! नर्मदानदीनें सर्व पृथ्वी बुडवून टाकिली आहे, करितां तिचें रक्षण करा; व नर्मदानदी पूर्वीप्रमाणेंच शांत असूं द्या. नंतर पार्वतीनें नर्मदानदीला सांगून तिला पूर्ववत् शांत करून पृथ्वीचें रक्षण केलें. नंतर अगस्त्यऋषी व पार्वती उभयतां महाकालवनामध्यें येऊन पार्वती अगस्त्यास म्हणते कीं, जोंपर्यंत चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत नर्मदानदीचें पाणी पृथ्वीला बाधक होणार नाहीं, आतां तूं स्वस्थ राहा. मी आतां कुशस्थलीनगरीमध्यें राहते. आजपासून येथें असणाऱ्या ह्या तीर्थाला विमलोद हें नांव प्राप्त होईल. त्या विमलोदतीर्थाचें ठिकाणीं स्नान करून विंध्यवासिनीचें पूजन कर-

णारास सर्व इच्छित वस्तु सहज प्राप्त होईल, व त्यांना कोणापासूनहि भय राहणार नाहीं. ह्याठिकाणीं स्नान करणारे दीर्घायु होतील; व अंतीं शिवलोकीं जाऊन राहतील. याप्रमाणें अगस्त्याच्या तपःसामर्थ्यानें विंध्यपर्वतावर राहणारी विंध्याचलवासिनी पार्वती ह्याठिकाणीं येऊन राहती झाली. कितीहि पापी पुरुष असले तरी ते विमलोदक तीर्थाचे ठिकाणीं स्नान करितांच तत्काळ मुक्त होतात.

---

# अध्याय ५६ वा.

## क्षांतासंगममाहात्म्य.

नर्मदा, चर्मण्वती व क्षांता ह्या तीन नद्या त्रैलोक्याला पवित्र करणाऱ्या आहेत. मांधातृक्षेत्राचे ठिकाणीं ह्या तीनहि नद्या क्रीडा करीत असता क्षांता ही नर्मदेला सोडून जी निघाली ती विंध्यपर्वताचें उल्लंघन करून महाकालवनांत अमरावतीनगरीमध्यें असणाऱ्या शिप्रानदीला जाऊन मिळाली. क्षांता व शिप्रा ह्या नद्या जेथें एकत्र झाल्या त्यांस क्षांतासंगमतीर्थ म्हणतात.

एकदा त्वष्ट्यानें आपली मुलगी सावित्री सूर्याला दिली. त्या उभयतांपासून यम व यमुना अशीं दोन अपत्यें झाली. नंतर त्यांना घेऊन सावित्री बापाच्या घरी येऊन राहिली असतां एकेदिवशीं यमानें सावित्रीजवळ कांहीं खावयास मागितलें, त्यावेळीं तिनें त्यास दिलें नाहीं; म्हणून राग येऊन यमानें सावित्रीला लाथ मारिली. नंतर सावित्रीनें यमास शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं मला लाथ मारिलीस त्यापेक्षां तूं एका पायानें लंगडा होशील. नंतर सूर्यानें आपला मुलगा लंगडा झालेला पाहून त्यांस विचारलें असतां त्यानें सर्व झालेली हकीगत सूर्याला सांगितली. सूर्याला सावित्रीचें दर्शन झाल्यामुळें तो त्वष्ट्याला विचारूं लागला, तेव्हां त्वष्टा म्हणतो; हे सूर्य ! तुमचें तेज फार असल्यामुळें त्या तेजाला सहन करण्याचें सामर्थ्य तिच्या जवळ नाहीं; करितां सावित्री कोठें तरी गेली असेल; जर तुम्ही आपलें तेज कमी कराल, तर ती तुमच्याकडे येईल. सध्या ती घोडीचे रूप घेऊन गुप्तपणानें महाकालवनांत क्षांतासंगमाजवळ आहे. नंतर सूर्यनारायण क्षांतासंगमाजवळ येऊन स्नान करून सावित्रीचें ग्रहण करिता झाला. त्याच ठिकाणीं तापी व शनैश्वर यांची सूर्यापासून उत्पत्ति झाली. जे लोक ह्या नदीमध्यें स्नान करून शनैश्वराची ' सौरि, शनैश्वर, मंद, कृष्ण, अनंत, अंतक, यम, पिंगल, छायासुत, बभ्रु, स्थावर; व ' पिप्पलायन ' हीं नांवें स्वमुखानें उच्चारितात त्यांस कधींहि शनिपीडा होत नाहीं. यज्ञकुंडाचे उत्तरबाजूला मारुतीची स्थापना केली आहे, तेथें धर्मसर या नांवाचें तीर्थ आहे. त्याठिकाणीं

काशाचें भांडें देणारा ब्रह्मलोकाला जातो. च्यवनाश्रमाचे ठिकाणीं स्नान करून च्यवनेशाचें पूजन करणारास ज्ञानदृष्टि प्राप्त होते; व तो सूर्यलोकाला प्राप्त होतो. अशाप्रकारें क्षांतासंगमतीर्थाचें माहात्म्य जे पठण करतील किंवा श्रवण करतील; त्यांस हजार कपिलागाई दान दिल्याचें पुण्य प्राप्त होईल; व शेवटीं मोक्ष मिळेल.

## अध्याय ५७ वा.

### गयातीर्थमाहात्म्य.

सर्व तीर्थांमध्यें गयातीर्थ हें श्रेष्ठ आहे. त्याठिकाणीं स्नानदानादि करणारा देव–ऋण, पितृ–ऋण व ब्रह्म–ऋण ह्या तीनहि ऋणापासून मुक्त होतो. गयातीर्थाचें फक्त जरी माहात्म्य श्रवण केलें तरी सुद्धां त्यायोगें पितरांचा उद्धार होतो. पूर्वी कृतयुगामध्यें युगादिदेव नांवाचा एक राजा होता. तो पुत्राप्रमाणें प्रजेचें पालन करीत असे. त्याच्या राज्यांत सर्वदा सुभिक्ष असे. ह्याप्रमाणें बराच काल गेल्यावर नहुंड नांवाच्या राक्षसानें युगादिदेवाचा पराजय केला; व सर्व जग आपल्या ताब्यांत घेऊन सर्वत्र अधर्म सुरू केला. हा अधर्म सहन न होऊन देव व ब्राह्मण हे ब्रह्मदेवाला शरण गेले. नंतर ब्रह्मदेव सर्वांना घेऊन विष्णूकडे गेला. अनेकप्रकारें स्तुति केल्यावर आकाशवाणी झाली कीं, तुम्ही सर्व महाकालवनामध्यें शिप्रानदी आहे; व तेथेंच एक गया नदी आहे. त्याठिकाणीं जाऊन गयातीर्थी स्नान करा; म्हणजे तुमचीं सर्व दुःखें नष्ट होतील.

## अध्याय ५८ वा.

### गया-श्राद्धनिर्णय.

सनत्कुमार म्हणतात; मी तुम्हाला गयाश्राद्धाचा विधि सांगतों. सर्वप्रकारचे धर्म व लोक हे श्राद्धक्रियेच्या योगानें प्राप्त होतात. तीन पितरांना उद्देशून गयेचेठिकाणीं श्राद्ध केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होतात. सात पितृगण हे श्रेष्ठ आहेत. पैकीं चार अमूर्त व तीन मूर्तरूप आहेत. कांहीं पितर अमूर्त आहेत, त्यांचें नांव वैराज. देव नित्य वैराजांचें पूजन करितात. वैराजांसच योगभ्रष्ट म्हणतात. ते दुसऱ्या कल्पांत ब्रह्मवादी होतात. ते सोमप्राशन करीत असल्यामुळें त्यांसच सोमप म्हणतात. त्यांना मेना नांवाची मुलगी झाली. नंतर हिमवान् पर्वताचा तिच्याशीं विवाह होऊन मेनेला मैनाकपर्वत झाला. व मैनाकाला क्रौंच पर्वत झाला. त्यावर

अग्निष्वात्तादि पितृगण राहतात. बर्हिषद् नांवाचें पितर दक्षिणादिशेला राहतात; यम नांवाचे पितर पश्चिमदिशेला राहतात; व सोमप हे उत्तर दिशेला राहतात. श्राद्धविधि हा अनादि आहे. भरद्वाजाचे सात मुलगे श्राद्धविधीच्या योगें मुक्त झाले. आतां श्राद्धविधि सांगतों. ज्याला श्राद्ध करावयाचे असेल त्यानें ब्रह्मचर्यानें राहून क्रोधादिकांचा त्याग करावा; व अशाप्रकारें गयातीर्थाचे ठिकाणीं श्राद्ध करणारास विशेष फल प्राप्त होतें. क्षयतिथीला श्राद्धविधि केल्यास त्यांचें फल सर्वांहून श्रेष्ठ आहे. वृद्धिश्राद्ध, महालय ह्यांचेंहि फल शतपट आहे; व त्याच्याहि दसपट प्रयागामध्यें श्राद्ध केल्याचें फल आहे. त्याहून कुरुक्षेत्र व त्याहून गयाश्राद्धाचें फल दसपटीनें श्रेष्ठ आहे. सर्व पितरांना उद्देशून पिंडदान करावें; जे कोणी अग्नीमध्यें दग्ध झाले असतील, कुयोनींत जन्माला गेले असतील; व पितृवंशांत किंवा मातृवंशांत मेलेले असतील त्या सर्वांना उद्देशून पिण्डदान करावें. मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंतच्या सर्व प्राणिमात्रांना उद्देशून धर्मपिण्ड द्यावे. ह्याप्रमाणें श्राद्धविधि करणारे तीनही ऋणापासून मुक्त होतात.

---

## अध्याय ५९ वा.

### अक्षय्यवटमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा! नंतर सर्व देव ब्रह्मदेवांसह गयातीर्थाचे ठिकाणीं स्नानदानादि केल्यामुळें आपआपल्या अधिकाराला मिळविते झाले. आदिगया, बुद्धगया, विष्णुपदी, गयाकोष्ठ, अक्षय्यवट व अच्छोदानी वगैरे तीर्थें व क्षेत्रें पितरांना मुक्ति देणारीं आहेत. प्रथम गयातीर्थाची स्थापना अवंतीक्षेत्रामध्यें झाली, नंतर विष्णूनें गयासुराचा कैकटदेशाचे ठिकाणीं नाश केल्यामुळें त्या ठिकाणीं गयेचें माहात्म्य स्थापित झालें आहे. गयासुराचा देह पांच कोस लांब असून त्याचे डोकें एक कोस आहे; असें शरीर जेथें विष्णूनें नष्ट केलें, त्या ठिकाणीं श्राद्धादि करणारा तीनहि ऋणापासून मुक्त होतो; व शेवटीं अक्षय्यलोकांना पितृगणांसह प्राप्त होतो. पूर्वीं एके काळीं सप्तर्षींच्या बायका कार्तिकस्वामीचा गर्भ धारण केल्यामुळें पतींनीं टाकलेल्या अशा ह्या अरण्यांतून त्या अरण्यांत इकडेतिकडे फिरूं लागल्या. पुढें कांहीं दिवसानंतर नारदऋषींची गाठ पडली असतां ऋषिपत्न्या नारदास विचारतात; हे नारदा! आम्हाला आमच्या पतींनीं कां टाकलें तें समजत नाहीं. आतां आमचें लौकिक पाप कशानें नाहींसे होईल, तें सांगा. नंतर नारद म्हणतात; महाकालवनांत गयातीर्थ व अक्षय्यवट हीं दोन स्थानें पवित्र आहेत. त्याठिकाणीं गेलें असतां

पाप नष्ट होऊन सर्वप्रकारचें सुख मिळतें. ह्याप्रमाणें नारदाचें भाषण ऐकून ऋषिपत्न्या गयातीर्थाचे ठिकाणीं जाऊन स्नानदान; व उपोषण करून भाद्रपद शुद्ध पंचमीला अक्षय्यवटाचें पूजन केल्याचे योगानें सर्व पापापासून मुक्त झाल्या; व आपआपल्या पतीकडे जाऊन सुखानें गृहस्थाश्रम करूं लागल्या. ज्या कोणी स्त्रिया गयातीर्थाचे ठिकाणीं भाद्रपद शुद्ध पंचमीला स्नानदानादि करितील, त्यांना वैधव्य कधींहि प्राप्त होणार नाहीं. पुत्र, धन व धान्य इत्यादि-कांचीहि समृद्धि होईल. अवन्तीमध्यें गयातीर्थ हें सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ आहे. गयातीर्थाचे ठिकाणीं स्नानादि केलीं असतां जितकें पुण्य लागतें तितकें पुण्य देणारें तीर्थ संपूर्ण ब्रह्मांडामध्यें म्हणजे त्रैलोक्यांत सुद्धां सांपडावयाचें नाहीं. गयातीर्थाचे ठिकाणीं केलेलीं स्नानदानादि कर्में अक्षय्य फल देणारीं आहेत; व सतत ऐहिक सुख देऊन वैकुंठलोकाची प्राप्ती करून देणारीं आहेत.

---

## अध्याय ६० वा.

### पुरुषोत्तमक्षेत्रमाहात्म्य.

सनत्कुमार सांगतात; व्यासा ! तुम्हाला पुरुषोत्तममाहात्म्य सांगतों. एकदा लक्ष्मीसह विष्णु सर्व देवासह बसले असतां लक्ष्मी विष्णूला म्हणते कीं, पुण्य-कारक तीर्थांचें माहात्म्य मला सांगा, असा लक्ष्मीचा प्रश्न ऐकून विष्णू लक्ष्मीला म्हणतात; उत्तम अशा पुण्यतीर्थाचे ठिकाणीं प्रत्येक पर्वणीला स्नानदानादि केलीं असतां सर्व पापें नाहिंशीं होऊन ते अंतीं शिवलोकाला जातात. जे कोणी प्राणी अधिकमहिन्यामध्यें व्रतादि करीत नाहींत, ते प्रत्येक जन्मामध्यें दरिद्री होऊन दुःखांत काळ घालवितात. आतां अधिक महिन्यांतील नियम सांगतों; ऐका. क्षौरकर्म, मुंज वगैरे कृत्यें, लग्नादि विधी, हे सर्व अधिक महिन्यांत करूं नयेत. ज्या महिन्यांत सूर्यसंक्रान्त नाहीं त्या महिन्याला अधिकमास म्हणतात; व तो तीन वर्षांनीं येतो. अधिकमासाचा अधिपति पुरुषोत्तमदेवता आहे; करितां महाकालवनामध्यें असणाऱ्या पुरुषोत्तमक्षेत्रांत अधिक महिन्यामध्यें जाऊन तेथें पुरुषोत्तमाचें पूजन करणारा सर्व पापापासून मुक्त होतो. अधिकमासामध्यें स्नान, दान, जप, होम, स्वाध्याय, श्राद्धविधि, देवपूजा वगैरे केलेलीं कृत्यें अक्षय्य फल देणारीं होतात. अधिकमहिन्यांत कृष्णपक्षांतील चतुर्दशी, नवमी वगैरे दिवशीं सकाळीं उठून; व नित्यक्रिया उरकून पुरुषोत्तमाचें पूजन करावें; व एकभुक्त करावें. सपत्नीक ब्राह्मणांना आमंत्रण करावें; व पूजनानंतर पुरुषोत्तमास अर्घ्य द्यावीं; व शेवटीं पुरुषोत्तमाची प्रार्थना करावी; व दांपत्यभोजन घालावें. विद्वान् ब्राह्मणांस तांबूल; व दक्षिणा देऊन संतुष्ट ठेवावें. नंतर त्या दांपत्यास लक्ष्मी-

नारायण स्वरूप समजून त्यांच्या हातांत मोदक देऊन त्यास सीमेपर्यंत पोंचवावें. ह्याप्रमाणें हा अधिकमहिन्यांतील नियम ज्या स्त्रिया किंवा पुरुष पाळतील त्यांस दारिद्र्य, पुत्रशोक वगैरे कधींहि प्राप्त होणार नाहींत; व अंतीं मोक्ष मिळेल.

---

## अध्याय ६१ वा.

### अधिकमासमाहात्म्य

जो मनुष्य अधिकमास आला असतां महाकालवनांत न राहतां दुसरीकडे राहतो, तो महामूर्ख समजावा. जो अधिकमहिन्यांत महाकालवनांत असणाऱ्या पुरुषोतमक्षेत्रांत स्नानदानादि करितो, त्यास पुण्यलोक प्राप्त होतात. जे कोणी पुरुषोत्तमाची पूजा करून वटवृक्षाची पूजा करितात; व नंतर शंकर–पार्वतीला भजतात, त्यांचे इच्छित मनोरथ सफल होतात; व शेवटीं ते वैकुंठाला जातात. भाद्रपद शुक्ल एकादशीला उपोषण करून रात्रीं जागरण करणारा; व पुरुषोत्तमाचें पूजन करून पुरुषोत्तमसरोवराचे ठिकाणीं जलयात्रा करणारा पुत्रवान् व दीर्घायु होऊन त्रैलोक्यांत श्रेष्ठ होतो. ज्याठिकाणीं भगीरथराजानें तपश्चर्या करून भागिरथी पृथ्वीवर आणिली त्याठिकाणी स्नान करून तीळ व गाय ब्राह्मणास देणारास सर्वप्रकारच्या यज्ञांचें फल मिळतें; व संतति वगैरे सौख्यहि त्यास प्राप्त होतें. जटेश्वराच्या ईशान्य दिशेला परशुरामानें तप करून विश्वामित्री नदी तेथें आणिली. त्याठिकाणी स्नानादि केलीं असतां सर्व प्रकाराचें ब्रह्महत्त्यादि दोष नाहींसे होतात; व तेथील रामेश्वराच्या दर्शनानें मोक्ष मिळतो.

---

## अध्याय ६२ वा.

### गोमतीतीर्थमाहात्म्य.

गोमती नदी ही सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ आहे; व कृष्ण हा सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहे. द्वारकेसारखी दुसरी जगामध्यें श्रेष्ठ नगरी नाही, असा निश्चय करून शौनकादि ऋषी; व सांदीपनी हे स्नानसंध्यादि करण्याकरितां गोमतीनदीचे काठीं राहते झाले. कांहीं दिवस गेल्यावर बलराम व कृष्ण हे सांदीपनीकडे विद्या शिकण्याकरितां आले. एकेदिवशीं सकाळीं सादीपनी गुरु कोठें दिसत नाहींत, असें पाहून बलराम व कृष्ण ह्यांनीं सांदीपनीच्या बायकोजवळ चौकशी केली; व ते इकडेतिकडे गुरूचा शोध करूं

लागले. कांहीं काळानंतर गुरु सांदीपनी आपल्या घरीं आल्यावर बलराम व कृष्ण ह्यांनीं नमस्कार करून कोठें गेला होता, वगैरे विचारिलें. नंतर सांदीपनी म्हणतात; हे कृष्णरामहो. आम्हास गोमतीस्नानाचें एक व्रत करावयाचें आहे, तेव्हां त्याकरितां मी गोमतीनदीवर स्नानाकरितां गेलों होतो. आज भाद्रपद कृष्ण अष्टमी असल्यामुळें आज जे कोणी गोमतीव्रत करितील; व रात्रीं जागरण करून उपोषणादि करितील ते सर्व पापापासून मुक्त होतील.

---

# अध्याय ६३ वा.

## वामनकुण्डमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; व्यासा ! पूर्वीं विष्णूचा भक्त प्रल्हाद या नांवाचा एक दैत्य होता. त्याचा नातू बलि. तो त्रैलोक्य आपल्या ताब्यांत घेऊन त्यावर आपली सत्ता चालवीत होता. एकदा सभेमध्यें दैत्यांसह बलि बसला असतां तेथें नारद ऋषि आला; व त्यानें बलीची पुष्कळप्रकारें स्तुति केली. कांहीं दिवसांनीं बलीनें इंद्रादि देवांचा पराजय केल्यामुळें ते ब्रह्मदेवाकडे गेले. नंतर ब्रह्मदेव देवांस म्हणतात कीं, तुम्ही पद्मावती नगरीला जाऊन; व विष्णुसरोवराचेठिकाणीं स्नान करून विष्णूची पूजा करा; म्हणजे तुम्हाला स्वर्गसुख पूर्वींप्रमाणें प्राप्त होईल. नंतर सर्व देवांनीं मिळून ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें स्नानादि केल्यावर विष्णूची उपासना कशी करावी, असा देवांनीं ब्रह्मदेवास प्रश्न केला असतां ब्रह्मदेव सांगतात; देवहो ! प्रथम निर्विघ्नपणें कार्यसिद्धि होण्याकरितां गणपतीची प्रार्थना " **शुक्लाम्बरधरं देवं** " पासून तों " **गणाधिपतये नमः** " पर्यंत म्हणून करावी. नतर कलश, शंख व घंटा ह्यांचें पूजन झाल्यावर पुरुषसूक्तमंत्रानें षोडशोपचार विष्णूची पूजा करावी. हा विधि दुष्ट व वेदनिंदक यांस सांगूं नये. विष्णूला फुलें वगैरे वाहिल्यावर विष्णूसहस्त्रनाम म्हणून विष्णूवर तुळशी घालाव्या. ज्या विष्णुसहस्त्रनामस्तोत्राचा मार्कंडेय ऋषी असून विष्णु ही देवता आहे, असें हें स्तोत्र मी सर्व इच्छित कार्यें सिद्धीस जाण्याकरितां पठण करितों, असें म्हणून विष्णूचें ध्यान करून विष्णुसहस्त्रनामाला प्रारंभ करावा. नंतर " **विश्वं विष्णुर्हृषीकेशः** " येथ पासून तों " **मांगल्यः सर्वमंगलः** " येथपर्यंत एक हजार आठ विष्णूचीं नांवें पठण केल्यावर त्याची फलश्रुति म्हणून; व विष्णुसहस्त्रनामांची संपूर्णता करून विष्णूला हजार तुळशी वाहिल्यावर त्याची प्रार्थना करून पूजासमाप्ति करावी. ह्याप्रमाणें देवांनीं विष्णूची पूजा केल्यावर विष्णु प्रसन्न होऊन देवांस 'वर मागा' असें म्हणतें

झाले. नंतर देव म्हणतात कीं, बलीनें आम्हाला स्वर्गातून हाकलून लाविलें; व तो स्वतः स्वर्गाचें राज्य करीत आहे. तेव्हां बलीचा नाश करून आमचें स्थान आम्हास परत मिळावें. असें ऐकताच विष्णु बरें आहे, असें म्हणून गुप्त झाले. नंतर कांहीं दिवसांनीं विष्णूनें वामनावतार घेऊन बटुवेषानें बलीजवळ तीन पावलें भूमिदान मागण्याच्या मिषानें बलीला पाताळीं घालून इंद्राला स्वर्गासनावर बसविलें. व स्वतः कुमुद्वतीक्षेत्रामध्यें राहून एक आपल्या नांवानें तेथें कुंड निर्माण केलें. त्यासच वामनकुंड म्हणतात. भाद्रपद शुद्ध द्वादशीला वामनकुण्डाचेठिकाणीं स्नान करून जागरण करणारा ब्रह्मलोकाला जातो.

---

## अध्याय ६४ वा.

### कालभैरवतीर्थयात्रा.

पूर्वी कालीनांवाच्या योगिनीनें भैरवाचें पुत्राप्रमाणें पालन केलें. नंतर त्यानें महामारी, पूतना, कृत्या, शकुनी, रेवती, खला, कोटरी, तामसी, माया, ह्या नऊ मातृका आपल्या ताब्यांत घेतल्या; व त्यांसह कालभैरव शिप्रानदीचे काठीं राहता झाला. जे कोणी आषाढ शुक्लपक्षांतील रविवारीं विशेषेंकरून नवमी, अष्टमी किंवा चतुर्दशी ह्या तिथींवर कालभैरवाचें पूजन करितात; व तसेच विवाहादि मंगल कृत्यामध्यें अनेकप्रकारें त्याची गंधादि उपचारांनीं अर्चा करितात; त्यांचीं सर्व कार्यें सिद्धीस जातात. भैरवाची अनेकतऱ्हेनें स्तुति करून त्यास प्रसन्न करून घेतल्यास; व भैरवाष्टकाचें सतत पठन केल्यास वाईट स्वप्नें कधींहि पडत नाहींत; व सर्व इच्छित गोष्टी सिद्धीस जातात. ह्या तीर्थाचेठिकाणीं स्नानादि करणारास संसारभयाची भीति राहत नाहीं. ह्याकरितां अवश्य सुखेच्छूनें कालभैरवतीर्थाचेठिकाणीं स्नान करून कालभैरवाचें पूजन करावें.

---

## अध्याय ६५ वा.

### नागतीर्थमाहात्म्य.

आतां तुम्हाला नागतीर्थाचें माहात्म्य सांगतों. पूर्वी जनमेजयानें सर्पसत्र करून सर्व साप जाळून टाकिल्यावर कांहीं शिल्लक राहिलेले साप आस्तिकऋषीच्या कृपेनें जिवंत राहिले; व ते जरत्कारूचा मुलगा जो आस्तिक त्यास विचारिते झाले कीं, आम्हाला सुखानें राहतां येईल असें एकादें स्थान दाखवा. नंतर आस्तिक म्हणतात;

सर्पहो, महाकालवनामध्यें कुशस्थलीनांवाचें एक क्षेत्र आहे, त्याच्या दक्षिणदिशेला नागालयनांवाचें एक स्थान आहे, जेथें पुष्कळ सर्प राहत असून प्रत्यक्ष भगवान् विष्णु शेषावर शयन केलेले असे त्याठिकाणीं राहतात. तेथें तुम्हाला प्रलय-कालाचीहि बाधा होणार नाहीं. जेथें बकदाल्भ्यऋषी तप करितात, लोमशऋषी जेथें राहतात, मार्कंडेयऋषींनीं जेथें तप करून पुष्कळ वर्षें आयुष्य मिळविलें. जेथें कपिलमहामुनि, हरिश्चंद्र, सप्तर्षि वगैरे मोठमोठ्या ऋषींना सिद्धी प्राप्त झाल्या, तेथें तुम्ही राहा; म्हणजे तुम्हाला कोणाचीहि पीडा होणार नाहीं. ह्याप्रमाणें आस्तीकाचें भाषण ऐकून एलापत्र, कंबल, कर्कोटक, धनंजय, वासुकि, तक्षक, नील, पद्मक, अर्बुद वगैरे सर्व साप नागालयाचेठिकाणीं येऊन राहते झाले. नंतर त्या सर्पांनीं आपआपल्या नांवाचें एक एक कुंड अशीं नऊ कुंडें निर्माण केलीं; व त्यांस नागतीर्थ हें नांव प्राप्त झालें. ह्याठिकाणीं स्नानदानादि करणा-रांचीं सर्व पातकें नाहींशी होऊन त्यांस ऐहिक सुख मिळून वैकुंठलोक प्राप्त होतो.

---

## अध्याय ६६ वा.

### नृसिंहतीर्थमाहात्म्य.

सनत्कुमार म्हणतात; मी तुम्हाला नृसिंहतीर्थाचें माहात्म्य सांगतों, ज्याच्या दर्शनानें सर्व पातकें नाहींशीं होतात. पूर्वी हिरण्यकशिपू नांवाचा एक दैत्य होता. त्यानें सर्व पृथ्वी जिंकून टाकिली; व जिकडेतिकडे पापाचरण होऊं लागलें; त्यावेळीं पृथ्वीला तें पाप सहन न होऊन ती गाईचें रूप घेऊन ब्रह्म-देवाकडे गेली. तेव्हां ब्रह्मदेव म्हणतात; हे पृथ्वी! हिरण्यकशिपूनें गायत्रीची आराधना करून घोर तपश्चर्या केली असल्यामुळें त्यास मी प्रसन्न होऊन वर दिला आहे कीं, तुला दिवसा, रात्रीं, आकाशांत, पृथ्वीवर, शुष्क किंवा ओल्या पदार्थानें किंवा शस्त्रास्त्रादिकानें, देवदैत्यांकडून किंवा गंधर्व, यक्ष वगैरेकडून मरण येणार नाहीं. यामुळें हा दैत्य उन्मत्त होऊन सर्वांस पीडा देत आहे; करितां तूं महाकालवनांत जाऊन नृसिंहतीर्थाचे ठिकाणीं स्नानदानादि कर. असें ब्रह्मवाक्य ऐकतांच गाईचें रूप धारण केलेल्या पृथ्वीनें सर्व देवांसह महा-कालवनांत असणाऱ्या नृसिंहतीर्थांत स्नानदानादि केलीं असतां नृसिंह प्रसन्न होऊन त्याकडून हिरण्यकशिपूचा वध करवून त्रैलोक्याचें रक्षण केलें. जे कोणी नृसिंहतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून नृसिंहेश्वराचें पूजन करितील, ते लक्ष्मी-वान् व दुःखमुक्त होऊन वैकुंठाला प्राप्त होतील. त्यानंतर अगस्त्येश्वराचें पूजन करावें, त्यायोगें सर्व सिद्धी प्राप्त होतात. ज्या अगस्त्येश्वराच्या पूजनानें

मारुतीलाहि सिद्धि प्राप्त झाली. त्याचठिकाणीं असणाऱ्या अगस्त्यवटाखालीं पुरुष किंवा स्त्री सावित्रीच्या व्रताचें आचरण करील, तीस अखंड सौभाग्य प्राप्त होईल. ह्या अगस्त्यवटाचें ठिकाणीं स्नान करून; व सौभाग्यवायनें ब्राह्मणास देऊन सप्तधान्यावर सुवर्णाची तयार केलेली सावित्रीची मूर्ती स्थापित करावी; व तिचें यथाविधि पूजन करून व्रत करावें; म्हणजे वैधव्यादि प्राप्त होणार नाहींत.

## अध्याय ६७ वा.

### कुटुंबेश्वरमाहात्म्य.

सर्व तीर्थामध्यें कुटुंबेश्वर तीर्थ हें उत्तम आहे. ज्या तीर्थाचें ठिकाणीं स्नान केलें असतां मनुष्य कुटुंबी म्हणजे स्त्रीपुत्रयुक्त होतो. पूर्वी दक्षानें कुटुंबाच्या वृद्धीकरितां ह्याठिकाणीं तप केलें. नारदऋषीला ह्याच तीर्थाचे ठिकाणीं साठ पुत्र झाले. ब्रह्मदेवानेंहि ह्या ठिकाणीं घोर तपश्चर्या करून निष्पाप असें सुंदर रूप प्राप्त करून घेतलें. शंकरसुद्धां ह्याच कुटुंबतीर्थाचे ठिकाणीं स्नानदानादि करून ब्रह्मपदाला प्राप्त झाला. ह्या तीर्थाचे ठिकाणीं जे कोणी स्नान करितील त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन अंतकालीं ते शिवलोकीं गमन करितील. ह्याठिकाणीं फाल्गुन शुद्ध त्रयोदशी किंवा चतुर्दशी ह्या दिवशीं स्नानादि करून व उपोषण करून ब्राह्मणाला कोहाळा दान द्यावा; व जागरणादि करावें; म्हणजे तो सर्व पापापासून मुक्त होतो; व शेवटीं शिवलोकाला गमन करितो. ह्या तीर्थाचे ठिकाणीं ब्राह्मणभोजन घालणारास हजार कपिलागाई दान दिल्याचें पुण्य लागतें.

## अध्याय ६८ वा.

### अखंडेश्वराचें माहात्म्य.

शिप्रानदीच्या पूर्वेस माधवतीर्थ आहे. त्याठिकाणीं स्नान करून आनंदभैरवाचें पूजन केलें असतां सर्वपातकांचा नाश होतो. ज्येष्ठ शुद्ध दशमीला बुधवारीं हस्तनक्षत्रावर गरकरण असतां व व्यतिपातयोग असतां, कन्याराशीला चंद्र व वृषभराशीला सूर्य असतां गंगेचा जन्म झाला; करितां त्या दिवशीं गंगेवर स्नानदानादि केल्यास सर्व तीर्थाचेठिकाणीं स्नान केल्याचें फल मिळतें. तसेंच अखंडेश्वराचें पूजन केलें असतां गंगास्नानाचें फल मिळतें; व ही अखंडेश्वराची कथा श्रवण केली असतां व्रतभंगकेल्याचें पातक नाहींसें होतें; एक धर्मशर्मा

ह्या नांवाचा ब्राह्मण होता. कांहीं कारणामुळें त्याचें व्रत खंडित झालें; त्यावेळीं नारदऋषि येऊन त्या ब्राह्मणास म्हणतात कीं, तुझ्या आरंभलेल्या व्रतांत विघ्नें कां येतात तें सांगतों; ऐक. पूर्वींच्या जन्मीं तूं ब्रह्मदत्त नांवाचा वेद व ब्राह्मण यांची निंदा करणारा असा ब्राह्मण होतास. तूं धनलोभी व अधर्मवर्तन करणारा असल्यामुळें तुला दुःखानें सर्वत्र भ्रमण करणें भाग पडलें; व शेवटीं दुर्वर्तन करणारा असा तूं कांहीं काळानें गोदावरीनदीच्या काठीं मृत झालास. नंतर तुला यमदूतांनीं यमलोकीं नेऊन यमापुढें उभें केलें. नंतर यमानें तुझें पुण्यपाप यमदूतांस विचारिलें असतां; यमदूत म्हणतात कीं, ह्यानें आजपर्यंत एकहि पुण्यकर्म केलें नाहीं. नंतर यमानें सांगितलें कीं, ज्यापेक्षां ह्याचें शरीर गोदावरीचे काठीं मृत झालें आहे, त्यापेक्षां हा यमलोकीं राहण्यास अयोग्य आहे; व ह्याचें सर्व पाप दूर झालें आहे, नंतर यमाच्या सांगण्यावरून दूतांनीं तुला पृथ्वीवर सोडिलें; व तुझें गोदावरीचे काठीं पूर्वजन्मीं देहविसर्जन झाल्यामुळें हा तुला ब्राह्मणाचा जन्म प्राप्त झाला आहे. मात्र पूर्वजन्मांतील पापसंचयाच्या योगें ह्या जन्मांतील तुझीं व्रतादि पुण्यकृत्यें शेवटास जात नाहींत. ह्याप्रमाणें नारदाचें भाषण ऐकून ब्राह्मण म्हणतो कीं, हें माझें पूर्वजन्माचें पातक कशानें नाहींसें होईल, तें सांगा. नंतर नारद म्हणतात; हे ब्राह्मणा! महाकालवनामध्यें रुद्रसरनांवाचें तीर्थ आहे. त्याच्या उत्तरदिशेला अखंडसरनांवाचें तीर्थ आहे. त्याठिकाणीं स्नान करून अखंडेश्वराचें पूजन केल्यास तुझें सर्व पाप नाहींसें होऊन तुझीं सर्व व्रतें निर्विघ्नपणें शेवटास जातील; व ह्यालोकीं तुला अखंडसुख मिळून शेवटीं शिवलोकांत जाऊन तेथें अखंडकालपर्यंत राहावयास मिळेल. ह्याप्रमाणें ऐकून तो ब्राह्मण त्याठिकाणीं स्नानादि केल्यामुळें सर्वपापापासून मुक्त होऊन, अंतकाळीं शिवलोकीं गेला.

## अध्याय ६९ वा.

### कर्कराजतीर्थमाहात्म्य.

पूर्वी ब्रह्मदेवानें मार्कंडेयाला कर्कराजतीर्थाचें माहात्म्य सांगितलें; ज्याच्या दर्शनानें सर्व पातकांचा नाश होतो. जे दक्षिणायनामध्यें मृत होतात त्यांस मुक्ति मिळावी, ह्या सादृच्छेनें हें कर्कराजतीर्थ परमेश्वरानें निर्माण केलें आहे. नंतर मार्कंडेयानें ब्रह्मदेवास चातुर्मास्यनियम विचारिले असतां ब्रह्मदेव म्हणतात; हे मार्कंडेया! चातुर्मास्यामध्यें विष्णूचीच व्रतें बहुधा करावीं. जो मनुष्य चातुर्मास्यांत व्रतादि नियम पाळीत नाहीं, त्याचें पुण्य निरुपयोगी आहे, असें समजावें. चातुर्मास्यांत कर्कराजतीर्थाचे ठिकाणीं स्नानादि केल्यास स्वर्गांत देवाप्रमाणें

आनंदानें राहता येतें. पुष्कर, प्रयाग, किंवा इतर कोणत्याहि पुण्यकारक तीर्थांत चातुर्मास्यांत स्नानादि केलीं असतां असंख्य पुण्य प्राप्त होतें. नर्मदानदीचे ठिकाणीं स्नान करून सूर्याची उपासना करणारास कधींहि दुःख प्राप्त होत नाहीं. पृथ्वीवर जितकीं तीर्थें, क्षेत्रें, व इतर पुण्यस्थानें आहेत तीं सर्व कर्कराजतीर्थाचे ठिकाणीं राहतात, तेव्हां तेथें स्नान केलें असतां दुसरीं तीर्थें पाहण्याची जरूरी नाहीं. जे कोणी ही कथा श्रवण करतील ते अंतकाळीं वैकुंठलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ७० वा.

### तीर्थयात्रानुक्रम.

मेरुपर्वताच्या दक्षिणेला व दुग्धकुंडाच्या उत्तरेला एक ऋषभनांवाचा पर्वत आहे. त्या पर्वतावर एक रम्यसर नांवाचें तीर्थ आहे. भाद्रपद शुद्ध अष्टमीला ह्या तीर्थावर स्नान केलें असतां शिवलोक प्राप्त होतो. मेरुपर्वताच्या ईशान्य दिशेला एक बिंदुसरतीर्थ आहे. त्याठिकाणीं त्यातीर्थाच्या दर्शनाकरितां प्रत्यक्ष गंगा, सरस्वती, शरयू वगैरे नद्या नित्य येतात. तेथें स्नान केलें असतां सर्व मनोरथ सफल होतात. नंतर व्यासांनीं सनत्कुमारास विचारिलें कीं, अवंतीक्षेत्रांत एकंदर तीर्थें किती आहेत. त्या नंतर सनत्कुमार सांगतात; हे व्यास! संपूर्ण तीर्थांचें वर्णन करणें जरी ब्रह्मदेवालासुद्धां अशक्य आहे, तरी मुख्य तीर्थें किती आहेत, हें तुम्हास थोडक्यांत सांगतों. कुमुद्वतीनगरीमध्यें मुख्य नद्या चार आहेत, चौऱ्यांयशी लिंगें आहेत, आठ भैरव आहेत, अकरा रुद्र व बारा सूर्य, साहा विनायक, चोवीस देवता, सहा विष्णु, वगैरे देवतांची स्थानें आहेत. त्याप्रमाणें अगस्त्येश्वर, गुहेश्वर, ढुंडेश्वर, डमरुकेश्वर, अनादिकल्पेश्वर, स्वर्णजालेश्वर, त्रिविष्टपेश्वर, कपालेश्वर, कर्कोटकेश्वर, सिद्धेश्वर, स्वर्गद्वारेश्वर, लोकपालेश्वर कामेश्वर, कुटुंबेश्वर, इंद्रद्युम्नेश्वर, ईशानेश्वर, अप्सरेश्वर, कल्कलेश्वर, नागचंडेश्वर, प्रतिहारेश्वर, कुक्कुटेश्वर, मेघनादेश्वर, महाकालेश्वर, मुक्तेश्वर, सोमेश्वर, अनरकेश्वर, जटेश्वर, रामेश्वर, च्यवनेश्वर, अखंडेश्वर, पत्तनेश्वर, आनंदेश्वर, कंथडेश्वर, इंद्रेश्वर, मार्कंडेयेश्वर, शिवेश्वर, कुसुमेश्वर, अक्रूरेश्वर, कुंडेश्वर, लुंपेश्वर, गंगेश्वर, शूलेश्वर, ॐकारेश्वर, कंटकेश्वर, सिंहेश्वर, वगैरे असंख्य तीर्थें अवंतीनगरीमध्यें आहेत. ज्या तीर्थाचें; व ज्या देवाचें जें नांव त्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून त्या देवाचें त्या त्या मंत्रानें पूजन केलें असतां पूजा करणारास फलप्राप्ती होते; अपुत्राला पुत्रप्राप्त होतो; व अविद्वानाला विद्या प्राप्त होऊन; व विजय मिळवून तो शेवटीं निष्पाप असा शिवलोकीं जातो.

---

